

# कादंबरीमय पेशवाई

११

# पेशवाईतील उत्तर-दिग्विजय

लेखक

**विठ्ठल वामन हडप**

१९३१

पडी मत २ रुपये — किंमत [redacted]

प्रकाशक
बळवंत विष्णु परचुरे
परचुरे, पुराणिक आणि मंडळी,
बुकसेलर्स व पब्लिशर्स, माधवबाग, मुंबई नं. ४.



मुद्रक
अनंत सखाराम गोखले
'विजय' प्रेस, ५७० शनवार, पुणें.

# भूमिका

'पेशवाईतील उत्तर-दिग्विजय' ही 'कादंबरीमय पेशवाई' मालेंतील अकरावी कादंबरी होय. 'भोपाळचें युद्ध हा मराठे-मोगलांच्या झगड्याचा पहिला निकर होय. पुढें पानपतचा प्रसंग तरी याच सांखळींतला दुसरा एक निकर समजला पाहिजे. मात्र त्या वेळच्या वातावरणाच्या व्यक्ति वेगळ्या. मोगलांच्या बाजूचीं कारस्थानें निजाम हालवीत होता, तर नानासाहेबांच्या वेळीं तें काम नजीब खानानें केलें. समग्र मोगल बादशाहीची एकवटलेली सत्ता निजामानें भोपाळच्या संग्रामांत बाजिरावावर ओतली. वेळ मोठी आणीबाणीची होती. जर का बाजीराव हरला असता, तर मराठे पुन्हा वर डोकें काढूं शकले नसते; आणि शत्रूच्या दरबारांत बाजिरावाचा पाडाव होऊन पेशव्यांचें कर्तृत्व संपलें असतें. कठीण प्रसंगांत धैर्यानें उडी घालून यश संपादन करणें, हा जो थोर व्यक्तींचा गुण तोच भोपाळावर बाजिरावानें दाखविला आणि मराठशाहीत वाहवा मिळविली. सर्व सरदार बाजिरावाला भजत होते, छत्रपतींची त्याजवर मर्जी होती, म्हणून नाना युक्त्यांनीं शत्रूस हैराण करून बाजिरावास आपला डाव सिद्धीस नेतां आला' (म. रि, म. वि. १). ह्या शब्दांत प्रस्तुत कादंबरीच्या प्रतिपाद्य विषयाचा स्थूल पण ठळक आराखडा आला आहे. वस्तुतः हा प्रस्तुत कादंबरींतील उत्तर-दिग्विजयाचा प्रसंग वसईच्या धर्मसंग्रामाच्या पूर्वीचा; असें असतां, 'पेशवाईतील धर्मसंग्राम' प्रस्तुत मालेंत पूर्वीं प्रथित करण्यांत आला, याचें कारण जें धर्मसंग्रामाच्या भूमिकेंत सांगितलें आहे तेंच इथेंही सांगावयाचें कीं, धर्मसंग्रामाचीं कारणें उत्तर दिग्विजयाच्या कारणाहून फार खोल व पूर्वींचीं होतीं; म्हणून त्या प्रसंगाची योजना उत्तर दिग्विजयाच्या पूर्वीं करण्यांत आली.

बाजिरावांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या राजकीय घडामोडींची चर्चा प्रस्तुत मालेंतील पांचव्या कादंबरीपासून तों प्रस्तुतच्या अकराव्या कादंबरीपावेतों क्रमशः करण्यांत आली आहे. त्या लोकोत्तर पुरुषाच्या आयुष्यरूपी रत्नाकरांत निमज्जन करतांच अतुल प्रतापरूपी परमदेदीप्यमान रत्नांच्या अत्युज्ज्वल प्रभेनें दृष्टि दिपावते व कोणतें रत्न उचलूं आणि कोणतें उचलूं नको अशा उत्तंबळींत गुरफटलेलें मन क्षणैक भांबावून जातें. रत्नाकराच्या तळाशीं असलेलीं असंख्य रत्नें वेंचून घेणें कोणत्याही पट्टीच्या पाणबुड्याला देखील सर्वथैव अशक्य असतें. मनाला फार वाटतें, कीं तेथली सर्वच दौलत लुटून आणावी. पण तेवढें सामर्थ्य

व तेवढी दमछाट कोठून आणावी ? बाजिरावांच्या कारकीर्दीतील प्रसंग निवडून मालेच्या मर्यादित क्षेत्रांत त्यांची मांडणी करतांना माझी थेट अशीच गाळण उडाली हें मी प्रांजलपणें कबूल करतों. स्थल-काल-मर्यादा माझ्या मार्गांत नसती तर ह्या एकाच पेशव्याची यशोगीतें कथारूपानें गाण्यांत मला शीण न येतां व कल्पकतेची वाण न भासतांही माझें आयुष्य त्या कार्याला खास अपुरें पडलें असतें. ह्या अनेकविध भयामुळेंच मीं मूळपासून शक्य तितकी आवराआवर करण्याचा प्रयत्न करीत असतों. मराठी साम्राज्याच्या वैभवरवीची माध्यान्ह यापुढील पेशव्याच्या श्रीमंत नानासाहेबांच्या कारकीर्दींत उगवली हें जरी खरें, तरी पेशवे वंशांतील लोकोत्तर व सर्वांगीण कर्तबगारीचा रवि बाजिरावांच्याच कारकीर्दींत माध्यान्हीं आरूढ झाला, व त्यांच्या आयुष्याच्या अखेरीला पश्चिमेकडे कलला, असें मला निश्चितपणें वाटतें.

आणि म्हणूनच बाजीराव पेशव्यांच्या निधनामुळें पेशवाईवर एक गण्डान्तर कोसळलें असें कबूल करणें क्रमप्राप्त आहे. या गण्डान्तराची मीमांसा करतांना बाजीराव पेशव्यांना जाचक झालेला किंबहुना त्यांच्या अकालीं अंताला अप्रत्यक्षत: कारण झालेला गृहकलह, बाजीराव मस्तानी या अनुरूप दंपत्याचें परस्परांवरील दिव्य प्रेम, सामाजिक दृष्ट्यां त्या काळीं पाण्यांत पडून वांया गेलेल्या सूर्यकिरणाप्रमाणें अस्थानीं ठरलेली त्यांची प्रगतिप्रियता, वगैरे अनेक हृदयस्पर्शी प्रसंग हे पेशवाईवरील गण्डान्तराचे अंगभूत होत म्हणून, त्याप्रमाणेंच बाजिरावांची खरी योग्यता आणि पेशवाईच्या उत्कर्षापकर्षाची कार्यकारणमीमांसा वाचकांच्या विचारपंथांत आणून देणें पेशवाईच्या इतिहासांतील समतोल सत्यकथनाच्या दृष्टीनें अत्यावश्यक आहे यास्तव, बाजीराव उत्तर दिग्विजय संपादून पुण्याला आल्यापासून तों पुणें-सातारा एथें त्यांच्या घरांतील कलह-त्या कलहाला विटून त्यांना नासीरजंगावरील स्वारीच्या निमित्तानें वैतागून घराबाहेर पडावें लागलें व त्या वैतागांतच त्यांचा रावेरखेड येथें अंत झाला, एथवरच्या घडामोडींना आधारभूत धरून

**पेशवाईवरील गण्डान्तर**

ही 'कादंबरीमय पेशवाई'मधील पुढची म्हणजे बारावी कादंबरी विरचिली गेली असून ती यथानियम प्रसिद्ध होईल.

त्र्यंकटपुरा-सातारा,
तारीख १।१।१९३१.

**विठ्ठल वामन हडप**

# पेशवाईतील उत्तर-दिग्विजय

## विषयप्रवेश

दिल्लीच्या बादशहानें आपल्या कारभारी मंडळाच्या अनुमतीनें निजामाला दिल्लीला येण्याविषयीं गौरवपूर्वक आमंत्रण दिलें,* ही बातमी श्रीमंत बाजीराव पेशव्यांना दिल्लीतील त्यांचे वकील महादेवभटजी हिंगणे यांच्या मार्फत कळली. तेव्हांच बाजिरावांनीं मनांत खूणगांठ बांधली कीं, चौथाई-सरदेशमुखीच्या सनदांबाबत व माळव्याचा सुभा बादशहाच्या सही-शिक्यानिशीं आपणांला मिळण्याबाबत सुरू असलेल्या राजकारणांत निजाम पडल्यानें दुधाच्या हंड्यांत मिठाचा खडा पडल्यासारखी अवस्था होणार. त्याच कल्पनेनें भावी धोरण ठरविण्यासाठीं बाजिरावांनीं पुन्हा माळव्यांत ठाणें दिलें होतें; व जयपूरचा राजा जयसिंग याच्या मध्यस्थीनें दिल्लीच्या कारभारी मंडळांत आपणाला इष्ट

---

* तत्कालीन दिल्लीपति महंमदशहा, खानडौरान वगैरे त्याच्या प्रधान मंडळांतील बरेच बडे लोक आणि बादशाही सुभेदार वगैरे बादशाही प्रभावळींतील बहुतेकांना निजामाची धडाडी व त्याचा स्वसंपादित उत्कर्ष सहन होत नव्हता; म्हणूनच बादशहानें निजामाला दक्षिणची सुभेदारी सांगून त्याला तिकडे डाम्बून ठेविलें होतें. परंतु बाजीराव व चिमाजीअप्पा यांच्या प्रमुखत्वाखालीं मराठ्यांनीं बादशहाची व त्याच्या सर्व कारभाऱ्यांची हबेलंडी उडवून दिल्यामुळें त्यांना त्या परमसंकटांतून निजामाशिवाय अन्य त्राता दिसेना. निजामालाही बादशाही सत्तेच्या दुबळेपणाचा फायदा घेऊन दिल्लीच्या राजकारणांत आपलें प्रस्थ माजवावयाचें होतें. त्यानें प्रसंगावधान राखून त्या ऐनवेळीं बादशहातीची सेवा करण्याची आपली इच्छा बादशहाला कळविली, व बाजिरावाचा मोड करण्याची इच्छा आत्मविश्वासपूर्वक दर्शविली. बादशहाला व त्याच्या कारभाऱ्यांना तें तेव्हांच मान्य होऊन त्यांनीं ती 'पडत्या फळाची आज्ञा' घेऊन निजामाला मान्यतापूर्वक आमंत्रण दिलें.—History Of the Maratha People, Vol. II.

अशी कारवाई चालविली होती. ती कारवाई अयशस्वी झाली तर पुढें काय करावयाचें हें निश्चित ठरविण्यासाठीं शके १६६० मधील हिंवाळ्याच्या प्रारंभीं मांडवगडाच्या ईशान्येला तेव्हां असलेल्या गंभीरगडावर बाजीराव पेशवे, मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, पिलाजी जाधव व मल्हारराव बांडे ही सर्व मंडळी खलबतखान्यांत बसून खलबत करीत होती. त्या दिवशींच्या खलबतांतील वैशिष्ट्य हें कीं मराठ्यांशीं राजकीय संबंध ठेवण्याच्या बाबतींत बादशाही सरकार कोणतें धोरण ठेवील याविषयीं इतर खाशा मंडळीशीं बाजिरावाचा उघड उघड मतभेद झाला होता. हा मतभेद वस्तुतः जुनाच होता; पण बाजिरावांनीं तो आजच्याइतक्या उघड्या व तरवारीच्या धारेसारख्या तिखट भाषेंत यापूर्वी कधींच बोलून दाखविला नव्हता.

बोलतां बोलतां निजामाच्या नांवाचा संबंध संभाषणांत ओघामरसा आला; तेव्हां बाजिरावांनीं मल्हाररावांना विचारलें, "सुभेदार ! आज इतके दिवस निजाम-बादशाही कारभाऱ्यांच्या डोळ्यांत सदैव शल्याप्रमाणें सलणारा निजाम —जो इतके दिवस दिल्लींत बादशाही पाहुणचार झोडीत बसला आहे, तो जसा कांहीं आम्हांला बादशहाच्या छाताडावर नाचविण्याची संधि देण्यासाठींच असेल नाहीं ! "

"नाहीं, श्रीमंत ! इतकी सरळ बुद्धि निजामाला त्याच्या अल्लानें दिली असेल असें मी मुळींच म्हणत नाहीं. निजामाच्या अंतःकरणांत मराठ्यांविषयीं किती कालकूट भरलेलें आहे याची जशी आपणाला जाणीव आहे, तशीच मलाही पण आहे पण मी म्हणतों, प्रसंग पडल्यावर निजाम नव्हे साक्षात् त्याचा पैगंबर धांवून आला तरी काय करणार ! आज इतकीं वर्षें आम्हीं बादशाही सत्तेच्या छाताडावर नाचत गुजराथ-माळवा-बुंदेलखंड वगैरे सर्व भागांत जी मुलुखगिरी दंडेलीच्या जोरावर चालविली आहे, ती थांबविण्याइतकें पाणी बादशहाच्या कारभाऱ्यांपैकीं एकाच्याही अंगीं नाहीं. त्यांच्या अंगीं पराक्रम नाहीं, धडाडी नाहीं, परचक्रापासून स्वसंरक्षण करण्याची वकूब नाहीं, इतकेंच काय पण प्राप्त परिस्थितीचें आकलन करण्याइतकें तारतम्यज्ञानही त्यांच्या अंगीं नाहीं."

"म्हणून तर त्यांनीं निजामाला बोलावून घेतलें !"

"असेल. पण निजाम कांहीं तसा नाहीं. मराठ्यांचा दरारा त्याच्या चांगला प्रत्ययाला आलेला आहे. पालखेडाला मिळालेला कटु अनुभव निजाम आजन्म

विसरावयाचा नाहीं ‡. विषाची परीक्षा वारंवार पहाण्याइतका अदूरदर्शी अथवा पोकळ घमेंडखोर तो खास नाही."

"सुभेदार ! आम्ही स्पष्ट बोलतों याबद्दल राग मानूं नका; पण खरें पाहूं जातां तुमचा हा आत्मविश्वास घमेंडखोरपणाचा आहे. स्वाभिमानपूर्वक तुम्ही मराठ्यांचीं गौरवगीतें गातां हें ठीक आहे. पण गौरवांतील सत्यासत्याची भेसळ वस्तुस्थितीचें यथावत् ज्ञान करून देण्याला पुरेशी नसते. आपण मराठे सामर्थ्यवान नाहीं असें माझें म्हणणें नाहीं, पण तुम्ही समजतां इतका बादशाही पक्षही कमजोर नाहीं हा तुमचें मत मीं ग्राह्य धरलें असतें; पण तें केव्हां ? आज बादशहातीचें रक्षण करण्यासाठीं सर्व मुसलमान ज्याप्रमाणें आपसांतील सारे भेदभाव विसरून एक होण्याच्या उद्योगांत आहेत, त्याप्रमाणेच सारे हिंदु बादशहातीविरुद्ध एक झाले असते तर. पण तें तर शक्य नाहीं. हिंदुपदपादशाही एकट्या मराठ्यांची नाहीं; उलट आमच्या सध्यांच्या प्रयत्नांत तर माळवा, राजपुताना, बुंदेलखंड वगैरे भागांतील रजपुतादि हिंदूंच्याच भवितव्याचा संबंध विशेष आहे ह्या झगड्यांत हिंदूंना यश मिळाल्यास ह्या लोकांनाच स्वातंत्र्याची अमोल जोड मिळविण्याचा राजमार्ग निष्कंटक होणार आहे. असें असतांही अनुराधसिंग, कुंवर लक्ष्मणसिंगजी, दुर्जनसाल वगैरे मंडळी बादशहाच्या झेंड्याखालीं उभी राहून हिंदुपदपादशाहीच्या उद्योगाला कसून विरोध करीत आहेतच. रजपुतांचीच गोष्ट कशाला ? आम्हां मराठ्यांत तरी फाटाफूट काय कमी आहे ? दाभाडे, गायकवाड, भोंसले वगैरे मंडळी आमच्याशीं विनाकारण किती बाकानें व तेढानें वागतात हें तुम्ही पहातांच. मराठी साम्राज्याच्या वाढत्या वैभवाला लागलेलें हें आपसांतील यादवीचें खग्रास ग्रहण सुटण्याचीं कांहींच लक्षणें तूर्त तरी दिसत नाहीत. ह्या यादवीचा फायदा शत्रूनें तरी कां घेऊं नये ?" राणोजी शिंद्यांकडे वळून बाजीराव म्हणाले, "खरें कीं नाहीं राणोजीबाबा ! आम्ही म्हणतों ते ?"

"खरें आहे." राणोजी शिंदे उद्गारले.

"एकूण आपलें मत काय, कीं दिल्लीच्या दरबारांत आमच्याविषयीं सध्यां सुरू असलेल्या भानगडी सामोपचारांनीं मिटणार नाहींत ?" मल्हारराव होळकरांनीं बाजीरावांना प्रश्न केला.

---

‡ ही पालखेडची लढाई फेब्रुआरी, सन १७२८ मध्यें झाली. या लढाईंत बाजीरावांनीं निजामाचा खासा कोंडमारा करून त्याला शरण आणून ता. ६।३।१७२८ रोजीं मुंगी-शेवगांव एथें नामुष्कीनें तह करावयाला भाग पाडलें.

"अर्थात् ! त्या सामोपचारांनीं मिटणार नाहींत इतकेंच काय, पण मघाशीं सांगितलें तसा प्रकार होईल. मिठाचा खडा दुधाच्या हंड्यांत पडलेला असल्यानें सारें दूध नासल्याचें तुम्हां-आम्हांला आढळून येईल." बाजीराव उत्तरले.

"श्रीमंतांचा हा निराशावाद मला मान्य नाहीं" मल्हारराव म्हणाले. राणोजी शिंदे व पिलाजी जाधव त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागले.

"आम्ही निराशावादी आहों ही तुमची कल्पनाच अगदीं चूक आहे. असें पहा, निराशावादी आम्ही असतों तर एवढ्या विशाल बादशाही सत्तेशीं सध्यांच्या परिस्थितींत झुंज मांडलीच नसती. पूर्वी सांगितली तेवढीच आपसांतील तेढीची प्रतिकूलता आम्हांला नडते असें नाहीं; प्रत्यक्ष शाहूमहाराजांचें नेमस्त धोरण ही तर आमच्या मार्गांतील मोठीच धोंड आहे.* स्वातंत्र्यसंपादनाचा शब्द काढला कीं, महाराजांना जणुं आपल्या मस्तकावर आकाश कोसळून पडल्यासारखें वाटतें. महाराजांना बादशाही सत्ता परमेश्वराहूनही प्यार ! 'त्या सत्तेला चुकून तरी कुठें धक्का लावाल तर खबरदार' अशी आमच्या मागें त्यांची नेहमीं बोंचणी असते. बादशहा महाराजांना आपला दक्षिणेंतील नोकर मानतो, तरी त्यांची महाराजांना जरा देखील चीड वाटत नाहीं ! उलट बादशहाचा नोकर म्हणून घेण्यांत त्यांना भूषणच वाटतें ! ज्यांच्या नांवावर आम्ही सर्व मिळून एकजुटीनें हिंदुपदपादशाहीची भव्य इमारत उभारणार, त्यांनाच हा उद्योग इतका अप्रिय असल्यावर आम्हीं तरी काय करावयाचें ? बरें,महाराजांची ही मवाळपणाची इच्छा सद्धेतुपूर्वक किंचित् धाब्यावर बसवून आम्हीं उद्योग आरंभिला, कीं आधींच आमच्या उत्कर्षामुळें ज्यांच्या पोटांत दुखतें, त्यांची पोटदुखी जास्त चाळवावयाची ! मनाला पटणाऱ्या गोष्टीदेखील अशा प्रतिकूल परिस्थितींत बोलण्याची सोय नसते."

---

* 'जुनें मोडूं नये व नवें करूं नये' हें शाहूमहाराजांचें नेमस्तपणाचें धोरण, बादशाही सत्तेच्या सर्वश्रेष्ठतेवरील त्यांची अढळ श्रद्धा, व बाजीराव पेशव्यांची धडाडी आणि स्वातंत्र्यलालसा यांतील विषमतेचा परिणाम 'पेशवाई'वरील यापूर्वीच्या कादंबऱ्यांतून जागोजाग वर्णन करण्यांत आलेला आहेच; व सर्व मराठा इतिहासांचीही तद्विषयक साक्ष अगदीं ढळढळीत आहे. मराठशाहीच्या नाशाच्या अनेक तात्त्विक कारणांपैकीं शाहूमहाराजांचें विशिष्ट धोरण हें एक कारण होय, हें क्रमशः विदित होईलच.

मल्हारराव बांडे समोरच बसले होते त्यांच्याकडे वळून ते म्हणाले, "नाहीं तर मल्हाररावांना वाटावयाचें कीं, पेशवे आपल्या सासऱ्यांची निंदा करतात."*

"नाहीं. श्रीमंत ! मला तसें मुळींच वाटावयाचें नाहीं." मल्हारराव बांडे म्हणाले.

"पण गजराबाईसाहेबांना तरी वाटत असेल. कारण सगुणाबाई राणीसाहेबांना तसें वाटतें."

"पण तिला कांहीं तसें वाटत नाहीं. आतां, ती महाराजांची मुलगीच पडली, तिला महाराजांविषयीं प्रेम वाटणें साहजिकच आहे. आणि त्यांच्याविषयीं प्रेम कोणाला वाटत नाहीं ? श्रीमंत ! आपल्या मनांतदेखील महाराजांविषयीं किती अलोट आदर वसत आहे याची मलाच काय, परंतु तिलाही जाणीव आहे."

"खरें का ?"

"खरेंच ! इतकेंच काय, पण श्रीमंत ! सांगितलें तर आपणांला आश्चर्य वाटेल, प्रस्तुतच्या लढ्यांत आपल्या साह्यार्थ चालून येण्याचा माझा व्यक्तिशः तर इरादा होताच, त्याला आणखी तिचा अंतःकरणापासूनचा दुजोरा मिळाला."

"धन्य त्यांची ! आम्हांला हें माहीत नव्हतें !"

"सगुणाबाई राणीसाहेब व सकवारबाई राणीसाहेब यांना देखील महाराजांच्या नांवानें हिंदुपदपादशाहीची स्थापना होऊन महाराज सम्राटपदाला पोंचले तर नको आहे अशांतली गोष्ट नाहीं. बादशाही सत्तेचें जितकें लौकर निर्मूलन होऊन मराठी साम्राज्याचा वैभवविस्तार होईल तितका त्या दोघींनाही पाहिजेच आहे.

* अमृतराव कदम बांडे हा बांड्यांचा पहिला पराक्रमी पुरुष होय. अमृतराव याला ताराबाईनें प्रथम आपल्या मोकाशावर पाठविलें असतां तो कोकरमंड्याला राहूं लागला. पुढें शाहूमहाराजांचें आणि त्याचें वांकडें येऊन लढाई झाली, तींत अमृतराव ठार झाला. त्या वेळीं त्याचा मुलगा त्रिंबकराव एक वर्षाचा होता. पुढें अमृतरावाच्या रघूजी नांवाच्या बंधूला दाभाडे सेनापतींनीं पेशवे दाभाड्यांचें वैमनस्य येण्यापूर्वी आपल्या दिमतीला घेतलें व गुजराथेंत अंमल बसविण्याला पाठविलें. तेथें रघुजीचा पराक्रम चांगला व्यक्त झाल्यावर त्याचा मुलगा मल्हारराव याला शाहूमहाराजांनीं आपली मुलगी गजराबाई ही देऊन त्याला आपला जांवई केलें—( शाहूमहाराजांची रोजनिशी व चरित्र ).

पण सभोंवारचे कारभारी त्यांच्या कानीं विष ओततात, त्यामुळें त्यांचें मन आपणांविषयीं कलुषित झाल्याकारणानें आपण आरंभिलेली प्रत्येक गोष्ट त्यांना विपरीत दिसते. ओघाला आलें म्हणून सांगतों, श्रीमंत ! आपण हा उत्तरेकडील उद्योग आरंभिला तेव्हां ती माहेरीं होती मी या झगडयांत आपल्या झेंडयाखालीं उभा राहीन अशी आमच्या सासूबाईंची खात्री होतीच; म्हणून त्यांनीं तिच्या-मार्फत मला पढविलें कीं, पेशव्यांच्या उद्योगांत भाग घेऊं नये. पण त्याचा तर कांहीं उपयोग झाला नाहींच; उलट 'आईच्या सांगण्याकडे लक्ष्य न देतां आपण पेशव्यांच्या झेंडयाखालीं उभे राहून लढलेंच पाहिजे' असें तिनें मला आग्रहानें सांगितलें. एवढेंच काय; पण ती स्वतः जरूर तर जातीनें लढण्याला तयार असून तेवढ्यासाठींच ती माझी इच्छा नसतांही माझ्याबरोबर आली आहे."

"परमेश्वर त्यांना अखंड सौभाग्य व उदंड आयुरारोग्य देवो. आणि असेच पराक्रमी पुत्र त्यांच्या कुसव्यांत जन्माला येवोत." बाजीराव कृतज्ञतापूर्वक उद्गारले.' आम्हांला वाटतें, स्वर्गवासी मातुश्री जिजाबाईसाहेबच गजराबाईसाहेबां-च्या रूपानें महाराजांच्या पोटीं अवतरल्या असाव्या ! त्या तुमच्याबरोबर आल्या हें एका अर्थी फार छान झालें. त्यांचें उदाहरण पाहून आमच्यांतील सर्व लोकांना बादशाही सत्तेशीं टक्कर देण्याला जास्त हुरूप येईल"

इतक्यांत हुजऱ्या आंत आला व त्यानें बाहेर कोणी रजपूत तरुण आल्याची वर्दी दिली बाजीराव त्याला म्हणाले, " जा, त्याला आंत पाठवून दे."

थोड्याच वेळांत एक रजपूत तरुण आंत आला. त्याची सुंदर व कोमल चर्या पाहून कोणालाही तें राजबीज असावें असेंच वाटलें असतें. पण त्याचा वेश पाहावा तों एखाद्या सामान्य रजपूत सैनिकाला साजेसा होता. त्या तरुणानें आंत येतांच बाजिरावांना अभिवादन केलें, व एकवार सभोंवतीं नजर फिरवून 'एथें कोणी परकीं माणसें नाहींत' असें स्वतःशीं पण किंचित् मोठ्यानें उद्गारून तो बाजिरावांच्या अनुमतीची वाट न पाहातां त्यांच्या शेजारीं बैठकीवर जाऊन बसला. बाजीराव व इतर सर्वजण त्या तरुणाच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागले

तो तरुण कोण असावा बरें !

प्रकरण पहिलें

# तडजोडीची आशा खुंटली !

"श्रीमंत पेशवेसरकार ! आपण मला ओळखलें नसावेंसें दिसतें. मी जयपूरचा युवराज ईश्वरसिंग* आहे"

"यांच्या चर्येवरून मला प्रारंभींच तसें वाटलें." मल्हारराव होळकर स्मितपूर्वक म्हणाले.

"आणि आम्हांलाही प्रथमच तशी दाट शंका आली." बाजिरावांनीं ईश्वरसिंगाकडे वळून विचारलें, "पण युवराज ! तुम्हांला असें भलत्या वेषांत इकडे येण्याचें कारण काय ?"

"आपणांला दिल्लीकडील वाटाघाटीच्या अखेरच्या निर्णयाची बातमी कळविण्यासाठीं पिताजींनीं तांतडीनें मला इकडे पाठविलें आहे."

"पण त्यासाठीं असें वेषांतर करण्याची काय जरूर होती ?"

"जरुर अशी की यापुढें मराठ्यांशीं उघड उघड स्नेहसंबंध ठेवण्याची सोय उरलेली नाहीं. मराठ्यांचा स्नेही अथवा शुभचिंतक तो बादशहाचा वैरी-राजद्रोही ठरण्याची वेळ आतां प्राप्त झाली आहे."

"म्हणजे ? जयसिंगजींचे¶ दिल्लीच्या दरबारांतील सारे प्रयत्न फसले काय ?" मध्येंच मल्हारराव होळकरांनीं विचारलें.

---

* मेवाडचा राणा जयसिंग याला अनेक राण्या होत्या, व त्यांपासून त्याला पुत्र झाले होते. त्यांपैकीं ईश्वरसिंग हा वडील पुत्र होय. माधवसिंग या नांवाचा आणखी एक राजपुत्र जयसिंग व त्याची एक राणी मेवाडची राजकन्या यांच्या पोटीं जन्म पावलेला होता. माधवसिंग हा ईश्वरसिंगाहून लहान असला तरी, मेवाडच्या राजकन्येच्या उदरीं जन्मलेला राजपुत्रच राज्याचा वारस ठरावा, असा मेवाडच्या राजघराण्याच्या शुद्धतेकडे लक्ष देऊन प्रघात पडूं पहात होता. ह्या प्रश्नानें जयसिंगाच्या वंशांत कसे घोंटाळे माजविले, त्याचे प्राथमिक स्वरूप पुढें दिसून येईलच.

¶ जयसिंग ऊर्फ सवाई जयसिंग हा जरी बादशहाचा सेवक होता, तरी त्यानें केवळ आपद्धर्म म्हणून देश-काल-परिस्थितीकडे लक्ष्य देऊन ती सेवावृत्ति पत्करली

" अर्थात् ! ते प्रयत्न नुसतेच फसले असें नाहीं, तर त्यांत खुद्द पिताजींचा-ही अपमान झाला, व त्यांच्या ताब्यांतील मुलुखावर देखील संक्रांत येण्याचा संभव आहे." ईश्वरसिंग बाजिरावांकडे वळून म्हणाला, " माळव्याचा सुभा आपणांकडे कायम व्हावा याबद्दल पिताजींनीं वजीर कमरुद्दीनखान, मीरबक्षी खानडौरान, अयोध्येचा सुभेदार सादतखान, अलाहाबादचा सुभेदार महंमदखान बंगष, शहाजादा व बादशहा ह्या सर्वांची समजूत करण्याची शिकस्त केली. पण त्याचा कांहींच उपयोग न होतां उलट मराठयांशीं निकराचा सामना देण्याचा बादशाही दरबारचा विचार निजामाच्या मतें कायम झाला, आणि त्या दृष्टीनें तयारीला सुरवातही झाली आहे."

" एकूण बादशहा माळव्याचा सुभा सहीशिक्क्याच्या सनदेनिशीं आमच्या स्वाधीन करावयाला तयार नाहीं तर ! "

" छे ! सहीशिक्क्याच्या सनदा कुठच्या घेऊन बसलां ? उलट निजामाची तर अशी आग्रहाची मागणी आहे कीं, माळवा व आग्रा हे दोन्ही सुभे आपला वडील पुत्र गाजीउद्दीन याच्या नांवानें मिळावे. आणि निजामाच्या ह्या मागणीला

---

होती. पण मराठ्यांच्या हिंदुपदपादशाहीबाबतच्या प्रयत्नांना त्याची पूर्ण सहानुभूति होती. उत्तरेकडे बाजीराव पेशव्यांचा जम बसण्याला जयसिंगच मुख्यतः कारण होता, व बादशाही दरबारांत पेशव्यांच्या अर्थात् मराठयांच्या दृष्टीनें राजकारणविषयक हितसंबंधांचें इष्ट तें धोरण राखण्याचें कार्य जयसिंग कळकळीनें पार पाडीत असे. बाजीराव पेशवे व बादशहा यांच्यांतील प्रस्तुत कथाविषयक झगडा विकोपास जाऊं नये, उभयपक्षीं—विशेषतः मराठयांना पोषक असा त्या झगड्याचा शेवट व्हावा, अशी सदिच्छा मनांत धरूनच जयसिंग बादशाही दरबारांत वाटाघाटी करीत होता. माळव्यांत गेल्यावर बाजिरावांनीं जयसिंगाच्या मार्फत चौथाईच्या सनदांची व सरबुलंदखानानें गुजराथचा तह ठरविला होता, तो मंजूर करून देण्याची मागणी बादशहाकडे ठांसून केली. बाजिरावांचा हा जोर पाहून त्यांच्या मागण्या कबूल कराव्या अशीच जयसिंग व बादशहाचा मीरबक्षी खानडौरान यांनीं बादशहाला सल्ला दिली.' ( मराठी रिसायत—मध्य वि० १. ) पण ती अखेर फोल ठरून निजामाच्या कुटिल नीतीचाच तेथें विजय झाला.

सर्व दरबाराचा पाठिंबा मिळाल्यामुळें ही मागणी पूर्ण झाल्यांतच जमा आहे कारण वजीर कमरुद्दीनखान या बाबतींत निजामाच्या बाजूचा आहे. त्यानें आपली मुलगी गाजीउद्दिनाला देऊन नुकताच तो लग्नसंमारंभ बादशाही थाटानें उरकून घेतला. त्या प्रसंगीं बादशहानें गाजीउद्दिनाला फिरोजजंग असा बहुमानाचा किताबही बहाल केला."

"एकूण माळवा आमच्या हातचा जाणार व आग्रा जयसिंगजींच्या हातचा जाणार!"

"होय. असा प्रसंग प्राप्त झाला आहे खरा. इतकेंच काय पण या लढाईंत आपणांला दक्षिणेंतूनही शह देण्यासाठीं निजामानें आपला मुलगा नासीरजंग याला तिकडे शक्य तेवढे बखेडे उत्पन्न करून लगेच प्रचंड सैन्यानिशीं भोपाळपाशीं बादशाही सैन्याला येऊन मिळविण्याविषयीं पत्र लिहिलें आहे."

"बरें, पुढें आम्हीं काय करावें असें जयसिंगजींचें म्हणणें?"

"यापुढें आपण स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं जो उद्योग आरंभाल त्याला पिताजींची अंतःकरणांतून पूर्ण सहानुभूति आहे. पडद्याआड राहून आपलें जेवढें साह्य करणें आम्हांला शक्य आहे तेवढें आम्ही करूं. मात्र आम्हांला या लढाईंत उघडपणें आपल्या पक्षाला सामील होतां येणार नाहीं. कदाचित् अशीही वेळ येईल कीं आम्हांला बादशाही हुकुमाची तामिली करण्यासाठीं प्रत्यक्षपणें निजामाच्या पक्षालाही मिळावें लागेल. त्याविषयीं आपण कांहींही विकल्प मनांत आणूं नये."

"पण आम्ही म्हणतों, जयसिंगजी उघडपणें आम्हांला मिळाले तर कोठें बिघडलें?"

"असें पहा श्रीमंत! राजकारणाच्या अशा झगड्यांत परस्परविरोधी दोन पक्षांच्या सांखळ्यांना शक्य तर जरूर तेव्हां एकत्र सांधण्यासाठीं असा एखादा मजबूत दुवा शिल्लक असावा लागतो."

"ठीक आहे. अशा आणीबाणीच्या वेळीं जयसिंगजी जर उघडपणें मराठ्यांच्या भगव्या झेंड्याखालीं उभे रहाते, तर सोन्याहून पिंवळें झालें असतें. पण त्याविषयीं त्यांच्याशीं काय बोलावयाचें तें आम्ही समक्ष बोलूं. बरें, आणखी कांहीं निरोप?"

"आणखी पिताजींनीं असें सांगितलें आहे कीं, आपल्या सर्व हालचाली अत्यंत गुप्तपणें चालूंद्यात. होतां होईतों आपण निजामाशीं प्रत्यक्ष सामन्याचा

प्रसंग न आणतां अप्रत्यक्षतः त्याची जितकी अडवणूक करतां येईल तितकी करावी कारण बादशाही दरबारच्या मंडळीनें या प्रसंगीं उत्तर प्रांतांतून मराठ्यांचें समूळ उच्चाटण करण्यासाठीं आपली सर्व शक्ति एकवटून निजामाच्या द्वारा मराठ्यांवर ओतण्याचा संकल्प केला आहे; व दुर्दैवाची गोष्ट ही कीं, बेशरमपणें बादशहाच्या ताबेदारींत भूषण मानणारे आमच्यांतील बरेचसे स्वाभिमानशून्य रजपूत राजे निजामाला सामील झाले आहेत. त्यांच्या साह्यानें निजाम माळवाप्रांत आपल्या काबूंत आणण्याच्या कामीं कसुर करणार नाहीं, व बादशाही दरा यापुढें निमूटपणें मान वांकविणारे पुष्कळच गडकरी, ठाकूर, चौधरी वगैरे अमलदार माळव्यांत निजामाला सांपडतील. आज तरी वस्तुस्थिति अशी आहे कीं, निजामाच्या अर्थात् बादशहाच्या पक्षपाती लोकांचा पसाराच माळव्यांत मोठा आहे.—"

"खोटें! साफ खोटें!" मल्हारराव होळकर मध्येच दांतओठ खात उद्गारले, "मला इतक्या दिवसांचा या प्रांताचा जो अनुभव आहे त्यावरून मी तर निश्चयपूर्वक सांगतों कीं, कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ शोभणारे कांहीं राजे व इतर मूठभर ठाकूर, चौधरी वगैरे सोडले, तर बादशाही सत्तेपुढें निमूटपणें मान वांकविणारे नेभळट लोक माळव्यांत मुळीच नाहींत." ते राणोजी शिंदांकडे वळून म्हणाले, "राणोजीबाबा! तुमचें मत काय!"

"तुमचें म्हणणें बरोबर आहे. पण युवराजांचें म्हणणेंही कांहीं चूक नाहीं." राणोजी शिंदे उत्तरले.

"असे दोन्ही दरडींवर हात ठेवून गुटप्पी बोलूं नका. स्पष्ट काय तें सांगा."

"स्पष्टच सांगतों, दोघांचेंही म्हणणें बरोबर आहे. सुभेदार! युवराजांच्या भाषणांतील खोल अर्थ तुमच्या ध्यानीं आला नाहीं. माळव्यांतीलच काय, पण सभ्या बादशाही साम्राज्यांतील रयत बादशाही सत्तेला पूर्णपणें कंटाळली असून सर्वांना स्वातंत्र्याची अर्थात् हिंदवी साम्राज्याची तहान लागलेली आहे हें युवराजांनाही नाकबूल नसेल!"

"मुळींच नाकबूल नाहीं. एकदां नव्हे शंभरदां कबूल! पण—"

"थांबा!—" राणोजी शिंदे ईश्वरसिंगाला हातानें गप्प राहाण्याची खूण करीत म्हणाले, "सुभेदार! या रयतेला कह्यांत वागविणारे राजेरजवाडे व ठाकूर, चौधरी वगैरे सामर्थ्यवान लोक पूर्णपणें मराठ्यांच्या बाजूचे आहेत असें मात्र नाहीं. आज दोनअडीच शतकें मोंगलांच्या अरेरावी बादशाही सत्तेखालीं जीव

धरून राहाण्यासाठीं हांजी हांजी करण्यांत त्यांच्या कैक पिढ्या लोटल्या आहेत; व हिंदूंचें जितपण आणि यवनांचें जेतेपण हा अन्योन्यसंबंध मानवनिर्मित नसून ईश्वरनिर्मित आहे अशाच त्यांच्या भावना बधिर होऊन गेल्या आहेत."

"हा सहवासाचा व परंपरेच्या कुसंस्कारांचा महिमा होय." पिलाजी जाधव म्हणाले, 'हे गुलाम, यांचे बाप गुलाम, यांचे आजे गुलाम, अशी गुलामगिरी यांच्या हाडींमांसीं भिनलेली असल्यानें शेणकिड्यांसारखी त्यांची अवस्था साहजिकच असणार. शेणकिडा ज्याप्रमाणें शेणाच्या गोळ्यालाच स्वर्ग-मोक्ष-वैकुंठ मानीत असतो, त्याप्रमाणें बादशहाचें दास्य व अनुराधन हेंच सुखसर्वस्वनिधान असें ह्या लोकांना वाटत असतें. ते आपल्या ऐहिक सुखसाधनांच्या शाश्वतीकडे प्रथम पहातात, व ती शाश्वती त्यांना बादशहातीत जितकी दिसून येते तितकी मराठ्यांच्या उद्योगांत दिसून येत नाहीं. त्यामुळें बादशहाच्या वतीनें निजाम व मराठे यांच्यामधील लढ्यांत असले मवाळ वृत्तीचे लोक प्रथम प्रथम तरी निजामाच्याच बाजूला झुकत राहणार."

ईश्वरसिंग पिलाजी जाधवांना म्हणाला, "तुम्हीं अगदीं माझ्या मनांतील गोष्ट बोललां. मात्र मागाहून आपणाला विजय मिळतो असे पहातांच तेच लोक आपल्या बाजूला वळतील यांत संशय नाहीं."

"मग तेच कां? त्यांचे देव आमच्या बाजूला वळतील." बाजीराव गंभीर स्वरांत उद्गारले, "ठीक आहे युवराज! जयसिंगजींचा निरोप पोंचला. त्याप्रमाणें आम्हांला काय तजवीज करावयाची ती आम्ही करतों. जयसिंगजींना म्हणावें, यापुढें तुम्ही आपला सोनेंमोलाचा शब्द मातींत घालण्याची कांहींच आवश्यकता नाहीं. आणखी त्यांना म्हणावें, यापुढें कसलाही प्रसंग प्राप्त झाला तरी बादशहाच्या वतीनें आपण मराठ्यांशीं तिरहाईती करण्याचें काम पत्करूं नका. कारण तडजोड व सामोपचार हा शब्द मराठ्यांनीं दिल्लीच्या बादशाहीपुरता-निदान निजामापुरता तरी-आपल्या भाषेंतून वेंचून टाकला आहे."

"भगवान् श्रीएकलिंगजी आपणांला आपल्या पवित्र अंगीकृत कार्यांत पूर्ण यश देवो. त्या यशांत एकट्या आपणां मराठ्यांचेंच काय पण आम्हां रजपुतांचें भारतवर्षांतील अखिल हिंदूंचें परममंगल आहे. मात्र या वेळीं पुन्हा एकवार आपणांला सूचना द्यावीशी वाटते कीं, ह्या अनिवार्य रणसंग्रामाचा पूर्वरंग

आपल्या मनाजोगा जमेपावेतों आपण प्रगटपणें माळव्याच्या टापूंत संचार करूं नका. निजाम किती कावेबाज आहे हें आपण जाणतांच."

एवढें बोलून सर्वांचा निरोप घेऊन ईश्वरसिंग निघून गेला. लगेच बाजिरावांनीं मल्हारराव होळकर वगैरे मंडळीकडे वळून म्हटलें, "सुभेदार! आम्हीं जें सांगितलें त्याचें हें प्रत्यंतर पहा!"

"श्रीमंतांची विचारसरणी माझ्यापेक्षां तर्कशुद्ध होती हें मी प्राजलपणें कबूल करतों." मल्हारराव होळकर उद्गारले.

"तें असो. पण पुढील तजवीज अशी काय करावयाची? निजामाशीं आपल निकराचा सामना जुंपणार यांत तर संशयच नाहीं. जयसिंगजींकडून आलेल्य निरोपावरून मराठ्यांची सत्ता उत्तरेकडील ह्या भागांतून समूळ खणून टाकण्याच बादशाही पक्षाचा निर्धार झालेला उघड दिसतो."

"त्या शत्रूच्या निर्धाराला तशाच निर्धारानें आपण एक जुटीनें व धिमेपणानें तोंड दिलें पाहिजे." मल्हारराव होळकर राणोजी शिंद्यांकडे वळून म्हणाले "राणोजीबाबा! खरें ना?"

"अगदीं खरें." राणोजी शिंदे उत्तरले.

"पिलाजीराव! तुमचें काय मत?" मल्हारराव होळकरांनीं पुन्हा पिलाजी जाधवांना विचारलें.

"या बाबतींत दुमत होणें शक्यच नाहीं." पिलाजी जाधव उद्गारले, "मला एक सूचना मात्र करावीशी वाटते कीं, निजामाला माळव्यांत घुसूं न देतां होतां होईतों माळव्याच्या सरहद्दीवरच त्याला पायबंद लावून त्याचा कोंडमारा करून त्याला नेस्त नाबूद केलें पाहिजे."

"आम्हाला असें वाटतें," बाजीराव म्हणाले, "शिंदे-होळकरांनीं पूर्वेकडे माळव्याच्या सरहद्दीवर जाऊन त्या टापूंत निजामाचा पाय रुजणार नाहीं अशी खबरदारी घ्यावी. गोविंदपंत बुंदेल्यांची सागरहून या कामीं चांगलीच मदत होईल. आतां, दक्षिणेकडून नासिरजंगाकडून निजामाला साह्य होण्याजोगें आहे. पण नासिरजंगाला अडवून धरण्याचें कार्य अप्पा तिकडे परस्पर पार पडतील. याहीउपर कदाचित् नासीरजंग माळव्यांत घुसण्याचा प्रयत्न करूं लागलाच, तरी नर्मदेचे सारे उतार मंडलोई, वडवाणीचे ठाकूर अनूपसिंग, व चंद्रशेखर यांच्या ताब्यांत आहेत, ते कांहीं नासीरजंगाची नाव ऐलतीराला लागूं द्यावयाचे नाहींत."

" शिवाय मीही पाहिजे तर त्यांच्या साह्याला जावयाला तयार आहें." पिलाजी जाधव म्हणाले.

" आणि श्रीमंत सांगतील तर मीही त्या कामगिरीवर जाईन." मल्हारराव बांडे म्हणाले.

" तुम्ही नका जाऊं. तुम्ही व सटवोजी हे दोघेही आमच्याबरोबर रहा. यापेक्षांही किंचित् बिकट अशी कामगिरी आम्हीं स्वतः शिरावर घेण्याचें योजिलें आहे, त्या कामीं आम्हांला तुमची आवश्यकता आहे. मंडलोईसारखे राजनिष्ठ मातबर लोक या टापूत आहेत, तेव्हां नासीरजंग नर्मदेच्या ऐलतीराला येणें शक्यच नाहीं." बाजीराव पिलाजी जाधवांकडे वळून म्हणाले, " पिलाजीराव ! तुम्हां देखील उतारांच्या बंदोबस्तासाठीं डांबून रहाण्याची आवश्यकता नाहीं. तुम्ही फक्त आणखी कोणाला तरी हाताखालीं घेऊन तांडाघाट व भैरवघांट हे दोन्ही मार्ग रोखून धरा. कारण कीं, चुकून निजामाच्या सैन्याची एखादी टोळी एखाद्या उतारापार आली तरी तिला आंत प्रवेश मिळूं नये. एवढा दोन्ही बाजूंचा बंदोबस्त झाला, कीं इतर गोष्टी आम्ही संभाळतों. माळव्यांतील सर्व गडकऱ्यांना व ठाकूर चौधऱ्यांना सावधगिरीनें वागण्यासाठीं आजच्या आज आमच्या शिक्कामोर्तबाचीं आज्ञापत्रें रवाना होतील; त्याप्रमाणेंच सर्व रजपूत राजांना या युद्धांत आमच्या वतीनें लढण्याबद्दल विनंतिपत्रेंही रवाना होतील. आम्ही गुप्त रूपानें कितीएकांच्या भेटी गांठी घेण्याचें ठरविलें आहेच. या वाटाघाटींतील प्राथमिक कामगिरी—मराठ्यांच्या तर्फेनें वकिलीच म्हणाना, मल्हारराव बांडे व सटवोजी जाधव या दोघांनीं करावयाची ! दोघेही मुलुखगिरीच्या निमित्तानें माळवा-गुजराथभर हिंडलेले आहेत. बुंदेलखंडही त्यांनीं पायांखालीं घातलें आहे. अशा मान्यतेच्या व विश्वासू तरुणांच्या हातून ती कामगिरी सोळा आणे पार पडेल अशी आमची खात्री आहे." मल्हारराव बांड्याकडे वळून ते म्हणाले, " कोणा राजाचा कल कोणाकडे आहे याचा अचूक अंदाज तुम्हां दोघांना चांगला घेतां येईल व त्यावरून आपण पुढील अंदाज बांधूं शकूं. ज्यांची समक्ष जातीनें भेट घेण्यानें कार्य होणें शक्य असेल त्याची भेट आम्ही घेऊं. अं; जे आमच्या विरुद्ध असतील, त्यांचा योग्य समाचार घेण्याचीही तजवीज आम्हांला करतां येईल."

इतक्यात एक मराठा शिपाई आंत येऊन दाखल झाला. त्याला पाहून बाजिरावांनीं आपलें बोलणें एकदम आवरतें घेतलें.

" कायरे हैबती ! " मल्हारराव वांड्यांनीं त्या नव्या मराठा शिपायाला हांक मारून विचारलें, " इकडे कुठें आलास ? "

" हैबतीनें सर्वांना मुजरा करून उत्तर दिलें, " धनी ! वहिनीसाहेबांची स्वारी आपल्या पत्राप्रमाणे सुलतानपुराला खासेरावांच्या वाड्यांत कालच येऊन पोंचली· त्या लगेच आपणाकडे येणार होत्या; पण एकतर आपला मुक्काम नक्की कुठें आहे हें आम्हांला माहीत नाहीं व दुसरें, काशीबाईसाहेब आणि त्यांच्या मातोश्री य.चाही वहिनीसाहेबांना फारच आग्रह पडला कीं, आतां मोहीम आटोपेपावेतों– निदान महिनाभर रहाच. काशीबाईसाहेब व आईसाहेब यांना पंचक्रोशीची यात्रा करून यावयाचें आहे."

" आणि या बाईसाहेबांनादेखील पंचक्रोशी पहावयाची होतीच. तेव्हां बेत जमला. होय ना ? " मल्हारराव म्हणाले.

" होय धनीसाहेब ! तेव्हां वहिनीसाहेबांनीं विचारलें आहे कीं, किती दिवस रहावें व नंतर कोणत्या मुक्कामीं यावें ? कीं आपणच सुलतानपुराला याल ? " हैबतीनें विचारलें.

मल्हारराव उत्तरले, " बाईसाहेबांना सांग कीं, तूर्त मी श्रीमंतांबरोबर कांहीं महत्त्वाच्या कामगिरींत गुंतलेला आहें; त्या कामगिरींतून केव्हां मोकळीक मिळेल याचा आजच कांहीं नेम सांगतां यावयाचा नाहीं. मोकळा झाल्यावर मी तिकडे येईन. तोंवर त्यांनीं सुलतानपुरांत खासेरावांच्या वाड्यांतच रहावें."

" बरें; आणखी कांहीं निरोप आहे का ? "

" नाहीं. आम्ही सर्व खुशाल आहों असें मात्र सांग."

" बरें तर मी येतों." असें म्हणून पुन्हा पूर्ववत् सर्वांना मुजरा करून हैबती निघून गेला.

" मी ज्या चिंतेत होतों ती आपोआप दूर झाली." मल्हारराव बाजिरावांकडे पाहून म्हणाले, " आतां मंडळीच्या सुरक्षितपणाविषयीं चिंता करण्याचें मला कांहींच कारण उरलें नाहीं."

" खासेरावांचा व तुमचा इतका घरोबा आहे ? " मल्हारराव होळकरांनीं विचारलें.

" वा: ! म्हणजे ? खासेराव आमचे पाहुणे आहेत." मल्हारराव वांडे उत्तरले.

"तर मग त्यांना आपल्या बाजूला वळविण्याची कामगिरी तुमच्या हातून सहज होईल."

"जरूर ! पण मला वाटतें, त्यांना वळविण्याचें कारणच नाहीं. ते आपलेच आहेत. ते फार स्वाभिमानी पुरुष आहेत."

  

तो दिवस गेला व दुसऱ्या दिवसापासूनच पेशव्यांकडील मंडळी आपले संकेत कृतींत उतरविण्याच्या तयारीला जारीनें लागली. मल्हाराव होळकर, राणोजी शिंदे व पिलाजी जाधव ही मंडळी आपापल्या कामगिरीवर निघून गेली. चिमाजी-अप्पांकडे 'नासिरजंगाचा बंदोबस्त करावा' असें पेशव्यांचें पत्र घेऊन एक जासूद मांडवगडाकडे रवाना झाला. दुसरा एक जासूद कंपेल येथें राव तेजकर्ण मंडलोई यांजकडे पाठविण्यांत आला. राव तेजकर्णाच्या मुलाचें—बालकर्णाचें—लग्न ठरल्या मुळें व लग्नमिति केवळ एका महिन्यावर येऊन ठेपल्यामुळें तेजकर्ण, न्याहालकर्ण व बालकर्ण हे सर्व पिता-पुत्र लग्नघाईत गुंतून पडले होते. हें बाजिरावांना माहीत होतें म्हणूनच तो लग्नसमारंभ आटोपेपावेतों मंडलोईंना विशेष तसदी देण्याचा त्यांचा मानस नव्हता. पण जयसिंगाकडून आलेल्या दिल्लीकडील ताज्या बातमीवरून बाजिरावांना तांतडीनें प्राप्त प्रसंगाला तोंड देण्याची तयारी करणें प्राप्तच होतें.

राहातां फक्त बाजीराव पेशवे, मल्हारराव बांडे व दोघांच्या खास हुकमती खालील अवघें एक हजार निवडक सैन्य एवढी मंडळी जागयावर राहिली. बाकीची बहुतेक फौज शिंदे, होळकर, जाधव व आणखी कांहीं सेनानी यांच्या नेतृत्वाखालीं माळव्याच्या दक्षिण व पूर्व हद्दींतील प्रांतांत पूर्वींच वावरत होती, व कांहीं शिल्लक होती ती आज पुन्हा त्यांच्याबरोबर रवाना झाली. बाजीराव मात्र तो दिवस व दुसरा दिवस ठाण्यावरच होते. ते सटवोजी जाधवाची वाट पहात होते. त्यांनीं सटवोजीला दिल्लीला आपल्या वकिलातींत तिकडील वाटाघाटींची बित्तंबातमी काढण्यासाठीं पाठविलें होतें. तें एक त्यांना स्वतःला माहीत कीं दुसरें सटवोजीला माहीत !

दुसऱ्या दिवशीं सूर्यास्ताच्या सुमाराला सटवोजी घोडा फेंकीत फेंकीत गंभीर-गडावर येऊन पोंचला. त्यापूर्वींच बाजिरावांना ईश्वरसिंगाकडून दिल्लींतील वाटाघाटीबाबत अशुभ बातमी कळल्यामुळें फारशी आशा त्यांच्या अंतः-

करणांत शिल्लक उरली नव्हतीच. त्या निराशेनें अंतःकरणाला झालेल्या जखमेवर मीठ चोळले जावें अशी आणखी एक दुर्वार्ता त्यांना सटवोजीच्या तोंडून ऐकावयाला मिळाली. पुरंदरे व हिंगणे या पेशव्यांच्या दोन्ही वकिलांना निजामाकडून मानखंडनापूर्वक दिल्लींतून हांकलून देण्यांत आलें, हीच ती दुर्वार्ता होय ※. ती दुर्वार्ता ऐकतांच बाजिरावांच्या सर्वांगाचा संतापानें इतका भडका झाला कीं, ते कल्पांतींच्या सूर्याप्रमाणें तळपत आवेशानें उद्गारले, “ पेशव्यांच्या वकिलांचा अपमान दिल्लींत पुन्हा झाला काय ? ठीक आहे. या अपमानाचा सूड म्हणून निजामाची दाढी धरून त्याला आमच्यासमोर मान नमवावयाला लावूं तरच नांवाचे पेशवे.”

त्या रात्रीं सारी रात्रभर बाजीराव, मल्हारराव बांडे व सटवोजी जाधव यांचीं पुढील महत्त्वाच्या बाबतींविषयीं खलबतें झालीं व उजाडण्यापूर्वीच ते तिघेही कांहीं गुप्त संकेत ठरवून आपल्या सैन्यासह मार्गस्थ झाले.

निजामाचे गुप्त हेर मराठ्यांच्या हालचालींवर डोळ्यांत तेल घालून नजर ठेवीत होतेच. त्यांना बाजिरावांचा तळ रातोरात उठल्याची खबर लागली, तेव्हां त्यांनीं गंभीरगडावर जाऊन चौकशी केली. त्या वेळीं त्यांना बातमी मिळाली कीं, बाजीराव निजामाच्या दराऱ्याला भिऊन माळवा सोडून नर्मदेपार झाले व तेथून ते निजामाशीं तडजोडीची वाटाघाट करणार आहेत. ही शुभवार्ता निजामाच्या गोटांत कळविण्यासाठीं बातमीदारांची कोण धांदल ! कारण, ही ‘शुभवार्ता’ प्रथम निजामाला कळविणाराला चांगले मूल्यवान बक्षिस मिळण्याचा संभव होता ! !

पण खरोखरच बाजीराव पेशवे भिऊन नर्मदेपार पळाले होते काय ?

※ मराठी रियासत, मध्यविभाग १, पृष्ठ ३९१ पाहा.

## प्रकरण दुसरें

# दोन प्रवासी

"कालिदास !"

"काय ?"

"मला वाटतें, आपण आतां आजची सायंकाळ व रात्र ह्या गांवींच वस्ती करावी आणि व पहांटेला पुढच्या मार्गाला लागावें."

"वाः ! भवानीराम ! हेंच का तुला वेळेचें महत्त्व कळतें ? आपण शिरावर घेतलेली कामगिरी किती नाजूक आहे व ती किती तत्परतेनें पार पाडली पाहिजे हें तुला सांगावें तरी कितीदां ! समज आपण ओंकारेश्वरीं जाऊन पोंचण्या पूर्वींच चंद्रशेखर आपल्या कन्येसह मांडवगडावर निघून गेला असला तर मग कसें करणार !"

"म्हणून काय झालें ! वेळीं चंद्रशेखर भागाबाईसह मांडवगडाकडे निघून गेला असला, तरी बालकर्ण व भागाबाई यांचें लग्न तर उद्यांच्या उद्यां लागत नाहीं ना ? जोंपर्यंत बालकर्ण भैरवगडावर कैदेंत आहे, तोंपर्यंत तर आपणांला कांहींच भय नाही. शिवाय आपणांला लगेच मांडवगडावरही जावयाचें आहेच."

"पण मला वाटतें, जितका जास्त वेळ दरम्यान् जाईल, तितक्या आमच्या मार्गांतील अडचणी एकमेकींच्या गुणाकारानें वाढत जातील. बालकर्ण कैद झाल्याची बातमी तोंवर गुप्त राहीलच याचा काय नेम ! बालकर्णाचा साह्यकर्ता अनुपसिंग जो आपल्या लोकांच्या हातून निसटला, तो स्वस्थ थोडाच बसणार आहे ! तो वढवाणीला जाण्यापूर्वी ताबडतोब प्रथम मांडवगडाकडे दौड निघाला असेल. बाजीराव पेशवे मांडवगड व भैरवगड यांच्या दरम्यान गुप्तपणें लढाईचा पुढील बेत करीत हिंडत असल्याची खबर आपणांला आपल्या हेरां-मार्फत मिळाली, त्यावरून मला एकंदर भावी परिस्थितीविषयीं फार चिंता वाटूं लागली आहे. अनुपसिंग जर त्यांना जाऊन मिळाला असला, तर ते सावध होऊन मांडवगडाचा कबजा न सोडण्यासाठीं आकाशपाताळ एक करतील."

"पण त्यांनीं आकाशपाताळ एक केलें तरी मंडलोई बंधु किंवा चंद्रशेखर हे आपल्या हातानें आपल्या पायावर दगड पाडून घेण्याइतके वेडेपीर थोडेच आहेत !

मावळत्या सूर्याला अर्घ्य देण्यापासून कांहींच लाभ व्हावयाचा नाहीं हें त्यांना चांगलें कळतें."

"पण सूर्य मावळला असला तरी अजून पूर्णपणें मावळला तर नाहीं ना! तो मावळतां मावळतां कोणाला किती ताप देईल याचा काय नेम सांगावा? बरें; मांडवगड प्रथमपासूनच मराठ्यांचे पक्षपाती मंडलोई यांच्या ताब्यांत आहे. मंडलोई निजामाच्या दराऱ्याला भिऊन नमला तर; एरव्हीं सामोपचारांनीं निजामाला सामील होणारा तो नाहीं."

"सामोपचारानीं सामील न होईल तर आपल्या कर्मांचीं फळें भोगील! माझी तर परमेश्वरापाशीं अशी प्रार्थना आहे कीं, मंडलोईंना निजामाच्या विरुद्ध जाण्याची इच्छा व्हावी—"

"काय, भवानीराम! काय बोलतां हें? तुम्ही निजामाचे कैवारी जर असें बोलूं लागलां, तर—"

"कालिदास! मी बादशहांचा पक्षपाती व निजामाचा कैवारी आहें, त्यापेक्षांही मंडलोईंचा हाडवैरी जास्त आहें. किंबहुना तें हाडवैर साधण्यासाठींच मीं निजामाचा कैवार घेतला आहे म्हणाना! कालिदास! तुम्हीं अजून मला पूर्णपणें ओळखलें नाहीं. मला सांगा, भागाबाईच्या सौंदर्याची ख्याति चक्रवाढीनें वाढत शहाजाद्याच्या कानांपावेतों कशी बरें गेली असेल?"

"कशी गेली?"

"ती कामगिरी माझी!"

"खरेंच?"

"खरेंच!"

"एकूण तुमचें व चंद्रशेखरांचेंही हाडवैर आहे म्हणावयाचें तर!"

"नाहीं. तसें कांहीं नाहीं. आतां, त्या दृष्टीनें पाहूं गेल्यास या माळवा प्रांतांतील बहुतेक सारे ठाकूर व चौधरी माझे वैरीच आहेत. माझ्या आजोबांनीं जें राज-वैभव आपल्या असामान्य मर्दुमकीच्या व मुत्सद्देगिरीच्या जोरावर कमावलें, माझ्या पराक्रमी वडिलांनीं व चुलत्यांनीं जें शुक्लेंदुवत् वाढविलें, त्याची धुळवड प्रथम या ठाकूर-चौधरींनींच आरंभिली, व मराठ्यांना साह्य करून आमच्या वैभवासह वंशाची वाताहात केली! तरीही चंद्रशेखर त्याला अपवाद आहे. इतरांपैकींही मंडलोई वंशाइतकें दुसऱ्या कोणत्याही वंशानें आमचें हाडवैर साधलें

नाहीं. नंदलाल मंडलोई जर होळकरांच्या आहारीं जाऊन मराठ्यांना फितूर झाला नसता, तर इतर ठाकूर व चौधरी यांची मराठ्यांना फितूर होण्याची काय माय व्याली होती ? मंडलोईचा सर्व ठाकूर-चौधऱ्यांवर दांडगा वचक, म्हणून ते बहुतेक सारे मंडलोईच्या मागोमाग मराठ्यांना जाऊन मिळाले व त्यांच्याच साहाय्यानें मराठ्यांनीं आमचीं पाळेंमुळे खणून काढून आमची सारंगपूरची राजधानी स्मशानवत् उजाड बनवून सोडली ! " भवानीराम क्रोधाविष्टतेनें थरथर कांपत दांतओंठ खात हाताच्या मुटी वळून उद्गारला, " सारंगपूर ! सारंगपूर ! ज्या सारंगपुरांत माझ्या पूर्वजांनीं व मींदेखील काल-परवांपर्यंत अपार राजवैभव उपभोगिलें, त्याच सारंगपुरांत एखाद्या सामान्य नागरिकाप्रमाणें रहाण्याची देखील मला चोरी व्हावी अं ! परमप्रतापी राजा गिरिधरबहादुरांच्या औरस पुत्राला एखाद्या भणंग भिकाऱ्याप्रमाणें वणवण करीत दहा दिशांना हिंडणें प्राप्त व्हावें ! इतकी माझी दुर्दशा करावयाला मंडलोई कारण; म्हणूनच त्यांना मी माझे हाडवैरी समजतों. आणि चंद्रशेखरावर माझा राग आहे तो तरी केवळ एकाच कारणासाठीं,—त्यानें माझ्या हाडवैऱ्याच्या घरांत आपली मुलगी देण्याचा घाट घातला आहे म्हणून. एरव्हीं चंद्रशेखर व्यक्तिशः फार सज्जन माणूस आहे. आम्ही व मराठे यांच्या झगड्यांत तो मराठ्यांचा वाढता जोर पाहून व मंडलोई-पक्षाचे सारे ठाकूर-चौधरी मराठ्यांना सामील झालेले पाहून बाह्यत्कारीं त्यांच्या पक्षाला मिळाला, तरी अंतःकरणांतून त्याचा ओढा आमच्याकडेच होता. फार काय, चौदा वर्षांपूर्वीं माझ्या वडिलांना त्या मराठ्यांतील सैतानानें—चिमाजीअप्पानें ठार केलें, त्यानंतर वडिलांच्या ऐवजीं मला माळव्याची सुभेदारी मिळावी म्हणून खटपट करणाऱ्या माझ्या हितचिंतकांत चंद्रशेखरही एक होता; व नंतर सात वर्षांपूर्वीं माझ्या चुलत्यानें माझ्या पोरपणाचा फायदा घेऊन वशिल्याच्या जोरावर बादशहाच्या वजिराकडून माळव्याची सुभेदारी स्वतःला मिळवून मला देशोधडीला लावलें, तेव्हां मला ओंकारेश्वरीं आपल्या पदरीं आश्रय देऊन चंद्रशेखरानेंच माझा बचाव केला..."

" आणि तरीही तुम्ही चंद्रशेखरांशीं दावेदारी करतां, हें तर मोठेंच आश्चर्य आहे म्हणावयाचें ! "

" नाहीं. मी चंद्रशेखरांशीं मुळींच दावेदारी करीत नाहीं. चंद्रशेखरानें मला आपला मुलगा मानून माझें लालन-पालन केलें; एकीकडून माझा चुलत

व दुसरीकडून नंदलालाचें पोर हे माझे दुस्मान माझा सत्यानाश करण्याला मला या जगांतून नाहींसा करण्याला डोळ्यांत तेल घालून टपून बसलेले असतां-देखील चंद्रशेखरानें मला गुप्तपणें आपल्या पदरीं आश्रय दिला व तेजकर्णाला ही कुणकूण लागून त्यानें मला पकडण्यासाठीं एके दिवशीं ओंकारेश्वरावर अचानक छापा घातला, तेव्हां त्यानेंच मला स्त्रीवेष देऊन बाहेर लावून दिलें मी भागा-बाईला देखील माझी पाठची बहीण मानलें होतें. इतक्या जिव्हाळ्यानें माझ्या-वर प्रेम करणाऱ्या माणसांना मी माझे दावेदार कसे मानीन ! पण चंद्रशेखरानें माझ्या हाडवैऱ्याला आपली कन्या देऊं करावी. हा काय त्याचा लहानसान गुन्हा आहे? माझ्या दुस्मानाला सुखी करण्यासाठीं झटणारा जो मनुष्य तो एरव्हीं माझा जिवलग स्नेही असला तरी तोही माझा दुस्मानच! त्याच्याविषयीं मला रति-मात्र दयामाया अथवा आपुलकी वाटावयाची नाहीं."

आपल्या वकिलांचा दिल्लींत अपमान झाला ही वार्ता कळतांच बाजीराव पेशवे पुढील उद्योगाला लागल्यानंतर महिना सव्वा महिना लोटल्यावर एके दिवशीं भवानीराम व कालिदास हे विंध्याद्रि-सातपुड्याच्या निबिड अरण्यप्रांतांतून घोडदौड करतां करतां मार्गांत महू गांवीं सराईत विश्रांतीसाठीं थांबले होते, तेथें त्यांचें वरील संभाषण चाललें होतें. बोलतां बोलतां भवानीराम त्याच सराईत रात्रभर वस्ती करण्याच्या इरादानें कपडे काढूं लागलेला पाहून कालिदास म्हणाला, "हें काय ! भवानीराम कपडे काय काढतां ? आज इथें मुक्काम मुळींच करावयाचा नाहीं. अजून चांगला दोन घटका दिवस आहे."

" पण ओंकारेश्वर गांठावयाला आपणाला एक दिवसही पुरावयाचा नाहीं शिवाय रात्र काळोखी, व मार्ग हा असा अवघड ! हीं जंगलांतील दऱ्याखोरीं तुडवीत व नद्यानाले ओलांडीत काळोख्या रात्रीं कोठें जावयाचें ! लुटारू भिल्लांचे तांडे वाटमारीच्या उद्देशानें या रस्त्यांतून सारखे हिंडत असतात, व मराठ्यांचे शिपाईही आपल्या तलासावर असण्याचा संभव आहे. उगाच आपण होऊन संकटाला आमंत्रण द्यावयाचें, त्यापेक्षां आजची रात्र या महू नगरांत निवाऱ्या-च्या जागीं काढूं व मोठ्या पहाटेला ओंकारेश्वराकडे जावयाला निघू." याप्रमाणें भवानीरामानें कालिदासाची परोपरीनें समजूत करून पाहिली.

पण त्याचा कांहीच उपयोग झाला नाहीं. उलट कालिदास उद्गारला, " भवानीराम ! तुम्ही शूराचे लेक स्वतःला सिंहाचा छावा म्हणवितां, व एखाद्या भ्याडासारखें

हें काय बोलतां ? मला वाटतें, मराठ्यांच्या दराऱ्याची दहशत जी एकवार तुम्हांला बसली आहे, ती कांहीं केल्या तुमची पाठ सोडीत नाहीं ! ”

“ मराठ्यांचा दरारा तुम्हांला माहीत नाहीं म्हणून तुम्ही असें बोलतां.”

“ माहीत आहे; मला मराठ्यांचा दरारा माहीत आहे. बाजीराव पेशवा भगवा झेंडा फडकावीत 'हरहरमहादेव' असा रणमंत्र ललकारत थोड्या दिवसांपूर्वी दिल्लीवर चालून आला व त्यानें दिल्लीच्या आसपास भयंकर लुटालूट आणि जाळपोळ करून प्रत्यक्ष बादशहाच्याही तोंडचें पाणी पळवून त्याला दिल्लींतून पळ काढावयाला लावलें, तो प्रळय मी काळकादेवीच्या जत्रेत ‡ प्रत्यक्ष माझ्या

‡ दिल्लीच्या दक्षिणेला काळकादेवी या नांवाचें एक हिंदु देवस्थान आहे. रामनवमीच्या सुमाराला तेथें मोठी जत्रा भरते. बाजीराव व बादशहा यांच्यातील कथानककालीन झगडा सुरू असतां बादशहा आपल्या हस्तकांच्या लोणकढ्या थापांवर भुलून मराठ्यांचा मोड झाला असें समजून अगदीं शेफारून गेला व त्यानें आपल्या दरबारांतून पेशव्यांच्या वकिलालाही हांकलून लावून मारे आमोदप्रमोद सुरू केला. 'बाजिरावांना ही बातमी कळतांच आपण अजून जिवंत आहों हें बादशहाला प्रत्यक्ष दाखविण्यासाठीं बाजीरावांनीं दहा दिवसांचा प्रवास दोन अहोरात्रींत गांठून रामनवमीच्या दिवशीं ता. २९ मार्च सन १७३७ रोजीं काळकादेवीची जत्रा सुरू असतां दिल्लीपुढें येऊन तळ दिला. मराठ्यांनीं जत्रेंतील कांहीं हत्ती व दुकानें यांची लूट केली.त्या वेळीं जो गोंधळ उडाला, तो अवर्णनीय आहे. जाळपोळ केली असतां काम चिडीला जाईल असें वाटून बाजीराव ताल-कटोरा ऊर्फ झील तलावाच्या नजीक मालचा गांवीं झाडींत तळ देऊन राहिले. तेथून त्यांनीं बादशहाला पत्रें लिहून पुढील बेत कळविला. जत्रेंतील लुटीनें घाबरलेल्या लोकांनीं शहरांत जाऊन भलभलत्या कंड्या पिकविल्या. बादशहाला तें प्रथम खरेंच वाटलें नाहीं. कोणीतरी मेवाती चोर जत्रेंत घुसले असतील. व्यापाऱ्यांनीं तरी असला मौल्यवान माल उघड्या मैदानावर न्यावा कशाला ! असेंच बादशहा म्हणाला. पण भरंवशाच्या लोकांकडून बातमी आणविली, तों तें खरेंच ! तेव्हां मात्र त्याची घाबरगुंडी उडून अहोरात्र नाना विचार व बेत चालू झाले. पळून जाण्यासाठीं मागच्या बाजूला यमुनेंत त्यानें सर्व नावा जमविल्या. व आपला बचाव केला. ( मराठी रियासत—मध्यविभाग १.)

डोळ्यांनीं पाहिला आहे. पण आतां त्याची कसली मातब्बरी ! आपण आतां माळव्यांत आहों, व बादशहानें माळवा सुभा बाजिरावाकडून काढून निजामाला दिल्या दिवसापासून ह्या सुभ्यांत निजामाचा अंमल जारी झाला आहे. केवळ आम्ही बादशाही पक्षाचे लोक असें कळतांच जागोजागच्या किल्लेदारांनीं व जमीनदारांनीं आपला कसा आदरसत्कार आजवर केला, ते अनुभवूनदेखील तुम्ही अजून मराठ्यांना इतके भितां ? "

" भीतीचें सोडा पण पुढचा मार्ग बराच अवघड आहे नव्हे का ? "

" होय. अवघड खरा; पण आतां त्याचें काय! सती जावयाला निघाल्यावर अंग भाजतें असें म्हणून माघारीं थोडेंच फिरतां येतें ? "

" आणि हा पुढचा सारा मार्ग घनदाट जंगलांतून गेला आहे का ? कीं मोकळा आहे ? "

" मोकळा कसला, थेट जंगलांतून गेला आहे. भर दोन प्रहरींदेखील त्या मार्गानें जातांना सूर्यदर्शन होण्याची मारामार पडते."

" म्हणूनच भिल्ल लुटारू वगैरे लोकांना वाटमारी करावयाला चांगलें फावत असेल !"

" तर !"

" व्याघ्र, सिंह वगैरे हिंस्र पशु या अरण्यांत फार असतील ! "

" आहेत तर ! पण आतां त्याची चर्चा कशाला हवी ? इतकें भय तुम्हांला वाटत होतें, तर आरंभींच मीं सांगितलेला हिताचा शब्द तुम्हांला कां रुचला नाहीं ? "

भवानीरामानें भित्रेपणाचा आरोप केला, तो कालिदासाला रुचला नाहीं. तो मनांतून थोडासा भ्याला होता खरा; पण भ्याड माणसाला तरी स्वतःला भ्याड म्हणवून घेणें कोठें आवडतें ! तो उतरला, "भवानीराम ! मी भ्यालों नाहीं कांहीं! "

" तर मग ही सारी चौकशी कशासाठीं चालली आहे ? "

" चौकशी मी अशासाठीं करतों आहें कीं, आपल्या या वनसंचारावर एखादी रोमहर्षणकारी काव्यरचना करण्याचा माझा मानस आहे. तें काव्य जर मीं माघारा गेल्यावर कोट्याच्या राजमंडळांत गाऊन दाखविलें, तर शहाजादा त्या मजलशींत हजर असणारच; तो तें ऐकून बहोत खूष होऊन मला जर दिल्लीच्या दरबारांत राजकवि होतोस का असें म्हणाला नाहीं तर नांव कशाला ! पण

भवानीराम ! माझ्या काव्यप्रतिभेला नवोनव चैतन्य प्राप्त होण्यासाठीं मार्गांत जर एखादा हृदयस्पर्शी प्रसंग घडून आला असता तर काय बहार झाली असती ? "

" कोणता हृदयस्पर्शी प्रसंग घडून यावा असें तुमच्या मनांत आहे ? तुम्हांला खड्गांचा खणखणाट ऐकावयाचा आहे, कीं एखादा भुकेनें वखवखलेला व्याघ्र-सिंह डरकण्या फोडतांना आढळला पाहिजे आहे ? "

" शाबास ! शाबास ! ! अशाच आणखी कांहीं सुंदर कल्पना सुचव पाहूं ! वनश्रीच्या वैभवावर काव्य करावयाचें म्हणजे त्यांत हिंस्र पशूंच्या डरकण्यांचें वर्णन अवश्य पाहिजे. खड्गांचा खणखणाटही त्यांत ग्रथित करतां आला तर वाईट नाहीं. अशाच आणखी कांहीं प्रसंगोचित कल्पना तुझ्या डोक्यांतून बाहेर पडूंदेत; कीं त्या सर्वांच्या वर्णनपर सुंदर व रसाळ असें काव्य मी रचीन. हा विषय फार नामी आहे. आपण अशा रात्रीच्या वेळीं किर्रर झाडींतून दोघेच महत्त्वाच्या कामगिरीवर निघालों आहों, इतक्यांत आपणांवर वाटमाऱ्या भिल्लांनीं अचानक छापा घातला, त्यांच्याशीं लढून त्यांचा पराजय करून आपण बेडरपणें पुढें चाललों, तों एका बाजूनें एक सिंह व दुसऱ्या बाजूनें एक वाघ आपणांवर चवताळून चालून आले, त्यांतील वाघाला तुम्हीं ठार केलें व सिंहाला मीं ठार केलें !......"

" सिंहाला तुम्हीं ठार केलें ? भले बहाद्दर ! मग तो पहा सिंह. करा पाहूं त्याला ठार ! " असें म्हणून भवानीरामानें एकदम समोर बोट दाखविलें. त्याबरोबर 'कुठें आहे ? सिंह कुठें आहे ?' असें चांचपटत्या शब्दांत विचारतां विचारतां कालिदास चटकन् आपला घोडा भवानीरामाच्या घोड्याच्या मागें वळवूं लागला. त्याची अशी तिरपीट उडालेली पाहून भवानीराम खोः खोः हंसला ! कुठचा सिंह व कुठचें काय ! कालिदासाच्या शौर्याची धांव शब्दांच्या क्षेत्राबाहेर कधींच जावयाची नाहीं हें भवानीरामाला पक्कें माहीत असल्यामुळेंच त्यानें कालिदासाची ती केवळ थट्टा केली.

प्रकरण तिसरें

# ती स्त्री कोण ?

ती केवळ थट्टा आहे असें जेव्हां कालिदासाला कळून आलें, तेव्हां आपल्या भ्याडपणाचें आपणाकडूनच निष्कारण प्रदर्शन झाल्यामुळें त्याला विषाद वाटला. त्याला आपल्या काव्यप्रतिभेची थोरवी भवानीरामाच्या मनावर बिंबविण्यासाठीं गरुडाप्रमाणें आणखी कितीतरी कल्पनेच्या भराऱ्या मारावयाच्या होत्या; पण त्याचा विरस झाला. एवढ्यांतल्या एवढ्यात दोनदां आपली फजिती झालेली पाहून कालिदासानें चातुर्यानें विषयांतर केलें. तो भवानीरामाला म्हणाला, " भवानीराम ! तुमच्या पूर्वजांनीं एवढें मोठें वैभव संपादन केलें व त्या वैभवाला मुकण्याचा दुर्धर प्रसंग तुमच्यावर आला, तरीही तुम्ही धिमेपणानें व पूर्ण आशावादित्वानें आपल्या पूर्वजांचें वैभव पुन्हा संपादन करण्याचा उद्योग सुरू ठेविलाच आहे. इतक्या लहान वयांत इतका धडाडीचा पराक्रम तुम्ही गाजवीत आहां, तुमची खरोखर धन्य आहे. तुमच्या वनवासावर एक मनोरम काव्य रचितां येण्याजोगें आहे. या विंध्याद्रि-सातपुड्याच्या दऱ्याखोऱ्यांतून रात्रंदिवस वणवण हिंडता हिंडतां तुम्हांला फारच कटु अनुभव आले असतील नाहीं ! "

स्तुतिप्रियता हा मनुष्याचा सामान्यतः स्वभावधर्मच आहे, व त्याला भवानीराम कांहीं अपवाद नव्हता. शिवाय भवानीरामानें लहानपणापासून खडतर वनवास भोगला होता हेंही अक्षरशः खरें. बाजीराव पेशव्यांनीं एकदां सारंगपूरच्या राजा गिरिधरवर जे शस्त्र धरलें, तें गिरिधरच्या वंशाच्या व त्याच्या राजवैभवाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडेपावेतों खालीं ठेवलें नाहीं. राजा गिरिधराचा वंश त्याच्या पूर्वजांपासूनच बादशाही सत्तेसमोर लाळ घोंटून व गोंडा घोळून स्वार्थ साधण्यांत पटाईत म्हणून विख्यात होता. माळव्यांतील इतर बहुतेक सारे ठाकूर चौधरी एकजुटीनें जुलमी बादशाही सत्तेच्या प्रतिकारार्थ सज्ज झाले; अशा वेळीं दयाबहाद्दराच्या पूर्वजांनीं त्या बादशाही सत्तेची कांस धरून धडधडीत देशद्रोह आरंभिला; आणि राजा गिरिधर, त्याचा भाऊ दयाबहाद्दर वगैरे मंडळीनींही तें देशद्रोहाचें अधम व्रत अखंड पाळून बादशहाकडून माळव्याची सुभेदारी संपादन केली, व ती मिळाल्यावर त्यांनीं आपल्याच हिंदु बांधवांना परोपरीनें

छळण्याच्या कामीं तत्कालीन कट्टया हिंदुद्वेष्ट्या मुसलमानांवरही ताण केली ! ती त्यांचीं अघोर कर्में हिंदुजण कसा विसरणार ! 'पण सत्तेपुढें शहाणपण नाहीं या न्यायानें जोंवर राजा गिरिधरचा चालता काळ होता, बादशहाच्या कृपेचें अभंग छत्र जोंवर त्याच्या मस्तकावर अखंड ढळत होतें, तोंवर त्याचा प्रतिकार करणें अथवा त्याच्याविषयीं उणादुणा चकारशब्द बोलणेंही तद्देशीय हिंदु जनतेला धोक्याचें वाटत होतें. ती सद्दी संपली; बाजीराव पेशवे व त्यांचे बंधु चिमाजी-अप्पा यांनीं हिंदपदपादशाहीच्या महत्तम कार्याच्या मार्गांतील असले कांटे आपल्या मार्गांतून भराभर वेंचून, बाजूला सारून, तुडवून नामशेष करण्याला सुरुवात केली. त्याबरोबर जनताजनार्दनाचें खरें उग्र स्वरूप राजा गिरिधरला जाणवूं लागलें. त्यांतच राजा गिरिधरचा पहिला बळी पडला. त्यानंतर भवानी-राम कसाबसा बापाच्या जागीं सत्तारूढ झाला; पण त्याचा चुलता दयाबहाद्दर यानें त्याला हां हां म्हणतां दूर लोटून सारंगपूरचें राजवैभव स्वतः बळकाविलें. तेव्हां भवानीराम भणंगभिकारी बनून दाही दिशां वणवण हिंडूं लागला. पण त्या सर्पाच्या पिलाचा कैवार कोण घेणार ? दयाबहाद्दरानें त्याला ठार करण्याचाच घाट घातला होता. पण मंडलेश्वरचा चौधरी चंद्रशेखर याने त्याला पाठीशीं घातलें, म्हणून तो बचावला. तरीही लोक देखील राजा गिरिधरच्या वंशाचा समूळ निःपात करण्यासाठीं टपून बसले होते; त्यांच्यापासून स्वतःचा बचाव करण्यासाठीं भवानी रामाला वेषांतर करून पळ काढावा लागला. तेव्हांपासून तो जो नापत्ता होता तो आज इतक्या वर्षांनीं पुन्हा माळव्यांत उगवला होता. चंद्रशेखर व इतर मंडळी यांची तर ठाम कल्पना झाली होती कीं, भवानीराम ठार झाला. भवानीरामाला बाजूला सारून दयाबहाद्दर सारंगपूरच्या दौलतीचा धनी झाला; पण त्याचाही पेशव्यांनीं फडशा उडविला, व सारंगपूरचा देशद्रोही चौधरी वंश निःशेष झाला म्हणून तत्प्रांतीय सर्व हिंदूंना एकदांचें हायसें वाटलें.

तात्पर्य, भवानीरामाचा आजवरचा बहुतेक सारा जन्म अत्यंत हालअपेष्टांत गेला होता यांत संशय नाहीं. आणि त्या हालअपेष्टा वास्तविक तापदायक होत्या त्यापेक्षां जास्त तापदायकशा भवानीरामाला वाटत होत्या याचें कारण त्याच्या वंशाच्या व वैभवाच्या वाताहातींत अखिल हिंदु जनता परमसंतोष मानीत होती. तो बादशहापाशीं आश्रय मागण्यासाठीं गेला; पण नानापरींच्या विलासविहारांत अष्टौप्रहर दंग असणारा बादशहा किंवा वजीर वगैरे त्याचे डावे-उजवे हात त्याना थोडेंच ओळ-

खतात ! तरीही भवानीराम धिमेपणानें, मोठ्या धैर्यानें व चातुर्यानें शहाजाद्याच्या पदरीं सामान्य सेवकाची नोकरी पत्करून अनुकूल काळाची वाट पहात आजवर स्वस्थ बसला होता. तो अनुकूल काल त्याला आतां कुठें लाभूं पहात होता. इतक्या दिवसांत त्याला मायेचा, उत्तेजनाचा अथवा सहानुभूतीचा एकही शब्द कोणाकडून ऐकावयाला मिळाला नव्हता; त्यामुळें आज कालिदास त्याचीं स्तुतिस्तोत्रें गाऊं लागलेला ऐकून त्याला संतोष कां वाटणार नाहीं ! त्यानें मनमोकळेपणानें आपल्या वनवासाची सविस्तर कहाणी कालिदासाला निवेदन केली. त्या गप्पागोष्टींत त्यांचा प्रवासही सुखासमाधानानें चालला होता. मधून मधून त्या जंगलवाटेंत एखादी दरी अथवा विस्तीर्ण जाळी आढळली कीं, 'या दरींत एखादा सिंह दडून बसला असेल काय ?' 'या जाळींतून एखादा वाघ आपणावर झडप घालील काय ?' अशा संशयात्मक भयानें कालिदासाच्या अंगावर कांटा उभा राही व भवानीरामाची कहाणी ऐकतांना त्याचें अवधान सुटूं पाही. पण त्या वेळीं तो नुसत्या हुंकारावर 'वाहवा' 'शाबास !' 'भले बहाद्दर !' अशा ठराविक सांच्याच्या शब्दांवर वेळ मारून नेत असे. कालिदास कवि होता; तो अर्थशून्य शब्द अव्ययें वगैरेंची पुरवणी आपल्या कवितांना देऊन मात्रा-गणवृत्तांची सांगड घालून देण्यांत जितका पटाईत होता, तितकाच पटाईतपणा तो या वेळीं आपण भ्यालों नाहीं हें दाखविण्यासाठीं हरयुक्तीनें उपयोगांत आणीत होता. आजच्या आज थोड्या अवकाशांत दोन वेळां भवानीरामानें त्याच्यावर भित्रेपणाचा आरोप केला, तो त्याच्या मनाला बोंचत होता, व तो भित्रेपणा पुन्हा उजेडांत येऊं नये यासाठीं शक्य तितकी खबरदारी घेत होता. ज्याप्रमाणें एखादी दरी अथवा जाळी पाहून त्या कालिदासाचें मन भयग्रस्त होई, त्याप्रमाणेंच समोरून हरणें निर्भयपणें इकडून तिकडे इतस्ततः नाचतबागडत असलेलीं पाहून त्याला धीर व कुतूहलही वाटे, आणि क्षणभर विस्मयदेखील वाटे; कीं "हे गोजिरवाणे मुके प्राणी परचक्रापासून आपलें रक्षण करण्याला शस्त्रास्त्रांच्या अभावीं असमर्थ असतां देखील अशा निबिड अरण्यांत निर्भयपणें बागडतात, व मी एवढा कल्पक व सशस्त्र मनुष्य असतांही इतका भितों, याचा अर्थ काय ?"

याप्रमाणें गोष्टी बोलत बोलत मौजेनें प्रवास करतां करतां त्या दोघांना समोर बऱ्याच अंतरावर एका टेंकाडावर एक भव्य मंदिर दिसलें. इतक्या दूरच्या अंतरावरून देखील त्या मंदिराचें शिखर व त्याच्या सभोंवारचा वनप्रदेश अस्त-

मान सूर्याच्या सुवर्णकिरणांनीं व्यापून गेल्यामुळें जणुं काय सुवर्णजलाचा मुलामा केल्याप्रमाणें मनोहर दिसत होता. भवानीराम त्या मंदिराला अनुलक्षून कालिदासाला म्हणाला, "कालिदास! तें मंदिर पहा. तें माझ्या आयुष्यांतील एका अत्यंत महत्त्वाच्या क्रांतीची मला आठवण करून देत आहे."

"ते मंदिर कसलें?" कालिदासानें विचारलें.

"तें त्रिभुवनेश्वराचें मंदिर आहे." भवानीराम उत्तरला.

"आणि तें कसली साक्ष देत आहे म्हणाला?"

कालिदासाच्या या प्रश्नावर भवानीराम किंचित् गोंधळला. पण लगेच 'तो आतां हा माझा मित्र व सहकारी आहे; याच्यापाशीं बोलावयाला काय हरकत आहे?' असें स्वतःच्या मनाचें स्वतःशींच मनोमय समाधान करून उद्गारला, "पण तुम्हा ही गुप्त वार्ता कोठेंही बाहेर फोडतां कामा नये."

"नाहीं, मुळींच नाहीं. तुम्ही अगदीं निर्भयपणें बोला." कालिदास उत्तरला.

भवानीराम म्हणाला, "त्या त्रिभुवनेश्वराची शपथ आहे कोठें या गोष्टींची वाच्यता कराल तर!"

"अगदीं त्रिभुवनेश्वराची शपथ! तुमच्या गळ्याची शपथ!" कालिदास पुन्हा उद्गारला.

भवानीराम सांगूं लागला, "एक काळ असा होता कीं, तेव्हां त्या त्रिभुवनेश्वराच्या मंदिरांत आत्यंतिक एकान्तांत बसून आम्ही आमच्या या मायभूमीच्या स्वातन्त्र्य-संपादनाप्रीत्यर्थ मनोरथांचे भव्य मनोरे रचीत असूं."

"असें?"

"होय."

"केव्हां ते?"

"नुक्तेच पांच वर्षांपूर्वी."

"आणि तुमच्या या वाटाघाटी कोणाशीं चालत?"

"जयपूरचे राजपुत्र धर्मसिंग व ईश्वरसिंग, वढवाणीचा ठाकूर अनुपसिंग, मंदावराधीश अनुराधसिंगाचा धाकटा भाऊ सज्जनसिंग, मेवाडचा राजा जगत्‌सिंग, सध्यां जयपुराधिपति जयसिंगजींच्या पदरीं असलेला विख्यात राजकवि रत्नाकर, जगत्‌सिंगाचा मेहुणा भैरवगडचा राजा विक्रमसिंग, अशी आम्ही बरीचशी तरुण मंडळी त्या त्रिभुवनेश्वराच्या मंदिरांत बसून दिल्लीची जुलमी

बादशाही सत्ता कशी उलथून पाडावयाची व हिंदवी साम्राज्याचें पुनरुज्जीवन कसें करावयाचें, याविषयीं प्रहरांचे प्रहर–दिवसांचे दिवस वाटाघाटी करीत असू. जगत्सिंग हा आम्हीं सर्वांनीं आमचा पुढारी मानला होता."

"काय ? जगत्सिंगजी तुमचे पुढारी होते ?" असें कालिदासानें विचारतां विचारतां आपल्या चर्येवर महदाश्चर्य प्रगट केलें.

"होय." भवानीराम त्याच्याकडे पाहून गंभीर स्वरांत उद्गारला. "तुम्हांला इतकें आश्चर्य कां वाटलें तें मीं ओळखलें. पण आम्हां सर्वांत पुढारी होण्याला जगत्सिंगच सर्वांत अधिक लायक म्हणून त्याला आम्हीं पुढारी नेमलें अशांतली गोष्ट नाहीं. वास्तविक विक्रमसिंगजी हे आमचे खरे पुढारी; आमची नव चैतन्यदात्री दिव्य प्रेरक शक्ति ती ! राणी इंद्रकुमारीच्या बाबतींत बादशहाच्या रोषाला पात्र झालेल्या विक्रमसिंहजींना मारवाडाधिपति अजितसिंगजींच्या पश्चात् अज्ञातवास पत्करणें भाग पडलें, तेव्हां त्यांनीं त्रिभुवनेश्वराचा आश्रय केला. बादशाही सत्तेचा जाच प्रथम खरा असह्य झाला असा त्यांना ! त्यांचें वास्तव्य त्रिभुवनेश्वरीं होऊं लागल्यापासून तेथूनच त्यांच्या स्वातंत्र्याचा प्रारंभ झाला, व हळुहळू आम्हां सर्वांचीच ती कर्मभूमि बनली. विक्रमसिंहासारख्या त्यागमूर्तीचा सत्संग घडल्यावर आमच्या मनोभावना देशहितैक तत्पर बनल्या यांत आश्चर्य काय ?"

"तर मग विक्रमसिंहजी तुमचे पुढारी होते; जगत्सिंह नव्हते कांहीं !"

"होय, आमचे खरे पुढारी विक्रमसिंहजीच होते. पण त्यांच्याच आग्रहावरून जगत्सिंग आमच्यांत येऊन मिसळले व आम्हीं त्यांना आमचे नामधारी पुढारी नेमिलें. त्यांना पुढारी नेमण्याचें कारण असें कीं, मेवाडच्या प्राचीन राज्याचे ते अधिपति, वीरोत्तम बाप्पारावळ चक्रवर्त्याचे ते वंशज, शिवाय यवनांच्या अमानुष अत्याचारांत त्या मेवाडच्या राजवंशाइतकें दुसऱ्या कोणत्याही रजपूत वंशाचें पावित्र्य अभंग राहिलेलें नाहीं; इतर बहुतेक साऱ्या रजपूत राजेरजवाड्यांनीं यवनाशीं सोयरीक करून आपल्या लेकीबहिणी यवनांच्या विलासमंदिरांत पाठवून आपल्या कुळाच्या उज्ज्वलतेला कलंक लावलेला आहे. ह्या सर्व रजपूत राजांची एकी झाल्याशिवाय बादशाही सत्तेला शह देतां येणें शक्यच नव्हतें. हें ओळखूनच फार दिवसांपासून सर्व रजपुतांची एकी करण्याचे नानापरींचे उपाय सुरू होते. त्यांतला एक मुख्य परिणामकारक उपाय असा

कीं, मेवाडची राजकन्या ज्या राजवंशांत दिली असेल, त्या राजाला त्या राजकन्येपासून पुत्र झाला असल्यास तोच त्या राजाच्या पश्चात् त्या राज्याचा वारस समजला जावा. या न्यायानें मेवाडाधिपति ओघानेंच सर्व रजपुतांचा पुढारी ठरला होता, हें जगत्‌सिंगाला सर्व रजपुतांचें पुढारीपण प्राप्त होण्याचें एक कारण होतें. आणखी दुसरें कारण असें कीं, जगत्‌सिंगाला पुढारी नेमण्यांत आलें नसतें, तर तो आम्हां सर्वांच्या एकीच्या प्रयत्नांत खो घालण्यालाहीं वेळीं तयार झाला असता."

"पण सर्व रजपुतांच्या एकीशीं तुम्हांला काय करावयाचें होतें?"

"म्हणजे काय?"

"तुम्ही पडलां ब्राह्मण; खरें ना?"

भवानीराम किंचित् त्वेशांत येऊन म्हणाला, "कालिदास, तुम्ही कवि आहां झालें! मी ब्राह्मण असलों म्हणजे हिंदु नव्हे कां काय?"

"तसें कांहीं मी म्हणत नाहीं."

"मग कसें म्हणतां? 'सर्व रजपुतांच्या एकीशीं तुम्हांला काय करावयाचें होतें' ह्या तुमच्या प्रश्नाचा रोंखच मला कळला नाहीं!"

आतां बाजू आपल्या अंगाशीं येते असें दिसतांच कालिदास मोठ्या चतुराईनें विषयांतर करून म्हणाला, "नाहीं! मी असें म्हणालों कीं, जगत्‌सिंगजी कसे वागतात हें तुम्हीआम्ही आतां पहातच आहों. आपल्या भाच्याला गादी मिळावी म्हणून बादशहा, वजीर, निजाम, यांच्याशीं संगनमत करण्याइतकीही त्यांच्या मनाची तयारी झाली आहे.—"

"राज्याधिकार प्राप्त झाल्यापासून त्यांची वृत्ति चळली आहे, विलास-विहारांची भयंकर चटक त्यांच्या जिवाला लागली आहे; व त्यामुळें ते आपल्या क्षात्रधर्माला आणि स्वाभिमानाला पारखे झालेले आहेत. पूर्वीं ते इतके कांहीं बहकले नव्हते; पण गादीवर आल्यापासून गेल्या चार वर्षांत त्यांची मति चळली आहे. त्यांच्यावर कोणाचा दाब नाहींसा झाला. पुढें विक्रमसिंहजी नापता झाल्यापासून मात्र आमचे सारेच बेत ढांसळले."

"विक्रमसिंहजींची वाताहात उडण्यालाही कांहीं अंशीं जगत्‌सिंगजी कारण होतेच, खरें ना?"

"असतील. पण विक्रमसिंहजींच्या सर्वनाशाला खरोखर तो नीच कुलांगार धोकलसिंगच कारण झाला."

"कोण ! अभयसिंग ! विक्रमसिंहजींचा मेहुणा–राणी इंद्रकुमारीचा भाऊ–मारवाडचा राजा अभयसिंग का ?"

"होय, तोच. तो अभयसिंग कसला ? मूर्तिमंत भयरूपी विनाशकर्ता कुलांगार तो ! म्हणूनच त्याला सारें जग आतां धोकलसिंग* याच नांवानें ओळखूं लागलें आहे. त्या नीचानें राज्य मिळविण्यासाठीं प्रत्यक्ष आपल्या पित्याला ठार करवयालाही कमी केलें नाहीं; व त्या त्यांच्या दुष्ट वर्तनांना इंद्रकुमारी आणि विक्रमसिंह यांचा अडथळा होऊं लागला म्हणून त्यानें विक्रमसिंहजींना विश्वासघातानें मारेकऱ्यांकडून ठार मारवून प्रत्यक्ष आपल्या बहिणीच्या कपाळींचें कुंकू पुसलें !"

"खरेंच, इंद्रकुमारीची पुढें काय गत झाली ?"

"कोणी म्हणतात कीं, तिला त्या चांडाळानें अन्नापाण्याविणें हाल हाल करून ठार मारलें; कोणी म्हणतात, ती विषप्राशन करून मरून गेली; कोणी म्हणतात ती सती गेली; खरें काय तें भगवान् जाणे !"

"एकूण विक्रमसिंहजींच्या पश्चात् तुमच्या स्वातंत्र्यसंघाचीही वाताहात उडाली म्हणावयाची !"

"होय. एकदां घडी विस्कळली ती विस्कळली. धोकलसिंगानें आमच्या संघाविषयींची दातमी बादशाही दरबारापर्यंत पोंचविली; व बादशहानें कोट्याचा दुर्जनसाल, माझा धनी अनुराधसिंग, ओरछाचा कुंवर लक्ष्मणसिंगजी वगैरे रजपूत राजांना आपल्या बाजूला वळवून घेऊन त्यांच्या हातूनच आमच्या संघाला मूठमाती देवविली. कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ म्हणतात ते अशांनाच !"

---

* 'पेशवाईचा ध्रुव ढळला !' या 'पेशवाई मालेंतील चौथ्या कादंबरींत प्रस्तुत कथानकांतील एक नायिका इंद्रकुमारी व तिचा पिता मारवाडचा राजा अजितसिंह यांचा वृत्तान्त आला आहे. अभयसिंग हा अजितसिंगाचा पुत्र अर्थात् इंद्रकुमारीचा सावत्र भाऊ होय. स्वतःच्या दुष्कृत्यांमुळें तो त्याच्या काळीं धोकलसिंग अर्थात् विनाशकर्ता या नांवानें प्रसिद्ध होता.

" असें काय ? एकूण तुमच्या आयुष्यांत आरंभापासून अशीं अघटित स्थित्यंतरें घडून आलीं म्हणावयाचीं ! बाकी, तुमचा देखील नाइलाज होता, हें मी जाणतो. आपल्या मंडळींत कोणी पुरस्कर्ता भेटेना अशी तुमची खात्री झाल्यावर तुम्ही तरी काय करणार ? "

" अर्थात् ! मी एकटा माणूस तेथें काय करणार ? इमारतीचे सारे आधारस्तंभ ढांसळून पडल्यावर माझ्यासारखीं त्या इमारतीवरील कौलें आपोआप ढांसळून पडावयाचीच ! " या वेळीं भवानीरामाला स्वतःच्या वर्तनाविषयीं लाज वाटूं लागली. पण ज्याचें मन पापी, त्याला त्याचीं पापें क्षणोक्षणीं भेडसावीत असतात व आपण पापी नाहीं असे इतरांना दाखविण्यासाठीं तो एकसारखी धडपड करीत असतो. भवानीरामही आपल्या पापी वर्तनाचें समर्थन करण्याच्या अंतस्थ इराद्यानें पुढें म्हणाला, " बाकी, पुढें मीं केलें तें बरोबर केलें असेंच मला वाटतें. हे सारे रजपूत राजे, ठाकूर, चौधरी आपल्या देशाशीं बेइमान ठरले, तेव्हांच मीं माझ्या मनाशीं खूणगांठ बांधली कीं, परक्यांच्या दास्यकर्दमांत लोळण्याचीच या षंढांची लायकी ! स्वातंत्र्याचा आस्वाद घेण्याचें यांच्या कपाळीं नाहीं. मग मी तरी जमेल त्या मार्गानें माझ्या जन्माचें सार्थक कां करून घेऊं नये ? "

ओंकारेश्वराकडे जाण्याचा जवळचा मार्ग त्रिभुवनेश्वराच्या पायथ्यानेंच जात असल्यामुळें जसजसे भवानीराम व कालिदास पुढें पुढें जाऊं लागले तसतसें तें मंदिर जास्त जास्त स्पष्ट व मनोहारी दिसूं लागलें. मात्र गोष्टींच्या भरांत कालिदासाचें तिकडे लक्ष नव्हतें. पण बोलतां बोलतां ते दोघे त्या मंदिरापाशीं येऊन पोंचले. तेव्हां कालिदास क्षणभर आपला घोडा आवरून पायांखालच्या टेकाडावरून त्या मंदिराच्या दक्षिणेला असलेल्या सुंदर सरोवराकडे पाहूं लागला. कालिदास अग्रभागीं चालत असल्यामुळें व ती वाट नेमकी एकाच मनुष्याला अथवा घोडेस्वाराला एका वेळीं जावयाला पुरणारी अरुंद असल्यामुळें कालिदासामागोमाग भवानीरामालाही आपला घोडा आवरावा लागला.

" कां ? कालिदास ! असे एकाएकीं थबकलां कां ? " भवानीरामानें विचारलें.

" तें पहा डाव्या हाताकडे एक सुंदर सरोवर आहे. त्याचें नांव काय बरें ? " कालिदासानें प्रश्न केला.

" त्याला त्रिभुवनतीर्थ म्हणतात."

" वाः ! सरोवराप्रमाणेंच त्याचें नांवही फारच सुंदर आहे ! मला वाटतें, भवानीराम ! आपण या तीर्थावर स्नान केल्याशिवाय पुढें जाऊं नये."

" पण मग रात्र होईल ती ? तो पहा सूर्यही अस्ताला गेला; व आतां काळोखी रात्र आपल्या डोक्यावर उभी आहे."

" खरें आहे. मग मला वाटतें, आपण आजची रात इथेंच या देवालयांत वस्ती करून मग उदईक पुढच्या मार्गाला लागावें हें बरं. म्हणजे या पुण्य-तीर्थाचें स्नानही घडेल, त्रिभुवनेश्वराचें दर्शनही होईल आणि मोठ्या पहांटेला चांदणें पडतांच एथून पुढच्या मुक्कामाला निघतां येईल."

" काय ? कालिदास ! अशा या भयाण जागीं रात्रीं वस्ती करावयाची ? त्यापेक्षां आपण असेच अविलंबानें घोडदौडीनें पुढें गेलों तर एथून दोन कोसांवर कांतारपूर या नांवाचें खेडें आहे व त्याला लागूनच कांतारगड या नांवाचा किल्ला आहे. वाटल्यास आपण कांतारपुरांत वस्ती करूं, किंवा कांतारगडावर वस्तीला जावयाचें म्हटलें तरी तेथल्या किल्लेदाराशींही माझी चांगली जानपछान आहे. आपले घोडेही बरेंच थकले आहेत; त्यांनाही तेथें विश्रांति मिळेल व त्यांच्या दाणावैरणीचीही व्यवस्था होईल."

" पण मला वाटतें, हें स्थानही अगदींच निर्जन नाहीं. इथेंही आपणांला जरूर ती विश्रांति मिळेल, व तीर्थस्नानाचें आणि देवदर्शनाचें पुण्य अनायासें पदरीं पडेल."

" कालिदास ! तुम्हांला वेड तर नाहीं लागलें ? हें स्थान निर्जन नाहीं कशावरून ? "

" ती पहा, त्या सरोवराच्या कांठीं कोणी सुंदर स्त्री सरोवरांतील कमळें तोडीत आहे." कालिदास सरोवराकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाला, " अशा सूर्यास्ताच्या वेळींही ती स्त्री ज्या अर्थी इथें आढळते, त्या अर्थी ती इथेंच जवळपास कोठें तरी वास्तव्य करीत असावी. तिच्या ओळखीनें आपणांला एथें आश्रय मिळणें मला तरी अवघड वाटत नाहीं."

" खरेंच ! " भवानीराम आपल्या घोड्याच्या पाठीवरूनच तिकडे वांकून पहात म्हणाला. " पण समजा, शत्रुपक्षापैकीं एखाद्याच्या कुटुंबांतील ती स्त्री असली तर ? मग आपल्या फजितीला पारावार उरावयाचा नाहीं."

" त्याची काळजी तुम्हांला नको. शत्रु अथवा मित्र जो कोणी भेटेल, त्याच्या मनाजोगें बोलून प्राप्त प्रसंगांतून पार पडण्याच्या कामीं माझा हातखंडा आहे."

" पण तुम्हांला आजच काय तीर्थस्नानाविषयीं एवढी उपरति झाली? मार्गांत आपणांला इतकीं लहानमोठीं तीर्थक्षेत्रें आढळलीं; पण तिकडे तुम्हीं ढुंकूनही पाहिलें नाहीं."

" खरें; पण मित्रा! या स्थानाचा आजचा महिमा कांहीं और आहे. मीं आजवर इतकीं तीर्थक्षेत्रें हिंडून पाहिलीं; पण इतका मनोरम काव्यविषय मला कोठेंच आढळला नाहीं. पहा, तें सरोवर किती सुंदर आहे! त्यांत कमलें कशीं जागोजाग विखुरलीं आहेत! मावळत्या सूर्याच्या सोनेरी किरणांनीं त्या सरोवरांतील जलाला कसा सोनेरी रंग चढला आहे! ते पहा, पलीकडे त्या सरोवरांत हंस कशी स्वैरक्रीडा करीत आहेत! आणि अशा नितान्तरमणीय सरोवराच्या कांठीं ती कोणी शुभ्रवसना सुंदरी कमलें खुडीत उभी आहे! खरोखर, कैलासांतील मानससरोवराचें सौंदर्यदेखील या त्रिभुवनतीर्थाच्या सौंदर्यापुढें फिकें ठरेल. आपण तर या विषयावर एक सुंदर काव्य रचणारच रचणार!"

" एकूण कालिदास! तुमच्या काव्यप्रतिभेचा सारा भर या शुभ्रवसना सुंदरीवर आहे म्हणावयाचा! तिला पाहतांच थोड्या वेळापूर्वीच्या तुमच्या साऱ्या शंका चट्साऱ्या मिटल्या!" असें म्हणून भवानीरामानें कालिदासाचे थोड्या वेळापूर्वींचे शब्द मोजून त्याच्या पदरांत घातले. पण कालिदासानें आपला हेका कांहीं सोडला नाहीं.

त्या दोघांचें एवढें संभाषण चाललें आहे, तोंच ती सरोवराच्या कांठींची शुभ्रवसना सुंदरी जरूर तेवढीं कमलें तोडून घेऊन देवालयाच्या मार्गाला लागली. तें पाहून कालिदासानेंही आपला घोडा देवालयाकडे वळविला. भवानीरामालाही नाइलाजास्तव त्याचें अनुकरण करावें लागलें. त्या दोघांनाही मनांतून महदाश्चर्य वाटत होतें कीं, अशा घनदाट जंगलांतील एकान्ताच्या निर्जन स्थलीं वास्तव्य करणारी ही स्त्री कोण असावी!

## प्रकरण चवथें

# कालिदासाचा परिचय

त्रिभुवनतीर्थाचा त्रिभुवनेश्वराच्या भव्य देवालयाला अर्धवर्तुलाकार वेढा पडलेला होता, व तीर्थापासून त्रिभुवनेश्वराच्या मंदिराकडे जाण्यासाठीं सुमारें शंभर पायऱ्यांची भक्कम चिरेबंदी चढती वाट बांधण्यांत आलेली होती.

त्रिभुवनेश्वराच्या त्या रमणीय मंदिराकडे ती कोणी शुक्लवसना सुंदरी हातीं कमळें घेऊन जाऊं लागली, ती सर्व पायऱ्या चढून मंदिराच्या तटाला असलेल्या भव्य प्रवेशद्वाराच्या आंत प्रविष्ट झाली, तेव्हां भवानीराम व कालिदास हेही समोरच्या वाटेनें दुसऱ्या प्रवेशद्वारांतून मंदिराच्या प्रांगणांत प्रविष्ट झाले. त्या दोघांना पाहून ती स्त्री चमकल्यासारखी होऊन क्षणभर जागच्या जागींच उभी राहिली; तेव्हां त्या दोघांना तिचें समोरासमोर दर्शन घडलें. ज्याप्रमाणें ती स्त्री त्या दोघां परक्या माणसांना पाहून चमकली, त्याप्रमाणेंच ते दोघेही तिला पाहून चमकले व एकमेकांच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागले.

“ भवानीराम ! ” कालिदासानें आपल्या घोड्यावरून उतरतां उतरतां हळूच हांक मारली.

“ काय म्हणतां ! ” भवानीरामानें आपल्या घोड्यावरून उतरतां उतरतां विचारलें.

तेवढ्यांत ती स्त्री तिमूटपणें मंदिरांत निघून गेली. पण जातां जातां तिनें त्या दोघांकडेही तीक्ष्ण नेत्रकटाक्ष फेंकण्याला कमी केलें नाहीं. कालिदासानें आपल्या निरंकुश कवित्वप्रतिभेच्या जोरावर त्या नेत्रकटाक्षांची संगति लावण्याचा प्रयत्न केला. अर्थात् ती संगति लावतांना त्यानें त्या स्त्रीच्या अत्यंत साध्या व विरक्तिपूर्ण शुभ्रवस्त्रपरिधानामुळें ठळकपणें दिसून येणाऱ्या नैसर्गिक अनुपम सौंदर्याचा मनोमय आढावा घेण्यालाही कमी केलें नाहीं.

“ मला वाटतें, ही स्त्री कोणीतरी परित्यक्ता राजमहिषी अथवा राजघराण्यांतील कोणी स्त्री—निदान थोरामोठयांची स्त्री–तरी खास असावी. कारण, इतकें अनुपम सौंदर्य गोरगरिबांच्या संसारांतून कोठचें आढळून यावयाला ! ”

“ मलादेखील तसेंच वाटतें.” भवानीराम म्हणाला.

"वाटतें का? मला तर अशी पूर्ण खात्री वाटते. तिची नाजूक शरीरयष्टि सांगते कीं, ती अशा निर्जन अरण्यांत आयुष्य कंठण्यासाठीं खास जन्माला आली नसली पाहिजे. वयानेंही ती फार दिसत नाहीं; ती तरुणी नसली तरी प्रौढा आहे खास. तारुण्याच्या ऐन उमेदींत संसाराचा सारीपाट भवितव्यतेनें निष्ठुरतेनें उधळून टाकल्यामुळें अथवा अशाच अन्य कांहीं कारणांमुळें संसारांतून व समाजांतून उठलेली ती कोणीतरी अभागी स्त्री असली पाहिजे. आणि तिनें आतां आपणांकडे पाहिलें तें देखील अत्यंत करुणास्पद दृष्टीनें पाहिलें. मी एवढा राजकवि आहें खरा; सर्व लोक मला प्रतिभावान् कवि म्हणतात. जयसिंगजींच्या पदरचा रत्नाकर कवि इतका नांवाजलेला ना, पण त्याची प्रतिभाही माझ्या प्रतिभेसमोर फिक्की पडते, असें माझ्या कवित्वाचा एकवार आस्वाद घेतलेले सारे राजेलोकही म्हणतात. पण त्या सुंदरीचें अशा भयाण स्थळीं वास्तव्य करण्याचें अपूर्व धाडस, तसेंच तिचें सौंदर्य, विशेषतः तिचे नेत्रकटाक्ष, यांतील उपजत काव्य इतकें स्वाभाविक व सामर्थ्यवान आहे कीं, त्या काव्याला शब्दकाव्याचें रूप देतांना माझी प्रतिभा अपुरी पडेल कीं काय असें भय मला वाटतें."

कालिदासाच्या काव्यप्रतिभेचें चऱ्हाट ऐकण्याचा भवानीरामावरील हा कांहीं पहिला प्रसंग नव्हता. त्या दोघांची ओळख नवीनच केवळ गेल्या दोनतीन महिन्यांपासूनची होती हें खरें; पण ह्या दोनतीन महिन्यांत त्याला वीट येण्याइतका कविलाघवाचा आस्वाद चाखावयाला मिळाला होता. मात्र यावरून कालिदास प्रतिभावान् कवि नव्हता असें नाहीं. तो स्वतःला जितका प्रतिभावान् समजे तितकी प्रतिभा त्याच्या अंगीं नसली तरी जनमनांना रिझविण्याला उपयुक्त असा मधुर आवाज, मृदु शब्दयोजना व कल्पनेच्या गरुडभराऱ्या हीं त्याच्या काव्याचीं तीन मुख्य उपांगें असल्यानें त्याच्या कवितेंत प्रसाद उत्पन्न होण्याला प्रयास पडत नसत. शिवाय आणखी एक 'कला' त्यानें हस्तगत केली होती; ह्या कलानैपुण्याच्या जोरावर त्याला आपल्या तांब्याच्या अथवा रुप्याच्या मोलाच्या कविता सोन्याच्या मोलानें समाजाच्या बाजारांत मांडतां येत, व त्यांचें योग्य मोलही त्याला मिळे. ती कला म्हणजे तोंडपुजेपणा ऊर्फ लाळघोटेपणा होय. कोणा एखाद्यावर आपली छाप ठेवून द्यावयाची झाली कीं, कालिदासानें त्या माणसावर परमस्तुतिपर काव्याचा मोहिनी रामबाण सोडावयाचा, व तो बहुशः हटकून लागूही पडावयाचा. ह्या

कलेच्या जोडीला आणखी एक कलेंत लढविण्यांत कालिदास निष्णात होता. एखाद्या थोर माणसावर छाप पाडावयाची झाली, कीं कालिदासानें प्रथम त्याच्या आवडत्या वस्तूंची अथवा विषयांची माहिती मिळवून त्यावरच काव्य रचून तें गाऊन दाखवावें. हा कालिदासाची कलानिपुणताही एकांगी ऊर्फ एकाक्ष होती. स्त्रीविषय, शृंगारविलास, विलासप्रिय युवयुवतींच्या विरहकालींच्या अथवा विलाससमयींच्या निरनिराळ्या नाजूक भावना, वगैरे विषयांचें काव्य करण्यांत त्याचा हातखंडा होता. तो सृष्टिसुंदरीच्या विविध लीलांवर व मृगया, युद्ध वगैरे विषयांवरही काव्य करी; पण त्या काव्यासाठीं उपमान, उपमेय, उपमा, अलंकार वगैरे जे साहित्य लागे तें तो विलासोपभोग कल्पनांच्या जामदारखान्यांतून घेई. त्याच्या काव्यांत मृगया आली, कीं एखादा तरुण अथवा एखादी तरुणी व्याध व्हावयाची, त्या विलासी जीवांच्या भ्रुकुटींचा धनुष्यें व नेत्रकटाक्षांचे बाण बनावयाचे; रणांगणाचें वर्णन करावयाचें झालें तर विलासमंदिर हें रणांगण बनावयाचें; तात्पर्य, कोणत्याही विषयावर कालिदासाला काव्य करावयाचें झालें तरी ह्या दोन गोष्टींची त्या काव्यांत रेलचेल असावयाची.

या गुणानें किंवा दुर्गुणानें कालिदासाला चांगला हात दिला होता हें जरी खरें, तरी तोच दुर्गुण एक-दोन महत्त्वाच्या प्रसंगीं त्याच्या अवमानाला कारण झाला होता हेंही खरें. कालिदास हा बापाच्या वेळेपासून प्रथम मेवाडच्या राण्याच्या ताब्यांतील एका श्रीमान जमीनदाराच्या आश्रयाला भाट म्हणून होता. त्या जमीनदाराची एक तरुण, पण दुराचारी अशी लावण्यवती स्त्री होती. ती त्या जमीनदाराला अप्रिय होती हें कालिदासाला माहीत नव्हतें. त्यानें एके दिवशीं आपल्या प्रसादयुक्त काव्यांत त्या स्त्रीच्या सौंदर्याचें व गुणांचें अवास्तव वर्णन केलें. ज्या गुणांचा त्या स्त्रीच्या ठायीं लवलेशही नव्हता, ते गुण कालिदासानें तिच्या नांवानें आपल्या काव्यांत ओतप्रोत गाइले होते; व जे दुर्गुण तिच्या रोमरोमांत भिनलेले होते, त्यांचा लवलेशही त्यानें आपल्या काव्यांत येऊं दिला नव्हता. ती स्त्री कालिदासाशीं विशेष सलगीनें वागे, एवढी एकच गोष्ट तिचीं स्तुतिस्तोत्रें गाण्याला कालिदासाला पुरेशी होती. त्यानें तें काव्य आपल्या धन्याला गाऊन दाखविलें तेव्हां त्या जमीनदारानें त्या काव्यांत आपल्या नावडत्या बायकोची ओतप्रोत स्तुति गाइलेली ऐकून कवि व कवीचा काव्यविषय असलेली आपली बायको ह्या दोघांच्याही वर्तनाविषयीं भलताच संशय घेऊन कालिदासाला देहान्तशासन

फर्माविलें. या वेळचा एक विशेष असा सांगावयाचा कीं, त्या जमीनदाराच्या पदरीं असतांना कालिदासाचें नांव ब्रिजलाल असें होतें. पण धन्याने फर्माविलेल्या देहान्तशासनांतून आपला बचाव करण्यासाठीं ब्रिजलालला राजधानींतील आपलें घरदार, परिवार व दौलत सोडून दूरदेशीं पळ काढावा लागला; तेव्हांच त्यानें आपलें 'ब्रिजलाल' हे नांवही सोडलें व कालिदास हें नवें नांव धारण केलें. हें नांव धारण करण्यांत त्याचा आणखी हेतु असा कीं, लोकांनीं आपणाला दुसरा अथवा सवाई कालिदास या नांवानें ओळखावें.

कालिदास आपल्या 'ब्रिजलालगिरी'वर पाणी सोडून जो निघाला, तो फिरत फिरत प्रथम जयपुराधिपति सवाई जयसिंगाच्या पदरीं आला. त्याचे काव्यनैपुण्य पाहून जयसिंगानें त्याला आपल्या दरबारीं ठेवून घेतलें. पण कालिदासाची महत्त्वाकांक्षा आपणाला विद्वज्जनाग्रणी राजकवि म्हणून राजानें लेखावें व बहुमान द्यावा अशी होती, तो त्याचा डाव मात्र साधला नाहीं जयसिंगाचा दरबार म्हणजे साऱ्या भरतखंडांतील विद्वन्मुकुटमणींचें आगर! तो स्वतः परमविद्वान् व विद्वानांचा निस्सीम पुरस्कर्ता असल्यानें मोठमोठे विद्यावत व कलावंत त्याच्या आश्रयाला यावयाचे व त्यांच्या विद्वत्तेचें तेथें खरें चीज व्हावयाचें. त्या काळीं विद्वज्जनांचे मुकुटमणि शोभणारे विद्याधर व रत्नाकरभट्ट हे दोघे पंडितही जयसिंगाच्याच पदरीं होते. पैकीं रत्नाकर हा राजकवि होता. कालिदास जयसिंगाच्या दरबारीं प्रथम आला तेव्हां रत्नाकरानेंच त्याची परीक्षा घेऊन त्याला जयसिंगाच्या पदरीं आश्रय मिळण्याविषयीं शिफारस केली होती. कालिदास जरी रत्नाकराच्या तोडीचा विद्वान नव्हता, तरी बऱ्याच वरच्या दर्जाचा प्रतिभावान कवि होता. केवळ कवित्वाचीच बाब घेतली तर कदाचित् कालिदास रत्नाकरापेक्षां रेसभर श्रेष्ठही ठरला असता. त्यामुळें गुणग्राहक जयसिंगालाही तो प्रिय झाला. पण नुसत्या राजाश्रयावर संतुष्ट होऊन बसण्याइतका कालिदास मित महत्त्वाकांक्षी नव्हता. त्याला जयसिंगाच्या दरबारांत रत्नाकरापेक्षांही मान मिळावयाला हवा होता. त्या दृष्टीनें त्याचे प्रयत्नही एकसारखे सुरू होते. तो बाह्यात्कारी रत्नाकराचा परममित्र म्हणवी व त्याच्याशीं अदबीनें वागे; पण अंतःकरणांत त्याला रत्नाकराविषयीं फार हेवा वाटत होता. असें असतांही रत्नाकर राजाचा परमप्रिय मित्र असल्यानें व राजाच्या मनांत रत्नाकराच्या अगाध विद्वत्तेविषयीं परमादर वसत असल्यानें कालिदासाचा डाव साधणें

दुर्घट होतें. कालिदासाला रत्नाकराचें वर्म एकच काय तें माहीत होतें. कवित्व शक्तींत कालिदासाशीं तुलना करतां रत्नाकर हा डावा कवि होता. रत्नाकराच्या वर्मस्थानीं घाव घालण्याचा योग कालिदासानें एकदां जुळवून आणला. राजाच्या वाढदिवसानिमित्त थाटाचा दरबार भरला, त्या दरबारांत सर्व राजकवींच्या शीघ्रकवित्वाची चढाओढ व्हावी अशी योजना कालिदासानें मुद्दाम घडवून आणली. ह्या चढाओढींत आपण रत्नाकराला फजीत करूं व अपरंपार राज-स्तुतीच्या जोरावर दरबारांत कविश्रेष्ठाचा मान संपादन करूं असा कालिदासाला आत्मविश्वास वाटत होता.तो त्याचा आत्मविश्वास केवळच अयथार्थ नव्हता. पण—!

दरबारांत राजस्तुतिपर शीघ्रकाव्य करण्याचा अग्रमान अर्थात् रत्नाकराला मिळाला. त्यानंतर कालिदासाला शीघ्रकाव्य करण्याची आज्ञा झाली. पण सर्वच कवींना एकदम फजीत करण्याचा सुयोग साधण्यासाठीं व रत्नाकराचा आरंभ आणि आपला शेवट यांची ठळकपणें सर्वांना तुलना करतां यावी म्हणून कालिदासानें मुद्दाम सर्व कवींच्या शेवटीं शीघ्रकवित्व करण्याबद्दल राजाची अनुमति मिळविली. त्या वेळीं कालिदासानें अप्रतिम शीघ्रकाव्य करून व त्या काव्यांत जयसिंगाची ओतप्रोत स्तुति करून सर्वांना मान डोलवावयाला लावलें. कोणाही कवीनें आपल्या काव्यांत न आणलेला एक स्तुतिविशेष त्यानें मुद्दाम आपल्या काव्यांत आणला. जयसिंग हा दिल्लीपतीचा सेवक होता व तो दिल्ली-पतीची यथावत् सेवा करीही; पण या राजनिष्ठेच्या आच्छादनाखालीं झांकले गेलेलें जयसिंगाचें खोल अंतःकरण दिल्लीच्या यवनसाम्राज्याचा नाश व त्या जागीं हिंदवी साम्राज्याचा उद्भव—उत्कर्ष झालेला पहाण्याला अत्यंत उत्सुक होतें, हें कालिदासाला काय माहीत! त्यानें आपल्या काव्यांत बादशहाशीं राजनिष्ठ राहिल्याबद्दल जयसिंगाचे फारच गोडवे गाइले; इतकेंच काय पण बादशाही वंशाशीं अंबरच्या कच्छवाह वंशाचा शरीरसंबंध झाल्याबद्दलही जयसिंगाचें मनः-पूर्वक अभिनंदन करण्याला व असेंच जयसिंगाच्या राजवंशाशीं बादशाही वंशाचे शरीरसंबंध वारंवार घडून येऊन त्यांचा परस्पर प्रेमा शुक्लेंदुवत् वृद्धिंगत व्हावा असें आपल्या काव्याच्या शेवटीं परमेश्वरापाशीं मागणें मागावयाला कमी केलें नाहीं. पुढें जेव्हां जयसिंगाला हें काव्य रुचलें नाहीं असें कालिदासाला कळलें, तेव्हां त्यानें लगेच पगडी फिरवून पूर्वीच्या काव्याच्या विरुद्ध तितकेंच रसाळ काव्य रचून गाऊन दाखविलें. त्यामुळें तर जयसिंगाला कालिदासाच्या तोंडपुजेपणाचा

पुरा वीट आला व त्यानें त्याला आपल्या दरबारांतून काढून लाविलें ! तेथून मग कालिदास जो निघाला, तो जयसिंगाचा शत्रु व बादशाही सत्तेची गुलामगिरी करण्यांत भूषण मानणारा भदावरचा राजा अनुराधसिंग याच्या पदरीं गेला, व तेथेंच त्याचा अंगच्या तोंडपुजेपणामुळें चांगला जम बसला होता. अनुराधसिंगाच्या विलास विहारांचें वर्णन कालिदासानें जितक्या रसाळ वाणीनें करावें, तितक्याच रसिकतेनें अनुराधसिंग व त्याच्या अनेक प्रियतमा यांनीं तें ऐकावें व त्याबद्दल कालिदासाची मनसोक्त वाखाणणी करावी.

अनुराधसिंग हा बादशाही सत्तेचा कट्टा कैवारी व पट्टीचा स्वदेशद्रोही असल्यानें त्याला बादशहाच्या दरबारांत बराच मान होता. पूर्वीं निर्देशिलेली विक्रमसिंग वगैरे स्वदेशाभिमानी रजपूत वीरांची स्वातंत्र्याची चळवळ नेस्तनाबूत करण्याच्या कामीं बादशाही अधिकाऱ्यांना मनःपूर्वक साह्य करणाऱ्या रजपुतांत अनुराधसिंग व दुर्जनसाल यांचा मान पहिला होता, म्हणूनच त्या दोघांचाही बादशाही दरबारांत बराच मान वाढला होता. जसें कालिदासाला आपल्या धन्यांना कसें खूष करावें हें कळत होतें, तसेंच अनुराधसिंग व दुर्जनसाल यांनाही बादशाही पक्षाची खुषमस्करी कशी करावी हें कळत होतें. त्यांतूनही आजचा शहाजादा हा उद्यांचा बादशहा आहे हें ओळखून त्या उगवत्या सूर्याची उपासना करण्यांत ते दोघेही जरादेखील कसूर करीत नसत. शहाजादा हा अत्यंत विलासी व विषयासक्त असल्यानें त्याची मर्जी संपादन करण्याचा अनिर्वाच्य पण परिणामकारक असा राजमार्ग निश्चित झाला होता. त्याचें मोजक्या दोन शब्दांत वर्णन करावयाचें तर 'बांगड्यांचा वाशिला' असें करतां येण्याजोगें होतें.

एवढ्या विवेचनावरून वाचकांना कालिदासाची स्थूलमानानें ओळख झालीच असेल व म्हणूनच कालिदासाच्या काव्यकल्पनात्मक चन्द्राटाचा भवानीरामाला कां कंटाळा आला याचाही जरूर तेवढा उलगडा झाला असेल.

प्रकरण पांचवें

# त्रिभुवनेश्वराच्या मंदिरांत

भवानीरामानें कालिदासाचें तें चर्‍हाट थांबविण्यासाठीं त्याला म्हटलें, "तें असो. पण तुम्हांला प्रथम त्रिभुवनतीर्थांत स्नान करावयाचें आहेना ?"

"गड्या ! या एका त्रिभुवनसुंदरीच्या दर्शनानें मला त्रिभुवनांतील सार्‍या पुण्यतीर्थांत स्नान केल्याचें पुण्य लाभलें. आतां या तीर्थांत स्नान करण्याची आवश्यकता उरली नाहीं. शिवाय हे हिंवाळ्याचे दिवस ! हवेंत गारठा तरी किती आहे ! अशा थंड वार्‍यांत मुद्दाम अशा अवेळीं थंड पाण्याचें स्नान कशाला करावें ?"

"आतां हिंवाळा आहे, आणि नुक्ता थोड्या वेळापूर्वीच उन्हाळा होता वाटतें ? कालिदास ! काय ही तुमची लहर ?" भवानीराम जरा रागावून म्हणाला.

"निरंकुशः कवयः" कालिदासानें स्मितहास्यपूर्वक उत्तर दिलें.

"पण कवींच्या निरंकुशतेंत आणि एखाद्या माथेफिरूच्या मोकाट भटकण्यांत किंवा बरळण्यांत थोडें तरी अंतर असतें अशी माझी समजूत आहे. ती मग अजाणपणाची असो, कीं सुजाणपणाची असो."

"वाः ! भवानीराम ! एकूण तुम्हांलाही संस्कृत समजतें म्हणावयाचें !"

"होय. मी कांहीं संस्कृतिहीन पढोपंडित नाहीं खरा; पण बोलण्यांत व कृतींत मेळ घालण्याइतकें अथवा कितपत मेळ पडतो हें पहाण्याइतकें संस्कृत मला समजतें."

"वा ! भवानीराम ! तुम्ही बोलण्यांत इतके पटाईत असाल अशी माझी कल्पना नव्हती."

"तें असो. तुम्हांला आतां इथें राहिल्यासारखें ह्या त्रिभुवनतीर्थांत स्नान करावयाचें आहे कीं नाहीं ? आपण तर बुवा ज्याअर्थी मुद्दाम अशा धोक्याच्या जागींही थांबलोंच त्या अर्थी तीर्थस्नान करणारच."

"तर मग तुम्ही असें करा, तुम्ही लौकर स्नान करून या. तोंवर मी आपल्या वस्तीची एथें कांहीं सोय होईल किंवा कसें याविषयीं त्या बाईपाशीं चौकशी करतों."

भवानीरामानें ओळखलें कीं, हा कवि एथें तीर्थस्नानासाठीं राहिला नसून त्या स्त्रीला पाहूनच कांहीं काळ तिच्या दर्शनानें आपल्या चंचल नयनांचें पारणें फेडण्यासाठीं राहिला आहे अर्थात् अशा जागीं ही स्त्री कां रहाते हें जाणण्याची उत्कंठा त्याला लागून राहिली होतीच. पण त्या माहितीचें महत्त्व त्याला तीर्थस्नानापेक्षां जास्त मुळींच वाटत नव्हतें. लगेच त्या दोघांनीं आपले घोडे या देवालयाच्या एका बाजूला असलेल्या भव्य परंतु ओसाड पागेंत नेले व तेथें बांधून ठेविले. भवानीराम तेथला माहीतगार असल्यानें त्याला ती पागा माहीत होती. पागेंत जातांच तेथें बरेंच गवत व घोड्याची वाळलेली लीद पडलेली दिसली. त्याबरोबर भवानीराम कालिदासाला म्हणाला, "कालिदास एथें कांहीं घोडेस्वार येऊन वस्ती करून गेलेले दिसतात."

"होय." असें म्हणून कालिदासानें घोड्याची एक लीद उचलून हातांत घेतली. त्याबरोबर 'या वस्तूलाही काव्यविषय बनविण्याचा कविराजांचा इरादा आहे किंवा कसें' असें विचारण्यासाठीं भवानीरामाची जीभ तोंडांतल्या तोंडांत सळसळूं लागली. तोंच कालिदास म्हणाला, "मला वाटतें, या एकदोन दिवसांत बहुधा आजच कोणी घोडेस्वार एथें येऊन गेले दिसतात. कारण ही लीद अगदीं ताजी आहे. कोणी लुटारू तर या प्रांतांत आले नसतील ना? तसें असेल तर आपली मोठीच पंचाईत व्हावयाची! जा, तुम्ही तीर्थावरून स्नान करून या. तोंवर मी त्या स्त्रीपाशीं जाऊन चौकशी करतों. ती जर एथली कायमची अथवा निदान कांहीं दिवसांची रहिवासी असेल, तर ती आपणाला सारा वृतान्त सांगूं शकेल. पाहूं तर खरें!"

यावर 'बरें आहे' असें म्हणून भवानीराम आपले कपडे, शस्त्रें वगैरे सामान तेथेंच पलीकडील एका धर्मशाळेंत उतरून ठेवून स्नानापुरतें एक उत्तरीय बरोबर घेऊन सरोवरस्नानासाठीं निघून गेला. त्याच्या मागोमाग कालिदासही आपले कपडे वगैरे त्याच धर्मशाळेंत उतरून ठेवून तसाच देवालयाच्या गाभाऱ्याकडे वळला. तो गाभाऱ्यापाशीं जावयाला व ती शुभ्रवसना प्रौढा देवपूजा आटोपून गाभाऱ्यांतून हातीं एक लहान दिवा घेऊन बाहेर पडावयाला एक गांठ पडली. या वेळीं देवालयांत आंतील बाजूला एक दिवा मिणमिण तेवत होता. पण सूर्यास्त होऊन गेल्यामुळें व गाभाऱ्यासमोरचें देवालयाचें गोपूर सर्व बाजूंनीं पाषाणी भिंतींनीं वेष्टिलेलें असल्यानें तेथें बराच अंधार होता. तरीही त्या

प्रौढेच्या हातीं जो मंदसा दिवा होता त्याच्या प्रकाशांत कालिदासाला तिचें मुखावलोकन झालें. तेव्हां तिच्या चर्येवर निस्पृहता व निर्भयता यांची स्पष्ट छाया उमटलेली कालिदासाला आढळली, व 'न जाणो, ह्या स्त्रीशीं आपण प्रथमच बोलण्याची सलगी केल्यास ही रुष्ट तर होणार नाहीं ना' अशा नवोदित भयानें कालिदासाच्या तोंडाला तात्पुरतें कुलूप बसलें.

परंतु त्याचें तोंड बंद झालें तरी त्याचे डोळे उघडेच होते, व ते उत्सुकतेनें त्या स्त्रीकडे वेधले गेले होते. त्या स्त्रीनें तिकडे लक्ष्य दिलें न दिलेंसे करून गाभाऱ्यांतून गोपुरांत व गोपुरांतून बाहेरील डाव्या बाजूच्या एका चिरेबंदी कोठडींत असा मार्ग सुधारला. कालिदास त्या स्त्रीच्या मागोमाग गोपुराच्या दरवाजापावेतो आला व ती स्त्री कुठें जाते हें हेरीत तेथे कांहीं क्षण स्तब्ध उभा राहिला. तेवढ्यांत त्याला त्या कोठडींत त्याहाळून पाहावयाला सांपडलें. तेथे त्याला एक दर्भासन, एक मृगासन, एक कमंडलु व कांहीं कपडे त्याचप्रमाणें आंतील बाजूला एका साध्या तीन दगडांच्या चुलीवर कांहीं पदार्थ शिजत असल्याचें आढळून आलें. आणखीही कांहीं किरकोळ सामान उदाहरणार्थ पाण्यानें भरलेले दोन मातीचे घडे वगैरे आढळले त्यावरून कालिदासानें कयास बांधला कीं, ती स्त्री एथेंच वास्तव्य करून राहिलेली असावी. अर्थात् तिला गेल्या चारदोन दिवसांत एथें कोणी लोक येऊन गेले किंवा कसें वगैरे सर्व वृत्तान्त माहीत असणें संभवनीय होतें. पण तिच्याशीं बोलण्याला प्रारंभ कसा करावा हाच काय तो पेंच कालिदासाला होता. मार्गेतून देवालयांत येतांना आपण तिच्याशीं असें बोलूं व तसें बोलूं असा जो हुरूप त्याला वाटत होता, तो आतांच्या तिच्या बेफिकीर वर्तनामुळें बराच मलूल पडला होता.

तरीही कालिदास डगमगला नाहीं. तो कवि होता, बोलका होता, कल्पनाप्रभु होता, मधुरकंठाचा गायक होता, व कोणाला कसें रिझवावें हें शास्त्र त्याला शास्त्र म्हणून जरी नाहीं तरी अनुभवानें बरेंच कळत होतें. 'ज्या अर्थी ही स्त्री एथें जोगीण बनून राहिली आहे, त्या अर्थी ती भगवद्भक्त खास असली पाहिजे, व तीही या त्रिभुवनेश्वराचीच भक्त असली पाहिजे. त्रिभुवनेश्वराची भक्तिभावाची आळवण हा तिचा प्रियविषय असला पाहिजे. आपण त्रिभुवनेश्वराच्या स्तवनपर काव्य रचून तें मधुरकंठानें गाऊं लागल्यास त्या भक्तीच्या बोलांना त्या स्त्रीच्या अंतःकरणांतील भक्तिवात्सल्याची साथ हटकून मिळेल, व त्या भक्तीच्या जोरावर



...स्तवनाला आरंभ झाला व कालिदास विक्रमसिंहाची थोरवी गाऊं लागला, त्याच सुमाराला ती स्त्री गोपुराच्या दरवाजांत येऊन उभी राहिली.

[ पृष्ठ ४७

तिच्याशीं आपणाला भक्तिबंधूचें प्रेमळ नातें जोडतां येईल' असा विचार करून कालिदासानें आपल्या शीघ्र कवित्वानें त्रिभुवनेश्वराला आळवियाचे ठरविलें. भवानीरामाच्या तोंडून त्यानें थोड्या वेळापूर्वी त्या स्थानाचें अनेकविध माहात्म्य ऐकलें होतेंच. तो लगेच माघारा त्रिभुवनेश्वराच्या गाभाऱ्यापाशीं आला व खालीं बसून स्तवन करूं लागला. तें स्तवनकाव्य विक्रमसिंहाच्या तेथील भक्तिभावपूर्वक वास्तव्यानें ओथबलेलें असून त्यांतच ओघाओघानें मेवाडाधिपति, मारवाडाधिपति वगैरे राजपुरुषांचा उल्लेख येऊं लागला. स्तवनाला आरंभ झाला व कालिदास विक्रमसिंहाची थोरवी गाऊं लागला, त्याच सुमाराला ती स्त्री गोपुराच्या दरवाजांत येऊन उभी राहिली. कालिदासाचें तिकडे लक्ष्य होतांच मात्रा बरोबर लागू पडली म्हणून आनंदित चित्तानें तो विशेष कसोशीनें स्तवन करूं लागला. साध्वी सहचारिणी इंद्रकुमारी हिच्या विरहानें व्यथित झालेल्या विक्रमसिंहानें देशोद्धाराचें कंकण हातीं बांधून त्रिभुवनेश्वराच्या पायांपाशीं येऊन देशोद्धाराचें कार्य आरंभिलें हा कथाभाग त्या स्तवनाबरोबर कानीं पडतांच तिकडे त्या स्त्रीच्या नेत्रांतून घळघळां गंगायमुना वाहूं लागल्या. जणु काय कोणी सर्वस्वाला मुकलेली स्त्री त्रिभुवनेश्वराला आळवीत आहे अशी कालिदासाच्या त्या स्तवनाची एकंदर घाटणी होती; व 'माझा देश यवनांच्या दास्यांतून मुक्त व सर्वसमृद्ध झालेला पाहून माझे नेत्र मिटोत' असा त्या स्तवनाचा शेवट होता.

स्तवन पूर्ण होतांच कालिदास त्रिभुवनेश्वराला साष्टांग नमस्कार घालून व अंगारा ललाटीं लावून गोपुरांतून बाहेर येऊं लागला, तेव्हां ती स्त्री गोपुरांतून बाहेर पडतांना आढळली कालिदासाला पाहून ती गोपुराच्या दरवाजांत आपल्या शुभ्र वस्त्राच्या पदरानें डोळे पुशीत उभी राहिली. कालिदासाच्या मनांतून तिच्याशीं बोलावयाचें होतें, व तीही कालिदासाशीं बोलण्याला उत्सुक दिसत होती. पण प्रथम कोणी बोलावें हाच काय तो प्रश्न होता.

त्या स्त्रीनें आपण होऊन कालिदासाला विचारलें, ' तुम्ही कोण, कोठले ?"

आपला डाव बरोबर साधला असें पाहून कालिदासाला समाधान वाटलें. तो औदार्यपूर्ण दृष्टीनें त्या स्त्रीकडे पहात स्मितपूर्वक उत्तरला, " माताजी ! आम्ही पांथस्थ आहों."

" तें तर दिसतेंच आहे. पण हा कांहीं रहदारीचा मार्ग नव्हे; असें असतांही तुम्ही ज्या अर्थी या निर्जन व ओसाड देवालयांत मुद्दाम आलां त्या अर्थी हे

स्थान तुमच्या चांगलेंच परिचयाचें असलें पाहिजे; व कांहीं विशिष्ट उत्तम हेतूनेंच तुम्ही इकडे आलां असलां पाहिजे. आतां तुम्ही केलेल्या ईशस्तवना-वरून तुम्ही या देशचे रहिवासी आहां याविषयीं तर शंकाच नाहीं. आपल्या मायदेशाच्या दास्यविमोचनासाठीं कायावाचामनानें झटणाऱ्या थोड्या महा-भागांपैकीं तुम्ही एक दिसतां. त्याशिवाय एखाद्या त्रयस्थाला देशभक्तीचा उमाळा येणें शक्यच नाहीं."

कालिदासाला त्या स्त्रीचे बोल ऐकून प्रथमच धन्यता वाटली. वास्तविक तो त्या स्त्रीच्या कल्पनेप्रमाणें 'महाभाग' नव्हता व त्याच्या अंगीं तेवढी मान्यताही नव्हती. त्याच्या कवनगायनांतील हेतुही आपण 'महाभाग' आहों असें भासविण्याचा नव्हता. त्याला कविश्रेष्ठ ही पदवीच सर्व श्रेष्ठ वाटत होती. अन्य स्थलीं अन्य वेळीं त्याचें तें कवन ऐकून त्याच्यावर कोणी ज्वलज्जहाल स्वदेशाभिमानाचा मान लादला असता तर तो त्याला अनिष्टारोपसा वाटला असता आपल्या कवित्वाच्या एका अर्थांतून अनेक अर्थ निर्माण करणाराला त्यानें वाचाळ वावदूक ठरविण्यालाही कदाचित् कमी केलें नसतें. पण आज त्या त्याच्या काव्यांतून तो 'महाभाग' असल्याबद्दलचा अर्थ निर्माण केलेला ऐकून त्याला धन्यता वाटली, याचें कारण त्या स्त्रीला अशा महाभागांविषयीं आदर वाटतो असें तिच्या बोलण्यावरून त्याच्या निदर्शनाला आलें होतें. तो हलकेच उत्तरला, " होय. मी त्यांतलाच एक आहें म्हणाना ? "

" होय ना ? तर मग तुम्ही मला वंदनीय आहां." असें म्हणून त्या स्त्रीनें कालिदासाला भक्तिपूर्वक वंदन केलें व म्हटलें, " भगवान् श्रीत्रिभुवनेश्वरानें तुम्हांला सुखी राखावें व तुम्हांला तुमच्या स्वीकृत महत्कार्यांत यश द्यावें." त्या स्त्रीनें अभिनंदन केलें तें कालिदासाला अप्रिय होतें असें नाहीं. पण ज्या गोष्टीशीं आपला अर्थाअर्थीं कांहींच संबंध नाहीं, त्या गोष्टींविषयीं स्वतःचें अभिनंदन करून घेतांना व त्यासाठीं असत्य भाषण केल्यामुळें त्याचें मन त्याला खात होतें. त्या देशभक्तिविषयक अभिनंदनाच्या मागोमाग आपल्या कविश्रेष्ठत्वाबद्दलचें अभिनंदनही आपल्या वांट्याला येईल अशी कालिदासाला जबर अपेक्षा होती. पण ती पूर्ण होण्याचा रंग दिसेना तेव्हां तो आपण होऊन त्या स्त्रीला म्हणाला, " बरें, आतांचें स्तवन तुम्हांला कसें काय आवडलें ? "

" तें मला फार आवडलें. तुम्हांला तें कुठें मिळालें ? "

"मी स्वतःच कवि आहें." हें उत्तर देतांना कालिदासाला आनंद वाटला.

"काय, तुम्ही कवि आहां?"

"होय!" त्या स्त्रीला आपल्या कवित्वाबद्दल अत्यंत आदर व आश्चर्य वाटत आहे असें कालिदासाला वाटलें. तो म्हणाला, "मी राजकवि आहें."

"काय, राजकवि? कवि आणि इतका ज्वलज्जहाल देशसेवक? हा योग मला तरी अपूर्वच वाटतो."

त्या स्त्रीचे हे शब्द ऐकून कालिदास मनांतल्या मनांत बराच खजील झाला. त्याला वाटलें होतें कीं, त्या स्त्रीनें देशसेवकाला कंठीं धारण केले तर ती कवीला शिरीं धारण करील. पण ती त्याची अटकळ चुकली. ती स्त्री पुढें म्हणाली, "मला कांहीं कवींची फारशी माहिती नाहीं. पण एका कवीच्या लीला माहीत आहेत त्यावरून कवि हा सहवासाला अयोग्य असा प्राणि आहे अशी माझी समजूत झाली आहे."

"तुम्ही कोणत्या कवीविषयीं बोलत आहां? रत्नाकरांत कांहीं मौक्तिकांचे शिंपले व त्याबरोबरच कांहीं वांझोट्या शिंपाही हातीं लागावयाच्याच. एका हाताचीं पांचही बोटें सारखीं थोडींच असणार? तुम्हांला भद्रावराधीश अनुराधसिंगजी माहीत आहेत का?"

"हो! आहेत माहीत!"

"आणि त्यांच्या पदरचा राजकवि कविश्रेष्ठ कालिदास जो साऱ्या माळव्यांत, किंबहुना उभ्या भरतखंडांत सवाई कालिदास म्हणून ओळखला जातो, तो माहीत आहे?"

"हो!—"

"तो तुम्हाला माहीत असावयाचाच; त्यांत कांहीं नवल नाहीं. आसेतुहिमाचल त्या कविश्रेष्ठाचा कीर्तिदुंदुभि दुमदुमतो आहे. तोच कालिदास—"

कालिदासाच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच ती स्त्री तिरस्कारपूर्वक उद्गारली, "तो सोनेरी वर्णाचा सर्प आहे. तो सिंहाचें कातडें पांघरून सिंह म्हणून मिरवणारा लंबकर्ण आहे. तो जिव्हाग्रीं मधु आणि हृदयीं हालाहल असा खल पुरुष आहे. त्याचीच मला माहिती आहे, व तेव्हांपासूनच मला कवि लोकांचा कमालीचा तिटकारा येऊं लागला आहे. त्याच्याविषयीं तुम्ही काय म्हणत होतां?"

त्या पुष्पांजलींच्या वर्षावांत कालिदासाची चर्या पहाण्यासारखी झाली. या वेळीं आपला जोडीदार भवानीराम आपली विटंबना ऐकावयाला तेथें नाहीं एवढेंच समाधान कालिदासाला त्यांतल्या त्यांत वाटलें, व खरोखरच भवानीराम अजून आलेला नाहीं ना, अशी खात्री करून घेण्यासाठीं त्यानें मागें वळून पाहिलें. तों भवानीराम आपल्याकडेच येत आहे असें त्याला आढळून आलें. 'आपली झाली एवढी शोभा पुष्कळ झाली; आतां आवरतें घ्यावें हें चांगलें' असा पोक्त विचार करून तो त्या स्त्रीला म्हणाला, "माताजी! तुम्ही बऱ्याच माहीतगार दिसतां. इतकी अचूक माहिती तुम्हांला कशी बरें मिळाली?"

"कशी मिळाली!" असें म्हणून त्या स्त्रीनें एक दीर्घ निःश्वास सोडला, व विषयांतर करण्याच्या इराद्यानें कालिदासाला विचारलें, "खरेंच; तुमचें नांव काय बरें?"

आतां कालिदासाला मोठाच पेंच पडला. पण तो प्रसंगावधानी होता. तो चट्कन् उत्तरला, "माझें नांव ब्रिजलाल."

"आणि तुमचा तो जोडीदार त्याचें नांव काय?"

"भवानीराम."

"तोदेखील तुमच्याच ध्येयाचा असेल?"

"होय."

"वा:! फार चांगलें. भगवान् त्रिभुवनेश्वराच्या कृपेनें तुमची नरनारायणांची जोडीच आम्हांला भेटली म्हणायची. तुम्हांला खरेंच भोजन करायचें असेल ना?"

"साधल्यास."

"असें कां म्हणतां? अतिथिसत्कार करणें हें आमचें कर्तव्य आहे. तशांत तुमच्यासारख्या अतिथींचा सत्कार करण्याची संधि लाभणें ही तर महान् पुण्यपर्वणी आहे असें मला वाटतें. मात्र आम्हां दरिद्र्यांच्या पदरीं मीठकण्यांशिवाय दुसरें कांहीं तुम्हांला मिळणें शक्य नाहीं, तिथें माझा नाइलाज आहे. आतां इतक्यांतच माझा दादा येईल; मग मी तुम्हां तिघांनाही वाढतें." असें म्हणून ती स्त्री चुलीवरील स्वयंपाक करपल्याचा संशय आल्यावरून आंत निघून गेली. कालिदासाच्या मनांतून तिला तिचें व तिच्या दादाचें नांव वगैरे विचारावयाचें

होतें. इतक्यांत भवानीराम स्नान आटोपून आंत आला व हांक मारूं लागला, "कालिदास !"

ती हांक ऐकून कालिदास हादरून गेला. आतांच त्या स्त्रीनें 'कालिदास' नामधारी कवीची अर्थात् खुद्द कालिदासाची जी शोभा केली होती, तिचा कालिदासाला विसर पडणें शक्य नव्हतें. तिनें नांव विचारतांच कालिदासानें आपलें पूर्वीचें ब्रिजलाल हें नांव सांगून वेळ मारून नेली होती. तें गुपित पुन्हा उजेडांत येतें कीं काय ह्या भयानें भवानीरामाला सूचना देण्यासाठीं तो हातानें गप्प रहाण्याची खूण करीत स्वतःच तिकडे निघून गेला.

"कालिदास ! अखेर माझें भविष्य खरें होण्याचीच वेळ आली. तुम्हीं आपल्या भलत्याच हट्टाग्रहानें संकट आपणांवर ओढून आणलें. तरी मी तुम्हांला प्रथमच सांगत होतों."

"काय, झालें तरी काय ?" कालिदासानें घाबरून विचारलें.

"या इकडे बाजूला, म्हणजे सांगतों." असें म्हणून भवानीराम कालिदासाला हाताशीं धरून एका बाजूला घेऊन गेला.

## प्रकरण सहावें

# विचारा कवि !

" ती स्त्री कोण याचा पत्ता लागला का ?" भवानीरामानें बाजूला जातांच कालिदासाला विचारलें.

"नाहीं. आतां मी तीच माहिती तिला विचारणार होतों." कालिदास उत्तरला.

"आणि इतका वेळ काय चाललें होतें ? नमनालाच घडाभर तेल जळलें वाटतें ?"

"असें आहे, माणसाचा रागरंग पाहून बोलावें लागतें. प्रथमतः तिच्या मनांत माझ्याविषयीं विश्वास उत्पन्न करावा लागला."

"एकूण इतका वेळ विश्वासाच्याच गोष्टी चालल्या होत्या म्हणावयाच्या !"

"होय. तिच्या एकंदर बोलण्यावरून ती कोणीतरी थोर कुळांतील स्त्री असावीसें दिसतें. त्याप्रमाणें तिला तुमच्या संघाचीही चांगलीच माहिती दिसते."

"असें ?"

"होय." असें म्हणून कालिदासानें एथवर घडलेला सर्व प्रकार भवानीरामाला निवेदन केला. मात्र त्यांतील एक हातचा राखून ठेविला. त्या स्त्रीनें कालिदासाची जी निर्भर्त्सना केली ती भवानीरामाला न सांगतां फक्त आपण तिला मुद्दाम 'ब्रिजलाल' या नांवानें ओळख दिली आहे असें सांगितलें.

"बरें; तिचें नांव तरी तुम्हांला कळलें का ?" भवानीरामानें प्रश्न केला.

"नाहीं."

"तिच्या दादाचें नांव तरी ?"

"नाहीं."

"मला संशय येतो, ती आमच्या विक्रमसिंहजींची पत्नी तर नसेल ना ?"

"कशावरून ?"

"आतां मी स्नान करून माघारा येऊं लागलों तों पलीकडच्या पडक्या देवालयापाशीं मला माणसांची चाहूल लागली म्हणून मी तसाच हलक्या पावलांनीं लपत छपत तेथवर गेलों. तों तेथें कोणातरी चार माणसांचें आंतील बाजूला संभाषण चाललें होतें. त्या संभाषणावरून मला जबर संशय येतो कीं, ते मराठ्यांकडील कोणी खासे वीर धर्मसिंह, सज्जनसिंह वगैरे मंडळींच्या शोधार्थ

हिंडत असावे. मारवाडच्या राजकन्येसह तिचा भाऊ धर्मसिंह त्याच अरण्यांत अज्ञातवास भोगीत आहे व माळव्यांत निजामाचा अम्मल बसविण्यासाठीं हिंडत असलेल्या फौजेंतील कांहीं लोक अभयसिंगाच्या चिथावणीवरून धर्मसिंह वगैरे मंडळींच्या शोधार्थ या टापूंत हिंडत आहेत असें त्या मंडळीच्या बोलण्यांत आलें. त्याप्रमाणेंच त्या मंडळीला आमचाही सुगावा लागला असावा."

"खरेंच ?"

"होय. कारण कीं, 'दोन माणसें मांडवगडावर निजामाचा अंमल जारी व्हावा असें बादशाही आज्ञापत्र घेऊन निघालीं आहेत व तीं याच मार्गानें जावयाचीं आहेत' असें त्या मंडळींतील एकाला बोलतांना मीं ऐकलें."

"ती मंडळी कोण असावी ?"

"तें कांहीं नक्की सांगवत नाहीं. पण त्यांत कोणीतरी 'धनीसाहेब' असावे. कारण तशा हांका मीं दोन चार वेळां ऐकल्या."

"तर मग तीच मंडळी आज किंवा काल या देवालयांत वस्तीला नसेल ना ? त्यांचेच घोडे या पागेंत पूर्वी बांधले गेले असतील, असेंही असेल कदाचित्, त्याचा काय नेम सांगावा ! सैन्याच्या हालचालीविषयीं त्या मंडळींचें कांहीं संभाषण चाललें होतें; पण तें मला नीटसें समजलें नाहीं. तुम्हीं तुमचें काव्यलाघव अंमळ आवरतें घेऊन माहिती काढण्याचा प्रयत्न केला असता तर सहज माहिती मिळाली असती. आतां जर त्या मराठे मंडळीला आमच्याविषयीं आणखी खबर मिळाली. तर आमची पुरी फजिती व्हावयाची !"

"आणि त्या मंडळीनें आपल्यावर अचानक छापा घातला तर ?"

"हो ! तेंही भय आहेच. बरें, एथें रात्रभर वस्ती करावी तर तेंही भयच आहे !"

"त्या भयाचें एवढें मोठेंसें कांहीं नाहीं. ती स्त्री व तिचा तो दादा ही मंडळी बादशाही पक्षाच्या विरुद्ध दिसल्यास त्यांच्या बैठकींत असतांना आपणही कारणापुरती तीच भूमिका स्वीकारावी म्हणजे झालें."

"पण ती स्त्री जर आम्हां पूर्वीच्या कटवाल्यांपैकीं कोणाची नातलग असली व तिचा दादा जर माझ्या ओळखीचा निघाला, तर सारेंच प्रकरण आपल्या अंगाशीं यावयाचें !"

"त्याची काळजी तुम्हांला नको. वारा वाहील तशी पाठ देण्याची कला ज्याला अवगत आहे, त्याला कशाचेंही भय बाळगण्याचें कारण नाहीं."

" कीं आपण रातोरात एथून पाय काढावा ? म्हणजे कसलीच कटकट नाहीं."

" पण आपणाला वाटेंतच कोणीं गांठलें तर ? "

याप्रमाणें ते दोघे बोलत उभे आहेत तोंच ती पूर्वोक्त स्त्री हातीं दिवा घेऊन त्या दोघांना शोधीत तेथें आली व कालिदासाला म्हणाली, " ब्रिजलाल ! भोजन तयार आहे."

" तुमचा दादा आला का ? " कालिदासानें विचारलें.

" हो ! आला." स्त्री उत्तरली.

" तर मग चला." कालिदास भवानीरामाला म्हणाला.

कां नकळे, भवानीराम त्या स्त्रीच्या हातांतील दिव्याच्या प्रकाशांत तिचें रूप न्याहाळून ओशाळल्यासारखा झाला व तोंड बाजूला लपवीत हळूच म्हणाला, " आम्ही जलाशयावरून हस्तपादप्रक्षालन करून येतों."

यावर 'बरें आहे; पण लौकर या' असें म्हणून ती स्त्री तशीच माघारी निघून गेली. ती दाराआड होतांच भवानीराम कालिदासाच्या कानाशीं लागून उद्गारला, " वेड्या ! पहातोस काय ? अगोदर आपण घोड्यावर स्वार होऊन मार्गाला लागूं."

" कां बरें ! इतकी घाई ? मराठ्यांना तुम्ही इतके भितां ? "

" मराठ्यांचें भय बाजूलाच राहिलें; सध्यांच आपण शत्रूच्या जबड्यांत आहों. त्या स्त्रीला आतां मीं नीट ओळखलें. ती इंद्रकुमारी आहे."

" कोण ? इंद्रकुमारी ? मारवाडची राजकन्या—? "

" होय ! "

" विक्रमसिंहाची पत्नी ? "

" होय ! "

" धर्मसिंहाची बहीण ? "

" होय ! होय ! "

" मग असेना ! आपणही आपल्या कार्यापुरते त्यांच्यांत मिसळलों, कीं काम झालें."

" पण मला धर्मसिंह ओळखील आणि इंद्रकुमारीही ओळखील."

" मग काय, मीं इतका वेळ घेतलेले सारे श्रम वांयाच जाणार तर ? "

" यांत काय संशय ? "

"ठीक आहे. यांतही काव्य आहे.--चला." असें म्हणून कालिदास भवानी-रामाच्या सूचनेला कबूल झाला. लगेच ते दोघेही त्या काळोखांतून चांचपडत घोडे बांधून ठेविले होते तेथें गेले. त्यांनीं आपले कपडे वगैरे साहित्य कसेंबसें शोधून घेतलें व घोडे सोडून तेथून पाय काढला. देवालयाच्या आवाराबाहेर येऊन घोडयावर स्वार होईपावेतों त्यांच्या जिवांत जीव नव्हता; व घोडयावर स्वार झाल्यावरदेखील आपण कोणत्या मार्गानें चाललों आहों याचेंही त्यांना भान नव्हतें.

पण ज्या पापाला ते भीत होते तें पाप थोड्याच वेळांत दत्त करून त्यांच्या-समोर उभें ! ते सुमारें अर्ध्या कोसावर गेले असतील नसतील, तोंच त्यांच्यावर जवळच्या एका जाळींतून बाणांचा वर्षाव सुरू झाला, व त्या वर्षावामागोमाग चार सशस्त्र लोक त्यांच्यावर एकदम चालून आले. भवानीराम अशा अडचणीच्या प्रसंगाला तोंड देण्यांत निर्ढावलेला असल्यानें तो शत्रूंच्या हातावर तुरी देऊन निसटला. पण कालिदास मात्र अशा खणाखणीच्या प्रसंगांत निर्ढावलेला नसल्यानें त्याची फारच कुचंबणा झाली. त्यानेंही भवानीरामाच्या मागोमाग पळण्याचा प्रयत्न केला; पण तो साधला नाहीं. एकंदर चार प्रतिपक्षीय लोकांपैकीं तिघेजण भवानीरामाच्या पाठलागावर गेले व एकटाच कालिदासावर चालून आला, तरीही कालिदासाला त्याच्याशीं दोन हात करण्याचें धैर्य झालें नाहीं. त्या माणसानेंही त्याचें पाणी ओळखलें व त्याच्या घोड्याचा लगाम पकडून त्याला दरडावलें, "हें पहा, तूं आतां माझ्या हातीं सांपडला आहेस. आतां कांहीं गडबड करशील तर इथल्या इथें प्राणांना मुकशील, याद राख !"

त्या माणसानें नुसती प्राण घेण्याची धमकीच दिली, प्राण घेतला नाहीं, एवढ्यानें-च कालिदासाला बराच धीर आला. तो धैर्याचा आव आणून म्हणाला, "गड्या ! तुला येऊन जाऊन लूटच करावयाची आहे ना ? मग त्याच्यासाठीं इतकी धमकीही नको व रक्तपातही नको. मीं हा तुझा डाव ओळखूनच शस्त्र उचललें नाहीं. एरव्हीं माझ्यापाशीं शस्त्रें नाहींत असें नाहीं. माझ्यापाशीं जी काय पुंजी आहे ती मी सामोपचारानें तुझ्या स्वाधीन करावयाला तयार आहें." तो आपल्या कमरेला बांधलेली पिशवी सोडून त्या मनुष्यासमोर करून म्हणाला, "ही घे व आपल्या वाटेला लाग कसा ! मात्र एक कर, भला माणूस असशील तर मला ओंकारेश्वराच्या मार्गाला लावून दे."

" या पिशवींत काय आहे ? "

" बऱ्याचशा मोहरा आहेत, कांहीं भारी किंमतीचीं रत्नें आहेत, कांहीं नाहीं तरी गेला बाजार चार हजारांचा ऐवज आहे. "

त्या मनुष्याला कालिदासाचा भाबडेपणा पाहून कींव आली, व आपणांला पाहिजे त्या मंडळींपैकीं हा नसल्यास याला सोडून द्यावें असेंही त्याच्या मनांत आलें. त्यानें कालिदासाला विचारलें, " तूं ओंकारेश्वरी कशासाठीं जात आहेस ?"

" कशासाठीं म्हणजे ? त्या राजकारणाच्या भानगडी आहेत. तुम्हां लुटारूंना त्यांच्याशीं काय करावयाचें आहे ? "

कालिदासानें राजकारणाचें नांव काढतांच तो मनुष्य एकदम चमकल्यासारखा होऊन म्हणाला, " तें कांहीं नाहीं. तुझ्या या धनाशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं. तूं मुकाटपणें माझ्याबरोबर आमच्या धन्यांपाशीं चल. त्यांनीं तुला सोडलें तर माझी कांहीं हरकत नाहीं."

" एकूण तूं वाटमाऱ्या लुटारू नाहींस तर ! " तो मनुष्य कांहीं बोलत नाहीं असें पाहून कालिदास पुन्हः म्हणाला. " बरें; तुझ्या धन्याचें नांव काय ? "

" या चांभारचौकश्या तुला काय करावयाच्या आहेत ? चल म्हटल्याबरोबर चल." तो मनुष्य दरडावणीच्या स्वरांत म्हणाला.

'हा बोलून चालून आडदांड शिपाईगडी. याला कोणता माणूस काय दर्जाचा आहे हें काय कळणार ? मीं माझ्या काव्यप्रतिभेच्या दिव्य प्रकाशानें त्याच्या धन्याला तेव्हांच दिपवून सोडीन' असें मनांत योजून कालिदास त्या मनुष्याला म्हणाला, " ठीक आहे. चल तुझ्या धन्याकडे. "

लगेच ते दोघे आपले घोडे दौडीत त्या अरण्यांतील अरुंद खडकाळ वाटेनें चालूं लागले. कालिदास कदाचित् पळून जाईल या भयानें त्या दुसऱ्या मनुष्यानें त्याला आपल्या डाव्या बाजूनें आपल्या बरोबर चालविलें होतें. रात्र अंधारी व रस्ता अडचणीचा, त्यांतच मधून मधून वाघाची किंवा सिंहाची आरोळी ऐकूं यावयाची, अशा अडचणी व भय यांनीं व्याप्त असा त्यांचा तो प्रवास बऱ्याच मंद गतीनें चालला होता. तरी पण कालिदासाच्या नैसर्गिक विनोदी वृत्तीमुळें त्या प्रवासांत चित्तवेधकता उत्पन्न झाली होती. सुमारें चार घटका रस्ता चालल्यावर कालिदास व भवानीराम यांच्यावर हल्ला करणारे बाकीचे तिघेजण जवळच्या वाटेनें त्यांना येऊन मिळाले.

"सटवोजी !" त्या तीन माणसांपैकीं एकानें कालिदासाला बरोबर चालविणाऱ्या आपल्या जोडीदाराला हांक मारली. "दोघांपैकीं एक तरी मिळाला का ?"

"होय. हा पहा एकजण माझ्या बरोबरच आहे." सटवोजी म्हणाला. "दुसऱ्याचा पत्ता लागला नाहीं का ?"

"नाहीं. तो एकवार निसटला तो निसटला. पण आपल्या अपेक्षेप्रमाणें म्हणण्यासारखें कांहीं हातीं लागलें का ?"

"हो ! असें म्हणावयाला हरकत नाहीं."

कालिदासानें ह्या सांकेतिक प्रश्नोत्तरांचा निराळाच अर्थ घेतला. तो पुन्हा सटवोजीला म्हणाला, "सटवोजी ! माझ्याजवळची माया घेऊन तुम्हीं सर्वांनीं मला सोडलें तर फार बरें होईल. मात्र मला ह्या जंगलांत सोडतां कामा नये; मार्गाला लावून दिलें पाहिजे."

सटवोजीनें यावर पुन्हा एकवार दरडावून कालिदासाचें तोंड गप्प केलें. त्या चौघांचें आणखी कांहीं असेंच सांकेतिक संभाषण झालें. पण तें कालिदासाला समजलें नाहीं व त्यानेंही भीतीस्तव त्यांत तोंड घातलें नाहीं. ते चौघेहीजण एकत्र होतांच तो एकाद्या मुक्या गरीब प्राण्याप्रमाणें त्यांच्याबरोबर आपला घोडा चालवीत होता. मात्र ते चौघेही एकत्र जमल्यापासून त्यांच्या भाषणपद्धतीवरून ते महाराष्ट्रीय लोक असावे एवढें त्यानें अजमावलें होतें, व त्यामुळें तो प्रत्येक बाबतींत त्यांच्याशीं हातचे राखून बोलत होता.

याप्रमाणें गप्पा-गोष्टी करीत ती पांचही मंडळी मध्यरात्रीच्या सुमाराला जंगलांतील एका उंचच उंच डोंगरकड्याच्या तोंडापाशीं येऊन पोंचली, लगेच सटवोजीनें कालिदासाला घोड्यावरून खालीं उतरण्याला सांगितलें.

"हेंच आपलें मकाण काय ?" कालिदासानें विचारलें.

"मुकाट्यानें खालीं उतर." त्या चौघांपैकीं एकजण रागानें उद्गारला

कालिदास घोड्यावरून खालीं उतरला. लगेच एकानें आपल्या डोकीचा फेटा सोडून त्यानें कालिदासाचे डोळे घट्ट बांधले. कालिदासानें प्राणभयानें मुळींच विरोध केला नाहीं.

"याला घेऊन चला." हा आवाज सटवोजीचा होता हें कालिदासानें ओळखलें.

सुमारें अर्धी घटका कालिदास बरोबरच्या माणसां बरोबर चालत होता. त्याचे डोळे बांधले गेलेले असल्यामुळें आपण कोणत्या मार्गानें चाललों आहों हें

कळण्याला जरी त्याला कांहींच मार्ग नव्हता, तरी इतका वेळ अंगाला झोंबणारी मोकळी थंडगार हवा आतां झोंबेनाशी झाली, त्यावरून आपणाला एखाद्या बंदिस्त मार्गानें चालविण्यांत येत आहे एवढें त्यानें ओळखलें. त्याप्रमाणेंच त्याला मधून मधून बऱ्याच पायऱ्या उतराव्या लागल्या व एक दोन वेळां शिड्यांची चढउतारही करावी लागली; त्यावरून आपणाला बऱ्याच अवघड व गुप्त वाटेनें चालविण्यांत येत आहे हेंही त्यानें अजमावलें. तो त्याचा अंदाज चुकीचा नव्हता. गुहेच्या तोंडाशीं उतरल्यानंतर त्याला ज्या मार्गानें नेण्यांत येत होतें तो मार्ग गुहेशेजारीं असलेल्या एका घनदाट जाळींतून सुरू झाला होता. त्या जाळींत औरस चौरस दोन हातांची एक मोठी पाथर आडवी होती. ती नेहमीं इतर लहान-मोठ्या दगडांनीं व पानपाचोळ्यानें आच्छादिलेली असे. ती पाथर मोकळी करून वर उचलतांच भुयाराचें चिरेबंदी तोंड दिसून येई. तें भुयार तोंडाशीं निमुळतें, पण आंत जसजसें खोल जावें तसतसें रुंद रुंद होत गेलेलें होतें. सुमारें पन्नास कदमें सरळ चालून जातांच त्या भुयाराला एक डावीकडे व एक उजवीकडे असे दोन फांटे फुटत. पैकीं डावीकडच्या फाटयानें सुमारें तीस कदमें चालून जातांच गुडुप अंधारांत चार पायऱ्यांची उतरंड लागे. त्या उतरंडीच्या खालीं अत्यंत खोल अशी पोकळी होती. अपरिचित मनुष्यानें त्या फाटयानें जाण्याचें धाडस केल्यास त्याचा हटकून शेवट व्हावयाचा! उजव्या बाजूची वाट सुमारें चाळीस पावलें चालून गेल्यावर डाव्या बाजूप्रमाणेंच चार पायऱ्या लागत व त्या पायऱ्यांखालीं गुडुप अंधार दिसे. पण त्या पायऱ्या उतरून खालीं जातांच सुमारें दोन हजार माणसें बसतील असें विस्तीर्ण भूमिगत पटांगण लागे. अशा त्या गुप्त वाटेनें कालिदासाला त्याच्या बरोबरच्या माणसांनीं त्या भव्य पटांगणांत आणून सोडलें. व तेथें येतांच त्याचे डोळे सोडण्यांत आले. तेव्हां आपण अगदीं अज्ञात व भलत्या ठिकाणीं येऊन पोंचलों हें जरी कालिदासाला आढळून आलें, तरी त्या पटांगणांतील एकंदर नीटनेटकेपणा पाहून त्याचा शीणभार बराच हलका झाला. तो तेथें पोंचला तेव्हां नुकतें कुठें उजाडत होतें. बाहेरील प्रभातकालीन प्रकाश तेथें निरनिराळया झरोक्यांतून खेळूं लागला होता. त्या प्रकाशांत त्या जागेंतील निरनिराळ्या सोई पाहून कालिदासानें तोंडांत बोटें घातलीं. पाताळाचें वर्णन करण्यांत येतें, त्या पाताळलोकाचा आरंभ असाच भूमिगर्भांतून होत नसेल ना, अशीही कौतुकास्पद कल्पना त्याला सुचली. कारण

त्या जागीं स्नान, भोजन, स्तवन, शयन वगैरे सर्व गोष्टींची जरूर ती सोय असलेली दिसत होती.

विशेष आश्चर्याची गोष्ट कालिदासाला तेथें आढळून आली ती ही कीं, बाह्यतः निर्जन दिसणाऱ्या त्या भूमिगर्भांत दोनशें सैनिकांचा ताफा खडा, व हजारों सैनिकांना पुरण्याजोगी शस्त्रसामग्री तेथें तयार! हा आश्चर्यपूर्ण देखावा पहात कालिदास तेथेंच उभा असतां त्याच्याबरोबरची चारही मंडळी पटांगणाच्या उत्तरेकडील बाजूला जाऊन दिसेनाशी झाली, व कालिदास एकटाच सभोंवारच्या सैनिकांच्या घोळक्यांत अडकून पडला. आपणाला पकडणाऱ्या माणसांपैकीं मल्हारराव व सटवोजी अशीं दोघांचीं नांवें असल्याचें कालिदासाला माहीत झालें होतें; त्यावरून ते मराठा सैनिक असावे असा कयास त्यानें बांधला होता. पण त्यांचा वेष रजपूत लढवय्यांप्रमाणें असल्यानें त्याला थोडा संशय उत्पन्न झाला होता. कालिदास जेथें उभा होता तेथें आढळून येणाऱ्या वस्त्रभूषणांवरून तर तो जास्तच बुचकळ्यांत पडला तेथें रजपूत, मुसलमान व मराठे अशा सर्व प्रकारच्या सैनिकांचे कपडे ठेवलेले होते; फार काय, तेथल्या कांहीं वस्त्रभूषणांवरुन रानटी भिल्लांची वस्तीदेखील एथें असावी असें कालिदासालाच काय पण कोणालाही वाटलें असतें.

हें काय गौडबंगाल आहे याचा विचार करीत कालिदास स्तिमितपणें तेथें उभा असतां एका माणसानें येऊन त्याला सांगितलें, "चल, माझ्या मागोमाग ये."

"कुठें?" कालिदासानें विचारलें.

"मी नेईन तिथें." तो मनुष्य उत्तरला.

त्या मनुष्याच्या उत्तरांतील कठोरपणाचा आघात कालिदासाच्या मनाला चांगलाच जाणवला. तो मुकाट्यानें त्या माणसाच्या मागोमाग जाऊं लागला. थोडें अंतर चालून गेल्यावर त्याला उजव्या डाव्या बाजूला अनेक कोठड्या लागल्या. त्यांपैकीं एका प्रशस्त कोठडींत एका भव्य पाषाणमूर्तीसमोर प्रौढ वयाचा एक रुद्राक्षमणिमालाधारी जटाधारी बैरागी ध्यानस्थ बसला होता. त्या बैराग्याची सतेज मुद्रा व गौर काया पाहून कालिदासाला वाटलें कीं, हा कोणीतरी वनवासी राजपुरुष अथवा निदान थोर कुळांतील पुरुष असावा. काळयवनांच्या अत्याचारांना विटून व आपसांतील फितुरीला बळी पडून राजपुताना, माळवा ह्या भागांतील अनेक तेजस्वी

स्वाभिमानी पुरुष परागंदा झाल्याचें कालिदासाला ऐकून माहीत होतें. अशा परागंदा लोकांचें वास्तव्य विंध्याद्रि, सातपुडा, अरवली येथील निर्जन अरण्यांत नाहींतर अन्य कोठें असावयाचें ? त्यांपैकींच हा बैरागी एक असेल, त्याच्याच दूतांनीं रात्रौ आपल्याला पकडलें असेल व आतां त्याच्यासमोर आपणाला उभें करण्यात यावयाचें असेल अशा समजुतीनें कालिदास त्या देवघरासमोर क्षणभर थांबला. इतक्यांत 'पुढें चल' असा इषारा मिळतांच त्याला निमूटपणें मार्गस्थ व्हावें लागलें.

कालिदास आणखी पुढें चालत गेला, व शेवटीं एका मोठ्या प्रशस्त खोली-पाशीं जाऊन पोहोंचला. तेव्हां त्याच्याबरोबरच्या माणसानें त्याला एकदम आज्ञा केली, " कालिदास ! उभा रहा ! "

कालिदास आज्ञेप्रमाणें उभा राहिला. त्याच्याबरोबरचा माणूस प्रथम त्या प्रशस्त खोलींत गेला व लगेच बाहेर येऊन कालिदासाला म्हणाला, " आंत चल."

कालिदासाला ती आज्ञा मानणें प्राप्तच होतें.

## प्रकरण सातवें

# कालिदासोक्ति

कालिदास त्या माणसाबरोबर आंत गेला. तों तेथें एका प्रशस्त बैठकीवर मध्यभागीं लोडाला टेंकून एक सुमारें चाळीस वर्षे उमरीचा गोरापान राजबिंडा पुरुष बसला असून, त्याच्या दोन्ही बाजूंनीं अंथरलेल्या बैठकींवर दोन अगदीं तरुण व दोन प्रौढ असे चौघेजण बसले होते. तेथला एकंदर रुबाब पाहून ही खाशी मंडळी असावी व सर्वांच्या मध्यभागीं बसलेला वस्त्रालंकारभूषित सुंदर पुरुष त्या सर्वांचा प्रमुख असावा असा तर्क कालिदासाला सुलभपणें करतां आला. मात्र रात्रीं आपणावर हल्ला करणारांपैकीं सटवोजी व मल्हारराव हे दोघेजण त्या चौघांत असून ते खाशा स्वारीच्या डाव्या-उजव्या अंगाला बसले होते, हें कांहीं त्याला ओळखतां आलें नाहीं. तेथल्या एकंदर परिस्थितीविषयींच्या तर्क-वितर्कांच्या जाळ्यांत कालिदास गुरफटून गेला असतां त्या प्रमुख व्यक्तीनें त्याला आपणासमोरच्या एका आसनावर बसावयाला सांगितलें. कालिदास जरी भेदरून गेला होता, तरी तेवढ्यानेंच त्याला धीर आला व त्यानें आपल्या काव्य-नैपुण्याच्या चातुर्याच्या जोरावर त्या मंडळीला गारेगार करून सोडण्यासाठीं मनांतल्या मनांत चंग बांधला.

"तुझें नांव काय?" त्या प्रमुख व्यक्तीनें विचारिलें.

"माझें नांव कालिदास. मी राजकवि आहें." कालिदास उत्तरला.

"तूं कोणाच्या पदरचा राजकवि आहेस?" त्या प्रमुख व्यक्तीनें पुन्हा विचारलें.

"सरकारांपाशीं मीं खोटें बोलावें अशी सरकारांची इच्छा नसेलच."

"नाहीं. तूं खोटें बोलशील तर तें आम्हांला मुळींच खपणार नाहीं. त्याबद्दल तुला मग कडक शासन भोगावें लागेल. तूं राजकवि आहेस, अर्थात् तूं विद्वान् असलाच पाहिजेस. विद्वानांविषयीं आमच्या मनांत फार आदर असतो, व विद्वान् लोक खोटें बोलत नाहींत असा त्यांच्या ठायीं आमचा भरंवसा असतो. पण एखादा विद्वान् असत्यभाषी आढळला तर त्याला शिक्षाही सामान्य माणसा-पेक्षां जबर होते. कारण विद्वान् लोक बहुजनसमाजाचे नेते असतात."

"अगदीं खरें. सरकारापाशीं विद्वानांच्या विद्वत्तेची चहा आहे हें पाहून मला परम संतोष झाला. खोटें बोलण्याचें पाप माझ्या हातून घडूं नये असें मलाही वाटतें. पण सरकार विद्वान् आहेत, बहुश्रुत आहेत, सरकारांना सांगावयाला नकोच कीं, राजकारणाच्या भानगडींत पडलेल्या विद्वानांना प्रसंगविशेषीं कुटिल नीतीचा आश्रय करावा लागतो. सध्यां मी नुसता राजकविच नसून राजकारणधुरंधर मुत्सद्दी म्हणून माझी माझ्या धन्याकडून अत्यंत महत्त्वाच्या कामावर नेमणूक झाली आहे. यास्तव सरकारस्वारी कोण आहे, कोणत्या पक्षाची आहे हें मला अगोदर समजलें पाहिजे."

"म्हणजे ? आमची माहिती मिळाल्यावर तूं जरूर तर खोटें बोलणार वाटतें ! याद राख—"

"नाहीं, नाहीं. मी खोटें बोलणार नाहीं. सरकारांची माहिती मला मिळाल्यावर सत्य भाषण करणें सुरक्षितपणाचें नाहीं असें मला आढळून आल्यास मी खरा वृत्तान्त कथन करण्याचें स्पष्ट नाकारीन. तो कांहीं सरकारांकडून अपराधसा गणला जाणार नाहीं याविषयीं मला विश्वास आहे. सध्यां निजाम व पेशवे यांची लढाई जुंपली आहे, या लढाईच्या शेवटावर निजामाचेंच नव्हे तर दिल्लीच्या बादशहाचें भवितव्य अवलंबून आहे. आणि या बाबतींत फारच मोठा राजकारणाचा भार माझ्या मस्तकावर आहे. यास्तव इतकी चिकित्सा करणें मला प्राप्त आहे. सरकार जर निजामाच्या पक्षाचे असतील, तर मग मला खरा प्रकार सरकारांपासून अणुरेणुही लपवून ठेवावयाचा नाहीं. आपल्या पक्षाच्या माणसाशीं अविश्वासानें वागणें हें मलाच काय पण कोणत्याही खऱ्या राजकारणधुरंधर पुरुषाला शोभण्याजोगें नाहीं."

कालिदासाच्या या राजकारणधुरंधरतेच्या भाषणाचें सर्वांनाच हंसूं आलें; पण इतरांनीं आपलें हंसें दाबलें, व ती प्रमुख व्यक्ति स्मितहास्यपूर्वक उद्गारली, "पण कविराज ! समजा, हेच आम्ही जर मराठ्यांच्या पक्षाचे असतों, तर तुमचें हें बोलणें तुमच्याच अंगाशीं आलें असतें कीं नाहीं ?"

"गोष्ट खरी आहे." इतका वेळ ती प्रमुख व्यक्ति एक वचनानें संबोधीत होती ती आतां कविराज असें बहुमानदर्शक संबोधन योजून बहुवचनपूर्वक बोलूं लागली असें पाहून कालिदासाच्या अंगावर मूठभर मांस चढलें. आपण मनमोकळेपणाच्या बोलण्यामुळें पकडींत सांपडलों गेलों हें त्यानें लगेच

ताडलें. पण त्याबरोबरच ती प्रमुख व्यक्तिही असाच भोळेपणा करून आपण निजामाच्या पक्षाचे आहों हें सांगून फसली असें मनांतल्या मनांत समाधान मानून तो स्मितहास्यपूर्वक उद्गारला, " पण सरकारांना मी भोळा वाटतों तितका खरोखर भोळा नाहीं. सरकार आमच्याच पक्षाचे आहेत हें ओळखूनच मी इतक्या मोकळ्या मनानें बोललों. हा प्रकार मला खुद्द सरकारांच्या तोंडून वदवावयाचा होता इतकेंच. सरकार आमच्या पक्षाचे आहेत हें मीं रात्रींच अचूक ओळखलें होतें."

" तें कशावरून ? "

कालिदासानें समोर सटवोजी बसला होता त्याच्याकडे बोट दाखवून म्हटलें, " या गृहस्थांनीं रात्रीं मला अडवलें तेव्हां मीं यांना माझ्याजवळची सारी दौलत देऊं केली; पण यांनीं ती घेण्याचें नाकारलें. मराठे लोक नेहमीं दरिद्री असावयाचे. त्यांत आणखी ते खुद्द बाजीराव पेशव्याचे नोकर असल्यावर तर बोलावयालाच नको."

" कां बरें ?" सटवोजीनें विचारलें.

" कां, हें काय विचारतां ? अहो ! बाजिरावांची पेशवाई म्हणजे बडें घर व पोकळ वांसा अशी स्थिति आहे. लाखों रुपयांच्या कर्जांत पेशवे आज कुजत आहेत."

" असेल, पेशव्यांना लाखांनीं कर्ज असेल. पण कोटमाप उत्पन्नाचा मुलूख त्यांच्या हुकमतींत आहे तो ? शिंदे-होळकरांसारखे मातबर सरदार व कुबेरालाही कर्ज देण्याला पात्र असे दौलतदार पेशव्यांच्या पायांचे चाकर असतांना पेशव्यांना पैशांची अडचण कशाला भासेल ? " मल्हारराव म्हणाला.

" सारें खरें; पण पेशव्यांच्या सैन्यांतील शिपायांना पगार देण्यापुरतादेखील पैसा त्यांच्या खजिन्यांत नाहीं, म्हणून पेशव्यांचें सैन्य देशोदेशीं लूटमार व जाळपोळ करतें. रात्रीं मला पकडणारा सैनिक जर अशा रंक धन्याचा नोकर असता, तर तो मीं देऊं केलेला ऐवज कां नाकारता ? त्यानें तो ऐवज नाकारला तेव्हांच मीं ओळखलें कीं, हा पेशव्यांचा शिपाई नव्हे. पाहिजे तर त्या शिपायाला माझ्यासमोर आणून खरेंखोटें विचारा."

" बरें; तुम्ही कोणत्या राजाच्या पदरीं आहां तें अगोदर सांगा. इतर गोष्टी राहूं देत." ती प्रमुख व्यक्ति म्हणाली.

"आतां तुम्ही व आम्ही एक ठरल्यावर त्या गोष्टी सांगण्याची तादृश आवश्यकता उरलीच नाहीं. दोघां सख्ख्या भावांपैकीं एकानें दुसऱ्याला त्याच्या आईबापांचें नांव विचारण्यापैकींच हें आहे. बाकी, सांगण्याला माझी ना नाहीं."

"असें पहा, दुधानें तोंड भाजलें, कीं ताकदेखील फुंकून पिणें प्राप्त होतें. सध्यांचा काळ अत्यत आणीबाणीचा आहे—"

"तें सारें मला माहीत आहे सरकार!"

"पेशव्यांचे लोक निरनिराळ्या गुप्त वेषांनीं शत्रूच्या पाठीवर असतात."

"असणारच. मराठे ते, फारच लबाड व डावपेंचाचे!"

"असें सरास म्हणूं नका. तसें म्हणाल तर आम्हीदेखील मराठेच आहों. नाहीं का?"

"तें मला माहीत आहे."

"मग प्रथम आम्हांला सांगा, आमच्याविषयीं तुमचा काय तर्क आहे?"

"पेशव्यांशीं भांडून निजामाला सामील झालेले अथवा होऊं पाहणारे आपण आहां."

"अगदीं बरोबर बोललां. पण आम्ही पेशव्यांशीं भांडून निघालों, म्हणून पेशव्यांचा आमच्यावर दांत आहे, आम्हांला नेस्तनाबूत करण्यासाठीं त्यांनीं चोहींकडे आपलें सैन्य पेरलें आहे व बातमीदार तर आमच्या हालचालींवर नजर ठेवण्यासाठीं इतके हिंडत आहेत, कीं ही आमच्या बरोबरची चार मंडळीही त्यांच्याच बातमीदारांपैकीं नसेल असें देखील आम्हांला म्हणतां यावयाचें नाहीं."

"पण आपलें नांव काय बरें?"

"सारें सांगतों; परंतु अगोदर तुम्ही आमच्या म्हणजे निजामाच्याच पक्षाचे आहां अशी तर आमची खात्री पटवून द्या!" ती प्रमुख व्यक्ति डोकें खाजवीत विचार करीत उद्गारली.

"अजूनही माझ्याविषयीं संशय! पण कांहीं हरकत नाहीं, मराठा म्हटला कीं तो इतका चौकस असावयाचाच. माझें नांव मी आपणांला सांगितलेंच आहे. मी भदावरच्या राजदरबारांतील राजकवि व भदावराधीश अनुरार्धासंगाचा परम-मित्र—केवळ आश्रित नव्हे—परममित्र आहें. आपल्या लोकांच्या हातावर तुरी देऊन पळाला तो माझा साह्यकारी राजा भवानीराम. त्याची आपणांला जास्त ओळख

करून द्यावयाची म्हणजे तो सारंगपूरच्या राजा गिरिधरबहादुरांचा पुत्र-राजा दयाबहादुरांचा पुतण्या."

" असें बरें. कोणत्या महत्त्वाच्या कामावर तुमची नेमणूक झाली आहे ? "

" ह्या माळवा प्रांतांत इतके दिवस बळजवरीनें मिळविलेल्या बादशहाच्या आज्ञेवरून बाजीराव पेशवे कारभार करीत होते. पण आतां बादशहानें निजामाचा वडील मुलगा गाझीउद्दीन फिरूजजंग याला या सुभ्याचा कारभार सांगितला आहे; व माळव्यांत आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा उद्योग जारीनें सुरू केला आहे. बरेचसे जमीनदार, ठाकूर, चौधरी निजामाची सत्ता मानूं लागले आहेत. पण इंदूर, धार, नेमाड, ब्ऱ्हाणपूर वगैरे टापूंत अजून निजामाचा नीटसा जम बसलेला नाहीं. कारण या टापूंत मंडलोई, वढवाणीचा ठाकूर अनुपसिंग वगैरे लोकांचें विशेष वजन असून ते लोक होळकरांच्या तंत्रानें वागणारे अर्थात् बाजिरावांच्या बाजूचे आहेत. त्या लोकांना बादशाही पक्षाकडे वळवून घेण्याची महत्त्वाची कामगिरी माझ्या शिरावर आहे. शिवाय आणखीही एक कामगिरी आहे."

" ती कोणती ? "

" ओंकारेश्वरचा जमीनदार चंद्रशेखर हा मंडलोईच्या घरोब्याचा असून त्याला भागाबाई या नांवाची एक तरुण व सुंदर मुलगी आहे. तिचे राव तेजकर्ण मंडलोईचा धाकटा पुत्र बालकर्ण याच्याशीं लग्न व्हावयाचें ठरलें असून हा लग्नसमारंभ परवां शेवटच्या मुहूर्तावर व्हावयाचा आहे."

" मग ! त्या विवाहाशीं बादशाही राजकारणाचा काय संबंध ? "

" सांगतों, ऐका तर खरें ! त्या मुलीवर शहाजाद्याचें मन बसलें आहे. पण चंद्रशेखर खुषीनें आपली मुलगी शहाजाद्याला द्यावयाला तयार नाहीं. म्हणून ती शाहाजाद्याला मिळवून देण्याचें त्याप्रमाणेंच मंडलोईसह सर्व ठाकूर-जमीनदारांना निजामाची सत्ता मान्य करावयाला भाग पाडण्याचें कार्य अनुराधसिंगांनीं शिरावर घेतलें आहे. अर्थात् त्यांनीं केवळ माझ्या जिवावरच ही अवघड कामगिरी पत्करली असून ती माझ्यावर सोंपविली आहे." बोलतां बोलतां कालिदास आपल्या अंगरख्याचे खिसे चांचपूं लागला.

खिसे चांचपतांना कालिदासाची धांदल उडालेली पाहून त्या प्रमुख व्यक्तीनें त्याला विचारलें, " काय शोधतां ? "

“ बरोबर, ते दोन मोहरबंद लिफाफे भवानीरामापाशींच असले पाहिजेत.” कालिदास स्वगत, पण इतरांना ऐकूं जाईल एवढ्या मोठयानें उद्गारला.

“ कसले लिफाफे ? ” त्या प्रमुख व्यक्तीनें विचारलें.

“ निजामाची सत्ता बिन्‌तक्रार मान्य करण्याबद्दलचीं तेजकर्ण मंडलोई व चंद्रशेखर यांना द्यावयाचीं बादशाही फर्मानें ” कालिदास उत्तरला. “ बाकी, भागाबाईचें बालकर्णाशीं लग्न मात्र खास होत नाहीं.”

“ कां बरें ? ”

“ बालकर्ण भैरवगडावर कडेकोट कैदेंत आहे. तो जोंवर मोकळा सुटला नाहीं तोंवर लग्न कसें होणार ? ”

“ एकूण भैरवगडावरही निजामाचा जम बसला म्हणावयाचा तर ! ”

“ हो ! नुसता जम बसला नाहीं, चांगला जम बसला.”

“ उज्जयनी-भैरवगडच्या टापूंत पेशव्यांच्या वतीनें भदावराधिशाचा धाकटा भाऊ सज्जनसिंग याचा अम्मल होता.”

“ हो ! होता खरा. पण कोट्याचा दुर्जनसाल, ओरछाचा कुंवरजी, आमचे धनी अनुराधसिंगजी, मेवाडचे जगत्‌सिंगजी वगैरे सर्व मंडळी एकजुटीनें एकदम भैरवगडावर चालून गेली व त्यांनीं पहिल्या सपाट्याला सज्जनसिंगाच्या राणी हरकुंवरला लहान मुलासह कैद केलें. सज्जनसिंग पळून गेला. पण तो पळून जाऊन जाणार कुठें ? थोड्याच दिवसांत शरण येईल. तो पेशव्यांचा पक्ष सोडून निजामाच्या पक्षाला येऊन मिळण्याला तयार असेल तर त्याच्या बायकोमुलांना सुखरूपपणें बंधमुक्त करण्याची सर्वांची तयारी आहे. अनुराध-सिंगजींही त्याचे सारे अपराध विसरून त्याला त्याच्या मनाप्रमाणें वागविण्याला तयार आहेत.”

“ अस्सें ! पण अनुराधसिंग सध्यां कुठें आहे ? ”

“ अनुराधसिंगजी, दुर्जनसाल, जगत्‌सिंग, जयपुरचा युवराज माधवसिंग, बुंदेलखंडचा युवराज सभासिंग, शहाजादा वगैरे मंडळींचा मुक्काम आज उद्यां एवढ्या दरम्यान् उज्जयनीलाच असणार. अनुराधसिंग तर तेथेंच आहेत. पण यांची ही सारी मंडळी उज्जयनीला एकत्र होणार आहेत.”

“ ती कशासाठीं ? ”

"प्राप्त परिस्थितीचा विचार करण्यासाठीं. कारण बाजीराव पेशव्यांनीं तर म्हणे चंग बांधला आहे कीं, यापुढें जगाला निजाम व पेशवे हे तुल्यबल प्रतिस्पर्धी आहेत असें म्हणण्याला अवसरच ठेवावयाचा नाहीं; निजाम किंवा पेशवे यांपैकीं कोणीतरी चीत झाल्याशिवाय सध्यांच्या लढ्याचा शेवट होणेंच शक्य नाहीं. गेल्या दोन तीन वर्षांत शिंदे होळकरांनीं जागोजागीं बादशहातीचे लचके तोडले, बाजिरावानें तर जणुं सारी बादशहात घशांत टाकण्याचा घाट घातला आहे. तरी त्या मराठ्यांचें पारिपत्य करण्याइतकें पाणी बादशाही दरबारांतील एकाही माणसाच्या अंगीं नाहीं. सारे लेकाचे खा खा खाऊन तुस्त माजलेले, व नाच-रंग-तमाशे करीत ख्यालीखुशालींत अष्टौप्रहर मद्यसागरांत डुंबत असतात."

"आणि बाजीराव पेशव्यासंबंधीं तुमचें काय मत आहे ?"

"आमचा निजाम व मराठ्यांचा बाजीराव अगदीं एका माळेचे मणी ! दोघेही सारखेच कावेबाज, सारखेच पराक्रमी, आपापल्या धन्यांना सारखेच डोईजड झालेले, फरक असेल तर इतकाच कीं, एक जख्खड थेरडा व दुसरा ऐन चाळिशींतील तरुण. आतां बाजिरावावर शाहूराजाचा विश्वास आहे म्हणतात, व बादशहाचा निजामावर विश्वास नाहीं."

"तरीदेखील निजामाशिवाय बादशाही कारभाराचा गाडा सुरळितपणें चालेनासा झाला आहेच !"

"हीच तर मौज ! पण बादशहा तरी काय करणार ? अडला हरि व * * *चे पाय धरी, अशांतली सारी अवस्था आहे. अगदीं परवांपावेतों निजामाचा परस्पर नक्षा कसा उतरावा याविषयीं बादशाही दरबारांत कसोशीनें खटपट सुरू होती. बाजिरावानें पूर्वीच्या करारमदारांप्रमाणें प्रथम जेव्हां माळव्यांतील चौथाई-सरदेशमुखीच्या सनदा मिळण्याबद्दल बादशाही दरबाराला निकड लावली व बादशाही दरबार तह करीपर्यंत जेरीला येतांच ती मागणी वाढवितां वाढवितां दंडेलीच्या जोरावर फारच वाढविली, तेव्हां बादशहानें बाजिरावाच्या अनेक अटींपैकीं दक्षिणच्या सहा सुभ्यांवर सरदेशपांडेगिरी म्हणून शेंकडा दोन टक्के देण्याची अट मान्य केली. त्यांतील हेतु तरी हाच कीं, बाजिरावानें ती सरदेशपांडे-गिरी वसूल करण्यासाठीं दक्षिणेंत निघून जावें व तिकडे परस्पर निजामाशीं त्याचें भांडण जुंपावें.* दोघेही एकमेकांशीं भांडतांना घायाळ होऊन हतबल झाले तरी

* मराठी रियासत, मध्यविभाग १, पृष्ठ ३५७.

वाहवा, किंवा निजामानें पेशव्याला नामोहरम केलें तर त्याहीपेक्षां वाहवा ! पण पेशवा कसला वस्ताद ! इतका नेट लावल्यावर पहिल्या सपाट्यालाच सरदेशपांडे-गिरी पदरांत पडली असें पाहून त्याच्या तोंडाला जास्तच पाणी सुटलें. कायसें म्हणतात त्यांतली गत, भटाला दिली ओसरी व भट हातपाय पसरी. बादशाही कारभाराची जमीन इतकी मऊ लागतांच कोंपरांनीं खणण्याला तो थोडेंच कमी करणार ! त्यानें जास्तच धुमाकूळ मांडला. पण एका अर्थी तेंही खासें झालें. वजीर कमरुद्दीनखान, मीरबक्षी खानडौरान, अयोध्येचा सुभा सादतखान, अलाहाबादचा सुभा महंमदखान बंगष वगैरे लोकांना मारे गर्व झाला होता कीं, आम्ही बादशहातीचे पंचप्राण ! पण बाजिरावानें एकेकाची खाशी हवेलंडी उडविली, तेव्हां अखेर त्या सर्वांना निजामाची प्रार्थना करावी लागली. जो कमरुद्दीन-खान मी वजीर म्हणून गर्वानें फुगून गेला होता, त्याला आपली मुलगी निजामाच्या वडील मुलाला–गाजीउद्दिनाला देऊन निजामाशीं दोस्ती करावी लागली. प्रत्यक्ष बादशहाला जवळ जवळ आपल्या बरोबरीनें निजामाला मान द्यावा लागला. तीन चार महिने निजाम दिल्लींत होता, तोंवर त्याचा कोण थाट व कोण बडेजाव !—"

"तें सारें आम्हांला माहीत आहे." ती प्रमुख व्यक्ति कालिदासाच्या लांब-लचक चऱ्हाटाला कंटाळून म्हणाली, "सर्व रजपूत राजे व शहाजादादेखील उज्जयनीला एकदम जमून काय करणार आहेत तेवढें कळलें पाहिजे. म्हणजे त्या धोरणानें आम्हालाही वागतां येईल."

"सांगतों." कालिदास म्हणाला, "निजाम म्हणजे दुसरा बादशहाच—नव्हे, बादशहाचाही बादशहा आहे. बादशहाच्या वतीनें तो मराठ्यांशीं लढण्याला सज्ज झाला आहे हें आपण जाणतांच."

"होय."

"झालें तर ! राजपुताना माळवा-बुंदेलखंडांतील झाडून साऱ्या राजे-रजवाड्यांनीं, सरदार-दरखदारांनीं, ठाकूर सामंत-चौधरींनीं या प्रसंगीं निजामाला साह्य करावें अशीं बादशाही फर्मानें सर्वांना सुटलीं आहेत. त्या फर्मानांविषयीं काय विचार करावयाचा हें निश्चित ठरविण्यासाठीं निजामाच्या सूचनेवरून अनुराधासिंगजींनीं सर्व प्रमुख राजेरजवाड्यांची संयुक्त बैठक व्हावी अशी कल्पना

काढून सर्वांना आमंत्रण केलें. त्या आमंत्रणावरून सर्व प्रमुख राजे उज्जयनीला एकत्र होणार आहेत."

"पण मग शहाजादा तेथें कशाला ?"

कालिदास हंसून म्हणाला, "आपण एवढे राजकारणधुरंधर म्हणवितां, डाव-पेंचांनीं मतलब साधण्यांत ज्या मराठ्यांचा हातखंडा त्या मराठ्यांतील आपण, आणि आपणांला हें राजकारण उमगत नाहीं ? सांगा पाहूं—माझ्याच सूचनेवरून अनुराधसिंगजींनीं ही उपाययोजना केली आहे. हिच्यांतील मर्म काय तें सांगा पाहूं !"

"आम्हांला कांहींच अटकळ करतां येत नाहीं."

"तर मग चालू लढाईत मराठे निःसंशय हरणार. बस्स ! हेंच त्याचें गमक ! ज्या अर्थीं आमचे डावपेंच मराठ्यांना कळत नाहींत, त्या अर्थीं अखेर आमचीच सरशी होणार."

"पण तुमच्या सरशींत आमचाही वांटा आहेच कीं ! सांगा आतां."

"त्याचें कारण असें कीं, एरव्हीं सर्व राजेरजवाडे कदाचित् निजामाच्या झेंड्याखालीं मराठ्यांविरुद्ध हिंदु असून हिंदूंविरुद्ध शस्त्रग्रहण करण्याला तयार होणार नाहींत, म्हणून त्यांना जरब बसावी या इराद्यानें तेथें शहाजाद्याला हजर ठेवण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. सासूबाईसमोर सुना जशा नरमाईनें वागतात, तसे हे सर्व मांडलिक राजे शहाजाद्यासमोर निमूटपणें निजामाच्या पक्षाचा अंगीकार करतात कीं नाहीं तें आतां पहा !"

"अस्सें ! युक्ति तर फार नामी आहे."

"कारण ती माझ्या डोक्यांतून निघालेली आहे. बरें; पण या गप्पागोष्टींच्या गर्दींत आपण कोण तें मला अजून कळलेलें नाहीं !"

ती प्रमुख व्यक्ति क्षणभर विचार करून उत्तरली, "आम्ही सेनापति दाभाडे."

"सेनापति दाभाडे ? म्हणजे पेशव्यांचे वैरी ?"

"होय. पण ही बातमी कुठें फुटतां कामा नये. कारण, आमचें पेशव्यांशीं अंतस्थ वैमनस्य असलें तरी बाह्यात्कारीं आम्ही त्यांचे दोस्त व सहकारीच आहों. पेशव्यांचा एकदां खासा नक्षा उतरावा अशी आमची व गायकवाडांचीही मनापासूनची इच्छा आहे."

" बरोबर आहे. आपणही माणसेंच आहां; आपणाशीं पेशव्यांनीं थोड्या दिवसांपूर्वीं गुजराथेंत प्रतारणा केली * तो प्रकार ऐकून तेव्हां सर्वांनाच हळहळ वाटली. मी तेव्हां लहानच होतों म्हणा ! पण मला त्या साऱ्या गोष्टी आठवतात. बरें, गायकवाडांचा मुक्काम सध्यां कुठें आहे ? "

" ते बडोद्याहून इकडे यावयाला निघाले आहेत. आता विषय निघालाच व तुम्हीही निजामाच्या बाजूचे जबाबदार मनुष्य आहां, तेव्हां तुमच्यापाशीं अंतरंग उघडें करण्याला कांहींच हरकत नाहीं.—"

" कांहींच हरकत नाहीं. आपण निःशंकपणें बोला "

" आम्ही बाह्यात्कारीं पेशव्यांच्या बाजूचेच राहणार, व ऐन वेळेपावेतों निजामाच्या विरुद्ध आहों असेंच भासविणार. मात्र लढाईला ऐन रंग आला, कीं एकदम पेशव्यांची बाजू सोडून निजामाला येऊन मिळणार."

" वाः ! ही आपली युक्ति फार नामी आहे. याला म्हणतात मराठी डोकें. मात्र हें गुपित राखूनही निजामाच्या फायद्याची एक गोष्ट आपणांला तूर्तदेखील करतां येण्याजोगी आहे."

एवढें कालिदास बोलावयाला व त्यानें थोड्या वेळापूर्वीं पाहिलेला बैरागी पूजाअर्चा आटोपून मृत्तिकेचें तीर्थपात्र हातीं घेऊन त्या मंडळीला तीर्थ देण्यासाठीं त्या बैठकखान्यांत यावयाला एक गांठ पडली.

---

* 'पेशवाईंतील दुर्जन' ह्या पेशवाई-मालेंतील सातव्या कादंबरींत पेशवे व दाभाडे यांच्यांतील वैमनस्याची स्पष्ट फोड करण्यांत आली आहे.

प्रकरण आठवें

# श्रीमंत बाजीराव पेशवे

"आम्हांला काय करतां येण्याजोगें आहे तें सांगा." ती प्रमुख व्यक्ति बैराग्याच्या हातून तीर्थ घेतां घेतां म्हणाली.

"मारवाडाधिपति अभयसिंगाचा मेहुणा विक्रमसिंह याच्या नेतृत्वाखालीं या प्रांतांत एक स्वातंत्र्यमंडळ स्थापन झालें होतें त्याची आपणाला खबर असेलच." बैरागी तीर्थ देण्यासाठीं कालिदासासमोर आला तेव्हां तीर्थासाठीं हात पुढें करीत कालिदास म्हणाला, "तें स्वातंत्र्यमंडळ आतां बहुतेक मोडलें आहे. पण त्या विषयीं चळवळीचा बीमोड मात्र व्हावा तसा अजून झालेला नाहीं."

बैरागी तेथेंच कालिदासाच्या तोंडाकडे पहात उभा राहिला.

"बरें; त्या मंडळाविषयीं काय म्हणतां?" त्या प्रमुख व्यक्तीनें विचारलें.

कालिदासानें त्रिभुवनेश्वराच्या मंदिरांतील सर्व प्रकार आपल्या काव्यमय भाषेंत निवेदन केला. बैरागी त्याच्या मागें स्तब्धपणें उभा राहून सारा वृत्तान्त ऐकत होता जसजसें कालिदासाचें निवेदन रंगांत येऊं लागलें तसतशी बैराग्याची चर्या अधिकाधिक गंभीर होऊं लागली.

"ठीक आहे. आम्ही ह्या माहितीचा शक्य तेवढा उपयोग करूं. तुम्ही त्याविषयीं अगदीं निर्धास्त असा. पण आतां पुन्हा तुमची आमची भेट कुठें?" त्या प्रमुख व्यक्तीनें विचारलें.

मी ओंकारेश्वर व मांडवगड एथील माझी कामगिरी आटोपून दोन तीन दिवसांत माघारा उज्जयनीला जाईन; तेव्हां अनुराधसिंगजी, शहाजादा वगैरे मंडळीला आपला वृत्तान्त सांगून आपली शिफारस करीन. जेथें अनुराधसिंगजीचा मुक्काम तेथें माझा मुक्काम हें तर ठरलेलेंच आहे. मात्र असेंच आणखी कसल्या तरी महत्त्वाच्या राजकारणाचें जोखीम माझ्यावर पडलें न पाहिजे. शहाजादा किंवा निजाम यांच्या मनांतून आपणाला कांहीं महत्त्वाची कामगिरी सांगावयाची असल्यास अगर कांहीं महत्त्वाचें खलबत आपणाशीं करावयाचें असल्यास मला आपणाकडे कदाचित् पुन्हा यावें लागेलही."

"गोष्ट कबूल! पण आमची अडचण तुम्ही जाणताच."

" होय. मग कसें करावयाचें ? "

" आम्हांला आतांच सांगितलेल्या कारणासाठीं अस्तनींतील निखाऱ्याप्रमाणें पेशव्यांच्या सन्निध राहणें प्राप्तच आहे. यास्तव आमच्या या दोन विश्वासू माणसांपैकीं कोणीतरी एकजण प्रसंगोपात्त तुमच्या मुक्कामावर येऊन तुमची गुप्तपणें गांठ घेईल. बादशाही पक्षाच्या हालचाली आपण गुप्तपणें त्याला कळवीत जा; म्हणजे त्या अनुरोधानें पेशव्यांना आणून अचूक गोत्यांत अडकविण्याचें काम आमचें. तुम्ही आमच्या या माणसांना ओळखीत असालच." ती प्रमुख व्यक्ति मल्हारराव व सटवोजी यांच्याकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाली.

कालिदास त्या दोघांच्या तोंडांकडे टकमक पाहूं लागला. आतां कुठें त्याला ओळख पटली, कीं आपणाला पकडणारीं तीं हींच माणसें ! पण इतका वेळ आपणाला ओळख पटली नाहीं असें मुळींच न दर्शवितां तो उद्गारला, " ठीक आहे. यांहीपेक्षां तुमच्या माणसाला माझी भेट घेणें अथवा जरूर तेव्हां आमच्या पक्षांतील कोणाही मंडळीशीं पत्रव्यवहार वगैरे करणें सुलभ जावें, यास्तव ही मुद्रिका मी आपणापाशीं देऊन ठेवतों." कालिदास आपल्या हातींची मुद्रिका काढून त्या प्रमुख व्यक्तीच्या हातीं देऊन म्हणाला, " मात्र या मुद्रिकेला स्वतःच्या जिवापलीकडे आपण जपलें पाहिजे. कारण, ती जर एखाद्या शत्रुपक्षीयाच्या हातीं सांपडली तर अनर्थ व्हावयाचा."

" त्याची तुम्हांला बिलकूल चिंता नको. " ती प्रमुख व्यक्ति उद्गारली.

" ह्या मुद्रिकेच्या साह्यानें तुम्हांला आपल्या पक्षांत एखाद्या सामान्य माणसापासून तों बादशहापर्यंत व कोणापाशींही कोठेंही प्रवेश मिळेल."

" ठीक आहे. तुमचे आम्ही फार आभारी आहों. मात्र तुम्हीं एक करा, तुमचा जोडीदार तुम्हांला आतां ओंकारेश्वरीं अथवा मांडवगडावर भेटेलच. त्यालाही तुमच्या आमच्या भेटीची दाद लागूं देऊं नका."

" बरें; आतां मला एकदां या भुयाराबाहेर काढून द्या म्हणजे झालें." कालिदास कांहींतरी आठवण करून पुन्हा म्हणाला, " खरें; अत्यंत महत्त्वाची आणखी एक गोष्ट तुम्हांला सांगावयाची राहिली."

" ती कोणती ? "

" शाहूराजांचा जांवई बांडे हा पेशव्यांना सामील झाला असून त्याचा कबिला थोड्या दिवसांपूर्वी ओंकारेश्वराच्या दर्शनाला यावयाचा होता. त्या कबिल्याल

नर्मदेच्या घांटांतच अटक व्हावी अशी जरूर तेवढी तजवीज करण्यांत आलीच आहे. पण तुम्हींही तिकडे लक्ष्य दिल्यास बरें. बांड्याला आम्ही भितों किंवा तो पेशव्यांना सामील झाल्यानें पेशव्यांची बाजू मोठीशी बळकट व्हावयाची आहे अशांतली गोष्ट नाहीं; पण पेशव्यांना शह देण्याला त्या गोष्टीचा फार उपयोग होणार आहे."

"तो कसा काय ?" मल्हाररावानें मध्येंच विचारलें.

"तेवढी साताराची राजकन्या आमच्या हातीं सांपडली रे सांपडली कीं तिला ओलीस ठेवून पेशव्यावर आम्हांला पाहिजे तशा अटींच्या तहाची सक्ति करतां येईल."

"पण मराठ्यांकडील इतक्या बित्तंबातम्या आम्हांलादेखील माहीत नाहींत, त्या तुमच्या लोकांना कशा मिळाल्या याचें आम्हांला फार आश्चर्य वाटतें. मराठ्यांकडच्या खांचाखोंचा इतक्या पूर्णत्वानें ओळखणारा कोणीतरी दर्दी निजामापाशीं असला पाहिजे." ती प्रमुख व्यक्ति म्हणाली.

"आहेच. मराठ्यांचा वकील आनंदराव सुमंत या नांवाचा आहे. त्याचें पेशव्यांशीं वैमनस्य आहे. कोणीकडूनही पेशव्यांचें नाक खालीं व्हावें यासाठीं तो खटपट करीत असतो. ही राजकन्येला ओलीस ठेवण्याची युक्ति त्यानेंच सुचविली. इतकेंच काय पण माहीतगार माणसांकडून ही युक्ति अमलांत आणण्याची जबाबदारीही त्यानेंच शिरावर घेतली आहे." कालिदास बाहेर जावयाला उठतां उठतां म्हणाला, "बरें आहे, मी आतां येतों. अहो ! आतां तुम्ही आणि मी एकच. आतां माझे डोळे बांधण्याची कांहीं आवश्यकता नाहीं."

"ठीक आहे. त्यांना मोकळेपणींच जाऊं द्या." ती प्रमुख व्यक्ति उद्गारली. तेवढें कालिदासानें ऐकलें. पण त्या व्यक्तीनें जवळच्या इतर माणसांना व विशेषतः सटवोजीला कांहीं नेत्रसंकेत केला तो मात्र कालिदासाला कळला नाहीं.

कालिदासाला त्या बैठकखान्याबाहेर नेईतों त्याचे डोळे मोकळे राखण्यांत आले होते; पण पटांगणाच्या दरवाजापाशीं जातांच सटवोजी त्याला हळूच म्हणाला, "कविराज ! आमची इथली शिस्त अशी आहे कीं, ठराविक मूठभर माणसांशिवाय कोणालाही उघड्या डोळ्यांनीं आंत येतांही यावयाचें नाहीं व बाहेर जातांही यावयाचें नाहीं. ह्या शिस्तीचा भंग केवळ तुमच्यामुळें आम्हीं केला तर इतरांना वैषम्य वाटूं लागेल, व न जाणो आमच्यांत देखील पेशव्यांच्या

विश्वासांतील कांहीं माणसें असण्याचा संभव आहे.—त्यांना आमच्याविरुद्ध पेशव्यांकडे चुगली करावयाला एवढेंच निमित्त पुरें पडून आपला सारा व्यूह ढांसळेल. यास्तव मी आतां तुमचे डोळे बांधून तुम्हांला बाहेर नेऊन सोडतों."

कालिदासालाही तो युक्तिवाद पटला. सटवोजीनें त्याचे डोळे पूर्ववत् बांधून त्याला बाहेर नेलें.

"बरें; येथून ओंकारेश्वरापावेतों जाण्याचा मार्ग कोणता ?" कालिदासानें विचारलें.

"मी तुमच्याबरोबरच येतों आहें ना ? मग काळजी कसली ?"

"वाः ! मग तर फारच चांगलें. पण आपले घोडे कुठें आहेत ?"

"घोड्यांची फारशी आवश्यकता नाहीं, तशांत वाट अत्यंत अडचणीची असल्यानें घोडेस्वार त्या वाटेनें जाऊंही शकत नाहींत. बरें; ओंकारेश्वर एथून केवळ कोस-दीड कोसाच्या अंतरावर आहे. यास्तव आपण पायींच गेलेलें चांगलें."

कालिदास त्या वनप्रांतांत अगदींच अनोळखी होता. त्यामुळें त्याला आपल्या सोबत्याचें मत निमूटपणे मान्य करणें प्राप्त होतें. ते दोघेही लगेच पायींपायींच मार्गाला लागले. या वेळीं सूर्य चांगला दोन घटकांवर आलेला असल्यानें प्रकाशाची वाण नव्हती, व वन्य पशूंचीही भीति बाळगण्याचें फारसें कारण नव्हतें.

कालिदास व सटवोजी हे दोघे बाहेर गेल्यावर ती प्रमुख व्यक्ति खोः खोः हंसत मल्हाररावांकडे वळून म्हणाली, "कां मल्हारराव ! कविराज कसे विदूषकी थाटाचे आहेत ! खरोखर या पात्राची घडण करतांना परमेश्वराला फारच सायास पडले असले पाहिजेत."

"श्रीमंतांनीं इतक्या शान्तपणानें ती कटकट कशी ऐकून घेतली याचें मला अजूनही आश्चर्य वाटतें तो श्रीमंतांच्या कर्जबाजारीपणाविषयीं वाचा विटाळूं लागला, तेव्हां मला असा संताप आला होता, कीं खाशी एक श्रीमुखांत भडकावून एका थोबाडाचीं दोन थोबाडें करून टाकावीं. पण त्यामुळें श्रीमंतांची अमर्यादा झाली असती, म्हणून मला मूग गिळून स्वस्थ बसावें लागलें." मल्हारराव म्हणाले.

"तुम्ही त्या वेळीं रागाला बळी पडलां नाहीं हें फार चांगलें केलें."

" वाटेनें येतांना मला या वल्लीची चांगली ओळख झाली होती. म्हणून मला त्याच्या वाचाळतेविषयीं गय करतां आली. बाकी, एका अर्थानें ती स्वारी आमच्या बैठकींत प्रसन्न राहिली हें फार चांगलें झालें."

" यांत काय संशय ? आम्हांला तर वाटतें कीं, श्रीगजाननाच्या कृपेनें ही कामधेनु आमच्या हातीं सांपडली. आज सुमारें पाऊण महिना लपंडाव खेळूनही शत्रूकडील जो रहस्यभेद आम्हांला करतां आला नाहीं, तो ह्या कामधेनूच्या मुखांतून अनायासें झाला. आतां शत्रूच्या डावांवर प्रतिडाव टाकण्यांत मात्र आमच्या हातून दिरंगाई होतां कामा नये. पहिली गोष्ट, गजराबाईसाहेबांविषयीं चिंता करण्याचें कारण नाहीं ना ? "

तिच्याविषयीं चिंतेचें कांहींच कारण नाहीं. खासेरावांच्या मंडळीबरोबर ती सुखरूप आहे. निजामाचे लोक तिला नर्मदेच्या घाटांत प्रतिबंध करणार आहेत, यावरून ती बातमी फार शिळी आहे. मंडळी इकडे आल्याची त्यांना अजून दादही नाहीं हें उघड दिसतें. ते लोक तांडाघाटांत किंवा भैरवघाटांत तिची वाट पहात असले तर पिलाजीराव जाधव तिकडे आहेत, ते त्यांचा परस्पर खरपूस समाचार घेतील किंवा पूर्वीं घेतलाही असेल. मात्र सुमंतांसारख्यांनीं ही हीन प्रतीची कल्पना निजामाला सुचवावी याचें मला आश्चर्य वाटतें."

" त्यांत तुम्हांला आश्चर्य वाटतें; पण आम्हांला मुळींच वाटत नाहीं. सुमंतांचा दुष्टाव्याचा कावा दीड तपापूर्वींच-आम्हांला पेशवाईचीं वस्त्रें मिळण्याच्या प्रसंगीं-आमच्या प्रत्ययाला आला आहे * ही विघ्नमूर्ति कारभारीमंडळापासून दहा पावलें दूर असावी म्हणून त्यांना आम्ही आमचा शब्द महाराजांपाशीं खर्च करून निजामाच्या पदरीं वकील म्हणून ठेवून दिलें. पण तेथें राहूनही ते असे गुण पाघळीत आहेत. हा प्रकार आज तुम्ही प्रत्यक्ष अनुभवीत आहां हें एका

---

*बाजीराव पेशवे अधिकारारूढ होण्याच्या वेळेपासून शाहूमहाराजांच्या दरबारांतील जी मंडळी त्यांना उघड अथवा गुप्त विरोध करीत होती, त्यांपैकींच आनंदराव सुमंत हे एक होत. ( 'पेशवाईचा पुनर्जन्म' पहा. ) ही ब्याद आपणापासन दूर रहावी म्हणून बाजिरावांनीं त्यांना निजामाच्या दरबारीं मराठ्यांचे वकील म्हणून नेमिलें होतें. पण पेशव्यांचा त्यांच्यावर विश्वास नसल्यानें त्यांच्या उपद्व्यापावर नजर ठेवणारी पेशव्यांची निराळी मंडळी होतीच.

अर्थी फार चागलें आहे. वेळीं वखतीं महाराजांच्या कानांपर्यंत ही कागाळी न्यावयाची झाली तर तुम्ही साक्षीला आहां. एरव्हीं असल्या गोष्टी महाराजांना मुळींच खऱ्या वाटत नाहींत. असो. तेव्हां गजराबाईसाहेबांच्या रक्षणाची विशेष खबरदारी घेण्याचें कारण नाहीं ना ? ”

“ कांहीं कारण नाहीं. खासेराव सर्वांना पुरून उरणारे आहेत. आतां बालकर्णाच्या लग्नांत विघ्न आणण्याचा डाव जो शत्रूकडून रचिला जात आहे, त्याबद्दल मात्र आपण वेळींच खबरदारी घेतली पाहिजे.”

“ लग्नांतील विघ्न आपणांला आजच टाळतां येईल असें वाटत नाहीं. कारण बालकर्ण भैरवगडावर कैदेंत डांबला गेला आहे, मुहूर्त तर अवघ्या दोन दिवसांवर येऊन ठेपला आहे. पण त्याची मोठीशी चिंता नाहीं. लग्न आज नाहींतर दोन महिन्यांनीं होईल. मात्र बालकर्णाच्या जीविताविषयीं आपणाला तांतडीनें खबरदारी घेतली पाहिजे.”

“ आणि बालकर्णाच्या भावी वधूविषयींही खबरदारी घेतली पाहिजे. कारण तिच्यावर बालकर्णाचें भवितव्य अवलंबून आहे. ती सामोपचारांनीं शहाजाद्याच्या जनानखान्यांत पावती झाली, तर बालकर्णाची सुखानें सुटका होण्याचा संभव, नाहींपेक्षां—”

“ भागाबाई शहाजाद्याच्या जनानखान्यांत खास जाणार नाहीं.”

“ आपण आजच तशी खात्री देऊं नये. चंद्रशेखराच्या कसोटीची हीच वेळ आहे. तो कोणत्या धोरणाचा अवलंब करतो हें आपणांला सटवोजी माघारा आल्यावर कळेलच. त्याप्रमाणेंच मंडलोई मांडवगडाचा कबजा सोडतात किंवा कसें हेंही पहावयाचें आहे.”

“ त्याविषयीं तर बिलकुल चिंता नको. कविराज व त्याचा जोडीदार भवानीराम हे मांडवगडावर जाऊन पोंचल्यावर तेथून जिवानिशीं परत आले तर त्यांच्या आयुष्याची दोरी खबरदार आहे असें म्हणतां येईल. मंडलोईचा नुसता दरारा उभ्या पश्चिम माळव्यांत शत्रूची दाणादाण उडवून देण्याला पुरेसा आहे. तिकडे भोपाळच्या आसपास शत्रूची गळचेपी करण्याची कडेकोट तयारी शिंदे-होळकरांनीं चालविली आहेच. आतां प्रश्न काय तो उज्जयनीला एकत्र जमलेल्या रजपूत राजांचा. खरोखर, मल्हारराव ! मराठे व निजाम यांच्यांतील झगड्याला निजामानें हिंदु विरुद्ध मुसलमान असें भयंकर स्वरूप आणलें असतांदेखील हे

राजे बादशाही सत्तेपुढें गोंडा घोळण्याला कमी करीत नाहींत, यावरून आम्हांला खेद-पूर्वक असें म्हणावेंसें वाटतें कीं, आम्ही हिंदु हिंदु या नांवानें जगांत जगण्यालाही अपात्र आहों. आमची तर कल्पना होती कीं, हिंदूंचा स्वाभिमानसूर्य जर कुठें आपल्या मध्यान्हींच्या तेजानें तळपत असेल तर तो राजपुताना माळवा बुंदेलखंड ह्या प्रांतीं. चौदा विद्या चौसष्ट कलांचें माहेरघर हा माळवा; असें असतां इथले रजपूत स्वधर्माविषयीं व स्वराज्याविषयीं इतके उदासीन असलेले पाहून जिवाला हळहळ वाटते !"

"श्रीमंत ! तुमच्या जिवाला हळहळ वाटते याचें कारण तुम्हांला आजच्या रजपुतांची खरी ओळख पटलेली नाहीं. भूतकाळच्या उज्ज्वल इतिहासावर लक्ष्य देऊन तुम्ही वागतां म्हणूनच तुमची अशी फसगत होते, व अशीच पुढेंही व्हावयाची. आज इतके दिवस मी तुम्हांला कानीं कपाळीं ओरडून जें सांगत आलों त्याचें हें प्रत्यंतर पहा ! रजपुतांचे पुरातन वंश या हिऱ्याच्या खाणी होत्या खऱ्या; पण आज त्या निव्वळ कोळशाच्या खाणी बनल्या आहेत. आतां या खाणींत तुम्ही हिरे शोधूं लागलां, तर ते कोठून सांपडतील ! सच्च्या दिलाच्या स्वाभिमानी रजपुतांचा काळ मागें पडल्यामुळें जे कोणी मूठभर स्वाभिमानी रजपूत होते, त्यांना माझ्याप्रमाणें सर्वांगाला राख फांसून भणंगभिकारी बनून अशा गिरिकंदरांत काळ कंठावा लागत आहे." बोलतां बोलतां तो बैरागी चपापल्यासारखा होऊन एकदम गप्प झाला.

## प्रकरण नववें

# पेशवे तेथें कसे ?

बाजीराव पेशवे हे मल्हारराव बांडे व सटवोजी जाधव ह्या आपल्या दोघा विश्वासू हस्तकांसह गनिमी काव्याची उभारणी करून निजामाशीं तोंड देण्याच्या इरादानें पाऊण महिन्यापूर्वी गंभीरगडावरून खालीं उतरले होते हें वाचकांना पूर्वीच विदित झालें आहे. एथवरच्या संभाषणावरून कालिदासाच्या अंतःकरणांतील गूढ रहस्यें युक्तिप्रयुक्तीनें अवगत करून घेणारी प्रमुख व्यक्ति म्हणजे बाजीराव पेशवेच होत हेंही चाणाक्ष वाचकांनीं अंदाजानें ओळखलें असेल. बाजीराव, मल्हारराव बांडे व सटवोजी जाधव हे तिघेजण त्या दिवशीं गंभीरगडावरून मोठ्या पहाटेला जे बाहेर पडले, तेच वेष पालटून बाहेर पडले. 'बाजीराव पेशवे निजामाला भिऊन नर्मदेपार झाले' अशी लोकवार्ता कौशल्यानें प्रचलित करून ते तिघेजण गंभीरगडाखालीं उतरल्यामुळें त्यांचा मार्ग विशेष सुलभ झाला. पेशव्यांच्या पलायनाची वार्ता निजाम व त्याचे साथीदार यांच्या कानीं जातांच त्यांना माळव्यांत धुडगूस घालण्याला भरपूर अवसर सांपडला. व पेशव्यांच्या देखत अरेरावी करण्याला कचरणाऱ्या दिवाभीतांचा मार्ग बराच निष्कंटक झाला, असा त्या अपवार्तेचा विपरीत परिणाम झाला हें खरें. पण वाइटांतूनही चांगलें निपजतें या न्यायानें अप्रत्यक्षतः ही वरवर निराशाजनक दिसणारी परिस्थिति पेशव्यांना व त्यांच्या इतर साह्यकारी मराठ्यांना हितकारकच झाली. पेशवे ज्या अर्थी पळाले त्या अर्थी ते आतां आपल्या पचनीं पडण्याला मुळींच आयास पडणार नाहींत अशा घमेंडींत निजामाचें लढाऊ धोरण बरेंच ढिलें पडलें व निजामाच्या साह्यार्थ धांवून आलेल्या अथवा येऊं पहाणाऱ्या अनुराधसिंगादि लोकांना विलास-विहार प्रिय वाटूं लागले. दरम्यान् पेशवे निजामाला शरण येऊन तह करणार अशीही गप्प सर्व मराठ्यांच्या गनिमी काव्यां-तून निर्माण होऊन सर्वत्र फैलावली; त्यामुळें तर बादशाही पक्षात जास्तच ढिलाई उत्पन्न झाली. पेशव्यांचा अनिरुद्ध अंमल माळव्यांत सुरू असतांना त्यांच्याशीं निष्ठापूर्वक वागणाऱ्या व निजाम आणि पेशवे यांच्यात लढाई जुंपण्याचा रंग दिसूं लागतांच पेशव्यांच्या पक्षाला धरून रहाण्याला वचन-

बद्द झालेल्या लोकांत वरकरणी कोण बोलला व अंतःकरणापासून कोण बोलला, याची पारख करण्याला पेशव्यांच्या पक्षाला सुलभ जाऊं लागलें. त्या अनुभवांत त्यांना बरींच नाणीं बद्द वाजणारींच सांपडलीं. तरी त्यांच्यावर विश्वासून पेशवे फसले असते, ती त्यांची फसवणूक टळली.

त्या पाऊण महिन्याच्या अवधींत बाजीराव माळव्यांतील कैक दऱ्याखोरीं व डोंगरपठारें हिंडले, त्यांनीं अनेक मातबर लोकांच्या गांठी घेतल्या, बऱ्याच लोकांना आपल्या बाजूला वळवून घेतलें; पण या सगळ्याहून महत्त्वाचा लाभ बाजिरावांना त्या पर्यटणापासून झाला तो हा कीं, बादशाही सत्तेच्या अदाधुंदीला कंटाळून गृहत्याग–राजत्याग–देशत्याग करून अज्ञातवासी बनलेल्या अनेक पराक्रमी पुरुषांशीं त्यांचा परिचय झाला. रजपूत तरुणांनीं कांहीं काळापूर्वी स्थापन केलेल्या एका गुप्त स्वातंत्र्यसंघाची वार्ता पूर्वीच त्यांच्या कानीं आली होती. त्या संघांतील स्वाभिमानी तरुणाचें साह्य मिळवून स्वातंत्र्यप्रियतेचें वारें माळव्याच्या राजधानीपासून तों दरीखोऱ्यांपर्यंत खेळतें करावयाचें व बादशाही सत्तेविषयीं आणि बादशाही सत्तेच्या स्वजनद्रोही कैवाऱ्यांविषयींही बहुजन-समाजाच्या मनांत तीव्र तिरस्कार उत्पन्न करावयाचा हें ध्येय डोळ्यांसमोर ठेवूनच बाजीराव देशासारखा वेष घेऊन हिंडत होते. हिंडतां हिंडतां त्यांना वनवासी या नांवाच्या एका तेजस्वी सत्पुरुषाची वनप्रांतांत भेट झाली; तरी उभयतांचें थोडा वेळ संभाषण झाल्यावर वनवासीच्या राष्ट्रीय वृत्तीबद्दल व स्वधर्माभिमानाबद्दल बाजिरावांची बालंबाल खात्री होईतों त्यांनीं त्याला आपली खरी ओळख दिली नव्हती. पण अंतःकरणाला अंतःकरण मिळालें तेव्हां मात्र त्यांनीं आपली ओळख वनवासीला दिली.

वनवासीचें त्या प्रांतांतील वास्तव्य जरी अलीकडील कांहीं वर्षांतील होतें, तरी त्यानें आपल्या मायदेशाच्या व मायधर्माच्या उद्धारासाठीं चालविलेले प्रयत्न अत्यंत सूत्रबद्ध व पायाशुद्ध असे होते; व ते प्रयत्न अत्यंत गुप्तपणें चाललेले होते हा त्यांतील विशेष! वनवासीचा संचार त्या प्रांतीं कधींपासून होऊं लागला हें एक गूढच होतें. त्याला ओळखणाऱ्या माणसांची परंपरेनें अशी समजूत झाली होती कीं, प्राणनाथप्रभूंच्या* अनेक शिष्यांत वनवासी हा प्रमुख होता व प्राणनाथ-

* प्राणनाथप्रभू हे राजा छत्रसालाचे गुरु होत. शिव-दिग्विजयांत रामदासांचें जें स्थान तेंच छत्रसालाच्या लोकोत्तर दिग्विजयांत प्राणनाथप्रभूंना आहे.

प्रभूंच्या आज्ञेवरूनच त्यानें देशोद्धाराचें महत्कार्य आपल्या शिरावर घेतलें होतें. ह्या कार्यप्रीत्यर्थ सिद्धि मिळविण्यासाठीं वनवासीनें गिरनार पर्वतावरील निर्जन गिरिकंदरांत बसून एक तपपर्यंत खडतर तपश्चर्या केली, व सिद्धि मिळाल्यावर प्रथम लोकसंग्रह करण्याला प्रारंभ केला. सभोंवार येणाऱ्या व शिष्यत्व घेऊं इच्छिणाऱ्या लोकांना वनवासीजवळून कधींही विन्मुख होऊन जावें लागत नसे हें जरी खरें, तरी वनवासी त्या सर्व इच्छुकांना केवळ समभावानें म्हणजे एकाच पद्धतीनें वागवी असें मात्र नाहीं. त्या इच्छुकांतून जेवढे लोक आपल्या ध्येय-सिद्धीच्या उपयोगी पडतील अशी वनवासीला खात्री वाटे, तेवढ्या लोकांना तो निराळे काढून आपल्या विश्वासांत घेई. नंतर त्या लोकांना एकाहून एक कष्टमय अशा अनेक दिव्यांतून पार पडावें लागे. मायदेशाच्या उद्धारासाठीं आमरण झटण्याची शपथ घेणाऱ्या व सर्वस्वावर पाणी सोडून त्या कार्याचा अंगीकार करणाऱ्या स्वदेशाभिमानी तरुणांनाच काय तो वनवासीच्या ह्या विशिष्ट शिष्य-शाखेंत आश्रय मिळे. ह्या शिष्यशाखेला वनवासीनें स्नातकसंघ असें नांव दिलें होतें. पस्तीस वर्षांहून जास्त वयाच्या कोणाही पुरुषाला ह्या स्नातकसंघांत सहसा प्रवेश मिळत नसे.

संघांत प्रवेश करतांच पहिल्या घटकेपासूनच कडक्या शिस्तीला प्रारंभ होई. सध्यां बाजीराव पेशवे ज्या ठिकाणीं होते, तेंच वनवासीचें मुख्य निवासस्थान होय पण स्नातकाला देखील प्रथम त्या स्थानीं प्रवेश मिळत नसे. अशींच आणखी दोनतीन गुप्त स्थलें होतीं, त्यांपैकीं एखाद्या स्थळीं स्नातकाला समाविष्ट करण्यांत येई. त्या ठिकाणीं एकलिंगजी या रजपुतांच्या आराध्यदैवताची प्रतिष्ठा असे. त्या प्रतिमेसमोर स्नातकाला पूजाअर्चापूर्वक एक शपथविधि करावा लागे. 'मी सर्वस्वावर पाणी सोडून मातृभूमीच्या उद्धारार्थ स्नातकाची दीक्षा घेत आ॰. आजपासून मीं माझें सर्वस्व मायभूमीच्या सेवेंत अर्पण केलें आहे. मी माझ्य गुरूच्या आज्ञेबाहेर पाऊल टाकणार नाहीं. मी स्नातकसंघांत असेतों अखंड ब्रह्मचर्य पाळीन, व आचार विचार-उच्चार यांत अखंड पावित्र्य राखीन'. अशा आशयाचा तो शपथविधि असे.

शपथविधि झाल्यावर त्या स्नातकाचें नवीन नामकरण करण्यांत येई. स्नातकां साठीं आश्रमाचे जे नियम ठरलेले होते, त्यांची माहिती मग स्नातकाला देण्यांत येई. सर्व स्नातकांना रोज पहिला कोंबडा आरवण्याच्या सुमाराला उठावें लागे.

प्रातर्विधि आटोपल्यावर प्रथम ईश्वराचें सामुदायिक प्रातःस्मरण होई. प्रातःस्मरणानंतर भसरिका, प्राणायाम, निरनिराळीं योगासनें यांचें शिक्षण स्नातकांना देण्यांत येई. त्यानंतर कंदमुळांचा अल्पाहार प्रत्येकाला मिळे. अल्पाहारानंतर गीतावाचन व गीतेवर प्रवचन होई. त्या प्रवचनाचा भर कर्मयोगावर विशेष असे. गीतावाचन व प्रवचन आटोपल्यावर सर्व स्नातकांना कंदमुळें आणण्यासाठीं अथवा मृगयेसाठीं अरण्यांत जावें लागे. प्रत्येकाला निदान आपल्या निर्वाहापुरतें मांसान्न अथवा शाकान्न संपादन करून आणावें लागे. दोनप्रहरीं मिताहार झाल्यावर थोडा वेळ विश्रांति मिळे. त्यानंतर सर्व स्नातकांना विविध शस्त्रास्त्रविद्यांचें शिक्षण देण्यांत येई. तें शिक्षण आटोपल्यावर रामायण-महाभारतादि पुराणेतिहासांतील एखाद्या उत्कृष्ट प्रसंगावर प्रवचन होई. त्या प्रवचनाचा सारा रोंख आपल्या पुराणकालीन पूर्वजांचे पराक्रम स्नातकांच्या मनावर ठसवून त्यांच्यांत स्वदेशप्रेम व स्वदेशसेवेविषयींची आवड उद्दीपित करण्याकडे विशेष असे. त्यानंतर स्नातकानें नानापरींचे कष्ट कसे सहन करावे याविषयींचें विशिष्ट शिक्षण देण्यांत येई. शस्त्रांचे आघात सहन करणें, द्वंद्वयुद्ध खेळणें, दगडांचा मार सहन करणें असे कष्टाचे कार्यक्रम बराच वेळ चालत असत. याशिवाय हिमालयाच्या पायथ्यापासून तों नर्मदेपर्यंतच्या टापूंतील प्रदेशाचें भौगोलिक ज्ञान—त्या टापूंतील गड-कोट, राज्यें, जहागिरी, राजधान्या, दऱ्याखोरीं, त्याप्रमाणेंच निरनिराळ्या लोकांचे जातिधर्मविशेष स्वभावविशेष वगैरे आवश्यक गोष्टींची माहिती स्नातकाला देण्यांत येत असे. दरम्यान् त्याच्या वर्तनावर कडी नजर राखण्यांत येई. एखादा स्नातक विपरीत प्रकारानें वागूं लागल्यास त्याला कठोर शासन करण्यांत येई. सामान्य अपराधांबद्दलची शिक्षा म्हटली म्हणजे अपराध्याला त्याचे डोळे बांधून दूरच्या एखाद्या अज्ञात जागीं नेऊन सोडणे ही होय. तो अपराध थोडासा महत्त्वाचा असला तर अपराध्याच्या शरिरावर कांहींतरी व्यंग उत्पन्न करून त्याला अज्ञात जागीं नेऊन सोडण्यांत येई. पण कोणताही अपराध क्षम्य गणला जात नसे. त्याबरोबरच हेंही खरें कीं, अशीं बद् वाजणारीं नाणीं वनवासीच्या सहवासाला फारशीं येतच नसत.

इतक्या सर्व प्रकारच्या कसोटीला जे स्नातक उतरतील, त्यांना मग देवदूत-संघांत समाविष्ट करून घेण्यांत येत असे. स्नातकसंघावर प्रत्यक्ष अम्मल एकेका ठिकाणीं एकेका देवदूताचा असे व वनवासीची देखरेख असे. पण देवदूतसंघ

एकट्या वनवासीच्या हुकुमतीखालीं असे. बाजीराव पेशवे ज्या भूमिगत स्थळीं वास्तव्य करीत होते, तेंच देवदूतसंघाचें मुख्य स्थान होय. स्नातकांप्रमाणेंच देवदूतांनाही कडक शिस्त पाळावी लागे, व शिवाय प्रत्यक्ष कार्याची अवघड जबाबदारी त्यांच्या शिरावर असे. धन व शस्त्रास्त्रें संपादन करणें, देशद्रोही अथवा दुर्वर्तनी लोकांना पकडून आणणें, नवीन होतकरू व विश्वासू तरुणांचा संग्रह करणें, वगैरे सर्व गोष्टी देवदूतच करीत. अपराध्यांना शिक्षा ठोठावण्याचें काम स्वतः वनवासी करी. पण कांहीं अपराधी जिवंत हातीं लागणें शक्य नसे, अशांना शासन करण्याचें कार्य देवदूतच वनवासीच्या आज्ञेनुसार पार पाडीत. कोणाही देवदूताला कोठेंही ओळखतां यावें यास्तव प्रत्येकापाशीं एक स्वास्तिक चिन्ह असे; व शिवाय 'वनवास' हा त्यांचा परवल ठरलेला असे.

या देवदूतसंघाला हा शासनाधिकार कोणीं दिला, असा प्रश्न वाचकांकडून विचारला जाणें क्रमप्राप्त आहे. त्या प्रश्नाचें उत्तर असें कीं, 'स्वयमेव मृगेन्द्रता' या न्यायानें त्या संघाला ते अधिकार प्राप्त झाले होते. कांहीं वर्षांपूर्वी देशांतच स्थापन झालेल्या या स्वातंत्र्य-संघाचीं पाळेंमुळें जनतेच्या अंतःकरणांत फार खोल रुजलीं असल्याची दखलगिरी बादशाही अधिकाऱ्यांना होती. ती स्वातंत्र्य-लालसा जनतेच्या मनांतून निर्मूल करण्यासाठीं व बादशाही सत्तेचे कर्तुमकर्तु-मन्यथाकर्तुम् सामर्थ्य सर्व जनतेच्या प्रत्ययाला आणून देण्यासाठीं त्या अधिकाऱ्यांनीं दडपशाहीचे नवे नवे कठोर उपाय अंमलांत आणण्याला जारीनें प्रारंभ केला. त्यांतच मराठ्यांची सत्ता गुजराथ-माळव्यांत मूळ धरूं लागली, व राजा छत्रसालाच्या औदार्यामुळें त्याच्या राज्याचा तिसरा हिस्सा बाजिरावांना मिळून¶ बुंदेलखंडांतही पेशवे वतनदार होऊन बसले. हें संकट अगदीं दिल्ली-

¶ दिल्लीच्या बादशहानें आपला सुभेदार महंमदखान बंगष याला बुंदेलखंडचा वृद्ध राजा छत्रसाल याच्यावर स्वारी करून त्याला धुळीला मिळविण्याचा घाट घातला. त्या प्रसंगीं बाजिरावांनीं छत्रसालाच्या विनंतीवरून त्याला साहाय्य करण्याचें मनावर घेऊन बुंदेलखंडाकडे मोर्चा वळविला. तेथें बंगषाचा पूर्ण पराजय करून छत्रसालाचें राज्य त्याला निर्वेध करून दिलें. ( 'पेशवाईचें पुन-र्वैभव' पहा. ) त्या उपकाराबद्दल छत्रसालानें प्रथम एक किल्ला व झांशीनजीक दोन-अडीच लक्षांचा मुलुख बाजिरावांना दिला. पुढें इ. स. १७३२ मध्यें

दरवाजाला येऊन भिडलेलें पहातांच तर बादशाही पक्षानें दडपशाहीची कमाल केली.

ह्या राष्ट्रीय आपत्तींत ज्यांनीं आपल्या हीन स्वार्थाचा पर्वकाळ साधून घेतला अथवा साधून घेण्याचा सपाटा चालविला त्यांना हुडकून काढून शासन व जे लोक ह्या अत्याचारांत गांजले गेले त्यांना साह्य करण्याची जबाबदारी देवदूतांच्या संघानें आपल्या शिरावर घेतली होती, व ती संघांतील प्रत्येक मनुष्य कसोशीनें पार पाडीत होता. बादशाही सत्तेच्या वरवंट्याखालीं सर्रास चेंचला जाऊन नामशेष झालेल्या स्वातंत्र्यसंघांतील कांहीं नररत्नें विंध्याद्रि सातपुडा-अरवली वगैरे ठिकाणच्या गिरिगव्हरांत अथवा बुंदेलखंडांतील अजनेरसारख्या खोऱ्यांत दडून अज्ञातवासांत दिवस कंठीत होतीं, ती मंडळी हळूहळू वनवासीच्या स्वातंत्र्यध्वजेखालीं येऊन देवदूत या नात्यानें नांदूं लागली होती.

पुढें मराठ्यांनीं माळव्यामधून दिल्ली पावेतों चढाईचें धोरण स्वीकारलें तेव्हां ह्या क्रांतिकारकांना मोठा धीर आला. पण बादशहात कायम राखून बादशाही छत्राखालीं मग तें छत्र नामधारी कां असेना-हिंदवीसाम्राज्याची उभारणी करण्याचें मराठ्यांचें नेमस्तपणाचें धोरण त्या क्रांतिकारकांना मान्य नव्हतें; त्यामुळें ते बाजिरावांना साह्य करण्याला कचरत होते. अशा स्थितींत बाजीराव पेशवे त्या क्रांतिकारकांचें साह्य मिळविण्यासाठीं वेषांतरानें अरण्यांतून हिंडत असतां प्रथम त्यांची एका देवदूताशीं भेट झाली. भेट झाली म्हणण्यापेक्षां वेषांतरानें क्रांतिकारकांच्या साह्यासाठीं रानावनांतून भटकणारे हे लोक कोण ? हे क्रांतिकारकांच्या संघाची बित्तंबातमी काढण्यासाठीं स्वातंत्र्याच्या व स्वाभिमानाच्या मायावी गोष्टी बोलत हिंडणारे कोणी हेर तर नसतील ना ?—अशा संशयानें त्या मंडळीच्या तपासावर निघालेल्या कांहीं देवदूतांनीं बाजिरावांची भेट घेतली व त्या भेटींत बाजीराव पेशव्यांनीं आपली खरी ओळख

---

छत्रसाल मरण पावला, त्या वेळीं त्यानें हिरडोसा व जगत्राज हे आपले दोन पुत्र तसाच बाजीराव हा तिसरा पुत्र असें मानून आपल्या राज्याचे सारखे तीन हिस्से करून त्यांतला एक हिस्सा बाजिरावांना दिला. त्या वेळीं मिळालेल्या प्रांताच्या व्यवस्थेसाठीं बाजिरावांनीं आपले विश्वासू व पराक्रमी सेवक गोविंद बल्लाळ खेर ऊर्फ गोविंदपंत बुंदेले यांची नेमणूक केली.

दिल्यावर त्या देवदूतानें त्यांची वनवासीशीं भेट करवून दिली. दोघांचा बराच विचारविनिमय झाला, आपल्या महत्त्वाकांक्षा काय आहेत व शाहूमहाराज आणि त्यांचें इतर कारभारीमंडळ यांच्या नेमस्तपणाच्या धोरणापुढें आपणांला कशी मान नमवावी लागते याचा बाजिरावांनीं वनवासीपाशीं पूर्ण खुलासा केला. त्याबरोबरच निर्भेळ स्वातंत्र्याच्या पुकाऱ्यांपेक्षां बादशाही सत्तेचें बुजगावणें कायम राखून हिंदवी साम्राज्याची उभारणी व विस्तार करणें कसें व्यवहार्य आहे हेंही बाजिरावांनीं प्राप्त परिस्थितीशीं मेळ घालून वनवासीच्या मनाला पटवून दिलें. तेव्हांच वनवासीनें बाजिरावांना शक्य तें साह्य करण्याचें कबूल करून त्यांना आपल्या गुप्त निवासस्थानीं आश्रय दिला होता, व त्या उभयतांच्या परस्पर अनुमतानेंच पुढील सर्व घडामोडी चालल्या होत्या.

* * *

त्या रात्रौ कालिदास आणि भवानीराम यांच्यावर ज्यांचा छापा पडला, ते एक मल्हारराव बाडे, दुसरा सटवोजी जाधव व त्या दोघांचे दोन विश्वासू सैनिक असे चौघे असामी होते. अनुराधसिंगाच्या सैन्याला बाजिरावांच्या संचाराची बातमी कळली असून त्याचें सैन्य त्यांना पकडण्यासाठीं आसपासच्या दऱ्या-खोऱ्यांतून हिंडत आहे; बाजिरावांना जिवंत पकडून आणणाराला निजामानें मोठें बक्षीस देऊं केलें आहे; बुंदीचा बुधसिंगही अनुराधसिंग, दुर्जनसाल वगैरे कुऱ्हाडीचे दांडे गोताला काळ होऊन बसलेल्या स्वजनांच्या जबरदस्त हल्ल्यांत पराजित होऊन त्रिभुवनेश्वराजवळील अरण्याच्या आश्रयानें आपल्या बायको-मुलांसह अज्ञातवास भोगीत असून अनुराधसिंगाचें सैन्य त्याच्या पाटीवर आहे अशा वार्ता देवदूतामार्फत बाजिरावांच्या कानीं गेल्या होत्या, म्हणून शत्रूच्या त्या हालचालींवर नजर ठेवण्यासाठीं व बुधसिंगाचा तपास लागल्यास त्याचें रक्षण करण्यासाठीं सटवोजी व मल्हारराव हे रानटी लोकांच्या वेषानें त्या टापूंत हिंडत होते. त्यांना बुधसिंगाचा तपास कांहीं लागला नाहींच, शत्रुसैन्यही कोठें भेटले नाहीं, पण भवानीराम व कालिदास यांच्यापैकीं एक मात्र अचानक त्यांच्या हातीं लागला होता.

प्रकरण दहावें

# पुढील बेत

मागें वर्णिल्याप्रमाणें वनवासी बोलतां बोलतां चपापलेला पाहून बाजीराव व मल्हारराव बांडे या दोघांनाही किंचित् शंका आली. त्यांनीं शंकित मुद्रेनें एकमेकांकडे पाहिलें. वनवासीची त्यांच्या चर्येकडे नजर होतीच. त्यामुळें तो जास्तच चपापल्यासारखा झाला. बाजिरावांनीं प्रश्न केला, "स्वामिजी ! इतक्या दिवसांत आपण आम्हांला आपली स्वतःची ओळख मुळींच दिली नाहीं ती कां बरें ? आपण कोणी सामान्य मनुष्य नाहीं याविषयीं तर आमची पूर्वीच खात्री झाली आहे. पण आपण आपल्या तोंडानें ओळख करून दिली असती तर फार चांगलें झालें असतें."

"श्रीमंत !" वनवासी चर्या गंभीर करून उत्तरला, "आपणाला तूर्त माझी ओळख आहे एवढीच पुरे. यापेक्षां खोलांत जाण्याचा प्रयत्न तूर्त आपण करूं नये हे उत्तम. आतां आपण पुढच्या बेतांना लागा. मला सांगा, आपणां सर्वांना पावलोपावलीं नडणारे चांडाळ पुढील मसलती ठरविण्याच्या निमित्तानें अनायासें उज्जयनीला एकत्र जमले आहेत, या संधीचा फायदा आपण कसा घेणार ?"

"कसा फायदा घ्यावा ?" बाजिरावांनीं प्रश्न केला.

"मला तर वाटतें कीं, आपण साधल्यास अचानक उज्जयनीवर चालून जाऊन त्या सर्वांना कापून काढावें. ते लोक तेथें लढाईच्या बेतानें आले नसतील खास. त्यांच्यापाशीं जें जुजबी सैन्य असेल त्याचा समाचार घेण्यापुरतें सैन्य आपणांपाशीं आहे."

बाजीराव म्हणाले, "गोष्ट खरी. पण स्वामिजी ! आम्हांला वाटतें, इतका उतावळेपणा आजच करण्याचें कारण नाहीं. त्या शत्रूंचा मोड करावयाचा झाला तरी त्याला अजून अवकाश आहे. किंबहुना त्यांच्यावर प्रत्यक्षतः शस्त्र उगारण्याचा प्रसंगच आपणांवर येणार नाहीं. अनुराधासिंग काय, दुर्जनसाल काय, या सर्व आपणांला जाचणाऱ्या विषारी वृक्षाच्या शाखा आहेत. या शाखा तोडण्यानें तो वृक्ष नाश पावेल असें तर नाहींच; उलट तेवढ्या लोकांचे अनुयायी आपणां-

विरुद्ध बिथरतील. त्यापेक्षां निजाम हें त्या वृक्षाचें मूळ; त्या मुळावरच आपण घाव घातला कीं फांद्या त्या वृक्षाबरोबर आपोआप खालीं येतील."

मल्हरराव बांडे मध्येंच म्हणाले, " आणखी असें कीं, आपण सध्यां त्या मूर्ख-शिरोमणि कविराजांसमोर जी भूमिका घेतली आहे, त्या भूमिकेंत राहून आपणाला आपला पुष्कळच कार्यभाग साधतां येण्याजोगा आहे. गनिमी काव्याची लढाई हा आम्हां मराठ्यांचा रामबाण आहे; तो आपण नेहमीं सज्ज ठेविला पाहिजे."

" ठीक आहे. तुमच्या मार्गानें तुम्ही चाला व आमच्या मार्गानें आम्ही चालतों." वनवासी म्हणाला.

" म्हणजे काय ? " बाजिरावांनीं विचारलें.

" देवदूतांच्या गुप्त राज्यांत जे देशकंटक महान् अपराधी ठरून देहदंडाच्या शिक्षेला पात्र ठरले आहेत, त्यांपैकींच अनुराधसिंग, व दुर्जनसाल वगैरे लोक आहेत. देवदूतसंघाच्या शिस्तीनुसार विचार करतां त्या अपराध्यांना आतां देहान्त शासन मिळणें अवश्यच आहे. आपण अजून सामोपचाराची आशा धरतां; पण आपण पक्कें ध्यानीं ठेवा, कीं 'अशुभस्य कालहरणं' या न्यायानें आपल्या पक्षाची जय्यत तयारी करण्याला भरपूर अवकाश मिळावा म्हणूनच केवळ हें उज्जयनी येथील दरबाराचें थोतांड बादशाही पक्षाकडून उभारण्यांत आलेलें आहे. अशा विश्वासघातक्यांच्या शब्दावर विश्वासून आपण उज्जयनीला जाल तर हकनाहक फसाल."

वनवासीचे हे उद्गार शहाजाद्याकडून पूर्व दिवशींच बाजिरावांना उज्जयनी येथील दरबारचें निमंत्रण आले होते त्याला अनुलक्षून होते. निजामाच्या कोणत्याही उपद्व्यापाला बादशाही सत्तेचें बिलकूल पाठबळ नसून, निजाम व मराठे यांच्यांत वेबनाव न माजतां, हा वाद कसा मिटेल याविषयीं खुल्या मनानें विचार-विनिमय करण्यासाठीं म्हणून शहाजाद्यानें बादशहाच्या संमतीनें बाजीराव पेशव्यांची उज्जयनी येथें भेट घेण्याचें ठरविल्याबद्दलचा मजकूर त्या आमंत्रणपत्रिकेंत होता.

बाजीराव पेशवे नर्मदेपार पळून गेल्याची तेव्हां दाट बातमी असल्यानें व बाजिरावांचा नक्की पत्ता बादशाही दरबारांत कोणालाही माहीत नसल्यानें शहा-जाद्यानें तें आमंत्रणपत्र जयपुरच्या राजा जयसिंगामार्फत बाजिरावांकडे पाठविलें होतें. जयसिंगाला देखील बाजिरावांचें नक्की वास्तव्य कोठें माहीत होतें ! पण

बाजिरावांकडून एक शिपाई कांहीं महत्त्वाच्या बाबतींत जयसिंगाकडे पत्र घेऊन जावयाला व शहाजाद्याकडून बाजिरावांना यावयाचें आमंत्रणपत्र घेऊन तेथें जासूद यावयाला एक गांठ पडली. त्यामुळें जयसिंग तें आमंत्रणपत्र ताबडतोब बाजिरावांकडे रवाना करूं शकला. बाजिरावांनीं आपल्या मंडळींच्या विचारानें ताबडतोब आपण भेटीला येत असल्याचें आपल्या एका शिपाया-मार्फत शहाजाद्याला कळविण्याची व्यवस्था केली होती. हा सारा प्रकार वनवासीला माहीत असल्यानें त्याला अनुलक्षूनच तो बोलत होता.

बाजीराव शांतपणानें वनवासीला म्हणाले, " स्वामिजी ! आपण म्हणतां तें अगदीं खरें आहे. पण आमचें म्हणणें असें कीं, आपण कोणतीही सुसंधि लाभली कीं, ती वायां दवडूं नये."

" एकूण आपलें मत काय कीं, आपण एकवार शहाजाद्याला जाऊन भेटणार, व त्याच्याशीं वाटाघाट करणार."

" होय."

" आणि आमच्या दृष्टीनें देशद्रोही ठरलेल्या अनुराधासिंग, दुर्जनसाल वगैरे लोकांना शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करून पाहाणार !"

" अगदीं बरोबर बोललां."

" आणि आपल्या ह्या प्रयत्नांतून कांहींच निष्पन्न झालें नाहीं तर ?"

" मग त्या पुढचा आपला व आमचा मार्ग भिन्न नाहीं. आजदेखील आपला क्रांतीचा मार्ग आम्हांला मान्य नाहीं असें मुळींच नाहीं; पण—" असें म्हणून बाजीराव जरा थबकले.

" श्रीमंत ! आपण असें अडखळलां कां ? काय बोलावयाचें तें मोकळ्या मनानें बोला. सध्यांचा काळ हा क्रांतीचा काळ नाहीं असें आपलें मत असावें असें मला वाटतें. तसें असेल तर मात्र मला स्पष्टपणें सांगणें अवश्य आहे कीं, आपलें व आमचें एकमत कधींच होणें शक्य नाहीं—"

" पण आमचें तसें मत मुळींच नाहीं. उलट आम्ही असें म्हणतों कीं, हाच काळ क्रांतीला सर्वतोपरी अनुकूल आहे. बादशाही सत्तेचा सूर्य दिवसेंदिवस अस्तायमान होण्याच्या पंथाला लागला आहे. आमच्या महाराष्ट्रानें तर ह्या बादशाही सत्तेसमोर समजून किंवा न समजूनदेखील कधींच खुषीनें मान नमविलेली नाहीं. इतकेंच काय, पण बादशाही सिंहासन खिळखिळें करून

सोडणारा जोराचा पहिला धक्का महाराष्ट्रानेंच त्या सिंहासनाला दिला. असें असतांही आजवर बादशाही सत्ता या भागांत आपला पूर्वीचा दिमाख जगाला दिसण्यापुरता तरी कायम राखूं शकली, ती केवळ गुजराथ-माळवा-राजपुताना ह्या भागांतील राजेरजवाड्यांच्या व ठाकुर-चौधऱ्यांच्या साह्यानें ! आम्ही स्पष्ट बोलतों म्हणून आपण राग मानूं नका, पण स्वामिजी ! या भागांतील रजपूत राजांनीं जुलमी बादशाही सत्तेच्या ताटाखालील मांजरें होऊन न बसतां बाप्पा रावळाप्रमाणें किंवा राणा प्रतापसिंहाप्रमाणें उज्ज्वल स्वाभिमानपूर्वक आपल्या स्वातंत्र्यलक्ष्मीला रक्षिलें असतें, तर आजचा हा प्रसंगच आला नसता. त्या गोष्टी बोलाव्या तेवढ्या थोड्या आहेत."

"तें खरें. म्हणूनच मी म्हणतों कीं, अशा देशद्रोही लोकांचा बींमोड जितका लौकर होईल तेवढा बरा; व तसें होण्याला क्रांति हा एकच मार्ग आहे." वनवासी म्हणाला.

"आमचें ऐकून तर घ्या ! आम्ही पुन्हा सांगतों कीं, आपला क्रांतीचा मार्ग आम्हांलाही मान्य आहे. पण आम्हीं आचरीत असलेल्या मार्गांत प्रत्यक्षतः इतक्यांतच—या घटकेला—क्रांतीचे अशा प्रकारचे स्फुलिंग पडावयाला नको आहेत. कारण वाइटांतून चांगलें निपजतें या न्यायानें याच रजपूत राजे–रजवाडयांचे डोळे आतां नुक्ते कुठें उघडूं लागले आहेत, व सर्व रजपुतांची एकी करण्याची सुबुद्धि त्यांना सुचली आहे. यांच्यावर आज आपण सर्रास निष्ठुरपणें शस्त्र उचललें तर त्या एकीला बाध येण्याचा संभव आहे. हां ! तसें देखील करण्याला आम्हीं या घटकेलासुद्धां नकार दिला नसता; पण एकदम इतक्या सर्वांना नेस्तनाबूत करून मार्ग निष्कंटक करण्याइतकें आपलें सामर्थ्य अफाट असतें तर तेव्हांच्या त्या गोष्टी होत्या. असा सार्वत्रिक क्रांतीचा काळ आपल्या देशांत अजून आलेला नाहीं. मला सांगा, आपणांसारखे मायदेशाच्या मंगलासाठीं सर्वस्वावर तिलांजलि देऊन घराबाहेर पडलेले कितीसे लोक या उत्तरभागांत सांपडतील ? क्रांतीच्या मशाली हातीं धरून संचार करण्यासाठीं अशाच लोकांची खरी आवश्यकता असते. इतकी जागृति जोंवर जनतेंत झालेली नाहीं, तोंवर प्राप्त परिस्थितींतून मार्ग काढावयाचा तर साम-दाम-दंड-भेद अशा चतुर्विध साधनांनींच तो काढला पाहिजे."

वनवासी म्हणाला, " श्रीमंत! ही जुलमी बादशाही सत्ता समूळ नष्ट करण्यापेक्षां अन्य उपायच नाहीं असें जरी माझें मत आहे तरी एका अर्थी आपण म्हणतां तेंही कांहीं अंशीं खरें आहे. आमच्या मार्गानें जाण्याचा आमचा हक्क कायम राखून आम्ही आपणाला शक्य तेवढें साह्य करण्याला तयार आहों."

" बरें; त्या कवीच्या निवेदनांत आपणाला धर्मसिंह व त्याची बहीण यांच्या अज्ञातवासाची कहाणी कळली. त्या बाबतींत पुढें कोणती उपाययोजना करावयाची ? " मल्हारराव बांज्यांनीं प्रश्न केला.

" त्या बाबतींत योग्य ती उपाययोजना मी करीत आहेंच." वनवासी उत्तरला.

" मग कांहीं हरकत नाहीं." मल्हारराव उद्गारले, " एकूण तीं बहीण भावंडें स्वामींच्या परिचयाचीं आहेत असें दिसते."

" होय ! " वनवासी एक दीर्घ निःश्वास सोडून उत्तरला. तो थोडा वेळ तसाच स्तब्ध राहून पुन्हा म्हणाला, " श्रीमंत ! मीही आतां आपलें पाहून आपणाप्रमाणेंच आशावादी बनत चाललों आहे. नव्हे, मला आतां आशावादी बनणें प्राप्त झालें आहे. हेंच पहा ना, श्रीदाशरथी रामांनीं चौदा वर्षें वनवास भोगला व अखेर त्यांना त्यांच्या राज्यपदाची प्राप्ति झाली; याचें कारण ते आशावादी होते. पांडवांनीं वनवास भोगून अज्ञातवासही भोगला, करूं नये तीं हलकींसलकीं भृत्यकर्में केलीं, द्रौपदीदेवी ही विशाल भारतीय साम्राज्याची महाराज्ञी असतांही ती अनुकूल काल प्राप्त होईतों कीचकासारख्या नराधमाची दासी होऊन शांतपणानें दिवस कंठीत राहिली, म्हणूनच तिचें महाराज्ञीपद तिला पुन्हा मिळालें. आपण आशावादी आहां व आम्ही देवदूतही आशावादी आहों. मात्र प्रयत्नांची दिशा आपली वेगळी आहे व आमची वेगळी आहे."

वनवासी त्रिभुवनेश्वराच्या देवालयांतील त्या बहीण-भावंडांचें नांव निघतांच बिचकल्यासारखा कां होतो हें बाजिरावांना कांहीं केल्या कळेना. त्यांना क्षणो-क्षणीं जबर संशय येऊं लागला कीं, त्या बहीण-भावंडांशीं वनवासीचा तर कांहीं संबंध नसेल ना ? तसें स्पष्ट विचारावें असेंही त्यांच्या मनांत आलें. पण स्पष्ट-पणें तसें विचारण्याचें धाडस त्यांना होईना. तरीही त्यांनीं आडपडद्याच्या भाषेनें तो प्रश्न पुन्हा काढला, " कालिदासानें सांगितलेली बातमी जर खरी असेल, धर्मसिंह जर आपल्या बहिणीसह खरोखरच अज्ञातवासी बनून त्रिभुवनेश्वराच्या

मंदिरांत वास्तव्य करीत असेल,तर त्या दोघांचेंही रक्षण होईल अशी खटपट करणें हें आमचें काम आहे. कारण, मारवाडच्या राजघराण्याशीं आमच्या घराण्याचा फार दिवसांचा ऋणानुबंध आहे. आमच्या तीर्थरूपांनीं दिल्लीच्या दरबारांतून स्वराज्याच्या सनदा संपादन करण्याचें व राजस्त्रियांची मुक्तता करण्याचें कार्य ज्या थोर पुरुषांच्या धीरावर पार पाडलें त्यांत धर्मसिंह, विक्रमसिंह व मारवाडची राजकन्या इंद्रकुमारी हीं तिघेंजणें प्रमुख होतीं.* त्याच बहीण-भावंडांच्या वांट्याला अशी दशा आली असतां आम्ही त्यांच्या साह्यार्थ जिवाभावाच्या मोबदल्यांत झटणें अवश्य आहे. आणखीही एक महत्त्वाची कामगिरी त्या बहीणभावंडांच्या भेटींत पार पडण्याजोगी आहे."

"ती कोणती ?" वनवासीनें उत्सुकतेनें विचारलें.

"विक्रमसिंहाचा तपास त्यांच्यामार्फत लागला तर आम्हांला हवा आहे."

"कशाला ?"

"सध्यांच्या आणीबाणीच्या प्रसंगीं त्याचा आम्हांला फार उपयोग होईल. आमच्या तीर्थरूपांनीं स्वराज्याच्या सनदा दिल्लीदरबारांत संपादन केल्या, त्या कामीं विक्रमसिंगांनीं गनिमी काव्याची शिकस्त केली. त्यांनीं अल्ला हजरत बनून बादशाही दरबारचे सारे अनिष्ट व्यूह ढांसळून पाडले, म्हणूनच तें काम साधलें. आपण त्या विक्रमसिंहाला ओळखतां का ?"

"होय."

"त्याला पूर्वी बादशाही हुकुमावरून प्राणदंडाची शिक्षा झाली होती; पण तो त्या शिक्षेंतून बचावला असें आम्हाला कळलें आहे. मात्र त्याचा पत्ता आम्हांला माहीत नाहीं. तेव्हां कदाचित् राणी इंद्रकुमारीला व धर्मसिंहाला पत्ता माहीत असण्याचा संभव आहे."

"विक्रमसिंहाच्या भेटीची व साह्याची आपणाला खरोखरच इतकी आवश्यकता आहे का ?"

"होय."

"त्याच्यावर आपला इतका अढळ विश्वास आहे ?"

"हें काय विचारावयाला हवें ?"

---

* 'पेशवाईचा ध्रुव ढळला !' ही पेशवाईमालेंतील चौथी कादंबरी पहा.

" पहा ! श्रीमंत ? आपण बादशाही सत्तेचा तोंडदेखला तरी मुलाहिजा राखणारीं माणसें, व विक्रमसिंह हा बोलून चालून बादशाही सत्तेचा हाडवैरी ! आपण अशा कट्ट्या शत्रूशीं संबंध ठेवल्याचें आपल्या शाहूमहाराजांना कळलें तर ते आपणांवर नाराज होतील ! याचा आपण प्रथम विचार करा, व मग विक्रम-सिंहाशीं मैत्री जोडण्याची इच्छा करा."

" आम्हीं सर्व विचार केला आहे."

" विक्रमसिंहाच्या ज्वलज्जहाल वृत्तीशीं आपण कितपत जुळतें घेऊं शकाल याची मला शंका आहे."

" त्याचें साह्य आम्हांला मिळत असेल तर त्याच्या बरोबरीनें आम्ही धडाडी दाखवूं शकूं; व दोघेही खांद्याला खांदा भिडवून हिंदुपदपादशाहीसाठीं सारी सृष्टि उलथीपालथी करूं."

" ठीक आहे. लौकरच आपणाला विक्रमसिंहाची भेट होईल अशी तजवीज करण्यांत येईल. तूर्त आपण एवढें तरी करा; जसे सामोपचाराचे चार शब्द मला सांगितले, तसेच ते उज्जयनीला एकत्र जमलेल्या नंदीबैलांना सांगून पहा. त्यांच्या मनावर त्या उपदेशाचा कांहीं परिणाम झाला तर सोन्यापेक्षां पिवळें झालें."

" मला वाटतें, स्वामिजी ! आमच्याबरोबर आपणही असल्यास बरे. आपली ओजस्वी वैराग्यशील वाणी अशा वेळीं जितकी प्रभावी होईल, तितकी आमची होणार नाहीं."

" मला यावयाला कांहीं हरकत नाहीं; पण धर्मसिंह व राणी इंद्रकुमारी यांच्यावरील संकटाची जाणीव आपणाला आहेच. बुधसिंग व सज्जनसिंग यांचाही ज्या अर्थीं पत्ता नाहीं, त्या अर्थीं त्यांचेंही जीवित धोक्यांत आहे हें उघड आहे. सुदैवानें धर्मसिंग व इंद्रकुमारी यांचा तपास आपणाला साधारणतः लागला आहेच; व बुधसिंग आणि सज्जनसिंग हे कोणत्या गिरिगव्हरांत लपून बसलेले असण्याचा संभव आहे याविषयींही मला व माझ्या देवदूतांना बराच नक्की अंदाज आहे. असल्या निबिड अरण्यांत आपण अथवा आपले लोकही त्या मंडळीचा तपास लावूं शकणार नाहींत. बरें; कालव्यय करावा तर शत्रूचे सैनिक गिधाडांसारखे त्या मंडळीच्या वासावर घिरट्या घालीत आहेत. यास्तव मला प्रथम त्या मंडळीच्या रक्षणाकडे लक्ष दिलें पाहिजे."

मल्हारराव बांडे म्हणाले, " स्वामिजींचें म्हणणें अगदीं बरोबर आहे. त्यांनीं शिरावर घेतलेली कामगिरी इतरांकडून पार पडणें मुळींच शक्य नाहीं. मात्र आम्हांला उज्जयनीला जावयाचें तर कडेकोट तयारीनें व गुपचूप गेलें पाहिजे. आणखी असें कीं, आतां एकदां पुढें पाऊल पडल्यावर पुन्हा माघारें घ्यावयाचें नाहीं. शिंदे-होळकरांचीं पत्रांवर पत्रें येत आहेत, त्यांवरून आम्हीं आमचें सारें सामर्थ्य एकवटून वेळींच निजामावर ओतणें अवश्य आहे. वर्मी घाव घातला तर तो शंभर घावांचा वचपा एकट्यानें भरून काढतो. मी तर म्हणतों कीं, अनुराघ-सिंग वगैरे सर्व रजपूत राजे कोणत्या ना कोणत्या निमित्तानें उज्जयनींत एकत्र जमले आहेत हें फार चांगलें आहे. त्यांना आपण इकडच्या इकडेच अडकवून ठेवूं शकलों, निजामाच्या सैन्याशीं होतां होईतों त्यांची गांठ पडूं न देतां निजामाचा कोंडमारा केला, तर निजाम लौकर घाईला येईल. यास्तव निदान श्रीमंतांनीं तरी इकडे वेळ काढीत न राहतां, थेट भोपाळ-सिरोंज्याच्या बाजूला शक्य तितके लौकर निघून जावें."

" पण आम्हांला एकवार उज्जयनीला तर गेलेंच पाहिजे. कारण एरव्हीं आम्ही जयसिंगजींचा शब्द मोडल्यासारखा होईल." बाजीराव म्हणाले.

" तर मग असें करावें, आपण उज्जयनीला जाऊन भोपाळ–सिरोंज्याकडे येईपावेतों आम्ही–मी व सटवोजी असे दोघे पुढें रवाना होतों, व शिंदे होळकरांना भेटून तिकडील रणसंग्रामाची सिद्धता करतों. कारण उज्जयनीला आपल्या मनाजोगी तडजोड होऊं शकेल असा मुळींच भरंवसा नाहीं. कदाचित् आपणाला इकडे तडजोडीच्या गोड गोड थापांत गुंगवून ठेवावयाचें व तिकडे स्वतःची सारी सिद्धता करून शिंदे होळकर एकीकडे तर आपण दुसरीकडे अशी मराठ्यांची घडी विस्कळित करून ऐन वेळीं रणशिंग फुंकावयाचें, असाही निजामाचा बेत असण्याचा संभव आहे." मल्हाररावांनीं वनवासीकडे वळून म्हटलें, " आपलें मत काय ? "

" माझें मत मीं इतका वेळ प्रगट केलेंच आहे. आतां, श्रीमंत म्हणतात त्या अर्थी त्यांच्या शब्दाला मान्यता देणें हें माझें कर्तव्य आहे. बाकी, तुमच्याप्रमाणेंच माझाही ह्या तडजोडीच्या वाटाघाटींवर लेशमात्र विश्वास नाहीं. यास्तव इकडे श्रीमंतांचे तडजोडीचे प्रयत्न चालूंद्यातच; पण तुम्हीं आम्हीं अविलंबानें पुढील कामगिरीला लागलें पाहिजे."

"मग मला सांगा, आपली व आमची भेट आतां यानंतर कुठें व्हावयाची?"

बाजीराव म्हणाले, "आमचें असें मत आहे कीं, स्वामिजी! आपण आम्हांला गणेशतीर्थावर* आजपासून चार दिवसांनंतर पहांटेला भेटावें. तोंपर्यंत आम्ही मार्गांतील आमची कामगिरी आटोपून तेथें वस्तीला जातों, व मल्हाररावही सटवोजीला घेऊन तेथें येतील. मात्र सर्वांनीं एक गोष्ट ध्यानीं ठेवावयाची कीं, गणेशतीर्थावर आमचा मुक्काम पेशवे या नांवानें असेल अथवा प्रसंगोपात्त सेनापति दाभाडे या नांवानेंही असेल."

"समजलों! वनवासी स्मितहास्यपूर्वक म्हणाला, "त्या मूर्ख कवीच्या दृष्टीनें आपण सेनापति दाभाडे आहां, हें आम्हां सर्वांना अवश्य ध्यानीं ठेवलें पाहिजे."

"तेव्हां तेथें आपण सर्वजण एकवार एकत्र जमलों म्हणजे तोंवर उज्जयनीच्या बैठकींत काय निष्पन्न होण्याचा संभव आहे याचाही अंदाज आम्हांला लागेल व पुढील धोरण ठरवितां येईल. उज्जयनीची बैठक हें निव्वळ थोतांड आहे अशी आमची तोंवर खातरजमा झाल्यास—"

वनवासी मध्येंच उद्गारला, "आपणाला अजून ती शंका आहे; पण माझी तर खात्री आहे कीं-पण मी आतांच अशुभ कशाला बोलूं? आपण आमची भेट होईतों तेथून उज्जयनीला नक्की जात नाहीं ना?"

"नाहीं."

---

* गणेशतीर्थ हें माळव्यांतील अनेक प्राचीन प्रसिद्ध तीर्थोंपैकीं एक आहे. उज्जयनीहून भैरवगडाकडे जातांना मार्गांत क्षिप्रा नदीच्या पुलाच्या अलीकडे पूर्वेच्या बाजूला सुमारें अर्ध्या कोसाच्या अंतरावर हें आहे. हें स्थान क्षिप्रेच्या कांठींच आहे. वस्तुतः भैरवगड, पूल व गणेशतीर्थ हीं एकाच क्षिप्रा नदीवर आहेत. पण नदीच्या वक्रगतीमुळें रस्ते असे कांहीं चमत्कारिक भागांतून गेले आहेत कीं, हीं ठिकाणें एकाच नदीवर असतील असें पहाणाराला सकृद्दर्शनीं तरी वाटत नाहीं. गणेशतीर्थावर गजाननाचें देवस्थान आहे. त्या देवाच्या नांवावरूनच तीर्थालाही तें नांव मिळालें असावें. या ठिकाणींही क्षिप्रेला घाट बांधलेला आहे. ह्या घाटावर बसलें असतां सभोंवारची व समोरची अपूर्व सृष्टिशोभा दिसते.

"झालें तर. आपणां सर्वांची पुन्हा भेट झाल्यावर मग आपण उज्जयनीला जावयाचें कीं थेट भोपाळ-सिरोंज्याकडे मोर्चा वळवावयाचा, त्याप्रमाणेंच उज्ज-यनीला जावयाचें झालें तर तहाची वाटाघाट करण्यासाठीं जावयाचें कीं रणशिंग फुंकून उज्जयनीवर स्वारीच करावयाची हें परिस्थित्यनुसार ठरवितां येईल. तें पुढचें पुढें पाहूं; तूर्त ठरला हा बेत कायम."

याप्रमाणें आणखी थोडी भवति न भवति होऊन पुढील बेत मुक्रर झाले, व त्याच दिवशीं बाजीराव आणि वनवासी हे आपापल्या कामगिरीवर निघून गेले. मल्हारराव बांडे मात्र सटवोजीची वाट पहात तेथेंच थांबले होते.

## प्रकरण अकरावें

# हा फितूर कोण ?

तो दिवस गेला, दुसरा दिवस उजाडला, तरी सटवोजीचा पत्ता नाहीं. मात्र दुसऱ्या दिवशीं सूर्योदयाच्या सुमाराला एकलिंगजी या नांवाचा वनवासीचा उजवा हात शोभणारा अत्यंत विश्वासू व मल्हारराव, सटवोजी, बाजीराव वगैरे सर्व मंडळीला पूर्ण परिचित झालेला देवदूत घाईघाईनें त्या गुप्त स्थळीं येऊन पोंचला व मल्हाररावांना म्हणाला, "सज्जनसिंगाचें वास्तव्य§ पाताळकुंडाजवळच्या एका गुहेंत असून शत्रूला त्याचा पत्ता कळल्यामुळें शत्रूचे पंचवीस सैनिक त्याच्या टेहळणीवर आहेत. श्रीमंतांनाच ही खबर प्रथम मिळाली, व त्यांनीं तुम्हांला सज्जनसिंगाच्या साह्याला जावयाला सांगितलें आहे."

ती बाजिरावांची आज्ञा, अर्थात् ती अविलंबानें मान्य करणें हें मल्हाररावांचें कर्तव्य होतें, व तें कर्तव्य बजावण्याला ते एका पायावर तयार होते. बरें; एकलिंगजीसारखा विश्वासू देवदूत बातमी घेऊन आला त्या अर्थीं बातमीच्या खरेखोटेपणाविषयींही शंका घेण्याचें काहीं कारण नव्हतें. प्रश्न एवढाच होता कीं, पाताळकुंड ही विंध्याद्रीच्या दरीखोऱ्यांतील अत्यंत अवघड जागांपैकीं एक जागा असून शिवाय ती मल्हाररावांना अज्ञात होती. पण एकलिंगजीनें आपला एक माहीतगार देवदूत बरोबर देण्याचें कबूल केल्यामुळें तो प्रश्नही आपोआप सुटला.

सटवोजी आल्यास त्याला थांबावयाला सांगून मल्हारराव तसेंच एका सेवकराम या नांवाच्या माहीतगार देवदूतासह बरोबर पंचवीस निवडक लोक घेऊन बाहेर पडले. एकलिंगजीही त्यांच्याबरोबरच बाहेर पडला खरा; पण तो दुसऱ्या

---

§ खांडव्याहून इंदुराकडे जातांना मोरटक्का स्टेशन व महू स्टेशन यांच्यामध्यें पाताळकुंड या नांवाचें स्टेशन आहे. हें स्टेशन अर्थात् अलीकडचें आहे. एका बाजूला गगनचुंबित डोंगरांचे कडे तर दुसऱ्या बाजूला माडभर खोलीच्या दऱ्या, जिकडे तिकडे वनश्रीचें वैभव इतस्ततः विखुरलेलें, अशी पाताळकुंडाच्या आसमंतांतील शोभा अपूर्व आहे. अलीकडे आगगाडीच्या सोईमुळें तेथें जाणें सुकर झालें असलें, तरी कथानककालीं तें अपरिचितांना तरी बरेंच दुष्कर होतें.

मार्गानें आपल्या अपेक्षित ठिकाणाकडे निघून गेला. चांगला माहितगार देवदूत वाट दाखविण्यासाठीं बरोबर असल्याकारणानें मल्हारराव व त्याच्याबरोबरचे सैनिक काळोख पडतो न पडतो एवढ्या सुमाराला पाताळकुंड येथील एका सराईत जाऊन पोंचले. उजाडतांच सज्जनसिंगाचें निवासस्थान शोधावयाचें असा त्यांचा बेत ठरत आहे तोंच एक तरुण रजपूत अचानक तेथें येऊन पोंचला.

"मी सज्जनसिंगजींकडून आलों आहें. आपण आम्हांलाच साह्य करण्यासाठीं आलां असें कळल्यावरून मी आपणाकडे आलों आहें." तो तरुण रजपूत मल्हारराव बांच्यांना म्हणाला.

"आम्ही सज्जनसिंगांना साह्य करण्यासाठींच आलों असें तुम्हांला कोणीं सांगितलें ?" मल्हाररावांनीं चौकसपणानें प्रश्न केला.

"आपणांला माझ्या सचोटीविषयीं परीक्षा पहावयाची आहे काय ? स्वतः सज्जनसिंगजींनीं सांगितल्यावरून मींच आपल्या श्रीमंत पेशव्यांना विनंतिपत्र पाठवून साह्याची याचना केली, व त्यांनीं ताबडतोब आम्हांला साह्य करण्याचें कबूल करून एकलिंगजी नांवाच्या एका तरुणाबरोबर आपणांकडे निरोप पाठविला होता. माझ्या सचोटीविषयीं आपणांला आतां तरी खात्री पटते का ?"

मल्हाररावांबरोबर वाट दाखविण्यासाठीं आलेला सेवकराम त्या तरुणाच्या चर्येकडे एकसारखी टक लावून पहात होता. मल्हाररावांच्या साध्या प्रश्नावरून सुतानें स्वर्गाला जाऊन आपल्या खरेपणाची शाबिती करण्यासाठीं झटणाऱ्या त्या तरुणाचा सेवकरामाला थोडा संशय आला. पण एकलिंगजींच्या आज्ञेप्रमाणें त्याचें काम मल्हाररावांना फक्त पाताळकुंडापर्यंत मार्ग दाखविण्याचें होतें, व तें त्यानें पार पाडलें होतें. नेमून दिलेल्या कामाव्यतिरिक्त इतर कामांत ढवळाढवळ न करण्याची देवदूतसंघाची सार्वत्रिक शिस्त त्याच्या अंगीं पूर्णपणें बाणली असल्यानें तो कांहीं कमीजास्त बोलला नाहीं.

"सज्जनसिंगजींचें मकाण एथून किती दूर आहे ?" मल्हाररावांनीं विचारलें.

"जवळच एका घटकेच्या मार्गावर पाताळखिंडीच्या पलीकडे आहे. मात्र मार्ग थोडा अडचणीचा आहे; पण आपण आतांच्या आतां सज्जनसिंगजींची भेट घेतली तरच एथवर येण्याचे श्रम आपणाला पडले त्याचें सार्थक होणार आहे. प्रसंग मोठा आणीबाणीचा आहे." तो तरुण उद्गारला.

"तर मग चला. हा मी तुमच्याबरोबर येतों." असें म्हणून मल्हारराव त्या

तरुणाबरोबर निघाले. त्यांनीं विचारलें, " माझे सैनिक माझ्याबरोबरच असलेले बरे. तुम्हांला कसें वाटतें ? "

तो तरुण सेवकरामाच्या तोंडाकडे पहात क्षणभर विचार करून उत्तरला, " अर्थात् ! जितके विश्वासू सैनिक आपल्याबरोबर असतील तितके पाहिजे आहेत. शत्रूचे लोक आमच्या पाठीवर आहेत. ते आमचा पाठलाग करीत आलेच तर त्यांना खिंडीच्या तोंडाशीं अडवून धरण्याच्या कामीं आपल्या लोकांचा फार उपयोग होणार आहे."

यावर 'बरें आहे' असें म्हणून मल्हारराव आपल्या लोकांसह त्या तरुणाबरोबर मार्गाला लागले. रात्र काळोखी असल्यानें त्या लोकांनीं आपल्याबरोबर आणलेले पलिते पाजळून हातीं घेतले सोबतीसाठीं बरोबर आलेला देवदूत मात्र तेथेंच मल्हाररावांचा निरोप घेऊन माघारा गेला.

ती सर्व मंडळी त्या पहाडांतून एका बाजूला गगनचुंबित डोंगरकडे तर दुसऱ्या बाजूला डोळ्यांना अंधारी आणणाऱ्या अक्राळविक्राळ उघड्या जबड्यांच्या दऱ्या यांमधून जाणाऱ्या अवघड वाटेनें खिंडीपाशीं येऊन पोंचली. तेथें येतांच त्या तरुणानें मल्हाररावांना म्हटलें, " आपले लोक या खिंडीच्या तोंडाशीं पहाऱ्यावर असूं द्या. आपण मात्र माझ्याबरोबर पुढें चला."

त्या काळ्याकभिन्न रात्रीं त्या परक्या तरुणाबरोबर एकट्यानें खिंडींतून जातांना मल्हाररावांना जरा संकोच वाटला. ते स्तब्ध राहिले. तो तरुण त्यांचा आशय ओळखून म्हणाला, " तुम्हांला शंका येण्याचें कारण नाहीं. तुम्ही सज्जनसिंगांना प्रत्यक्ष ओळखीत नसलां तरी देवदूतसंघाचे प्रवर्तक वनवासी यांना तर ओळखतां ना ? त्यांच्या देवदूतांपैकींच मीही एक आहें."

" याला प्रमाण ? "

" याला प्रमाण ? हें पहा ! " असें म्हणून त्या तरुणानें आपल्या कंठांतील स्वस्तिक चिन्ह काढून मल्हाररावांना दाखवून म्हटलें, " आतां तरी आपली खात्री झाली ना ? "

" हो ! आतां खात्री झाली. चला; आपण प्रथम सज्जनसिंगजींची भेट घेऊं." मल्हारराव एक पलिता हातीं घेऊन त्या तरुणाबरोबर खिंडींत घोडा घालतां घालतां आपल्या लोकांना म्हणाले, " मी माघारा येईतों तुम्ही सर्व एथेंच सावधगिरीनें उभे रहा, व शत्रूचें सैन्य खिंडींत घुसूं लागल्यास त्याला प्रतिबंध करा."

ॐ ॐ ॐ

एक घटका झाली, दोन घटका झाल्या, मध्यरात्र झाली, पहांट झाली, झुंजुमुंजू दिसूं लागलें तरी मल्हारराव कांहीं माघारे आले नाहींत. त्यांचे सैनिक त्यांची वाट पाहून पाहून थकले. एथें कांहीं दगाफटका तर नसेल ना, अशी हुरहूर त्या सर्वांच्या जिवाला लागून राहिली. आतां काय करावें याविषयीं त्यांचें आपसांत खलबत सुरू आहे, तोंच खिंडींतून कोणीतरी घोडा दौडीत येत असल्याची चाहूल लागली. त्याबरोबर सर्व सैनिक मोठया आशेनें तिकडे पाहूं लागले व 'मल्हारराव आले' असें आपसांत कुजबुजूं लागले. पण ते मल्हारराव नसून तो एक अगदीं अपरिचित असा मुसलमानी पेहरावाचा तरुण घोडेस्वार होता. शिपायांनीं त्या तरुणाला तेथल्या तेथें अडविलें. पण तो स्वार जरादेखील न डगमगतां त्या शिपायांना म्हणाला, "तुम्ही मल्हारराव बाब्यांचे लोक ना ?"

"होय. पण तुम्ही कोण ?" एका सैनिकानें विचारलें.

तो स्वार उत्तरला, "तुम्ही ज्याच्या रक्षणासाठीं एथवर आलां, तो सज्जनसिंग मी !"

"आणि मल्हारराव कुठें आहेत ?" त्या सैनिकानें प्रश्न केला.

"मल्हारराव शत्रूच्या हातीं कैद झाले असून त्यांना आतां भैरवगडावर कैदेंत डांबून ठेवण्यासाठीं नेण्यांत यावयाचें आहे. माझी व त्यांची भेट कांहीं झाली नाहीं."

"असें कसें ? आपल्या माणसानें तर त्यांना बोलावून नेलें !"

"छे ! माझा कोणीही मनुष्य त्यांना नेण्यासाठीं आलेला नाहीं. तो शत्रूचा कोणी तरी हेर असला पाहिजे."

ती वेळ विचार करीत बसण्याची नव्हतीच. सज्जनसिंग त्या सैनिकांना घेऊन मल्हाररावांच्या शोधावर निघाला. सर्वजण वाऱ्याच्या वेगानें धांवत होते. पण त्यांचा संशय त्यांच्याही पुढें धांवत होता. हा अनर्थ घडवून आणणारा फितूर कोण ? एकलिंगजी फितूर ? तो तरुण फितूर ? तो बरोबर आलेला देवदूत फितूर ?"

प्रकरण बारावें

## चंद्रशेखराच्या वाड्यांत

बादशाही फर्मानानुसार माळव्याचा सुभा निजामाच्या अंमलांत आल्यापासून निजामानें आपल्या अंमलबजावणीसाठीं दडपशाहीचा वणवा जो उभ्या माळव्यांत पेटविला होता, त्याची झळ हळुहळू मांडवगडालाही नुक्तीच पोंचूं लागली होती. नर्मदेवरील उतार आपल्या फौजेला मोकळे मिळावे अशाबद्दल नासिरजंगानें दक्षिणेंतून मंडलोईशीं वाटाघाट चालविली होती; त्या वाटाघाटींचा प्रारंभ जरी सामोपचारांनीं झाला होता, तरी शेवटीं त्या वाटाघाटीला वादाचें स्वरूप येणार हें उघड होतें. कारण कीं, दक्षिणेंतून माळव्यांत येतांना मांडवगड* हा मार्गावरचा नाकेबंदीचा मजबूत किल्ला होता. अर्थात् तें माळव्याचें नाक होतें. तें नाक ज्यानें हातीं धरावें त्यानें उभा माळवा वांकवावा. तें नाक शत्रूच्या स्वाधीन करण्याला मंडलोई मुळींच तयार नव्हते, व त्यांनीं नासिरजंगाला तसें स्पष्टपणें कळविलें होतें. पण त्या नकारानें नासिरजंग स्वस्थ बसेल अशी मात्र मंडलोईंची मुळींच कल्पना नव्हती. तो बळजबरीनें नर्मदेचे उतार आपल्या ताब्यांत घेऊन मांडवगड बळकावण्याचा प्रयत्न करील, तेवढ्यासाठीं दुसऱ्या बाजूनें निजामही शह देण्याला कमी करणार नाहीं, हें हेरून तसा प्रसंग आलाच तर आरंभिलेल्या मंगल कार्यांत विघ्न येऊं नये म्हणून मंडलोईंनीं बालकर्णाचा विवाहसमारंभ ओंकारेश्वरीं वधूगृहींच करण्याचें ठरवून तसें चंद्रशेखराला सुचविण्यासाठीं आपला उपाध्याय श्यामलाल याला ओंकारेश्वरीं चंद्रशेखराकडे पाठविलें होतें. श्यामलाल चंद्रशेखराच्या वाड्यांत येऊन पोंचला, तेव्हां चंद्रशेखर भागाबाईच्या विवाहासाठीं निघण्याची तयारी करण्यांत गढून गेला होता. श्यामलालनें मंडलोईंचा बदललेला बेत चंद्रशेखराला निवेदन केला- प्रथमपासूनच चंद्रशेखराची इच्छा आपल्या एकुलत्या एका कन्येचा विवाहसमारंभ आपल्या घरीं थाटानें व्हावा अशीच होती. चंद्रशेखरापेक्षांही त्याची वृद्ध माता मणिकर्णिका हिचा आग्रह आपल्या घरींच नातीचा विवाह व्हावा असा होता.

---

*माळव्यांत धारच्या नैर्ऋत्य दिशेला नर्मदेच्या उत्तर तीरीं मांडवगड या नांवाचा फार जुनाट, अत्यंत मजबूत व इतिहासप्रसिद्ध असा किल्ला आहे.

म्हातारी वृद्धापकाळामुळें अगदीं गलितगात्र होऊन अंथरुणाला खिळलेली होती; व आपल्या लाडक्या नातीचा विवाहसमारंभ आपल्या डोळ्यां-देखत होऊन वधूवरांच्या मस्तकांवर मंगलाक्षता टाकतां याव्या अशी तिची अनावर इच्छा ! म्हणून चंद्रशेखर हा विवाह जमविण्यासाठीं प्रथम मंड-लोईकडे गेला तेव्हांच विवाहसमारंभ ओंकारेश्वरीं आपल्या वाड्यांत व्हावा असें त्यानें सुचविलें होतें. पण मंडलोईंना कांहीं तें मानवेना. त्यांनीं आग्रह धरला कीं, विवाहसमारंभ मांडवगडावरच झाला पाहिजे. अखेर आपला वधूपक्ष म्हणून चंद्रशेखराला वरपक्षाची ती अट मान्य करणें भाग पडलें. त्यामुळें आतां मंड-लोईंचा बदललेला बेत कळतांच म्हातारीला व चंद्रशेखरालाही संतोष वाटला.

आंत माडीवरील दिवाणखान्यांत चंद्रशेखर व श्यामलाल यांच्या गोष्टी चालल्या होत्या, तेव्हां भागाबाई त्या दिवाणखान्याला लागून असलेल्या सज्जांत उभी होती. विनयभंगाचा आरोप आपणावर भावी सासरच्या उपाध्यायाकडून येऊ नये म्हणून तेवढ्यापुरती ती 'पंचक्रोशी'चा देखावा पाहण्याचें मिष करून उभी होती इतकेंच. भागाबाई उपवर होती, विवाह व संसार म्हणजे काय हें तिला चांगलें कळत होतें; अशा उपवर मुलींना स्वतःविषयींच्या विवाहकथा चोरून ऐकणें प्रिय वाटणारच. तशांत बालकर्ण व भागाबाई यांचा हा जो विवाह व्हावयाचा होता, तो प्रीतिविवाह होता. कोणत्या ना कोणत्या समारंभाच्या निमित्तानें मंडलोईंची मंडळी व चंद्रशेखराची मंडळी वारंवार एकत्र येई, अशा निमि-त्तानें त्या वधूवरांची प्रथम ओळख झाली,हळुहळू त्या ओळखीचें मैत्रींत रूपांतर झालें, उभयतांच्या वडील माणसांना हा प्रकार कळला, व शेवटीं उभयतां घराण्यांना हा संबंध जुळवून आणावा लागला. असा विवाहसंबंध जुळवून आणावा लागला असें म्हणण्याचें कारण स्वाभाविकपणें हा संबंध जुळून येण्याला एक मोठी अडचण अशी होती कीं, राजा गिरिधर व चंद्रशेखर यांचा कैक पिढ्यांपासूनचा ऋणानुबंध असून राजा गिरिधरबरोबरच चंद्रशेखर यानेंही दिल्लीच्या बादशहाची सेवा पत्करली होती. पुढें राजा गिरिधर माळव्याचा सुभेदार झाला तेव्हां तो चंद्रशेखराला आपल्या वाढत्या वैभवाचा भागीदार करण्याला विसरला नाहीं. आज चंद्रशेखर जवळ जवळ मंडलोईंच्या दर्जाचा वैभवशाली चौधरी शोभत होता, तें बव्हंशीं राजा गिरिधरच्या कृपेचें फळ होतें. पुढें राजा गिरिधर व त्याच्या वंशांतील पुरुष अन्यायानें वागूं लागले व मंडलोई त्या वंशाचे

प्रतिस्पर्धी झाले, तरी चंद्रशेखराला राजा गिरिधरचें वर्तन अन्यायाचें आहे असें मुळींच भासलें नाहीं व त्यानें त्याचा पक्ष सोडला नाहीं. गिरिधरचा पाडाव झाल्यावर चंद्रशेखरानें प्रसंग ओळखून बाह्यात्कारी मंडलोईशीं सलोखा केला खरा; पण अंतर्यामीं त्याला गिरिधरच्या नाशाबद्दल खेद होत होता व बादशाही सत्तेविषयीं ओढा वाटत होता. बाजीराव पेशव्यांच्या नेतृत्वाखालीं मराठ्यांनीं माळव्यांत आपला अंमल बसविला हें अन्यायाचें कृत्य केलें असेंच प्रारंभीं चंद्रशेखराचें मत होतें. तरीपण मराठ्यांच्या सत्तेचा जबरदस्त लोंढा माळव्यावर कोसळला, त्या लोंढ्यांतून पैलतीराला जाण्याइतकें सामर्थ्य चंद्रशेखराच्या मनगटांत नव्हतें. मी मी म्हणणारे अनेक ठाकूर चौधरीरूपी महावृक्ष त्या मराठी सत्तेच्या महापुरांत कडाडून मोडून वाहून गेले, तेथे आपला कांहीं पाड लागणार नाहीं हें ओळखून 'महापुरें झाडें जाती तेथें लव्हाळे वांचती' हा व्यावहारिक हितमंत्र स्वतःच्या चित्तीं ठसवून चंद्रशेखरानें नम्रपणानें मराठ्यांसमोर मान वांकविली होती. पण हा जुलुमाचा रामराम आहे हें मंडलोई आरंभापासून ओळखीत होते. म्हणून बालकर्ण व भागाबाई यांचें लग्न व्हावें असें प्रथम कोणीच इच्छीत नव्हता.

केवळ मंडलोईकडील मंडळीलाच चंद्रशेखराच्या वंशाशीं शरीरसंबंध व्हावयाला नको होता असें नसून चंद्रशेखरदेखील तशा संबंधाला उत्सुक नव्हता. परंतु बालकर्ण व भागाबाई यांचें एकमेकांवरील प्रेम जितकें निर्मल तितकेंच निःसीम होतें. वडील माणसें ही गोष्ट मनावर घेत नाहींत असें पाहून भागाबाईनें आपल्या आवडत्या आजीपाशीं—मणिकर्णिकेपाशीं—युक्तिप्रयुक्तीनें हा विषय काढला. म्हातारीनें चंद्रशेखराच्या कानांवर ही गोष्ट घातली तेव्हां चंद्रशेखराला ती प्रथम रुचली नाहीं. बापाच्या इच्छेविरुद्ध टेका धरण्याइतकी भागाबाई ही धीट नव्हती. पण ती दृढनिश्चयी मात्र होती. चंद्रशेखर ही गोष्ट मनावर घेत नाहीं असें पाहातांच तिनें आपल्या आजीपाशीं आपला आजन्म अविवाहित रहाण्याचा निश्चय बोलून दाखविला. म्हातारी ह्या निश्चयांतील मर्म जाणण्याइतकी धूर्त होती व तिची आज्ञा उल्लंघन करण्याइतकें अप्रस्तुत धैर्य चंद्रशेखराच्या ठायीं नव्हतें. म्हातारीनें आपल्या लाडक्या नातीच्या शाश्वत सुखाकडे लक्ष्य देऊन अखेर बालकर्णाशीं तिचें लग्न जमविण्याबद्दल चंद्रशेखराला गळ घातली, व चंद्रशेखरानेंही म्हातारीचा शब्द मानला. असो.

चंद्रशेखर व श्यामलाल यांचें संभाषण दिवाणखान्यांत चाललें होतें. त्याचा इष्ट समारोप झालेला भागाबाईच्या कानीं पडला तेव्हां तिचा जीव एकदांचा हायसा झाला. तिनें तेथूनच समोर दिसणाऱ्या ओंकारेश्वराला दोन्ही हात जोडून नेत्र मिटून प्रार्थना केली, "भगवान्! आमचा विवाह एकदांचा निर्विघ्नपणे पार पडो!"

भागाबाई प्रार्थना संपवून डोळे उघडून समोर पहाते, तों एक घोडेस्वार तिच्या वाड्याच्या अनुरोधानें आपला घोडा दौडीत येत असलेला तिनें पाहिला. हां हां म्हणतां तो घोडेस्वार भागाबाईला स्पष्टपणें दिसण्याइतका जवळ आला व आपला घोडा आवरून भागाबाईकडे पाहात उभा राहिला.

"हा तर भवानीराम!" भागाबाई त्या घोडेस्वाराला पाहून स्वतःशीं पुटपुटत घाईघाईनें दिवाणखान्याकडे वळली. भवानीरामाला ती आपला भाऊ मानी; तो भाऊ आज इतक्या वर्षांनीं आणि तो अशा आनंदाच्या वेळीं भेटतांच तिला आनंद कसा होणार नाहीं! ही आनंदाची वार्ता प्रथम चंद्रशेखराला कळविण्यासाठीं उतावळी होऊन ती दिवाणखान्याच्या दरवाजापर्यंत गेली. दिवाणखान्यांत श्यामलाल बोलत बसला आहे याचें तिला भानही नव्हतें. पण दरवाजांत समोरच श्यामलालला पाहून ती एकदम ओशाळी होऊन लाजून मागें सरली व भवानीरामाला प्रथम भेटण्यासाठीं अत्यंत उत्सुकतेनें खालीं गेली. खालीं जातांच तिनें आपल्या घरांतील सर्व बायकामाणसांना व दासदासींना ती आनंदाची वार्ता सांगितली. भागाबाई दरवाजांत जाऊन उभी राहिली तेव्हां तिच्या दासीही तिच्या मागोमाग गेल्याच. पण ज्या एकीनें भवानीरामाचें लहानपणीं अत्यंत कोडकौतुक करून जन्मदात्या आईप्रमाणें त्याची सेवाशुश्रूषा केली होती, व जिला भवानीराम निघून गेल्यापासून वारंवार चुकल्यासारखें होई, ती भागाबाईची दुग्धमाता म्हातारी लालन भवानीरामाला प्रथम भेटण्यासाठीं सर्व दासींच्या अग्रभागीं भागाबाईच्या अंगाला अंग भिडवून उभी राहिली.

थोड्याच वेळांत भवानीराम घोडा फेंकीत दरवाजांत आला. तो घोड्यावरून खालीं उतरतांच एका नोकरानें पुढें जाऊन त्याच्या घोड्याला धरून पागेंत नेलें, व भागाबाईनें पुढें होऊन त्याला हांक मारली, "दादा!"

"लालननें हांक मारली, "भवानी!"

भवानीरामानें त्या दोघींकडे एकवार पाहून खालीं मान घातली. विशेषतः

भागाबाईच्या दृष्टीला दृष्टि भिडविण्याचें तर त्याला मुळींच धैर्य होईना. तो गोंधळलेला पाहून भागाबाईनें पुन्हा हांक मारून विचारलें, "दादा! असें काय? तूं मला ओळखलें नाहींस का?"

लालननेंही भवानीरामाला भागाबाईच्या प्रश्नाला उत्तर देण्याची सवड न देतां विचारलें, "भवानी! तूं मला तरी ओळखलेंस का?"

"ओळखलें." भवानीराम उत्तरला.

"आणि भागाबाईला ओळखलें नाहींस? बरोबर आहे, ती आतां मोठी झाली. भवानी! भागाचें लग्न व्हावयाचें आहे; आणि तें इथेंच व्हायचें आज ठरलें आहे. पूर्वी तें मांडवगडावर व्हायचें होतें; पण पुन्हा नवऱ्यामुलाकडील मंडळीचा बेत फिरला. भवानी! इतक्या वर्षांत लालन जिवंत आहे कीं मेली, याची चौकशी करण्याचीदेखील इच्छा तुला झाली नाहीं, आणि बहिणीचें लग्न ठरल्याची बातमी कानांवर येतांच कसा पण धांवून आलास!"

"लालन! दादा दमून आला आहे; त्याला थोडा वेळ विसांवा तरी घेऊं देशील कीं नाहीं? तो कांहीं आजच माघारा निघाला नाहीं; मग सावकाशपणें गोष्टी बोलतां येतील. तो कांहीं माझ्या लग्नासाठीं मुद्दाम आला नसून तुलाच भेटायला आला आहे." भागाबाई भवानीरामाकडे वळून म्हणाली, "होय ना रे दादा! होय म्हण!" बोलतां बोलतां तिनें चार पावलें पुढें जाऊन भवानीरामाला पंचारती ओंवाळली कुंकुमाक्षता त्याच्या मस्तकाला लावून त्याची ओंवाळणी काढून टाकली.

कोणी मानसशास्त्रवेत्ता तेव्हां भागाबाई व भवानीराम ह्या दोघांच्या अंतःकरणांत उचंबळून येणाऱ्या ऊर्मींचें पृथक्करण करण्याचें मनावर घेता, तर त्या एकाच प्रसंगीं त्या दोघांच्या भावना किती परस्परविरोधी आहेत याचें प्रत्यंतर त्याला आलें असतें. भागाबाई मनापासून प्रेमानें भवानीरामाचा आदरसत्कार करीत होती. पण भवानीराम त्या वाड्यासमोर येतांना गच्चीवर उभी असलेल्या भागाबाईकडे पाहिल्यापासून क्षणोक्षणीं जास्त गोंधळत होता, याचें कारण निराळें होतें. भवानीरामाचा चंद्रशेखराच्या घराशीं व भागाबाईशीं कसा ऋणानुबंध होता हें वाचकांना माहीत झालेंच आहे. ज्या चंद्रशेखरानें आपलें प्रेमानें लालनपालन केलें, त्याच्या नाशावर उठतांना भवानीरामाला मनस्ताप झाला नव्हता असें नाहीं; पण त्या वाड्यासमोर येतांच त्याच्या मनस्तापाला खरा प्रारंभ झाला.

लहानपणीं त्या वाड्यांत भागाबाईबरोबर केलेल्या निर्मल भावाच्या क्रीडा त्याला त्या क्षणीं मूर्तिमंत आठवल्या, व आपण हें अधमपणाचें कृत्य आपल्या शिरावर घेतलें अशी बोंचणी त्याच्या अंतःकरणांत नव्यानें सुरू झाली. सदसद्विवेकबुद्धि त्याला बजावून सांगूं लागली, 'भवानीराम ! तूं हें काय आरंभिलें आहेस ? ज्यानें तुला आपला पुत्र मानून तुझें संकटाच्या वेळीं प्रेमानें लालनपालन केलें, त्याच्यावर संकटांचा डोंगर तूं आपल्या हातानें कोसळून पाडणार काय ? भागाबाईला तूं आपली पाठची बहीण मानलें होतेंस, तिच्या संसाराला व जन्माला चूड लावून तूं तिला यवनांच्या विलासमंदिरांतील विलासदासी बनवून सोडणार काय ?'

पण हा सदसद्विवेकबुद्धीचा सदुपदेश व्हावा तितका प्रभावी झाला नाहीं. अविवेकाच्या भरांत भवानीरामानें मंडलोईवर सूड घेण्याच्या अनावर इच्छेला बळी पडून पुन्हा मनाचा धडा केला, 'बस्स ! तें कांहीं नाहीं ! मला माझ्या हाडवैऱ्यांवर सूड घ्यावयाचा आहे; त्या सूडाच्या वणव्यांत आणखी कोणकोण जळून खाक होतात हें पाहाण्याचें काम माझें नाहीं. त्या सूडाबरोबरच मला माझा भाग्योदयही करून घ्यावयाचा आहे. एकदां अनुसरलेल्या मार्गांत मागें पाऊल घेणें हें नामर्दाचें काम आहे'. असा मनाचा धडा करून भवानीरामानें दरवाजाच्या आंत पाऊल टाकलें.

" चंद्रशेखर आंत आहेत का ? " भवानीरामानें प्रश्न केला.

" होय. बाबा आंत आहेत." भागाबाई उत्तरली.

" बरें; आज सकाळपासून कोणी एखादा तरुण चंद्रशेखरांना भेटावयाला किंवा माझा तपास करण्यासाठीं आला होता काय ? " भवानीरामानें पुन्हा विचारलें.

" नाहीं." भागाबाई उत्तरली.

" बरें; चंद्रशेखरांना कळव कीं, दिल्लीच्या शहाजाद्याच्या वतीनें भवानीराम तुम्हांला भेटण्यासाठीं आला आहे." भवानीराम उद्गारला.

" बाबा मग भेटतील. तूं श्रमून आला आहेस, तो थोडा वेळ विश्रांति तरी घेशील कीं नाहीं ? " भागाबाई म्हणाली.

" आधीं काम; मग विश्रांति." भवानीराम उत्तरला.

" इतकें कसलें महत्त्वाचें काम आहे तरी ? " भागाबाईनें विचारलें.

"तें तुझ्यापाशीं सांगण्याजोगें नाहीं." भवानीरामानें उत्तर दिलें.

भागाबाईनेंही एकंदर रागरंग ओळखून भवानीरामाशीं जास्त बोलण्याचा आग्रह धरिला नाहीं. तो मनमोकळेपणानें बोलेना असें पाहून तिला वाईट वाटलें खरें; पण तरीही तिच्या अंतःकरणांत त्याच्याविषयीं बंधुभावाचा जो ओलावा होता तो कायम होता. दिल्लीच्या शहाजाद्याकडून भवानीराम आला असें कळतांच शहाजाद्याच्या पदरीं भवानीरामाला आश्रय आहे एवढें अंदाजून तिनें एक परीनें समाधानच मानलें.

भवानीराम आंत गेला तोही परक्याप्रमाणें शिष्टाचाराचीं बंधनें राखीत गेला. परक्या माणसानें एकाद्याच्या घरांत एकदम घुसणें शिष्टाचाराला धरून नसलें तरी घरच्या माणसानें परवानगीची वाट पहात खोळंबून रहाणें शोभत नाहीं. भवानीराम हा तेथें घरचा मनुष्य होता. त्याला चंद्रशेखराच्या परवानगी-साठीं खोळंबून रहाण्याचें कांहीं कारण नव्हतें. असें असतांही भवानीराम थेट आंत गेला नाहीं, त्यानें प्रथम एका सेवकाहातीं आपण आल्याचा निरोप चंद्रशेखराकडे पाठविला; याचें कारण भवानीराम आज घरचा मनुष्य म्हणून तेथें आला नव्हता, परका म्हणून व तोही शत्रुपक्षाचा मनुष्य म्हणून आला होता. ती त्याची नवी हिडिस भूमिका त्याला मनांतल्या मनांत लाजवीत होती. चंद्रशेखराच्या मनांत मात्र असें कांहींच काळेंबेरें नसल्यानें भवानीराम आल्याची वर्दी मिळतांच तो आनंदित चित्तानें दिवाणखान्यांतून उठून बाहेर आला व त्यानें भवानीरामाला प्रेमानें मिठी मारून भेटून त्याला दिवाणखान्यांत आणलें. दिवाणखान्यांत श्यामलाल बसलेला होताच. त्याला पाहून भवानीराम अंमळ बिचकला. चंद्रशेखरानें त्या दोघांची ओळख करून दिली, त्या निमित्तानें भवानीरामाची इतक्या वर्षांची हालहवाल त्यानें विचारून घेतली, तेव्हांही भवानी-रामानें हातचें राखून सावधपणानें उत्तरें दिलीं.

श्यामलालला तांतडीनें मांडवगडावर जावयाचें होतें. तो चंद्रशेखराचा निरोप घेऊन निघाला. तरीही भवानीराम दिवाणखान्यांतच बसलेला होता. चंद्रशेखर श्यामलालला पोंचवून माघारा येतांच पुन्हा मनमोकळेपणानें भवानीरामाशीं कांहीं बोलणार तोंच भवानीरामानें आपल्या अंगरख्याच्या खिशांतून एक मोहरबंद लिफाफा काढून त्याच्या हातीं देत म्हटलं, "ठाकूरजी! मी उज्जयनीहून शहाजाद्याकडून आलेला आहें. शहाजाद्यानें आपणाला हें आज्ञापत्र दिलें आहे."

## प्रकरण तेरावें

# गोमतीच्या संगमावर

चंद्रशेखरानें तो लिफाफा उघडून वाचला, तों त्यांत पुढील आशयाचा मजकूर होता; " माळव्याचा सुभा बादशहांनीं निजामाला बहाल केला आहे, व मराठयांची बादशाही मुलुखांतील दांडगाई थांबवून त्यांना नर्मदेपार करण्याची कामगिरी त्याला सांगण्यांत आली आहे. माळव्यांतील जे ठाकूर, चौधरी वगैरे मराठयांना सामील होते, त्यांच्या दौलती जप्त करण्यांत येत आहेत. त्यांतच तुमचाही समावेश आहे. असें जरी आहे, तरी तुम्ही पूर्वीपासूनचे बादशाहीचे कैवारी आहां हें ओळखून, कांहीं शर्तींवर तुमची जहागीर तुमच्याकडे राखण्यांत येईल. त्या शर्तींपैकीं पहिली शर्त अशी कीं, तुम्ही बादशाहांच्या शत्रूंशीं कोणत्याही प्रकारचा सलोखा ठेवतां कामा नये. त्याप्रमाणेंच तुम्ही तावडतोब उज्जयनीला आमच्या स्वारींत येऊन स्वतःची बादशहांच्या ठायीं पूर्ण निष्ठा असल्याबद्दल शपथक्रियापूर्वक आमची खातरजमा करून दिली पाहिजे. बाकीच्या अटी समक्ष समजावून देण्यांत येतील. या हुकुमाची तावडतोब अंमलबजावणी न झाल्यास आमचें सैन्य ओंकारेश्वरावर चालून येऊन तुमचें पारिपत्य करील."

पत्र वाचून होतांच चंद्रशेखर थोडा वेळ स्तब्धपणें स्वतःशीं विचार करीत होता. अंमळशानें त्यानें भवानीरामाला विचारलें, " तुला या हुकुमांतील मजकूर माहीत आहे का ? "

" नाहीं." भवानीराम उत्तरला.

" हें वाचून पहा." असें म्हणून चंद्रशेखरानें तें पत्र भवानीरामाच्या हातीं दिलें. भवानीरामाला सर्व प्रकार माहीत होताच. तरी त्यानें तें पत्र वाचल्यासारखें करून पुन्हा चंद्रशेखराच्या हातीं देऊन म्हटलें, " अस्सें ! "

" हा हुकूम तुझ्या हातीं कसा आला ? "

भवानीरामानें तेथून परागंदा झाल्यापासून आजतागायतची आपली कर्म-कहाणी चंद्रशेखराला निवेदन केली. मात्र त्यांतून भागाबाईसंबंधींचा मजकूर तेवढा मोठ्या शिताफीनें गाळून जणुं काय आपण त्या गांवचेच नाहीं असें भासविलें.

" आतां मीं काय करावें ?" चंद्रशेखरानें आपलेपणानें भवानीरामाला विचारलें.

" मला विचाराल तर मी सांगतों—मग तें तुम्हांला रुचो किंवा न रुचो—मातीच्या भांड्यानें धातूच्या भांड्याशीं कधीं टक्कर खेळूं नये; पूर्वपरंपरा सोडूं नये. मराठ्यांची माळव्यांतील दंडेली आठ घटकांची होती, व ती संपण्याचा समय आतां अगदीं समीप आला आहे. बादशाही सत्ता अमर आहे. सर्व राजेरजवाड्यांचें व ठाकूर-चौधऱ्यांचें पाठबळ त्या सत्तेला आहे. मंडलोईसारखे मूठभर चढेल लोक मराठ्यांना फितूर झाले आहेत, तेदेखील वेळींच शहाणपण शिकले तर ठीक, नाहींपेक्षां सर्वस्व गमावून कुत्र्याच्या मोतीनें मरण्याचा प्रसंग त्यांच्यावर लौकरच ओढवलेला तुम्हांला दिसून येईल. ह्यावरून तुम्हांला काय धडा शिकतां येईल तो पहा."

" मीं मंडलोईशीं सोयरीक जमविली म्हणून माझ्यावर ही आपत्ति कोसळूं पहात आहे कीं काय ?"

" असें पहा, या बाबतींत मला कांहींच बोलतां कामा नये. मीं सरळ भावनेनें वस्तुस्थितीकडे लक्ष्य देऊन तुमच्या मताला पुष्टि दिली तर तुम्ही त्याबद्दल सत्यवादीपणाचें श्रेय मला न देतां मी माझ्या वैऱ्यांवर सूड उगविण्याचा प्रयत्न करीत आहें असा विकल्प मनांत ध्याल."

" पण मी आतां ताबडतोब उज्जयनीला जाऊन शहाजाद्याला भेटावयाचें म्हणजे भागाबाईच्या लग्नाचा बेत निदान या वर्षापुरता तरी रहित केला पाहिजे. कारण पुढें मुहूर्त नाहींत."

" हो ! असें ओघानेंच प्राप्त झालें." भवानीराम जरा डोकें खाजवून म्हणाला, " ठाकूरजी ! बोलूं नये; पण प्रसंग आला कीं बोलावें लागतें. मंडलोईशीं सोयरीक करण्यानें तुमच्यावर सबंध बादशाही पक्षाचा रोष होईल हें ध्यानीं घेऊन काय करावयाचें तें करा."

" कांहीं झालें तरी हें लग्न लांबणीवर टाकण्याचा माझा मुळींच विचार नाहीं. आतां, तोंपर्यंत मला तांतडी करून उज्जयनीला जाऊन येतां येण्याजोगें आहे."

बालकृष्ण भैरवगडावर कैदेंत असल्याची बातमी सांगून लेंकीचें लग्न ताबडतोब व्हावें, या चंद्रशेखराच्या इच्छेवर विरजण घालण्याचा विचार ाकतां भवानी-

रामाच्या मनांत आला. पण त्यानें तो मनांतल्या मनांत दाबून ठेवून चंद्रशेखराला तोंडदेखलें उत्तर दिलें, "बरें, तसें करा."

भवानीरामाच्या तोंडून हे शब्द निघाले मात्र, तोंच आंतील दालनांतून कोणींतरी तरवारीच्या धारेसारख्या कठोर स्वरांत प्रश्न केला, "काय करा?"

तो प्रश्न भागाबाईचा होता. भागाबाई इतका वेळ त्या दिवाणखान्याला लागून असलेल्या अंतर्महालांत बसून त्या दोघांचें संभाषण ऐकत होती. तिनें महालाचा दरवाजा उघडून एकदम पुढें येऊन विचारलें, "बाबा! काय करण्याचा तुमचा विचार आहे? तुम्ही उज्जयनीला जाऊन शहाजाद्याचे पाय धरणार, बादशाही अधिकाऱ्यांसमोर नाक घांसणार, आणि तेथून माघारे येऊन मग माझें लग्न करणार? मग तुमच्याशीं सोयरीक करायला मंडलोई तयार होतील का?"

"कां होणार नाहींत?" भवानीरामानें विचारलें.

"कां होणार नाहींत?" भागाबाई भवानीरामाच्या प्रश्नाचा पुनरुच्चार करून म्हणाली, "बरोबर आहे. तूं असें विचारलें नाहींस तरच आश्चर्य! कोणी झाला तरी आपल्या वळणावर जातो. विषाच्या रोपट्याला अमृतानें शिंपून वाढविलें तरी त्याच्या अंगचें विष थोडेंच कमी व्हायचें आहे? वाडवडिलांचें नांव तूं राखशील यांत संशय नाहीं. तरी मी मनांत म्हणत होतें कीं, भांगेच्या बनांत तुळशीचें रोप रुजलें तरी कसें? पण तें भांगेचेंच रोप आहे, याची ओळख आतां पटली."

भवानीरामानें मनांत मानखंडनेनें चिडून पण बाह्यात्कारीं गंभीरपणाचा आव आणून म्हटलें, "भागा! राजकारण हा बायकांचा विषय नव्हे. मी जरा मोकळ्या मनानें बोलतों म्हणून तूं रागाला येऊ नकोस. पण पाटावरून ताटावर व ताटावरून पाटावर बसणाऱ्या बायकांनीं पुरुषांच्या कारभारांत मन घालून वृथा बखेडे माजवूं नयेत हें चांगलें. ठाकूरजींवर सध्यां कोणतें संकट कोसळूं पहात आहे याची तुला जाणीव तरी आहे का?"

"मला जाणीव आहे, म्हणूनच मी बोलतें. बायकांना कारभार करण्याची अक्कल पुरुषांइतकी नसते; पण पुरुषांची अक्कल जेव्हां आंधळी होते, तेव्हां तिला हाताशीं धरून चालविणें बायकांच्या अकलेला भाग पडतें." भागाबाई भवानीरामावर संतापून उद्गारली.

भवानीराम तिचा तो कडकडाट ऐकून खजिल झाला. चंद्रशेखर समजुतीच्या

भाषेंत भागाबाईला म्हणाला, " बाळ, ही सारी यातायात मी कोणासाठीं करीत आहें याची तुला जाणीव आहे का ? "

" कोणासाठीं ? माझ्यासाठीं ? " भागाबाईनें पूर्ववत् संतापानें विचारलें.

" होय. तुझ्यासाठीं–केवळ तुझ्यासाठीं हें सारें चाललें आहे. नाहींपेक्षां एकट्या माझ्या जिवासाठीं मला ही दौलत राखण्याचीही गरज नव्हती, व मग कोणाच्या पायधरण्याही मला कराव्या लागल्या नसत्या."

" पण माझ्यासाठीं कोणीं इतकी नामुष्की पत्करावी असें मला मुळींच वाटत नाहीं. कारण, असल्या नामुष्कीच्या करणीनें तुम्ही मला सुखी करूं शकणारच नाहीं. आधीं बाबा ! मला सांगा; आजवरचा माझ्या लग्नासंबंधींच्या वाटाघाटीं-तील अनुभव तुम्हांला काय सांगतो ? तुम्ही बादशाही पक्षाचे कैवारी आहां या एकाच कारणास्तव आजवर मंडलोई तुमच्याशीं फटकून वागत होते ना ? आणि पुन्हा तुम्ही बादशहाला शरण गेलां तर तुमच्या घराण्याशीं सोयरीक करण्याला मंडलोईच काय पण कोणताही स्वाभिमानी जातिबांधव धजणार नाहीं."

" भागा ! तुझ्या या भ्रमाचा भोंपळा लौकरच फुटेल." भवानीराम उद्गारला, " मंडलोईंच्या काल्पनिक मोठेपणानें व स्वाभिमानानें तूं इतकी मोडावली आहेस; पण तो त्यांच्या मोठेपणाचा व स्वाभिमानाचा डोल्हारा कोसळून जमीनदोस्त झालेला लौकरच तुला आढळून येईल."

" दादा ! हें मागच्या पिढींतील वैराचें भूत तुझ्या मानेवर बसून मंडलोईं विषयीं अमंगळ गोष्टी बोलत आहे." भागाबाई आवेशानें उद्गारली.

" नाहीं, नाहीं ! ही भवितव्यता बोलत आहे ! " भवानीराम भागाबाई पेक्षांही जोरानें उत्तरला, " मंडलोईंच्या नाकांत ओंवण्याची वेसण माझ्या हातीं आहे." तो आपल्या अंगरख्याच्या खिशांतील दुसरा मोहोरबंद लिफाफा काढून तिच्यासमोर धरीत म्हणाला, " ही पहा ती वेसण ! हें बादशाही फर्मान वाचून पहातांच तेजकर्णाला मांडवगडापासून उज्जयनीपर्यंत लोटांगणें तरी घालीत जावें लागेल, किंवा कपाळाला राख फांसून बैरागी बनून भिक्षापात्राचा अवलंब तरी करावा लागेल. ज्यांच्या जिवावर तुझ्या एवढ्या उड्या, त्यांचाच नाखोटा असा खालीं झाल्यावर तुझ्या ताठ्याला कोठें अवसर मिळेल, मला सांग बरें ? ठाकूरजी शहाजाद्यासमोर मस्तक नमविण्याला तयार झाले म्हणून त्यांना तूं, त्यांच्या पोटची मुलगी, तूं हंसावयाला तयार झालीस; पण उद्यां मंडलोईदेखील

शहाजाद्याला शरण गेल्यावर त्या नेभळटाच्या बावळट मुलाशीं–त्या बालकर्णाशीं लग्न झाल्यास तुझें हंसें होईल त्याची काय वाट ?"

"इतकें हिणवायाला कशाला हवें ? काळ्या दगडावर रेघ ओढून ठेव, मंडलोई शहाजाद्यासमोर मस्तक नमवणार नाहींत, व बाबा बादशाही पक्षाला शरण गेले असें मंडलोईंना कळलें तर ते आमच्या घराण्याशीं सोयरीक करण्यालाही तयार होणार नाहींत." समोर स्तब्ध बसून विचार करीत असलेल्या चंद्रशेखराकडे वळून ती हात जोडून म्हणाली, "बाबा ! तुम्हीदेखील माझ्या सुखासाठीं उज्जयनीला जाऊन शरणचिठ्ठी लिहून देत असाल तर मी स्पष्ट सांगतें, मला तें कबूल नाहीं. मग मंडलोईंनीं आमच्या घराण्याशीं सोयरीक करण्याचें नाकारून आमचा अपमान करावा, त्यापेक्षां मी आधींच सांगून ठेवतें, तुम्ही निजामाच्या बाजूला वळलां तर मी आजन्म अविवाहित राहीन, किंवा माझ्या जिवाचें कांहींतरी बरेंवाईट करून घेईन."

एवढें बोलतां बोलतां भागाबाईच्या डोळ्यांत आंसवें उभीं राहिलीं. ती पदरानें डोळे पुशीत आंत निघून गेली. भवानीरामदेखील दुखवलेल्या सर्पासारखा फुत्कारत होता, तो 'तृण नाहीं तेथें पडला दावाग्नि, जाय तो विझोनि आपोआप' या न्यायानें जरा शांत होऊन चंद्रशेखराकडे पाहूं लागला. आवेशाच्या भरांत आपण बोलूं नये तें बोलून गेल्याबद्दल भवानीरामाला आतां पश्चात्ताप होऊं लागला. चंद्रशेखर कोणाचाही इतका उद्दामपणा सहन करणारा मनुष्य नव्हता. पण त्यानें एवढी कटकट सहन केली, ती पूर्वीचा ऋणानुबंध आठवून सहन केली हें भवानीराम उमजला व नम्रपणानें चंद्रशेखराला म्हणाला, "ठाकूरजी ! आवेशाच्या भरांत माझ्या तोंडून निघूं नयेत ते शब्द निघाले याबद्दल मला क्षमा करा."

"त्यांत क्षमा ती कसली करावयाची ? मंडलोईंनीं तुला राखेंत बसविलें, त्याबद्दल मलादेखील जर अजून चीड येते, तर तुला ती येणारच. मीदेखील स्वसंतोषानें मंडलोईंशीं सोयरीक करण्याला तयार झालों असें नाहीं. पण त्या गोष्टी आतां बोलून काय करावयाचें आहे ? तशी वेळा आली खरी."

भवानीरामाला चंद्रशेखराचें जें भय वाटत होतें, तें चंद्रशेखराच्या उद्गारांनीं दूर झालें. त्याच्या हृदयाची धडधड थांबली. तो चंद्रशेखराच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याच्या नव्या उमेदीनें म्हणाला, "ठाकूरजी ! त्या गोष्टी बोलण्याचें कारण नाहीं. मला

सर्व कांहीं माहीत आहे. भागा आपली कन्या आहे. तशीच ती माझी मानलेली बहीण आहे. ती कोणीकडून तरी सुखी व्हावी असें आपणाप्रमाणें मलाही वाटतें. म्हणूनच ती माझ्या वैऱ्याची सहधर्मिणी होणार हें कळूनसवरूनसुद्धां मी तिच्या लग्नांतील विघ्नें दूर करण्यासाठीं मनोभावानें झटत आहें. मंडलोईंनीं निजामाचा पक्ष स्वीकारावा अशाविषयीं झटण्यांत मी माझ्या वैऱ्यांना संकट-मुक्त करण्याच्या कामीं साह्य करीत आहें खरें; पण तें भागाकडे पाहून करीत आहें. एरव्हीं मंडलोई निजामाला न मिळण्यानेंच त्यांचा नाश व्हावयाचा आहे, व तसें झाल्यास त्यांत मलाही आनंद होणार आहे. मराठ्यांची बाजू कमालीची कमजोर आहे; त्यांची निजामाकडून प्रस्तुतच्या झगड्यांत खाशी वाताहात उडणार व ताटावरोबर कांठ या न्यायानें मराठ्यांबरोबर मंडलोईंचीही वाट लागणार हें मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं."

"तुझा हेतु स्तुत्य आहे. मी देखील उज्जयनीहून आल्यावर मंडलोईंना तुझ्याप्रमाणेंच सल्ला देणार आहें."

"पण ती सल्ला त्यांना रुचली नाहीं तर मग काय करणार ? तरीदेखलि भागाबाईचें बालकर्णाशीं लग्न लावून देणार काय ?"

"नाहीं. मग मी त्या गांवचा नाहीं."

"तेंच मी तरी म्हणतों. कारण, तुम्ही आतां उज्जयनीला जाल, शहाजाद्या-समोर राजनिष्ठेची शपथ घ्याल, निजामाला साह्य करण्याला कबूल व्हाल, मग बादशाही दरबारांत तुमचा दर्जाही वाढेल, सर्व कांहीं मनाजोगें होईल. पण मंडलोई वठणीवर येईनासे झाल्यास ते राजद्रोहाबद्दल गुन्हेगार ठरणार, निजाम त्यांची पाळेंमुळें खणून काढणार; अशांशीं तुम्हीं सोयरीक केली कीं तुम्ही केवळ तेवढ्या-बद्दल अपराधी ठरून आपल्या हातानें आपल्या पायांवर दगड पाडून घेतल्या-सारखें होणार ! असें होऊं नये."

"तसें कधींही होणार नाहीं. भलत्याच कामांत मी माझ्या मुलीच्या लहरीला बळी पडणार नाहीं."

"ठीक आहे. मग तुम्ही उज्जयनीला केव्हां जाणार ?"

"आपण दोघेही बरोबरच जाऊं. तूं मांडवगडावर जाऊन तर ये !"

"छे ! छे ! तसें नको. मला मांडवगडाहून परत यावयाला कदाचित् एखादा दिवस जास्त लागेल. तोंवर तुम्ही थांबतां कामा नये. तुम्ही आजच्या आज

दुपारीं जावयाला निघा. मी मांडवगडाहून माघारा जाईतों तुम्ही कदाचित् माघारे देखील याल."

"तोंवर मंडलोई बादशाही फर्मानाबद्दल काय म्हणतात तेंही कळेल, व त्याप्रमाणें मला पोरीच्या लग्नाविषयींचा पुढील बेत ठरवितां येईल. देवदयेनें सर्व गोष्टी मनाजोग्या झाल्या तर तूं लग्न आटोपून मगच आपल्या कामगिरीवर जा. कसें ?"

"कांहीं हरकत नाहीं. पण तुम्ही आज दुपारींच तिकडे जावयाला निघा; व मी उदईक मांडवगडाकडे जाईन."

ॐ ॐ ॐ

चंद्रशेखर ठरल्याप्रमाणें त्याच दिवशीं दोन प्रहरीं उज्जयनीकडे रवाना झाला. भवानीराम मात्र कालिदासाची वाट पहात तेथेंच राहिला. कारण त्याला कालिदासाविषयीं काळजी वाटत होती. त्याला कालिदासाच्या जीविताविषयीं फारशी पर्वा नव्हती; पण स्वारी जर वेळीं शत्रूच्या हातीं लागली, तर आचरटपणानें वायफळ बोलून सर्व बेत शत्रूला सांगून मोकळी व्हावयाची ! या कर्माला तो फार भीत होता, व तेवढ्यासाठीं कालिदासाच्या जीविताची काळजी करणें त्याला प्राप्त झालें होतें.

पण भवानीरामाला फार वेळ ही काळजी करीत बसावें लागलें नाहीं. सायंकाळीं तिसऱ्या प्रहरीं भवानीराम सहज देवदर्शनही करावें व कालिदासाचीही चौकशी करावी अशा इराद्यानें ओंकारेश्वरीं गेला असतां कालिदास एका घाटावर बसून संगमाकडे दृष्टि वळवून कांहीं तरी पहाण्यांत दंग होऊन गेला आहे असें त्याला आढळून आलें. भवानीरामानें 'कविराज !' अशी हांक मारली पण कविराजांकडून उत्तर कांहीं केल्या मिळेना. इतका कविराजांच्या चित्ताचा लय कोठें लागला आहे तो पहावा तरी या इराद्यानें भवानीरामानें समोर दूरवर नजर फेंकली, तों त्याबरोबर त्याच्या मुखांतून आपोआप स्वगत उद्गार निघाले, "तरीच ! माझा तर्कच बरोबर ठरला. तरी मी मनांत म्हणतच होतों कीं, असें एखादें मोहक दृश्य दृष्टीसमोर असल्याशिवाय कविराजांच्या चित्ताचा लय तिकडे लागावयाचाच नाहीं."

कालिदास तेथें कोणत्या गोष्टीकडे टक लावून बसला असेल बरें ? आणि भवानीरामाला त्याचा संशय कां आला असेल ?

प्रकरण चौदावें

# कवि हुरळला !

भवानीरामाच्या व इतर अनेकांच्या मतें कालिदास ही व्यक्ति कांहींशी पागल ठरून गेली असली व त्यामुळें त्याची आवडानिवड क्षणभर बाजूला टेविली तरी ओंकारेश्वर ह्या स्थलाची थोरवी व रमणीयता प्राचीन कालापासून अपूर्व अशीच आहे. महाभारतांत जीं बारा ज्योतिर्लिंगें परमपूज्य व परमपवित्र म्हणून सांगितलीं आहेत; त्यांपैकींच ओंकारेश्वर हें एक आहे. हें क्षेत्र नर्मदेच्या दोन्ही तीरांवर वसलेलें असून आजला तें एका छोटया संस्थानाची राजधानी शोभत आहे, व कथानकाच्या कालींही तेथेंच चंद्रशेखराच्या जहागिरीची राजधानी होती. या ठिकाणीं नर्मदा दोन डोंगरांच्या विशाल कड्यांमधून वहात असल्यानें एथें नर्मदेचें पात्र इतर ठिकाणच्यापेक्षां थोडें अरुंद असून दोन्ही तीरांना रेताड मैदानें नाहींत. नर्मदेचा प्रवाह अत्यंत खळाळीचा म्हणून प्रसिद्ध आहे खरा; पण ओंकारेश्वरापुरता तो अगदीं शांत आहे. एथें नर्मदेला अनेक सुंदर घाट बांधलेले असून त्यांच्या सभोंवारचें सृष्टिसौंदर्य तर इतकें मनोवेधक आहे कीं, कोणाचेंही मन तेथें मोहित व्हावें. नदीच्या दोन्ही तीरांना हे घाट बांधण्यांत आलेले असून त्या घाटांना लागून अनेक टोलेजंग सराया ऊर्फ धर्मशाळा बांधण्यांत आलेल्या आहेत. या क्षेत्रीं बाराही महिने कमी अधिक यात्रा असते. सोमवती, अमावास्या वगैरे नेहमींच्या पर्वण्यांनाही एथें यात्रेकरूंची गर्दी असते. मग मोठ्या पर्वणीच्या दिवशीं तर विचारावयालाच नको. एथील मुख्य देवस्थान ओंकारमांधाता ऊर्फ ओंकारजी हें होय. या देवस्थानासभोंवार ठिकठिकाणींही बरींच महादेवाचीं देवालयें आहेत; पण ओंकारजी हें मुख्य ज्योतिर्लिंग होय, व तें स्वयंभू आहे अशी परंपरेचीच भावना आहे. यात्रेच्या दिवशीं ओंकारजींचें दर्शन होणें दुरापास्त असतें. एक दालन ओलांडून आंत गेल्यावर समोरच्या दालनांत एक मोठें तांब्याचें शिवलिंग असून त्या लिंगावर तांब्याचाच मोठा नाग आहे. जरा बाजूला आणखी एक दालन असून त्या दालनांतच ओंकारजींचें स्वयंभू लिंग आहे. हेंच क्षेत्रदैवत होय. या दालनांत गुडुप अंधार असल्यामुळें दिवसाउजेडीं देखील तेथें दिवे लावावे

लागतात. ओंकारजीच्या या स्वयंभू लिंगावर भाविक लोक पवित्रोदक, बिल्वदलें, व आपापल्या ऐपतीप्रमाणें ताम्र-रौप्य-सुवर्णांचीं नाणीं अर्पण करितात. हें जल व द्रव्य तेथून थेट नर्मदेच्या प्रवाहांत जातें अशी आख्यायिका आहे. तो मार्ग मात्र गुप्तावस्थेंत—निदान भाविक यात्रेकरूंना तरी अज्ञात असा आहे. असें आहे तरी देवाचे पुजारी पिंडीवरील द्रव्य जेथल्या तेथें उचलून घेण्यासाठीं टपलेले असतात, व त्यांच्या हातून क्वचितच द्रव्य नर्मदार्पण होऊं शकतें! देवालयाच्या बाहेरील बाजूला त्या डोंगराच्या पहाडांतील भिल्लिणी, त्यांचीं मुलें वगैरे माणसांची बिल्वदलें विकण्यासाठीं मारे गर्दी उडालेली असते. बिल्वदलें तेथें इतकीं स्वस्त मिळतात कीं, विचारण्याची सोय नाहीं.

ओंकारेश्वराची यात्रा पुरी करावयाची तर पंचक्रोशीची प्रदाक्षिणा पुरी करावी लागते. नर्मदा पूर्व-पश्चिमवाहिनी असून तिच्या पैलतीराला म्हणजे उत्तरतीरावर वसलेल्या वस्तीलाच ओंकारेश्वर म्हणण्याचा फार प्राचीनकाळापासून परिपाठ आहे. गांवाच्या पूर्वेला सुमारें अर्ध्या कोसाच्या अंतरावरून नर्मदेचा एक फांटा निघून उत्तरेकडे वहात गेलेला आहे व तो नंतर उत्तरेकडून पश्चिमेकडे वक्रगतीनें वळून दीड कोसाच्या अंतरावर नर्मदेच्या मुख्य प्रवाहाला मिळालेला आहे. या फांट्यामुळें स्वाभाविकपणें जे एक सुमारें पांच कोसांच्या परिघाचें बेट बनलेलें आहे, त्यालाच पंचक्रोशी असें नामाभिधान प्राप्त झालेलें आहे. ओंकारेश्वर हें या पंचक्रोशीच्या एका टोंकाला आहे. या पंचक्रोशीला आंतून भाविक जन जी प्रदाक्षिणा घालतात तिलाच पंचक्रोशीची प्रदाक्षिणा असें म्हणतात. भाविक लोक प्रातःकालीं स्नान वगैरे आटोपून ओंकारजींचें दर्शन घेतल्यावर या प्रदाक्षिणेला प्रारंभ करतात. ही प्रदक्षणा वाटचालींत कोठें थोडीफार अवघड असली तरी आजूबाजूचें अनुपम सृष्टिसौंदर्य, यात्रेची शोभा व देवस्थानचें सौंदर्य पाहून कोणालाही शीण झालासा वाटत नाहीं.

असो. भवानीराम हलके हलके कालिदासाच्या पाठीमागें गेला व त्याच्या पाठीवर हात मारून म्हणाला, "कविराज! निरीक्षण कसले चाललें आहे?"

कालिदासानें एकदम दचकून मागें वळून पाहिलें.

"एखादें काव्य करण्याचा विचार आहे वाटतें?" भवानीरामानें समोर पहात विचारलें, "त्या कोणी दोन सुंदर तरुणी देवदर्शन करून जात आहेत, त्यांना पाहून तुमची प्रतिभा जागृत झाली असेल!"

" होय; गोष्ट खरी आहे. पण तुम्ही इकडे केव्हां येऊन पोंचलां ?"

" मी आज सूर्योदयाला आलों. आणि तुम्ही ?"

' मीही दोन प्रहर दिवसाला आलों. बरें; तुम्हीं एथली कामगिरी केली का ?"

" हो ! कामगिरी अगदीं सोळा आणे केली. चंद्रशेखरांना उज्जयनीकडे रवाना करून आलों."

" आणि भागाबाई शहाजाद्याच्या विलासमंदिरांत जायाला तयार झाली का ?"

" नाहीं. ती अशी सोईनें तयार व्हावयाची नाहीं."

" अरेरे ! मी जर तुमच्याबरोबर असतों, तर शहाजाद्याच्या वैभवावर असें सुंदर कवन रचून भागाबाईला गाऊन दाखविलें असतें, कीं तें ऐकून प्रत्यक्ष रतिदेखील शहाजाद्याला मोहित झाली असती ! मग भागाबाईची कथा काय ?"

" बरें; तें राहो. पण तुमची सुटका कशी झाली ?"

" विद्वत्त्वं च नृपत्वं च । नैव तुल्यं कदाचन । स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ।" कालिदास मान डोलवीत डौलानें म्हणाला, " भवानीराम ! मी माळव्याचा विद्वन्मुकुटमणि कविसम्राट् आहें हें तुम्ही विसरलां वाटतें !', तो समोरून जाणाऱ्या त्या सुंदर तरुणींकडे टक लावून पहात उद्गारला, "चला' आपण पंचक्रोशीची प्रदक्षिणा तरी करूं या ! जातां जातां मी तुम्हांला सारा वृत्तान्त सांगतों. म्हणजे तीर्थ व स्वार्थ दोन्ही साधलीं." कविराजांना त्या सुंदर स्त्रियांच्या मागें लाळ घोंटीत हिंडावयाचें आहे, व तेवढ्यासाठीं तो पंच-क्रोशीच्या प्रदक्षिणेचें निमित्त करीत आहे हें भवानीरामानें अंदाजलें, आणि एवढा वेळ गमावणें हितकर नाहीं असें तो म्हणणार होता. तोंच कालिदास पुढें उद्गारला, " राव तेजकर्ण मंडलोईदेखील आज पंचकोशींत आला असल्याची खबर, माझ्या कानीं आली आहे. त्याच्याकडील कामगिरी अजून व्हायची शिल्लक आहे ना ?"

" होय." भवानीराम उद्गारला.

" आणि शाहूछत्रपतीची राजकन्या गजराबाईही आज इथें यात्रेला येणार असल्याची बोलवा आहे."

" खरें ?"

" होय."

" हें तुम्हांला कोणीं सांगितलें ?"

" राजकन्येच्या पाठलागावर असलेल्या अनुरावसिंगाच्या सैन्याची टोळी आज सकाळपासून इथें टेहळणीवर आहे. त्यांतील एकदोन ओळखीचे मनुष्य मला थोड्या वेळापूर्वी भेटले, त्यांनीं मला हें सांगितलें."

" तर मग तुमच्या समोरून जाणाऱ्या स्त्रियांत तर ती राजकन्या नसेल ना ?"

" असेलहीं कदाचित्."

" चला तर, आपणही पंचक्रोशीला प्रदक्षिणा घालूं." असें म्हणून भवानीराम कालिदासाबरोबर प्रदक्षिणा करण्याला निघाला. कोणीही मनुष्य देवालयापाशीं आलें कीं, बेल विकण्यासाठीं व भिक्षा मागण्यासाठीं बेलविक्यांचा व भिक्षेकऱ्यांचा तांडा मागोमाग धांवत यावयाचा, त्याप्रमाणें भवानीराम तेथें आलेला पाहातांच चार पांच बेलविके व दोनतीन भिक्षेकरी त्याला सामोरे गेले. परंतु भवानीराम देवदर्शन करण्याच्या इरायानें तेथें आलेला नाहीं अशी त्यांची खातरजमा होतांच ते हलके हलके मागें पाऊल घेऊन आले तसे गेले. नाहीं म्हणावयाला त्यांतला एक बेलविक्या व एक भिक्षेकरी असे दोघे मात्र भवानीरामाला सतावून सोडीत होते. भवानीराम कांहीं त्यांच्याकडे लक्ष्य देईना व ते कांहीं त्याची पाठ सोडीनात. एकदां भवानीरामानें त्यांच्या अंगावर खेंकसून त्यांना दूर लोटण्याचा प्रयत्न केला, पण तो वांया गेला. भवानीराम व कालिदास बोलत बोलत प्रदक्षिणेला निघाले, तेव्हां ते दोघे बेलविक्या आणि भिक्षेकरी त्यांच्या मागोमाग कोठेंतरी बेल विकला जाईल व भिक्षा मिळेल अशा इरायानें हळुहळू चालले होते. बेलाचा खप देवालयाजवळ तेवढा व्हावयाचा, इतर ठिकाणीं कोण कशाला बेल विकत घेणार ? त्यामुळें बेलविक्याची फेरी वांयाच जात होती. भिक्षेकऱ्याला मात्र प्रदक्षिणेच्या मार्गांतील यात्रेकरू मधून मधून कांहीं भिक्षा घालीत. भवानीराम व कालिदास यांचें तिकडे मुळींच लक्ष्य नव्हतें. कालिदास आपला वृत्तान्त सांगत होता व भवानीराम तो ऐकत होता.

पंचक्रोशीच्या प्रदक्षिणेला प्रारंभ ओंकारजींचें दर्शन झाल्यावर ओंकारजीच्या देवालयाच्या पश्चिमेकडून होतो. पश्चिमेकडे जातांना प्रथम नदीकांठानें संगमापर्यंत सुमारें कोस सव्वाकोस चालून जावें लागतें. भवानीराम व कालिदास हे तेथे गेले तेव्हां त्या दोन सुंदर तरुणी तेथें थांबलेल्या त्यांना आढळल्या. त्या दोघींबरोबर त्यांच्या दासदासींचा लवाजमाही होता. त्यावरून त्या कोणा थोरामोठ्यांच्या बायका

असाव्या याविषयीं शंकाच उरली नाहीं. त्या मंडळीला पाहून कालिदास भवानीरामाला म्हणाला, " भवानीराम ! आपण थोडा वेळ इथेंच थांबावें. या बायका एथें गोमतिस्नान करण्याच्या विचारांत आहेतसें दिसतें. आपण यांची चौकशी तर करूं खरी ! हा एवढा लवाजमा सातारच्या राजकन्येचा तरी असावा किंवा मंडलोईच्या घरची तरी ही मंडळी असावी. बहुधा हा सातारच्या राजकन्येचाच परिवार असेल. ती आज एथें आली आहे असें ऐकतों."

कालिदासाला धूर्तपणाची नुसती पोकळ घमेंड होती; पण भवानीराम खरा धूर्त होता. त्यानें त्या दोन सुंदर तरुणींकडे व त्यांच्या लवाजम्याकडे पहातांच त्यांच्या बोलीवरून व पेहरावावरून त्या मराठमोळ्यांतील स्त्रिया असाव्या असा अंदाज करून म्हटलें, " ही बायकामंडळी मंडलोईची खास नव्हे. ही कोणा थेरामोठ्या मराठ्याची बायकामंडळी आहे. कदाचित ही सातारची राजकन्या असण्याचाही संभव आहे."

" बरें; तुमचा नवा जोडीदार सटवोजी जो राजकन्येच्या तपासासाठीं गेला आहे, तो परत तुम्हांला कोठें येऊन भेटणार आहे ? "

" त्यानें मला सायंकाळपावेतों ओंकारेश्वराच्या देवालयापाशीं भेटण्याचें कबूल केलें आहे."

" आणि अनुराधसिंगजीचें सैन्य इकडे आलें आहे म्हणालां, त्याचा नक्की तपास आपल्याला कसा लागेल ? " असें भवानीराम विचारतो आहे, तोंच तो बेलविक्या हलकेच भवानीरामापाशीं गेला व त्याला हांक मारून म्हणाला, " भवानीराम ! जरा बाजूला या."

" कोण तूं ? " भवानीरामानें मागें फिरून विचारलें.

" मी तुमचाच मनुष्य आहें; जरा बाजूला या म्हणजे सारें कांहीं सांगतों." बेलविक्या उद्गारला.

भवानीरामानें कालिदासाला आपणाबरोबर येण्याला खूण केली. पण कालिदास लुब्धपणानें कमलराजीवर गुंजारव करणाऱ्या भृंगाप्रमाणें त्या स्त्रियांच्या घोळक्याकडे–विशेषतः त्या दोन सुंदर स्त्रियांकडे पाहण्यांत इतका गढून गेला होता कीं, त्याला भवानीरामाची खूण कळलीदेखील नाहीं. अखेर भवानीरामानें त्याच्या कानाशीं लागून 'आपल्या मनुष्याकडून आपणाला सारी माहिती कळण्याजोगी आहे; तुम्ही इकडे या'. असें सांगितलें. पण त्यावर

'तुम्हींच बातमी काढून या. तोंवर मी या मंडळीवर नजर राखतों व त्यांचें संभाषण ऐकावयाला मिळालें तर तें पहातों'. असें उडवाउडवीचें उत्तर देऊन कालिदास मागें येण्याऐवजीं दोन पावलें पुढेंच गेला. भवानीरामाला मात्र वाटलें कीं, कालिदास तिथेंच असलेला बरा. त्या बेलविक्यानेंही पुन्हा भवानीरामाच्या कानाशीं लागून सांगितलें, " तो माणूस भोळसट आहे. कुठें काय बोलावें याचा त्याला मुळींच सुमार नाहीं. त्याला आपले बेत कळणें इष्ट नाहीं. त्याला तिथेंच थोडा वेळ उभा राहूं द्या; तुम्ही मात्र इकडे या."

तो बेलविक्या व भवानीराम यांचें सांकेतिक संभाषण सुरू असतांना तो भिक्षेकरी मधून मधून भवानीरामाला भिक्षा मागून त्रास देतच होता. भवानीराम व बेलविक्या संगमावरच अंमळ बाजूला गर्दी कमी असलेल्या जागीं गेले तेव्हां तो भिक्षेकरीही भिक्षा मागत मागत त्यांच्या मागोमाग गेला, व ते दोघे बसले तेथें जवळच बसून आपली भिक्षेची झोळी पुढ्यांत पसरून त्यांतील पैसे, फळें, धान्य वगैरे वेंचून निरनिराळे करूं लागला. भवानीरामानें एकवार त्याच्याकडे भेदक दृष्टीनें पाहिलें. पण भिक्षेकऱ्याचें तिकडे लक्ष्यच जणुं नव्हतें.

" तुमच्याबरोबरचा तो मनुष्य अगदींच बावळट दिसतो." बेलविक्या म्हणाला.

" असेल. पण आधीं मला सांग, तूं कोण ? " भवानीरामानें विचारलें.

" सातारच्या राजकन्येला पकडणें, मांडवगड कबजांत घेणें व चंद्रशेखराच्या सर्व मंडळीला कैद करून ही जहागीर ताब्यांत घेणें एवढ्या कामासाठीं निजामाच्या आज्ञेवरून अनुराधसिंग वगैरे मंडळीनें राजा शिवसिंग व अजमेरीसिंग या दोघांना या प्रांतीं रवाना केलें आहे हें तुम्हांला माहीत आहे ना ? "

" होय."

" त्यांपैकीं अजमेरीसिंगाचा मी हेर आहें. चमेलीसिंग माझें नांव." बेलविक्या आपल्या हातांतील मुद्रिका काढून भवानीरामाला दाखवून म्हणाला, " ही पहा माझ्या धन्याच्या स्वाक्षरीची मुद्रिका. आतां तरी तुमची खात्री पटली ना ? "

" होय; आतां खात्री पटली." भवानीरामानें चमेलीसिंगाच्या पाठीवर सलगीनें हात मारून हंसत म्हटलें, " गड्या ! तूं फारच चतुर दिसतोस. इतका वेळ बेलविक्याचें सोंग घेऊन एकसारखा आमच्या मागोमाग रेंगाळत आहेस, पण आम्हांला जरादेखील संशय येऊं शकला नाहीं."

" संशय आला तर मग तें सोंग कसलें ? हें तर कांहींच नाहीं, अशीं कामें गेल्या चार पांच दिवसांत आम्ही–मी व माझे धनी मिळून करीत आहों."

" आणखी कसली कसलीं सोंगें केलींत ? "

" त्या गोष्टी मग सवडीप्रमाणें बोलतां येतील. तूर्त तुम्हांला सांगण्याजोगी गोष्ट म्हणजे–" चमेलीसिंग संगमावर नौकाविहाराची तयारी करीत असलेल्या स्त्रियांकडे बोट दाखवून म्हणाला. " ह्या मंडळीविषयीं तुमचा वहीम बरोबर आहे. त्या स्त्रियांत ज्या दोन प्रमुख बायका दिसतात, त्यांपैकीं वयानें अंमळ मोठी दिसणारी ती सातारची राजकन्या अर्थात् मल्हारराव बांड्याची बायको असून दुसरी तिची मैत्रीण–सुलतानपूरचे इनामदार खासेराव यांची काशीबाई या नांवाची कन्या आहे. राजकन्येला देवस्थानें पहाण्याची फार आवड असल्यामुळें आज दोन आठवडे ती काशीबाई व खासेराव यांच्यासह ठिकठिकाणीं हिंडत आहे. सध्यां त्यांचा बैठा मुक्काम सुलतानपुराला असून आजच ती मंडळी ओंकारेश्वरीं आली आहे. राजकन्येला अटक करण्याचा आमचा प्रयत्न आज इतक्या दिवसांनीं सिद्धीला जाण्याचा योग आला आहे, पण हा योग कसा काय साधेल याचें भय आहे."

" त्यांत भय तें कसले ?–अजमेरीसिंग व शिवसिंग यांचा मुक्काम सध्यां कुठें आहे ? "

" ते दोघेही पूर्वसंकेताप्रमाणें मांडवगडासभोंवार जंगलांत गुप्तपणें वेढा देऊन बसलेले आहेत. पण त्यांचा वेढा यशस्वी होईल असें वाटत नाहीं."

" कां बरें ? "

" बालकर्णाच्या कैदेची बातमी घेऊन अनुपसिंग आज सकाळींच मांडवगडावर गेला आहे."

" हें तुला कसें समजलें ? "

" तो जातांना आज सकाळीं ओंकारेश्वराच्या दर्शनाला आला होता. त्यानें माझ्यापासूनच बेल विकत घेतला. त्याच्याबरोबरच्या नोकरापाशीं मीं चौकशी केली तेव्हां खरा प्रकार मला कळला. तेव्हां तेवढ्या माहितीनें मंडलोई बिथरणार यांत शंकाच नाहीं. अशा स्थितींत तुम्हीं मांडवगडापावेतों हेलपाटा घेतला तरी कांहीं उपयोग होणार नाहीं. त्यापेक्षां मला असें वाटतें कीं, तिकडे धनीसाहेब व

शिवसिंग यांना परस्पर मांडवगडाचा कबजा घेण्याला सुचवावें, व राजकन्येला कैद करण्याची कामगिरी इकडे आपण पार पाडावी." चमेलीसिंग जरी इकडे भवानीरामाशीं बोलत होता, तरी संगमाकडे मंडळी कोण काय करीत आहे इकडे त्याचें लक्ष्य होतेंच. गजराबाई वगैरे मंडळी नौकेंत बसूं लागलेली पाहून चमेलीसिंग आपला भाषणौघ आंवरता घेऊन भवानीरामाला म्हणाला, "भवानीराम! ती पहा राजकन्या निघाली. आपला डाव साधला. आतां थोडी चपळाई केली, कीं राजकन्या आपल्या हस्तगत झालीच असें समजा. तुम्हीं फक्त एवढें करा, ती जवळ दुसरी नाव नांगरलेली दिसत आहे, त्या नावेंत बसून पहिल्या नावेच्या पाठोपाठ जा."

इतक्यांत राजकन्येची नाव चालू होऊन बरीच दूर गेली. त्याबरोबर कालिदास एक निश्वास सोडून मागें वळून पहात हांक मारूं लागला, "भवानीराम! भवानीराम!"

ती हांक ऐकून संगमावर उभ्या असलेल्या नावेवरील नावाडी एकदम मागें वळून पाहूं लागले. चमेलीसिंग त्रासून भवानीरामाला म्हणाला, "किती अचरट हा मनुष्य! अगोदर त्याचें तोंड बंद करा पाहूं! त्याला गप्प रहावयाला खूण करा."

भवानीरामानें झपझप् पावलें टाकीत कालिदासापाशीं जाऊन त्याच्या कानापाशीं तोंड नेऊन हळुहळू त्याला कायसें सांगितलें. तेवढ्यांत चमेलीसिंग त्या नावेपाशीं जाऊन नावेवरील मुख्य तांडेलापाशीं हळुहळू कायसें बोलूं लागला. तो भिक्षेकरीही त्या दोघांची धांदल उडालेली पाहून धांदलीनें आपली भिक्षेची झोळी कांखोटीला मारून त्या नावेपाशीं आला व भिक्षांदेही करीत रेंगाळूं लागला. तोंच चमेलीसिंग भवानीरामापाशीं आला व म्हणाला, "चला, त्या नावेंत बसा."

"पण—"

"पणबीण कांहीं नाहीं."

"पण माझा एकट्याचा तिथें कसा निभाव लागणार?"

"कां? तुम्ही एकटे कां? मी आहें ना तुमचा पाठीराखा? काय भानगड आहे ती मला सांगा म्हणजे झालें." कालिदास आढयतापूर्वक म्हणाला.

" सातारची राजकन्या आतां नावेंतून निघून गेली ना ? तिला पकडावयाचें आहे." भवानीराम कालिदासाच्या कानाशीं लागून हळूच म्हणाला.

" काय ? ती सातारची राजकन्या होती ?" कालिदासानें विचारलें.

" म्हणजे ? इतका वेळ तुम्ही इथें आहां, मुद्दाम चौकशी करण्यासाठीं उभे राहिला, तरी एवढेंदेखील तुम्हांला कळलें नाहीं ? "

" नाहीं ! "

" मग तुम्ही इतका वेळ इथें उभे राहून काय करीत होतां ? "

" ते त्या बायकांचीं तोंडें पहात होते." चमेलीसिंग जवळच उभा होता, तो घुश्शांत येऊन म्हणाला, " मी सकाळपासून त्यांचीं लक्षणें पहातों आहें, एखादी तरुण व सुंदर स्त्री दिसली, कीं तिच्या मागोमाग रेंगाळण्यापलीकडे ते कांहीं-देखील करीत नाहींत."

कालिदासाला त्या बोलण्याचा राग आला. तो भवानीरामाला म्हणाला, " भवानीराम ! तुमच्या देखत तुमच्या परिचित माणसाकडून माझा–भदावरच्या ह्या विद्वन्मुकुटमणि राजकवीचा–धडधडीत अपमान होतो आहे. मला वाटतें, तुम्हीं माझा मुद्दाम पाणउतारा करण्याला त्याला शिकविलें आहे. माझा उत्कर्ष तुम्हांला सहन होत नाहीं. तुम्ही माझे प्रतिस्पर्धी आहां ! पण तुमचा दर्जा काय व माझा दर्जा काय ? " भवानीरामाला कालिदासाच्या या अस्थानीं वाचाळतेचा राग आला. तरीही तो शक्य तों आपलें मन शांत ठेवीत होता. तो ओशाळा झाला असें कालिदासाला वाटून तो पुढें म्हणाला, "याद राखा भवानीराम ! तुम्हांला या आगळिकीबद्दल अनुराधसिंगजींसमोर जाबद्यावा लागेल. मी तुम्हांला बरोबरीच्या नात्यानें वागवीत आलों म्हणून तुम्हीं माझ्या डोकीवर बसावें काय ? आधीं मला सांगा, तुम्ही व मी एकाच कामगिरीवर निघालों असतांना माझ्या संमतीशिवाय तुम्हांला ह्या घालमेली करण्याचें कारण काय ? "

कालिदासाचे हे बोल भवानीरामालाच काय पण चमेलीसिंगालाही चीड आणणारे होते. चमेलीसिंग भवानीरामाला म्हणाला, " भवानीराम ! अनुराध-सिंगजींच्या दरबारीं राजकवि म्हणून प्रख्या पावलेली ती हीच स्वारी काय ? "

" होय." भवानीराम नावेंत चढतां चढतां उत्तरला.

" होय. तोच मी ! " कालिदास आढ्यतापूर्वक म्हणाला, " आतां तरी तुला

माझी ओळख पटली ना? मग मुकाटपणें माझ्या झालेल्या अपराधाबद्दल अगोदर माझी क्षमा माग. मी उदार अंतःकरणानें क्षमा करण्याला तयार आहें."

"पुरे झालें." चमेलीसिंग कालिदासाला कोंपरापासून हात जोडून म्हणाला, "माझे आई! तुम्ही आपले तुमच्या धन्यांच्या विलासमंदिरांतील नखरेल छेलछबेल्यांवर शृंगारगीतें रचून धन्यांचें चित्तरंजन करण्यासाठीं माघारे जा कसे!" तो लगेच भवानीरामाकडे वळून म्हणाला, "भवानीराम! ह्या विदूषकाच्या नादीं लागून तुम्ही वेळ गमवूं नका, अगोदर आपल्या कामगिरीवर जा कसे! पुढील सर्व व्यवस्था मीं तुम्हांला सांगितल्याप्रमाणें होईल." लगेच त्यानें नावाड्यांना सूचना केली, "नौका हाकारून वेगानें चला."

प्रकरण पंधरावें

# भागाबाईचा दूत

त्याच क्षणीं नौका चालू झाली. भवानीराम कालिदासाला हांक मारून म्हणाला, " कालिदास ! तुमचा सटवोजी तुम्हांला भेटला, कीं त्याच्या ओळखीनें दाभाड्यांची मदत मिळवून चंद्रशेखर एथें नाहीं तों एथलें काम साधेल तेवढें करून साधा. काम कोणतें तें तुमच्या ध्यानीं आलेंच असेल."

कालिदासानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. नाव वेगानें निघून गेल्यावर चमेलीसिंग तेथून मागें वळला. नदीच्या कांठानें झप् झप् पावलें टाकीत तो चालूं लागला ! देवालयापासून त्याच्या मागोमाग भिक्षा मागत हिंडणारा भिक्षेकरी अजून तेथेंच रेंगाळत होता. त्यानें चमेलीसिंगाला हांक मारून विचारलें, " भाई ! तूं तिकडे कुठें चाललास ? "

" मी जातों आतां घरीं, रात्र पडूं लागली." असें उत्तर देऊन चमेलीसिंग तसाच घाईनें निघून गेला. कालिदास मात्र थोडा वेळ मानखंडित होऊन तेथेंच उभा होता. " ठीक आहे ! भवान्या ! तूं माझा अपमान केलास काय ? पण आजच कशाला बोलूं ? प्रथम सटवोजीच्या ओळखीनें दाभाड्याचें साह्य मिळवून भागाबाईला हस्तगत करीन, तिला शहाजाद्याच्या विलासमंदिरांत पाठवून शहाजाद्याची बहाल मर्जी संपादन करीन, आणि मग त्यापाशीं त्याच्या जोरावर—भवान्या ! शहाजाद्याकडून उलट्या गाढवावरून तुझी धिंड काढवीन, तर नांवाचा कालिदास ! आणि तो कवडी किंमतीचा बेलविक्या—पण माझ्यासारख्या थोरांनीं असल्या हलकट माणसांच्या नादीं लागणें शोभत नाहीं. ज्याच्या त्याच्यावर भुंकणें हा कुत्र्याचा स्वभावगुणच पडला. हत्तीनें त्या भुंकण्याकडे लक्ष्य कां म्हणून द्यावें ?"

हें कालिदासाचें मनोराज्य आणखी कोठवर विस्तारलें असतें याला सीमा नाहीं. पण तेवढ्यांत तो भिक्षेकरी त्याच्यापाशीं येऊन भिक्षा मागूं लागला, त्यामुळें त्याचें मनोराज्य खोळंबून पडलें. त्याबद्दल त्या भिक्षेकऱ्याला वास्तविक शिव्याच मिळावयाच्या, पण तो भिक्षेकरी पडला चतुर ! त्यानें 'धनी ! कविराज ! तुम्ही शब्दसृष्टीचे ईश्वर आहां ! गोमतीच्या पुण्यशील संगमाप्रमाणें तुमच्या ठायीं विद्वत्ता व कवित्व यांचा गोड संगम झाला आहे. रवि-शशि-नक्षत्रांच्या तेजालाही

लाजविणारें तेज तुमच्या मुखावर झळकत आहे...' वगैरे स्तुतिपूर्ण शब्दांचा कालिदासावर प्रथम नुसता वर्षाव करून भिक्षा मागितली. तेव्हां कालिदास इतका प्रसन्न झाला कीं, त्यानें चट्कन् एक मोहोर काढून त्याला बक्षीस दिली. भिक्षेकरी कालिदासाला दुवा देऊन तेथून निघून गेला.

सटवोजीनें सूर्यास्तापूर्वी ओंकारेश्वराच्या देवालयापाशीं भेटण्याचें कबूल केलें होतें, त्याप्रमाणें सूर्यास्ताचा समय झाला असें पाहून कालिदास देवालयासमोर संकेतस्थलीं जाऊन उभा राहिला. तेथें तो चांगला काळोख पडूं लागेपावेतों तिष्ठत उभाच होता. जसजसा काळोख पडूं लागला, तसतशी कालिदासाला चिंता पडूं लागली कीं, आतां रात्रीची सोय काय करावी ! त्रिभुवनेश्वराच्या मंदिरांत वाढलेलें ताट सोडून पळ काढावा लागल्यापासून या क्षणापर्यंत अन्नाची व त्याची भेट नव्हती. दोन प्रहरची भूक त्यानें तेथें मिळणाऱ्या फलाहारावर कशीबशी भागविली होती; पण आतां त्याला अन्नाहाराची तीव्र आवश्यकता भासूं लागली होती. तशांत तेथें थंडीही मी म्हणत होती. सटवोजी भेटता तर ते दोघेही कोठेंतरी मुक्कामाला गेले असते, पण तो भेटेना, यास्तव कालिदासाला त्याची वाट पहात तेथें उभें रहाणें तर अवश्य, व भूक आणि थंडी तर बेसुमार छळूं लागलेली !

या संकटांतून पार पाडण्यासाठीं कालिदास मनोभावानें ओंकारेश्वराला आळवूं लागला. तों ज्या भिक्षेकऱ्यावर त्यानें थोड्या वेळापूर्वी उपकार केले होते तो भिक्षा मागत मागत त्याच्यापाशीं येऊं लागला. त्या भिक्षेकऱ्याबरोबर एक घोडेस्वारही तेथें आला.

" कवीश्वर ! " त्या भिक्षेकऱ्यानें कालिदासाला हांक मारली.

" कोण ? " कालिदासानें विचारलें.

" हा एथील चंद्रशेखरांचा दूत तुम्हांला आपल्या वाड्यांत नेण्यासाठीं आला आहे." भिक्षेकरी उत्तरला.

" आपणच कविराज कालिदास काय ? " त्या दूतानें नम्रपणानें विचारलें.

" होय. हें तुम्हांला कोणीं सांगितलें ? " कालिदासानें सहर्ष चित्तानें विचारलें.

" आपण राजा भवानीरामांचे मित्र ना ? " घोडेस्वारानें पुन्हा विचारलें.

" होय. पण हें तुम्हांला काय माहीत ? "

" आमच्या बाईसाहेबांनीं आपणांला आजची रात्र वाड्यांत पाहुणचार घेण्याची विनंति केली आहे. या भिक्षेकऱ्यानें सहज आपलें गुणवर्णन केलें, तें ऐकून बाईसाहेब आपल्या सत्सहवासासाठीं उत्कंठित झाल्या आहेत."

" या तुमच्या बाईसाहेब कोण ? चंद्रशेखरांची एकुलती एक कन्या भागाबाई काय ?"

" होय, त्याच."

" आणि त्यांनीं मला बोलाविलें आहे ?"

" होय."

कालिदासाला तें आमंत्रण ऐकून किती आनंद झाला, याचें वर्णन त्याचें त्याला—खुद्द कवीलादेखील करतां येणें अशक्य होतें; मग इतरांची काय कथा ! कालिदास प्रसन्न वदनानें उद्गारला, " गहन अरण्यांत वाट चुकलेल्या वाटसरानें वाट सांपडण्यासाठीं परमेश्वराची प्रार्थना करावी व परमेश्वरानें त्याला वाटच काय, पण पालखी पाठवून द्यावी, तसा प्रकार झाला. मी संकटमुक्त होण्यासाठीं ओंकारेश्वराला आळवीत होतों, तों पाहुणचाराचें आमंत्रण चालत आलें !"

भिक्षेकऱ्यानें त्या घोडेस्वाराकडे पाहिलें व घोडेस्वारानें भिक्षेकऱ्याकडे पाहिलें. घोडेस्वार म्हणाला, " कवीश्वर ! बाईसाहेबांनीं आपणांला आणण्यासाठीं पालखी पाठविण्याची मला आज्ञा केली आहे; पण मीं मनांत म्हटलें कीं, आधीं आपला तपास करावा व मग पालखी पाठवावी."

" इतक्या तुमच्या बाईसाहेब माझ्यावर प्रसन्न झाल्या आहेत ?"

" होय ! आपल्या काव्यनैपुण्याचा कीर्तिडंका त्रिभुवनांत दुमदुमत आहे; व कवि, चित्रकार, गायक, तंतुवादननिपुण वगैरे कलावंतांविषयीं बाईसाहेबांना अत्यंत आदर वाटतो. आपलें वास्तव्य एथें असल्याची बातमी कळतांच स्वतः बाईसाहेबच आपणाला भेटावयाला येणार होत्या. पण आम्हींच त्यांना विनंति केली कीं, येऊं नका. कारण कीं, मग बाईसाहेबांच्या मनांतील गोष्ट साधण्याला नसते अडथळे येतील."

" त्यांच्या मनांत अशी कोणती गोष्ट आहे ?"

" समजा, मंडलोईंची मंडळी आजूबाजूला असती," तो स्वार एकवार सभोंवतीं चौफेर नजर फेंकून म्हणाला, " आणि मंडलोईंच्या शत्रुपक्षाशीं बाईसाहेब कलत्या आपलेपणानें वागतात, बादशाहीपक्षाचें मंगल इच्छितात, असें त्यांना

कळलें, तर ती सावध व्हावयाची व अखेर मंडलोईची सासरवाशीण होण्याचेंच बाईसाहेबांच्या कपाळीं यावयाचें ! ''

" म्हणजे ? " पूर्ण उमललेल्या कमलाप्रमाणें आपलें मुखकमल फुलवून मंजुळ स्वरानें कालिदास उद्गारला, " भागाबाईसाहेब एकूण बालकर्णाशीं लग्न लावावयाला तयार नाहींत तर ? "

तो स्वार कालिदासाच्या कानाशीं लागून हळूच म्हणाला, " पण या गोष्टीची कोठेंही वाच्यता होतां कामा नये. भवानीरामांना हें कळलें तर–ते सुतानें स्वर्गाला जाणारे मनुष्य आहेत, शिवाय मंडलोईंचे गुप्त हेर इथें भ्रमण करीत असण्याचा फार संभव आहे. यास्तव आपण प्रथम वाड्यांत चला, मग तेथें बाईसाहेबच खुल्या दिलानें आपणांला सर्व कांहीं सांगतील. सारी रात्र आपलीच आहे. आपणासाठीं पालखी पाठवूं का ? कीं आपला घोडा आहे ? "

" माझा घोडा नाहीं.–पण पालखीही नको. आपणाला एथून राजरस्त्यानेंच जावयाचें ना ? "

" होय."

" मग आपण दोघेही चालत बोलत जाऊं."

" बरें तर, चालतच जाऊं." असें म्हणून तो स्वार घोड्यावरून खालीं उतरला व कालिदासासमवेत चालूं लागला. मार्गानें जातां जातां त्यानें विचारलें, " पण तुम्हांला मी एथे असल्याची खबर कशी मिळाली ? "

" मीं–मीं त्यांना खबर दिली. मी भिक्षेसाठीं वाड्यांत गेलों होतों तेव्हां अमक्यातमक्या थोर गृहस्थांनीं मला एक मोहोर दिली तशीच तुम्हींही द्या असें मीं बाईसाहेबांना–त्या वेळ घालविण्यासाठीं गच्चीवर उभ्या असलेल्या पाहून विनविलें. भिकाऱ्याला मोहोरा वांटणारा हा उदारधी कोण अशी त्यांनीं कौतुकानें चौकशी केली व मीं आपली माहिती सांगितली.'' भिक्षेकरी म्हणाला.

" बाईसाहेबदेखील आपली मार्गप्रतीक्षा करीत होत्या. आपण आज इथें येणार असें भवानीरामांकडून बाईसाहेबांना कळलें होतें; व आपली कीर्ति त्यापूर्वींच त्यांच्या कानीं आली होती. तेव्हांपासून आपणाला भेटण्याची बाईसाहेबांची फार इच्छा होती. त्यांनीं भवानीरामांपाशीं ती इच्छा प्रकट केली तेव्हां त्यांना मत्सर वाटूं लागला व ते आपल्या दोषांचा पाढा बाईसाहेबांसमोर वाचूं लागले. पण बाईसाहेबांनीं त्यांच्यावर विश्वास ठेवण्याचें साफ नाकारलें. त्या उद्यां सकाळ-

पावेतों आपली वाट पाहून मात्र सकाळींच मला आपल्या शोधावर पाठविणार होत्या. तोंच हा भिक्षेकरी भेटला."

"आपली माहिती बाईसाहेबांना सांगितली, तेव्हां मी देवदूत भेटलोसें बाईसाहेबांना वाटलें व त्यांनीं मला एक मोहोर बक्षीस दिली!" भिक्षेकरी आपल्या पदरची मोहोर कालिदासाला दाखवीत म्हणाला.

कालिदासानें ती मोहर उजेडांत निरखून पाहिली असती तर आपण दिलेली तीच ती मोहोर होय असें त्या आढळून आलें असतें. मग त्याला भिक्षेकऱ्यानें पदरीं दुसरी मोहोरच नाहीं म्हणून ती दाखविलेली असो, कीं चुकून दाखविलेली असो. पण कालिदासानें त्या मोहोरेची इतकी चिकित्सा मुळींच केली नाहीं. चिकित्सा करावयाला त्याचें चित्त ठिकाणावर कोठें होतें! तें केव्हांच कविकल्पनेच्या विमानांत बसून चंद्रशेखराच्या वाड्यांतील भागाबाईच्या विश्रांतिस्थानीं जाऊन तिच्या मुखकमलासमोर मधुलोलुप भृंगाप्रमाणें मञ्जु गुञ्जारव करीत होतें. भागाबाई आतां शहाजाद्याची प्रियतमा होणार, उद्यां दिल्लीची बादशाहीण शोभणार; सर्व अमीर-उमराव राजेरजवाडे वगैरे श्रेष्ठ लोकांचीं मस्तकें तिच्यासमोर नमणार; अशी ती प्रतिमहादेवी आपणाविषयीं इतका आदर व्यक्त करते व आपल्या भेटीसाठीं आत्यंतिक उत्कंठेनें आपली मार्गप्रतीक्षा करीत बसते, हें ऐकून कालिदासाला आकाशदेखील ठेंगणें झालें होतें. तशांत आणखी ती भवानीरामाचा तिरस्कार करते असें ऐकून तर तो कमालीचा उल्लू बनून गेला होता. 'आतां मी वाड्यांत गेल्यावर भागाबाई मला अत्यादरपूर्वक उत्थापन देईल, घटकांच्या घटका तिचा सौंदर्यसंपन्न मुखचंद्रमा मला मनसोक्त निरखून पहातां येईल; उद्यां ती शहाजाद्याच्या जनानखान्यांत गेल्यावर जिला तिच्या नखाचेंही दर्शन होण्याचा संभव नाहीं; तिच्याशीं आज आपली मैत्री जमून तिच्या शेजारीं बसून गुजगोष्टी करण्याची सोन्याची संधि मला मिळाल्यावर हीच मैत्री अखेरपावेतों कायम राहील; मग मला उभ्या जन्मभर थेट बादशहाच्या जनानखान्यापावेतों प्रवेश मिळेल; त्यामुळें जनानखान्यांतील एकीहून एक सुंदर अस्मानच्या परींचें दर्शन व परिचय मला होईल; त्या परिचयाचें मैत्रींत रूपांतर होईल; मग शहाजादे बादशहादि खाशांचा थाट एकीकडे व माझा थाट एकीकडे! शहाजादा काय किंवा बादशहा काय, आपल्या प्रियतमांच्या मुठींतील कळसूत्री बाहुलीं! मी काव्यसृष्टींतील सारें धातृत्व खर्च करून भागाबाईच्या स्तुतिपर

रसाळ कवनें शहाजादा व भागाबाई यांच्यासमोर गाऊन दाखवीन; त्यामुळें शहाजादा खूष होऊन भागाबाईला प्रतिदेवता मानूं लागेल; भागाबाई मग माझ्यावर निहायत खूष होऊन आपल्या वक्षःस्थलावरील तिळाप्रमाणें माझ्याविषयीं कळकळ बाळगूं लागेल; तिच्यावर आपली पूर्ण छाप बसेल व तिची छाप शहाजाद्यावर असल्यामुळें तिच्या वशिल्याच्या जोरावर मी साऱ्या बादशहातीची मनसोक्त उलथापालथ करूं शकेन. भवानीरामानें माझा अपमान केला नव्हे काय ? त्याचा मी एकदां सोडून सहस्रदां अपमान करीन व त्याच्यावर शहाजाद्याची खप्पा मर्जी झाल्यावर त्याला अन्नाला मोताद करून माझ्या देवडीवरचा हुजऱ्या बनवून सोडीन'. असें मनोराज्य करण्यांत गुंगून गेलेल्या कालिदासानें त्या भिक्षेकऱ्याला आपल्या या अकल्पित भाग्योदयाचा प्रवर्तक समजून आणखी एक मोहोर बक्षीस देऊन सांगितलें, " हें पहा, तूं एक काम करशील का ? "

" जी हां ! तें कोणतें ? " भिक्षेकऱ्यानें मोहोर घेऊन कालिदासाला विचारलें

" पण अगोदर मला तुझें नांव सांग."

" माझें नांव मोहनलाल."

" बरें, मोहनलाल ! दोन प्रहरीं एथें माझ्याबरोबर एक तरुण होता त्याला तूं पाहिलें असशीलच."

" होय."

" सटवोजी त्याचें नांव. तो आतां इथें आला तर त्याला ठाकूरजींच्या वाड्याकडे पाठवून दे. तो येईपावेतों तूं इथेंच उभा रहा. एवढें काम तूं नीट बजावलेंस तर तुला आणखी एक मोहोर बक्षीस देईन."

मोहनलालनें ती गोष्ट आनंदानें मान्य केली. कालिदास त्या स्वाराबरोबर चंद्रशेखराच्या वाड्याकडे जावयाला निघाला. दुर्गंधियुक्त वस्तूचा दुर्गंध जसा त्या वस्तूपासून दूरवर दरवळत जातो, तशी कालिदासाची दुराभिलाषबुद्धि कविकल्पनांचे पंख लावून भराऱ्या मारीत त्याच्या पुढें चालली. कविकल्पनांच्या पायावरील मनोरथांचे मनोरे जर आकाशाच्या पोकळीप्रमाणें पोकळ नसून भरींव असते, तर जग किती दुष्ट चमत्कृतिगर्भ झालें असतें व जगांत काय काय अनर्थ माजले असते कोण जाणे !

प्रकरण सोळावें

# पिलाजी जाधवांवर संकट

पूर्वेचा सूर्य वेळीं पश्चिमेला उगवेल; पण मंडलोईंची स्वदेश व स्वधर्म यांवरची निष्ठा ढळावयाची नाहीं इतका बाजीराव पेशव्यांचा मंडलोईंवर* विश्वास असल्यामुळेंच मांडवगड काबीज करण्याबद्दल प्रतिपक्षाचीं कारस्थानें चालल्याचें ऐकूनदेखील मांडवगडाविषयीं यत्किंचित्सुद्धां धास्ती मनांत बाळगण्याला बाजीराव तयार नव्हते. इतकेंच काय पण मांडवगडच्या साऱ्या टापूंत शत्रुपक्षाच्या मुंगीलाही रीघ मिळावयाचा नाहीं व कोणी कौशल्य लढवून धाडसानें दुष्ट हेतु मनांत धरून त्या भागांत गेलाच तर मंडलोईंना तें सहन न होऊन दिव्यावर पतंगाची झडप पडावी तशी मंडलोईंच्या हातून त्या बिचाऱ्याची गत होईल, अशी बाजिरावांची खात्री होती. या उप्परही कदाचित् एकट्या मंडलोईंना नर्मदेच्या सर्व उतारांवरील बंदोबस्त राखणें वेळींवखतीं अवघड गेल्यास त्यांना

---

* इंदूरचे जमीनदार मंडलोई हे भारद्वाज गोत्री गौड ब्राह्मण नर्मदेच्या उत्तर तीरावरील प्रांतांत मोठे वजनदार होते. त्यांच्याच मदतीनें मराठ्यांचा माळव्यांत प्रवेश झाला. त्यांचें मूळ ठिकाण इंदूरपासून सुमारें अठरा मैलांवर कंपेल या नांवाचें गांव असून तेव्हां तें उज्जैन सरकारांत मोडत असे. इ० सन १७२४ च्या सुमाराला कंपेल परगणा मोडून इंदूर परगणा झाला. सध्यांचें इंदूर शहर ह्या मंडलोईंनींच प्रथम वसविलें. नंदलालपुरा, तेजकर्णपुरा, निहालपुरा वगैरे इंदुरांतील पुऱ्यांचीं नांवें मंडलोई घराण्यांतील पुरुषांच्या नांवांवरून पडलीं आहेत. राव नंदलाल मंडलोई हा या वंशांतील पहिला मोठा पराक्रमी पुरुष होय. माळवा व नेमाड हे दोन प्रांत याजकडे होते, त्यांच्याबद्दल सालीना रु. २५००० वसूल तो बादशहाला देत असे. पुढें हाच वसूल तो बाजीराव व जयासिंग यांना देऊं लागला. राव नंदलाल याला बादशहाकडून मिळालेली तरवार अद्यापि त्याच्या घराण्यांत संभाळून ठेवण्यांत आलेली आहे. राव नंदलाल चौधरी इ०सन १७३१ मध्यें वारला. त्याच्या मागें राव तेजकर्ण या नांवाचा ह्याचा पुत्र होता. तेजकर्णाला निहालकर्ण, जेतकर्ण आणि बालकर्ण असे तीन पुत्र होते.

जोड म्हणून बाजिरावांनीं पिलाजी जाधवांना विशेषतः बांडाघाट व भैरवघाट ह्या दोन घाटांच्या बंदोबस्तासाठीं बऱ्याच दिवसांपासून तिकडे ठेवून दिलें होतें. बाजिरावांच्या अपेक्षेप्रमाणें पितापुत्र मंडलोई व पिलाजी जाधव यांनीं एकमतानें वागून त्या भागांत चांगलीच आबादीआबाद राखली होती. पण होणारी गोष्ट टळत नाहीं! त्याच सुमाराला बालकर्ण व भागाबाई यांचा विवाह ठरला; तो मार्गशीर्षांतील अखेरच्या मुहूर्तावर आटोपून घ्यावयाचें ठरलें व मंडलोई त्या विवाहसमारंभाच्या गर्दींत बरेचसे गुरफटून गेले.

राव तेजकर्ण मंडलोई यांच्या मध्यस्थीनेंच पिलाजी जाधवांचा ज्येष्ठ पुत्र सटवोजी जाधव याचा सुलतानपूरचे सुप्रसिद्ध धनवान् देशमुख खासेराव यांच्या काशीबाई या नांवाच्या उपवर कन्येशीं विवाह ठरला होता. सदर विवाहाचा योगायोग मात्र कांहीं विलक्षण होता. तो विलक्षण म्हणण्याचें मुख्य कारण असें कीं, खासेराव देशमुख हे ओंकारेश्वराच्या चंद्रशेखर चौधऱ्यांचे अंकित असून शिवाय निजामाच्या पदरीं असलेल्या रावरंभा निंबाळकराच्या घराण्याशीं देशमुखांचा फार दिवसांचा ऋणानुबंध होता. चंद्रसेन जाधवांबरोबरच* मराठशाहीशीं बेइमान होऊन मोगलांचें दास्य पत्करणाऱ्या मूठभर स्वाभिमानशून्य मराठे सरदारांतच खासेराव देशमुखांची गणना होत असे. मंडलोई, मल्हारराव होळकर वगैरे मातबर लोकांच्या भगीरथ प्रयत्नांनीं इंदूर-मांडवगडाच्या टापूंतील—किंबहुना उभ्या अर्ध्या माळव्यांतील बहुतेक ठाकूर-चौधरी हिंदवी स्वराज्याप्रीत्यर्थ मराठ्यांच्या भगव्या झेंड्याखालीं उभे राहून बादशाही सत्तेशीं झगडण्याला तयार झाले; पण जे थोडे लोक तयार झाले नव्हते, त्यांपैकींच खासेराव हा

* चंद्रसेन जाधव हा शाहूमहाराजांचा सेनापति धनाजी जाधवांचा मुलगा. तो जणुं सूर्यापोटीं शनैश्वर जन्माला आला होता. धनाजी जाधवांचा पेशव्यांवरील लोभ सहन न होऊन चंद्रसेन क्षुल्लक कारणावरून बाळाजी विश्वनाथ पेशव्यांशीं भांडून शाहूमहाराजांचा पक्ष सोडून निघाला व मोगलांना जाऊन मिळाला तेव्हां निंबाळकर वगैरे इतर कांहीं मराठेही मोगलांकडे गेले. प्रस्तुत मालेंतील 'पेशवाईची प्राणप्रतिष्ठा', 'पेशवाईचें ध्रुवदर्शन,' 'पेशवाईचा ध्रुव ढळला!' व 'पेशवाईचा पुनर्जन्म' वगैरे कादंबऱ्यांतून चंद्रसेनाच्या कुटिल कारस्थानांचा वृत्तान्त आला आहे.

एक होता. अशा नेभळट वृत्तीच्या स्वाभिमानशून्य माणसाच्या मुलीशीं पिलाजी जाधवांसारख्या कट्टया हिंदवी स्वराज्याभिमान्याच्या मुलाचें लग्न जुळण्याचा हा विचित्र योगायोग काय, असें आश्चर्य तेव्हां अनेकांना वाटलें. पण जशी भागाबाई व बालकर्ण यांच्या विवाहाची गोष्ट आश्चर्योत्पादक होती, तशीच हीही.

वस्तुतः खासेराव देशमुखाच्या मनांतून पिलाजी जाधवाच्या घराण्याशीं सोयरिक करावी असें मुळींच नव्हतें. ज्या चंद्रसेन जाधवाच्या आश्रयानें खासेराव मराठशाही सोडून यवनसेवक बनला, त्या चंद्रसेनाच्या मध्यस्थीनें आपली काशीबाई रावरंभा निंबाळकराच्या कुटुंबांतील माणकोजी या नांवाच्या उमद्या तरुणाला अर्पण करण्याचें त्यानें ठरविलें होतें. खासेरावानें हा संबंध ठरविला होता असें म्हणण्यापेक्षां निंबाळकरांनीं आपण होऊनच माणकोजीला काशीबाई फार पसंत पडल्यामुळें खासेरावापाशीं काशीबाईला मागणी घातली होती असें म्हणणें जास्त सयुक्तिक झालें असतें. परंतु काशीबाई ही भागाबाईप्रमाणेंच अगदीं निराळ्या वृत्तीची तेजस्वी कुमारिका होती. निंबाळकरासारखा देशद्रोही पति आपल्या कपाळीं यावा असें तिला मुळींच वाटत नव्हतें. असें होतें तरी या लग्नसंबंधाला उघड उघड नकार देण्याइतकें धैर्य काशीबाईच्या अंगीं नव्हतें. पण सदिच्छा बलवत्तर असल्यावर त्या इच्छेला परमेश्वराचें पाठबळ मिळालें नाहीं असें कधींतरी झालें आहे? काशीबाई व माणकोजी यांचा विवाह ठरला; मार्गशीर्षाच्या दुसऱ्या पंधरवड्यांत सुलतानपूर मुक्कामीं विवाहसमारंभ व्हावयाचा असें नक्की झालें. इतक्यांत त्याच सुमाराला गजराबाई पाहुणी म्हणून खासेरावाच्या घरीं आली.

बांडे हे मराठ्यांच्या पक्षाचे व खासेराव निजामाच्या पक्षाचा; असें असताही गजराबाई खासेरावाच्या घरीं पाहुणचाराला आली याचें कारण त्या दोन घराण्यांचा कैक पिढ्यांपासूनचा ऋणानुबंध होय. गजराबाई व काशीबाई यांची तर जीवश्च कण्ठश्च मैत्री होती. गजराबाईला काशीबाईचें लग्न माणकोजीशी होणार हें कळतांच फार खेद झाला, व तिनें खासेरावापाशीं त्याविषयीं आपली नापसंती स्पष्ट शब्दांत प्रगट केली. खासेरावाच्या मनावर जरी ह्या नापसंतीचा फारसा परिणाम झाला नाहीं, तरी काशीबाईच्या मनावर फार परिणाम झाला; व तिनें गजराबाईपाशीं आपलें हृदय उघडें केलें. काशीबाईवर गजराबाईचा मैत्रीणच्या नात्यानें जितका लोभ होता, तितकाच लोभ सटवोजी जाधवावर तो तिच्या

एकनिष्ठ सेवक या नात्यानें होता. अर्थात् हें सेव्य-सेवकाचें नातें गजराबाईचें मल्हारराव बांड्यांशीं लग्न होण्यापूर्वीचें—ती शाहूमहाराजांची राजकन्या या नात्यानें सातार्‍याच्या राजवाड्यांत रहात होती तेव्हांचें होतें; एरव्हीं जाधव बांड्यांपेक्षां सांपत्तिक दृष्ट्या तर लेशमात्र कमी प्रतीचे नव्हते, व स्वाभिमान आणि मर्दुमकी या दृष्टीनें विचार करतां बांड्यांपेक्षां जाधवांची योग्यता अनेक पटींनीं थोर होती. बांडे शाहूमहाराजांशीं सोयरीक करून जेवढ्या श्रेष्ठपदाला पोंचले होते, त्यापेक्षां अनेक पट श्रेष्ठता पिलाजी जाधव व सटवोजी जाधव यांनीं स्वपराक्रमाच्या जोरावर संपादन केली होती. तात्पर्य, पिलाजी जाधवांच्या घराण्याशीं ऋणानुबंध ही गजराबाईला अभिमान वाटण्याजोगी गोष्ट होती, व त्या अभिमानाला साजेसेंच गजराबाई आणि सटवोजी यांचें एकमेकांवर बहीणभावंडांप्रमाणें प्रेम होतें. जाधवांना गुजराथेंत मुलुखगिरीच्या निमित्तानें वारंवार यावें लागे; व बांडयांनींही खानदेशांतच आपलें कायमचें वास्तव्य केल्यामुळें एकमेकांना एकमेकांकडे जाण्याचे प्रसंग वारंवार येत. अशाच एका प्रसंगीं थोडया दिवसांपूर्वी सटवोजी गजराबाईच्या घरीं आला असतांना काशीबाईही आली होती. तेथें काशीबाई व सटवोजी यांची ओझरती भेट व बोलभाषाही झाली होती. गजराबाई पट्टीची मार्मिक असल्यानें सटवोजीनें त्या भेटींत काशीबाईकडे स्नेहमय दृष्टीनें पाहिल्याचें तिच्या ध्यानीं आल्याशिवाय राहिलें नाहीं. त्यानंतर गजराबाईनें सटवोजीला एकटा गांठून त्या विषयाची फोड करून घेतली; तेव्हां तिला कळून आलें कीं, सटवोजीचें काशीबाईवर मन बसलें आहे.

पण तो विषय तेव्हां तेवढ्यावरच राहिला, व त्यानंतर गजराबाई देशमुखांच्या घरीं येते तों काशीबाईचें लग्न ठरूनदेखील गेलें! आतां सटवोजीविषयीं गोष्ट काढण्याचा समय निघून गेला अशा समजुतीनें गजराबाई प्रथम गप्प बसली; पण स्वतः काशीबाईच या लग्नसमारंभाला प्रतिकूल आहे असें जेव्हां तिनें पाहिलें, तेव्हां मात्र तिनें सटवोजीचें काशीबाईशीं लग्न जमविण्याचें मनावर घेतलें. प्रथम तिनें काशीबाईपाशीं गोष्ट काढून पाहिली. काशीबाईला सटवोजीची प्रत्यक्ष ओळख फारशी नसली तरी, त्याची कीर्ति ऐकून चांगलीच माहीत होती. किंबहुना बांड्यांच्या घरीं सटवोजीची व काशीबाईची ओझरती ओळख झाली होती तेव्हांच सटवोजीशीं आपला विवाह झाला तर फार चांगलें होईल अशी गोड आशा तिच्या अंतःकरणांत स्थगम पावली होती. पण या आशापूर्तीच्या मार्गांत दोन जबरदस्त अडचणी होत्या.—

एक तर पिलाजी जाधव ही फारच भारी असामी; व दुसरें, खासेराव देशमुख हे बोलून चालून प्रतिपक्षीय!—या दोन्ही अडचणींची काशीबाईला यथावत् जाणीव असल्यानें तिनें सटवोजीविषयींची आशा न करण्याला आपल्या मनाला वेळींच बजावून ठेविलें होतें. पण एखाद्याला प्रिय असणारी वस्तु ज्या मानानें दुष्प्राप्य असेल त्या मानानें ती परमप्रिय वाटावयाची हा निसर्गाचा सर्वसामान्य नियमच आहे. या नियमाला अनुसरून काशीबाईनें सटवोजीविषयीं जरी तो आपला भावी पति या नात्यानें मनांत अभिलाषबुद्धि जोपासून ठेविली नाहीं, तरी सटवोजीला तिच्या हृदयांत जें स्थान एकदां मिळालें तें चिरकालचेंच मिळून राहिलें होतें. पुढें गजराबाईनें काशीबाईपाशीं ही गोष्ट काढली तेव्हां काशीबाईचें त्या योजनेला ताबडतोब पाठबळ मिळालें. नुसतें पाठबळ मिळालें इतकेंच नव्हे, तर काशीबाईनें सटवोजीशीं आपलें लग्न व्हावें म्हणून इतकी उत्सुकता दाखविली कीं, ती काशीबाईच्या मनाची चांचल्यमय स्थिति अवलोकन करण्याला गजराबाईच्या ऐवजीं थोडी कमी प्रेमळ व कांहींशी परकी नातलग किंवा मैत्रीण असती तर तिनें काशीबाईला उल्लू ठरविण्यालाही कमी केलें नसतें!

काशीबाईकडून याप्रमाणें मान्यता मिळविल्यावर काशीबाईचें माणकोजीशीं ठरलेलें लग्न मोडण्याबद्दल खासेरावाला भीड घालण्याच्या कामीं गजराबाईला जास्त जोर आला. गजराबाईनें प्रथमच खासेरावापाशीं या लग्नसंबंधाबद्दल नापसंती दर्शविली तेव्हां खासेरावानें आपल्या नेमस्त वृत्तीला अनुसरून काशीबाईच्या इच्छेचा व गजराबाईच्या सूचनेचा अव्हेर जरी केला नाहीं, तरी 'माझ्या मुलीला माणकोजीइतका तरी लायक पति अन्यत्र कोठें मिळणार आहे' व 'जर मीं माणकोजीला माझी मुलगी देण्याचें नाकारलें तर—निंबाळकर मातबर पडले, निजामापाशीं त्यांचा दांडगा वशिला, माझे धनी चंद्रशेखर चौधरी हेदेखील बाह्यतः नाहीं तरी मनांतून निजामाच्याच बाजूचे, या सर्वांचा माझ्यावर रोष झाल्यास म्यां गरिबानें मग काय करावें' अशा दोन—आपल्या मतें दुर्लंघ्य—अशा अडचणी पुढें मांडल्या होत्या. त्या अडचणींपार खासेरावाला कसें करावें याचा उपाय गजराबाईला त्या वेळीं न सुचल्याकारणानें कांहींशी निरुत्तर होऊन स्वस्थ बसली होती. ती तिची अडचण तिला पूर्वींच कळलेल्या सटवोजीच्या मनोदयामुळें जरी अंशतः दूर झाली होती, तरी ती काशीबाईच्या अंतःकरणाचा थांग तिला लागला नव्हता. न जाणो, आपल्या पित्याच्या शत्रुस्थानीं असणाऱ्या

तरुणाला मी वरणार नाहीं असें काशीबाई म्हणाली तर ! पण काशीबाईचें मनोगत माहीत होतांच गजराबाई मग कशाची डरते ? तिनें लगेच त्याच दिवशीं खासेरावांपाशीं पुन्हा तोच विषय काढून विचारलें, " खासेराव ! काशीबाईला माणकोजी हा पति पसंत नाहीं हें मी निश्चित सांगतें. या उप्परही तुम्ही तुमचाच हेका धरून तिच्या जन्माचें मातेरें करणार, कीं अनुरूप अशा अन्य एखाद्या वराशीं तिचें लग्न लावून देणार ?"

" गजराबाई ! माझ्या मार्गांतील अडचणी तुला माहीतच आहेत." खासेराव पूर्वपदावर येऊन म्हणाला.

" मला सर्व कांहीं माहीत आहे. पण त्या अडचणींतून पार पडण्याचा मार्ग मीं तुम्हांला दाखविला तर त्या मार्गानें जाण्याची तुमची तयारी आहे का ?"

" अर्थात् !"

"तर मग तुम्ही पिलाजी जाधवांच्या मुलाला आपली मुलगी कां नाहीं देत ?"

" पिलाजी जाधव !" खासेराव अंमळ विचार करून उद्गारला, " पिलाजी जाधव माझ्याशीं सोयरीक करण्याला तयार होतील का ?"

" मला वाटतें, कीं होतील."

" पण त्यांचा मुलगा सटवोजी तर फारच जहाल आहे. त्यानें काय म्हणून माझ्या मुलीला पदरांत घ्यावें ? एक तर वैभवाच्या व लौकिकाच्या दृष्टीनें मी त्यांच्या तोडीचा नाहीं; व दुसरें मी त्यांचा प्रतिपक्षीय आहें. माझ्याशीं सोयरीक करण्यांत त्यांना कमीपणाच वाटेल."

" त्यांना काय वाटेल तें आपण मग पाहूं. पण जर दैववशात् तो योग जुळून आला तर त्याला तुमचा प्रतिबंध नाहीं ना ? आतां तुम्हीं राजकीय पक्षभेदाची भाषा काढली, पण खासेराव ! तुम्ही अस्सल जातकुळीच्या मराठ्यांनीं मराठशाहीचा अभिमान सोडून मुसलमानांच्या नादानें आपल्याच मायदेशाला दास्यांत कुजविण्याला तयार व्हावें, यांत तुम्हांला भूषण वाटतें का ? मी शाहूमहाराजांच्या वतीनें म्हणून तुमच्याशीं हें बोलतें असें नाहीं. पेशवे-शिंदे-होळकर असे मोठमोठे रथी-महारथी महाराजांच्या वतीनें मराठशाहीचें सर्वांगीण वैभव शुक्लपक्षींच्या चंद्राप्रमाणें वर्धित करीत आहेत. एक देशमुख त्या सोहळ्यांत सामील झाला नाहीं म्हणजे सोहळा बिघडला असें नाहीं. हुलकुंडासाठीं कधीं लग्न मोडलें आहे ?— "

" तें सारें मला कळतें. पण त्या झाल्या गेल्या गोष्टींना आतां कांहीं इलाज नाहीं."

" कां ? इलाज कां नाहीं ? इलाज आहे. हेंच पहाना, चंद्रशेखर चौधरी तुमचे धनी ना ? "

" होय."

" ते देखील प्रारंभीं आम्हां मराठ्यांच्या विरुद्धच होते. पण मंडलोईनीं त्यांना पदरांत घेण्याचें ठरविलें, बालकर्णाचें भागाबाईशीं लग्न ठरलें, त्यामुळें मंडलोई व त्यांच्या निमित्तानें छत्रपतींचा उभा महाराष्ट्र त्यांचा पाठीराखा बनला कीं नाहीं ? नाहींपेक्षां या झगड्यांत मराठ्यांनीं चंद्रशेखरांना ते शत्रुपक्षाचे कैवारी म्हणून देशोधडीला लावायला कमी केलें नसतें. तुमच्यावरही आज ना उद्यां तोच प्रसंग आहे. यास्तव मी म्हणतें, तुम्ही आपल्या नाहीं तर आपल्या मुलीच्या पुण्याईवर तरी आपला गमावलेला लौकिक कमावून आपलें वैभव राखावें."

गजराबाईचा हा सावधगिरीचा उपदेश खासेरावाच्या अंतःकरणांत ठसण्याला फार वेळ लागला नाहीं. कारण 'तुम्ही पेशव्यांच्या पक्षाला मिळून त्यांचें स्वामित्व मान्य करावयाला तयार नसाल तर आम्हांला तुमचें योग्य शासन करणें प्राप्त होईल' असा निर्वाणींचा निरोप पिलाजी जाधवांकडून खासेरावाला नुक्ता दोन दिवसांपूर्वींच आला होता. पण ही नामुष्कीची गोष्ट म्हणून त्यानें कोणालाच —विशेषतः गजराबाईला याची दादही लागूं दिली नव्हती. अखेर खासेरावानें 'काशीबाईची पसंती असेल तर' ह्या सबबीवर जाधवांशीं सोयरीक करण्याचें मान्य केलें. लगेच गजराबाईनें मुद्दाम मंडलोईकडे मनुष्य पाठवून प्रथम त्यांची ह्या संबंधाला औपचारिक संमति मिळविली, व चंद्रशेखर हा मंडलोईचा व्याही व्हावयाचा असल्यानें त्यानेंही ह्या संबंधाला मुक्त कंठानें आपली मान्यता दिली. हा विवाह ठरला, व दोन्ही समारंभ मांडवगडावरच थाटानें पार पाडावयाचे असेंही ठरलें.

त्याच संबंधांत तिथिनिश्चयासंबंधीं वाटाघाट करण्याकरितां पिलाजी जाधव ज्या दिवशीं गजराबाई व काशीबाई ह्या ओंकारेश्वरच्या यात्रेला गेल्या होत्या त्याच दिवशीं सायंकाळीं मांडवगडावर आले होते.

पण काय असेल तें असो; पिलाजी जाधव त्या दिवशीं कुमुहूर्तावर मांडवगडाकडे यावयाला निघाले हेंच खरें. बांडा घाटाच्या पायथ्याशीं असलेल्या एका

खेड्यांतील प्रशस्त वाड्यांत त्यांनीं अलीकडे आपलें बस्तान ठोकलें होतें, तेथून मांडवगडावर येईपावेतों त्यांच्या मार्गांत एकीहून एक अवघड अडचणी अनाहूतपणें येऊन कोसळत होत्या. अगदीं पहिला अपशकून झाला तो असा कीं, अजमेरीसिंग व शिवासिंग हे दोघे रजपूत सरदार मांडवगडासभोंवारच्या जंगलांत ठाणें देऊन बसले असून मांडवगड काबीज करण्याचा त्यांचा विचार आहे अशी बातमी जाधवांना त्यांच्या हेराकडून कळली.ते आणखी थोडे पुढें जातात,तों सुलतानपुरावर माणकोजी निंबाळकरानें छापा घालून खासेरावासह त्याच्या घरच्या सर्व मंडळीला कैद करून नेलें अशी दुसरी दुर्वार्ता त्यांच्या कानीं आली. त्या वार्तेनें पिलाजींचें मन बरेंच विषण्ण झालें. काशीबाईचें सटवोजीशीं लग्न आतां होणें शक्य नाहीं म्हणून त्यांना वाईट वाटलें असें नाहीं. वस्तुतः काशीबाईची जाधवांच्या घरांत दासी शोभण्याचीही योग्यता नव्हती; व स्वतः जाधवांना मनापासून तोही संबंध घडून यावयाला नको होता.परंतु केवळ गजराबाईची व बाळ्यांची भीड व मुलाची आवड म्हणूनच त्यांनीं त्या संबंधाला मान्यता दिली होती. असें असतां माणकोजीनें खासेरावाच्या सर्व मंडळीला कैद करून नेल्याची बातमी कानीं येतांच जाधवांना वाईट वाटलें तें अशानें आपला अपमान होत आहे म्हणून. खासेराव आपल्या तोडीचा नसला तरी ज्या अर्थी त्याच्या घराण्याशीं आपण सोयरीक करण्याचें ठरविलें त्या अर्थी तो आतां आपलाच झाला; अर्थात् त्याचा अपमान तोच आपला अपमान होय असें जाधव मानीत होते. याहीपेक्षां कोणती जर गोष्ट जाधवांच्या मनाला विशेष झोंबली असेल तर ती ही कीं, सटवोजीसाठीं नियोजित केलेली वधू माणकोजीनें पळविली! सिंहाचा भाग कोल्ह्यानें पळवावा त्यांतलाच हा प्रकार होता हें जरी खरें, तरी त्यांतच जाधवांना कमालीची नामुष्की वाटत होती. कारण सटवोजीशीं काशीबाईचा विवाह व्हावयाचें ठरल्यावर निंबाळकरांनीं याबद्दल जाधवांकडे मुद्दाम मनुष्य पाठवून त्यांचा तीव्र निषेध केला होता, व याबद्दल यथास्थित सूड घेण्याची प्रतिज्ञाही केली होती. 'जर खासेरावाच्या मुलीशीं मीं लग्न केलें नाहीं, तर निंबाळकरांचें नांव सांगणार नाहीं' अशा माणकोजीच्या निर्वाणींच्या उद्गारांचाही निंबाळकरांच्या त्या प्रतिज्ञेंत समावेश झाला होता. तो शत्रूचा डाव आतां साधणार असें पहातांच जाधवांसारख्या मानी माणसाला मरणप्राय दुःख कसें होणार नाहीं !

पण पिलाजी जाधवांचें भोक्तृत्व एवढ्यावरच संपलें नव्हतें. काय वाटेल तें

करून निंबाळकरांचें पारिपत्य हें करावयाचेंच अशा ईर्षेनें ते मांडवगडाकडे मंडलोईची सल्ला घेण्यासाठीं पुढें निघाले, तों मांडवगडापासून एकदीड कोसाच्या अंतरावर असलेल्या नर्मदेच्या एका उतारावर त्यांना माणकोजी निंबाळकराचा वडील भाऊ महादजी यानें आपल्या चार साथीदारांसह घेरलें,व पिलाजी जाधवांची बेसुमार निर्भर्त्सना करून त्यांना कैद करण्याचा आव घातला. तो एकट्या जाधवांचीच विटंबना करून थांबला नाहीं; त्यानें साताराच्या राजकन्येचीही त्यांच्या तोंडावर अत्यंत निर्भर्त्सना केली, व तिला पकडून बादशाही जनानखान्यांत पाठविण्याचेही प्रलाप काढले. जाधवांना तो अपमान सहन होणें शक्यच नव्हतें. त्यांना इतका चेव आला कीं, त्या भरांत आपण एकटे व आपले प्रतिपक्षी पांचजण याचें देखील भान त्यांना उरलें नाहीं. महादजीनें आपल्या शिपायांना आपणाला कैद करण्याचा हुकूम केला ते शब्द कानीं पडतांच जाधवांनीं एकदम आपल्या म्यानांतून तरवार बाहेर काढून महादजीच्या शिपायांवर चाल केली. तेवढ्यांत जाधवांबरोबरचे दोघे सैनिक दरम्यान् मार्गे गुंतून पडले होते तेही तेथें येऊन पोंचले. त्यांच्या शरिरावर व त्यांच्या घोड्यांच्या शरिरावरही ताज्या जखमा झालेल्या जाधवांनीं पाहिल्या. पण त्याबद्दल चौकशी करण्याइतकाही अवसर त्यांना तेव्हां मिळाला नाहीं. ते दोघे सैनिक तशा जखमी स्थितींतही आपल्या धन्याचें रक्षण करण्याला पुढें सरसावले. इतका वेळ महादजी घमेंडींत होता कीं, जाधव एकटेच भले तावडींत सांपडले आहेत. पण जाधवांच्या त्या दोघां अनुयायांना पहातांच महादजीला भय पडलें कीं, जाधवांचे आणखी किती अनुयायी मागाहून येत आहेत न कळे! ते जर जास्त असले तर ते एथें येतांच जाधवांना कैद करण्याची गोष्ट बाजूला राहून उलट आपल्यावर कठीण प्रसंग यावयाचा! या भयानें महादजीनें आपल्या सैनिकाला आज्ञा केली, "पहातां काय? या थेरड्याला आतांच्या आंता पकडा! तो जिवंत हातीं लागला नाहीं तर त्याला ठार करा; पण आतां तो एथून मोकळा सुटतां उपयोगी नाहीं."

महादजीच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच जाधवांच्या दोन्ही शिपायांनीं लांडगे मेंढरांच्या कळपावर झडप घालतात त्याप्रमाणें महादजीच्या शिपायांवर झडप घातली. त्या दोघांनीं महादजीच्या चारही माणसांना हां हां म्हणतां लोळविलें. मात्र तसें करतांना त्यांनीं आपल्या जीविताची आशा सोडली होती, व विधात्यानेंही त्या बिचाऱ्यांना तेवढेंच आयुष्य दिलें होतें. ते दोघेही आपल्या

चार शत्रूंना ठार करून 'राम' म्हणण्यासाठीं धरणीवर कोसळले. त्यांतला एक तर तात्काळ गतप्राण झाला, व दुसऱ्यानेंही 'शत्रूचे लोक आपल्या पाठलागावर आहेत. आपण तावडतोब एथून पाय काढा व मांडवगड गांठा' असें जाधवांना सांगून त्यांच्याच पायांपाशीं प्राण सोडला !

आपले चारही सैनिक ठार झाले असें पाहून महादजी अगदीं घाबरून गेला होता; पण जाधवांच्या शिपायांच्या तोंडचे शब्द ऐकून त्याला जास्त धीर आला, व तो जाधवांना पळून जाण्याची संधि मिळूं नये म्हणून त्यांच्यावर तुटून पडला. परंतु पिलाजी जाधव हे कसलेले वीर असल्यानें त्यांनीं महादजीशीं दोन हात करून त्याला जायबंदी करून तेथल्या तेथेंच लोळविलें. व स्वतः तांतडीनें मांडव-गडचा रस्ता धरला.

मांडवगडाकडे यावयाला निघतांना पिलाजी जाधवांच्या मनांत मुलाच्या लग्नाविषयींचे विचार घोळत होते. पण मार्गानें मिळालेल्या इतक्या कटु अनुभवां-च्या आघातांनीं त्या विचारांचा पूर्ण चक्काचूर होऊन गेला होता; व प्रास्त परि-स्थितींतून वर डोकें कसें काढावयाचें—विशेषतः राजकन्येवर कोसळूं पाहणारें संकट कसें निवारण करावयाचें, ही चिंता त्यांच्या मस्तकांत भिरभिरूं लागली होती. त्या चिंतेच्या जाचापुढें त्यांना त्यांच्या शरिरावरील जखमांपासून होणाऱ्या यातनांचाही विसर पडला होता.

परंतु श्यामलालसारख्या भिक्षुकाला तें काय होय ! त्याची व जाधवांची मांडवगडाच्या पायथ्याशीं गांठ पडतांच त्यानें 'बीचमें मेरा चांदभाई' या न्यायानें निराळीच कटकट जाधवांपाशीं सुरू केली !

*

## प्रकरण सतरावें

# मांडवगडावर



आपण संपादन केलेला अपूर्व विजय केव्हां एकदां जगजाहीर करूं असें श्यामलालला होऊन गेलें होतें. तो जो इतक्या घाईनें मांडवगडाकडे चालला होता, तो आपल्या यजमानापाशीं–मंडलोईपाशीं आपली फुशारकी गाण्यासाठीं ! तेवढयासाठीं मंडलोईच पाहिजे होते असें नाहीं, कोणताही साधारण परिचयाचा मनुष्यही श्यामलालच्या कामीं आला असता. पण त्याला आपल्या घराकडून मांडवगडाकडे यावयाला निघाल्यापासून असा मनुष्यच भेटला नव्हता ! ते जाधव पाहिले भेटले.

श्यामलाल ओंकारेश्वराहून सकाळीं जो निघाला, तो प्रथम मांडवगडावर न जातां आपल्या स्वतःच्या घरीं गेला. प्रथम घरीं जाण्याचें कारण असें कीं, आपण ज्या कार्याला गेलों, त्या कार्यांत फत्ते मिळवून आलों हें त्याला प्रथम आपल्या बायकोला निवेदन करावयाचें होतें. आपला पति भोळसट आहे, शिवाय त्याचें प्रत्येक कृत्य व प्रत्येक शब्द अवलक्षणी असणारच, असा सुमतीचा ठाम ग्रह असल्यानें कोणत्याही महत्त्वाच्या कार्यांत त्यानें भाग घेऊं नये आणि त्या कार्याविषयीं कोठें कांहीं बोलूं नये असें सुमति त्याला वारंवार बजावीत असे. बालकर्णाचें लग्न जुळूं लागलें तेव्हां त्या लग्नांत कोणत्याही प्रकारची लुडबूड न करण्याविषयीं सुमतीनें श्यामलालला निक्षून सांगितलें होतें. लग्नाबाबत उपाध्यायानें वाग्निश्चयादि जें कर्तव्य करावयाचें तें श्यामलाल हा मंडलोईचा कुलोपाध्याय असल्यानें त्यानेंच करणें अवश्य असतांही सुमतीनें श्यामलालला आजारीपणाचें ढोंग करावयाला लावून त्याचा कनिष्ठ बंधु प्यारेलाल याच्यामार्फत तीं सर्व कृत्यें पार पाडलीं होतीं. इतकी खबरदारी घेण्यांत बालकर्णाचें लग्न निर्विघ्नपणें पार पडावें असा तर सुमतीचा हेतु होताच; पण त्याहीपेक्षां तिला स्वतःच्या अर्थलाभाची जास्त काळजी होती. बालकर्णाच्या लग्नसमारंभांत आपल्या पतीला उपाध्याय म्हणून व आपणाला उपाध्यायपत्नी म्हणून चांगलीच प्राप्ति होणार, त्या प्राप्तीविषयींच सुमति मुख्यतः इतकी खबरदारी घेत होती. कर्मधर्मसंयोगानें प्यारेलाल बाहेरगांवीं असावयाला

चार शत्रूंना ठार... मांडवगडावर होण्याऐवजीं ओंकारेश्वरींच व्हावें असा मंडलोईंचा तर तात्काळ...वयाला एक गांठ पडली. अर्थात् ही गोष्ट चंद्रशेखराच्या कानांवर आहेत्. त्याची अनुमति मिळविण्याची कामगिरी मंडलोईंचा कुलोपाध्याय या नात्यानें श्यामलालवरच येऊन आदळली. त्यामुळें श्यामलालला पराकाष्ठेचा आनंद झाला; पण सुमतीला मात्र तिच्या भोळ्या भावानुसार पेंच पडला कीं, आतां आपल्या पतिराजांची अपशकुनी दांतकसर या कार्याला भोंवणार! ही आपली शंका तिनें श्यामलाल तो ओंकारेश्वरीं जावयाला निघते वेळीं त्याच्यापाशीं बोलून दाखविली होती, व श्यामलालनें त्यावर चिडून 'काम फत्ते करून आलों नाहीं तर नांवाचा श्यामलालच नव्हे' अशी सुमतीपाशीं प्रतिज्ञाही केली होती. इतकेंच काय; पण 'जर हें कार्य आपल्यामुळें बिघडलें, तर आपण माघारे न येतां तेथल्या तेथेंच सर्वसंगपरित्यागपूर्वक संन्यास घेऊन तीर्थयात्रेला निघून जाणार' अशीही त्यागाची भीति त्यानें सुमतीला घातली होती. मात्र सुमति त्यामुळें यत्किंचित्देखील भ्याली नव्हती. कारण ती आपल्या पतिराजांचा वकूब ओळखून होती. आपल्या पतीनें ओंकारेश्वरीं गेल्यावर सावधगिरीनें वागावें, एवढाच त्याला दूषणपूर्वक बजावण्यांत तिचा हेतु होता.

श्यामलालच्या सुदैवानें त्याला त्याच्या अंगीकृत कामगिरींत यश आलें; चंद्रशेखरानें मंडलोईंच्या सूचनेला बिनतक्रार मान्यता दिली. ही विजयवार्ता सुमतीच्या कानावर घालून तिला केव्हां एकदां निरुत्तर करूं असें श्यामलालला होऊन गेल्यामुळेंच तो जो ओंकारेश्वराहून मांडवगडाकडे यावयाला निघाला, तो प्रथम मांडवगडाकडे न जातां आपल्या घरीं गेला, व तेथून तो मांडवगडाकडे यावयाला निघाला असतां मार्गांत त्याला पिलाजी जाधव भेटले. त्यानें जाधवांपाशीं आपल्या विजयश्रीचें वर्णन करण्याला रसभरित भाषेंत सुरुवात केली. जाधवांचें चित्त त्या गप्पागोष्टींत कोठें होतें! तरीपण श्यामलालच्या संभाषणाला मधून मधून अर्थशून्य हुंकारांचे जबाब देऊन ते कशीबशी वेळ मारून नेत होते.

अखेर श्यामलाल जेव्हां सटवोजीच्या लग्नाच्या विषयाकडे वळला, तेव्हां मात्र जाधवांच्या मनाला फारच ताण बसूं लागला. ते श्यामलालला म्हणाले, "हें पहा श्यामलाल! तूर्त सटवोजीच्या लग्नाबाबत विचार करण्याइतकें माझें मन स्वस्थ नाहीं. आणि बालकर्णांचें लग्न तरी निर्विघ्नपणें पार पडेलच अशीही खात्री मला वाटत नाहीं."

" ती कां बरें ? आतां त्या लग्नांत आणखी कोणती अडचण यावयाची आहे ? मला कळूं दे तरी !" श्यामलाल म्हणाला.

परंतु श्यामलालसारख्या अचरट माणसापाशीं अडचणीचा पाढा वाचणें म्हणजे एरंडाचें गुऱ्हाळ लावण्यासारखें निष्फळ आहे अशी जाधवांची खात्री असल्यानें त्यांनीं त्या विषयावर बोलण्याची बुद्धिपुरस्सर टाळाटाळ केली व मामुली गोष्टींवर वेळ मारून नेतां नेतां एकदांचा मांडवगड गांठला.

सूर्यास्ताच्या सुमाराला पिलाजी जाधव व श्यामलाल हे दोघेही मांडवगडावर जाऊन पोंचले. तों सकृद्दर्शनींच नेहमीं न आढळणारा विशेष कडेकोट बंदोबस्त किल्ल्यावर असलेला त्यांना आढळून आला. नेहमीं किल्ल्यावर एक मामुली पहारेकरी असावयाचा, त्या जागीं आज चार सशस्त्र पहारेकरी उभे होते. पिलाजी जाधव पुढें चालले होते, व श्यामलाल अंमळ मागें होता. जाधवांना पहारेकऱ्यांनीं खुद्द राव तेजकर्णांच्या परवानगीखेरीज आंत सोडण्याचें नाकारतांच श्यामलाल आपली प्रौढी दाखविण्यासाठीं पुढें झाला. पण त्यालाही पहारेकऱ्यांनीं हरकत केली.

" मला तुम्ही ओळखीत नाहीं ?" श्यामलालनें एका ओळखीच्या पहारेकऱ्याला विचारलें.

" मी तुम्हांला ओळखतों." पहारेकरी उत्तरला.

" मी कोण आहें ?" श्यामलालनें आढ्यतेनें विचारलें.

" मीं तुम्हांला ओळखलें; तुम्ही श्यामलाल आहां." पहारेकरी उत्तरला.

" मी नुसता श्यामलाल नाहीं, मंडलोईंचा कुलोपाध्याय आहें. धाकट्या धन्यांच्या लग्नाच्या बाबतींत निश्चित बेत ठरविण्यासाठीं थोरल्या धन्यांनीं मला ओंकारेश्वरीं आपल्या भावी व्याह्यांकडे पाठविलें होतें; तें काम फत्ते करून मी आलेला आहें. मला ताबडतोब मोठ्या धन्यांना भेटावयाचें आहे."

" गोष्ट खरी; पण आजपासून ह्या किल्ल्यावरील बंदोबस्त फार कडक झाला आहे. परवान्याशिवाय कोणाही माणसाला आंत किंवा बाहेर जाऊं देऊं नये असा धन्यांचा आम्हांला सक्त हुकूम आहे.—"

" पण माझ्यासारख्या घरगुती माणसांना तो नियम लागू नसेल."

" सूर्यास्तापासून सूर्योदयापर्यंत तर तो नियम सर्वांनाच कसोशीनें लागू आहे.

प्रत्यक्ष धाकटे धनी आले तरी त्यांनादेखील आम्ही परवान्याशिवाय आंत सोडणार नाहीं!"

श्यामलाल मनांतून खूप जळफळला. पण उपयोग काय! त्याला परिस्थिती-समोर नमणें प्राप्तच होतें. त्याला विशेष अपमान वाटला, तो जाधवांसारख्या त्रयस्थासमोर आपली अशी फजिती झाली म्हणून! पण जाधवांनीं त्याची समजूत केली व पहारेकऱ्याला सौम्य शब्दांनीं सांगितलें, "तूं आंत जा व बाहेर पिलाजी जाधव आले आहेत असें रावांना सांग."

"आणि मी आलों आहें असेंही सांग. म्हणजे लौकर काम होईल. वेळीं धनी जाधवांची भेट घ्यावयाला या वेळीं तयार नसले तरी माझ्या भेटीसाठीं म्हणून तरी त्यांना पहारा खुला करावा लागेल" श्यामलाल म्हणाला.

पहारेकरी श्यामलालला अशा प्रकारच्या पोकळ घमेंडखोरीबद्दल मनांतल्या मनांत हंसत वर्दी देण्यासाठीं आंत निघून गेला. तो गेलेला पहातांच श्यामलालच्या जाधवांपाशीं पुन्हा वल्गना सुरू झाल्या. जाधव नुसतें 'हूं' म्हणून वेळ मारून नेत होते. इतक्यांत पहारेकरी माघारा आल्याचें त्या दोघांनाही आढळून आलें. श्यामलाल घाईघाईनें पुढें जातां जातां जाधवांना म्हणाला, "धन्यांनीं जर तुम्हाला आंत येण्याला परवानगी दिली नसली तर तुम्ही त्याविषयीं कांहीं चिंता करूं नका. मला तरी परवानगी खास मिळाली असेल; व मी आंत जातांच धन्यांना सांगून तुम्हांला आंत प्रवेश मिळण्याची व्यवस्था करतों. आणि या पहारे-कऱ्यांनाही चांगलीच अद्दल घडेल असें करतों."

जाधव यावर कांहींच बोलले नाहींत. पण तेवढ्यांत तो पहारेकरी जाधवापाशीं आला व नम्रतापूर्वक मुजरा करून म्हणाला, "धन्यांनीं आपणांला बोलावलें आहे."

"आणि मला!" श्यामलालनें विचारलें.

"तुमच्याविषयीं धनी कांहींच बोलले नाहींत." पहारेकरी उत्तरला.

श्यामलालनें घुश्श्यांत येऊन विचारलें, "पण तूं माझें नांव धन्यांना सांगितलेंस तरी का?"

"होय."

"काय सांगितलंस? एक भटजी बाहेर आले आहेत असें कोरडेंच सांगितलें असशील!"

" नाहीं ! महामहोपाध्याय धर्ममार्तंड परमपूज्य कुलगुरु पंडित श्यामलाल-शास्त्री आले आहेत असें खुलासेवार सांगितलें. पण धनी कांहींच बोलले नाहींत." पहारेकरी टोमणेवजा भाषेंत उत्तरला.

इतक्यांत 'मी आंत गेल्यावर तुमची व्यवस्था करतों' असें सांगून पिलाजी जाधव आंत गेले. श्यामलालला तेवढयानें समाधान वाटण्याजोगें नव्हतें. आपल्या-पूर्वी जाधवांना आंत प्रवेश मिळाला यांत आपला अपमान झाला असेंच त्याला वाटलें. तो पहारेकऱ्याच्या विरोधाची पर्वा न करतां तसाच जाधवांच्या मागोमाग आंत घुसला. पहारेकऱ्यानेंही जाधवांकडे पाहून श्यामलालला फारसा विरोध केला नाहीं.

" मीं ओंकारेश्वराकडील वार्ता प्रथम आपणांला सांगावी असें त्या मगरूर पहारेकऱ्याच्या मनांत होतें, व त्याची मनीषा पूर्ण झाली नाहीं म्हणून तो मला उगाच पोकळ विरोध करीत असावा. हीं नोकरमाणसें फारच लुब्रीं असतात. धन्यांना सांगून यांची एकवार चांगली कानउघाडणी केली पाहिजे." श्याम-लालची टकळी आंत प्रवेश मिळतांच पुन्हा सुरू झाली. परंतु जाधवांकडून साध्या प्रत्युत्तरानें देखील उत्तेजन न मिळतांच त्याचें तोंड आपोआप थांबलें, व धन्यांसमोर जातांच आपण संपादन केलेल्या विजयाची वार्ता कोणत्या रसाळ शब्दांत त्यांच्या कानीं घालावी याविषयींचे नवे विचार त्याच्या डोक्यांत घोळूं लागले. मात्र ते विचार मनांत घोळवितांनाही एक गोष्ट पुनः पुन्हा त्याच्या मस्तकांत घोळून ताप देत होती, ती पहारेकऱ्यानें केलेल्या अपमानाविषयीं होय.

जाधव व श्यामलाल हे दोघेही आंत गेले, तों तेजकर्ण लक्ष्मेश्वराच्या मंदिरांत निवडक मंडळींपाशीं कांहीं जबाबदारीच्या गोष्टींविषयीं वाटाघाट करीत बसला आहे असें त्यांना आढळलें. तेथवर जाण्याला मात्र त्या दोघांनाही कोणींच प्रतिबंध केला नाहीं. परंतु श्यामलाल आपली यशस्वी कामगिरी तेजकर्णाच्या कानांवर घालून शाबासकी मिळविण्यासाठीं अधीर झाला असल्यामुळें तो जाधवांना मागें टाकून 'सर्व मंडळी बहुधा धाकट्या धन्यांच्या लग्नाबाबत पुढील तयारी करण्याच्या बाबतींतच वाटाघाटी करीत असतील; त्यांना प्रथम भेटून सुवार्ता त्यांच्या कानीं घालणें अवश्य आहे' अशी त्यांची समजूत करून पुढें घुसला.

लक्ष्मेश्वराचें मंदिर दक्षिणाभिमुख असें नर्मदेच्या बाजूला असलेल्या बुरुजावर होतें. त्या बुरुजावर देवालयाच्या प्रांगणांत बसून समोर नजर टाकली तरी सहजासहजीं नर्मदेचा विशाल प्रवाह व आजूबाजूच्या सर्व प्रकारच्या हालचाली अनायासें दिसून येत. त्या प्रवाहाकडे लक्ष्य देऊनच तेजकर्ण, अनुपसिंग व आणखी कांहीं मंडळी सचिंत मुद्रेनें कसल्यातरी गूढ विचारांत गढून गेली होती. तोंच श्यामलालनें तेथें जाऊन तेजकर्णाला सांगितलें, "धनी! आपण सांगितलेली कामगिरी मी सोळा आणे बजावून आलों. आतां एकदम ओंकारेश्वराकडे जाण्याच्या तयारीला लागावयाचें."

"बरें आहे. कळलें.—"

तेजकर्णाला पुरतेपणीं बोलूं न देतां श्यामलाल पुन्हा म्हणाला, "कळलें नाहीं; अगोदर मला माझ्या कामगिरीबद्दल शेलापागोटें पाहिजे."

"बरें आहे; तुम्ही आतां जा. मग मी बोलावीन तेव्हां या. तूर्त तुमचें कांहीं काम नाहीं." तेजकर्ण पुन्हा श्यामलालला म्हणाला. इतर मंडळीही कांहींशा तिरस्कारपूर्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहूं लागली.

"असें काय बरें?" श्यामलालनें गंभीर चर्या करून विचारलें.

"तुम्ही तूर्त इथून जा म्हणतों ना? उगाच माझें डोकें कशाला पिकवितां?" तेजकर्ण कपाळाला आंठ्या घालून त्रासिक स्वरांत म्हणाला, "श्यामलाल! तुम्ही ओंकारेश्वरीं जावयाला निघालां तेव्हां मुहूर्त पाहिला नाहीं. तेव्हां तुम्ही अगदीं घात वेळेवर निघालां असलां पाहिजे."

"असें कोण म्हणतो? कोणत्या शंखानें आपणांला मी मुहूर्त पाहून निघालों नाहीं असें सांगितलें? मी अत्यंत शुभ मुहूर्त पाहून निघालों, याबद्दल पाहिजे त्याची खात्री पटवून देण्याला मी एका पायावर तयार आहें. आणखी असें पहा, जर मी शुभमुहूर्त पाहून निघालों नसतों, तर काम फत्ते कसें झालें? कोणता बेवकूब माझ्या मुहूर्तांत दोष काढतो त्याचें नांव तर मला सांगा, त्याच्याशीं वादविवाद करावयाला मी तयार आहें. वादांत मी हरलों तर आजपासून पंचांग पहाण्याचें सोडून देईन, व जितलों तर त्या मूर्खाचें पंचांग हिसकावून घेईन. उगाच कांहींतरी नांवें एखाद्याला ठेवावयाचीं म्हणजे काय?" श्यामलाल मुठी आंवळीत दांतओंठ खात गर्जून म्हणाला.

श्यामलालच्या ह्या आवेशांत सुमतीच्या याबाबतच्या टोमणेबाज भाषणाच्या जाणिवेची भर पडली होती, हें निराळें सांगावयाला नकोच. तेजकर्णालाही त्याचा स्वभाव पूर्ण माहीत असल्यानें तो त्याचें अकाण्डताण्डव मनावर न घेतां म्हणाला, " हें पहा श्यामलाल! बालकर्ण सध्यां शत्रूच्या कैदेंत असल्यामुळें तो सुटून येईतों आपणांला त्याच्या लग्नाच्या वाटाघाटी कांहींच करतां येत नाहींत."

" काय ! धाकटे धनी कैदेंत आहेत ? " असें म्हणून श्यामलाल खरोखरीच उतरलेल्या चर्येनें थोडा वेळ डोळे झांकून उजव्या डाव्या हाताचीं बोटें मोजीत कांहीं विचार करूं लागला. तेजकर्णानें त्याच्याकडे दुर्लक्ष करून जाधवांना गौरव-पूर्वक बसावयाला सांगून म्हटलें, " जाधवजी ! आपल्या सभोंवारची परिस्थिति अत्यंत बिकट झाली आहे हें आपणाला बहुधा कळलेंच असेल ! "

" होय. आणि त्याविषयीं विचार करण्यासाठींच मी आज आपणाकडे आलों आहें. मी आपणाकडे यावयाला निघतांना आकाश अगदीं निरभ्र होतें. पण इकडे येतां येतां मला जो अनुभव आला, तो फारच चिंताजनक आहे." जाधव म्हणाले.

इतक्यांत श्यामलाल डोळे उघडून चेहरा खुलवून तेजकर्णाला म्हणाला, " धनी ! आतांच्या आतां आपण धाकट्या धन्याला शत्रूच्या तावडींतून सोडवून आणण्याचें कार्य नेटानें हातीं घेतल्यास ते आपल्या नियोजित तिथीपूर्वीं मुक्त झालेच पाहिजेत. त्यांची कुंडली पूर्णपणें माझ्या लक्षांत आहे. त्यावरून मीं आतां गणित करून पाहिलें; त्या गणिताच्या ठोकताळयावरून मी आपणाला निश्चित सांगतों कीं, धाकट्या धन्यांचें लग्न नियोजित मुहूर्ताला झालेंच पाहिजे. माझें भविष्य अन्यथा झालें तर यापुढें ज्योतिष म्हणून पहाणार नाहीं; साफ सांगतों."

" बरें आहे; आम्ही आतां तुमच्या ज्योतिषकथनाप्रमाणें तजविजीला लागतों. धाकटे धनी सुटून आल्यावर मग त्यांच्या लग्नसमारंभाला कोणतीच अडचण नाहीं. तुम्ही आतां जा, थोडी विश्रांति घ्या. सकाळीं सवडीप्रमाणें आपण बोलूं." असें म्हणून तेजकर्णानें श्यामलालची कशीबशी बोळवण केली, व श्यामलालही 'पडलों तरी माझेंच नाक वर' अशा प्रकारचें स्वतःचें समाधान करीत तेथून निघून गेला. तो गेला असें पाहून आपल्या मागची एक ब्याद टळली असेंच सर्वांनाच वाटलें.

" बालकर्णाविषयींची ही अमंगळ बातमी मी आतांच ऐकतों आहें." जाधव म्हणाले.

तेजकर्ण म्हणाला, " अनुपासिंगजी आज सायंकाळीं उज्जयनीहून इकडे आले, त्यांनीं ही बातमी आणली."

अनुपसिंगानें सर्व वृत्तान्त पुन्हा एकवार जाधवांना थोडक्यांत निवेदन केला. तो ऐकून जाधवांना फारच हळहळ वाटली.

" बरें; तुम्हीं काय खबर आणली आहे ? " तेजकर्णानें विचारलें.

" माझ्याजवळची निम्मेशिम्मे खबर माझ्या अंगावरच्या या जखमा बोलून दाखवीत आहेतच." जाधव आपल्या अंगावरील जखमा तेजकर्णांना दाखवीत म्हणाले, " या जखमा खासेरावाच्या मुलीचें लग्न माझ्या मुलाशीं ठरल्यामुळें चिडून गेलेल्या व राजकन्येला पकडून मोगलांच्या जनानखान्यांत कोंबण्याचा विडा उचलून बाहेर पडलेल्या महादजी निंबाळकरांच्या हातच्या आहेत. राजकन्येला पकडण्याच्या कामगिरीवर माणकोजी पूर्वींच सुलतानपुराकडे रवाना झाला आहे, व त्यानें खासेरावाला त्याच्या कुटुंबांतील सर्व मंडळीसह कैद झाल्याची बातमी मला मार्गांतच कळविली. तेव्हां मी म्हणतों, आपण प्रथम राजकन्येच्या रक्षणाची कांहींतरी तजवीज केली पाहिजे."

" निंबाळकरानें असा सूड घेतला काय ? अरे हरामखोरा ! खरोखर निंबाळकर म्हणजे नेकजात मराठ्यांच्या जातीला जबरदस्त कलंक आहे." तेजकर्ण म्हणाला.

" होय. गोष्ट खरी आहे. घाटगे, निंबाळकर, चंद्रसेन जाधव वगैरे मंडळींनीं आपल्या बद्‌करणीनें आम्हां मराठ्यांना जगांत वर तोंड करावयाला बिलकुल जागा ठेविलेली नाहीं. हे कलंक धुवून टाकण्याचें सामर्थ्य परमेश्वर आम्हांला कधीं देईल तें देवो ! " जाधव उद्गारले.

जाधवांच्या मुखांतून हे उद्गार निघावयाला व निहालकर्ण आंत यावयाला एक गांठ पडली. निहालकर्ण आंत येतांच खोंचिक दृष्टीनें जाधवांकडे पहात म्हणाला.

" हे कोण बोलत आहेत ? जाधवजीच का ? जाधवजी ! मला वाटतें, सूर्यापोटीं शनैश्चर निपजावे असा शापच जणूं परमेश्वरानें तुम्हां जाधवांच्या वंशाला दिलेला आहे."

" तुमचें म्हणणें खरें आहे. चंद्रसेन जाधवांनीं जाधवांच्या उज्ज्वल नांवाला

आपल्या कृतघ्नपणानें जें काळें फांसलेलें आहे, तें आमच्या कैक पिढयांच्या पुण्याईच्या अखंड गंगाप्रवाहानेंही धुवून निघण्यासारखें नाहीं." पण आतां हा विषय कां निघाला ?" जाधवांनीं विचारलें.

" माझें म्हणणें तुमच्या अपेक्षेपेक्षां खरें आहे. मी तर उलट असें म्हणतों कीं,—तुम्ही जुन्या पिढींतील मनुष्य आहां असें मी मानतों; व्यक्तिशः तुमची गोष्ट निराळी आहे. तुम्ही काय, परलोकवासी सेनापति धनाजी जाधव काय, आम्हांला केव्हांही वंद्यच. पण तुम्ही जाधवांच्या कैक पिढयांच्या पुण्याईची गोष्ट बोलूं म्हणाल, तर मात्र मी सांगतों, तुम्ही त्या पवित्र वंशाच्या नांवाचा स्पष्ट अपमान करीत आहां. एवढें मात्र खरें, कीं धनाजी जाधव तुमच्याहून जास्त पुण्यवान् म्हणूनच उजव्या हातानें डावा हात तोडून टाकण्याचा प्रसंग येण्यापूर्वीच ते इहलोक सोडून गेले." निहालकर्ण म्हणाला.

" तुम्ही काय म्हणतां तें मला कळलें नाहीं !" जाधव आश्चर्ययुक्त मुद्रेनें निहालकर्णाकडे पहात म्हणाले. जी गत जाधवांची तीच त्या बैठकींतील इतरांचीही झाली. जो तो विस्मयपूर्ण दृष्टीनें निहालकर्णाकडे पाहूं लागला.

प्रकरण अठरावें

# शत्रूच्या जाळ्यांत

निहालकर्ण एक उसासा सोडून गंभीर मुद्रेनें म्हणाला, " जाधवजी ! जें बोलूं नये तें बोलणें माझ्या वांटयाला आलें आहे. पण तें बोलल्याविणें गत्यंतर नाहीं. तुमचा मुलगा–प्रत्यक्ष तुमच्या पोटचा गोळा सूर्यापोटीं शनैश्चर निपजला, असें तुम्हांला सांगणें मला प्राप्त आहे. "

" काय ? काय म्हणतां हें तुम्ही ! निहालजी ! माझ्या सटवोजीनें काय केलें ? " जाधव आपल्या कमरेच्या कटयारीला हात घालीत म्हणाले, " सांगा ! त्या सटवीच्यानें काय अन्याय केला तें मला सांगा. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें तो गुन्हेगार आहे अशी माझी खात्री झाल्यास मी तुम्हां सर्वांसमोर शपथ वाहतों, पोटचा पोर न म्हणतां त्या पोरटयाचें शीर धडावेगळें केल्याशिवाय मी माझी कटयार म्यान करणार नाहीं. सांगा निहालजी ! त्या पोरानें काय गुन्हा केला, तो मला अगोदर सांगा."

" जें महत्पाप करण्याला पुढें सरसावल्याबद्दल आतांच तुम्ही निंबाळकरांना दोष देत होतां, तेंच महत्पाप प्रत्यक्ष तुमच्या चिरंजिवांनीं केलें आहे."

" काय ? सटवोजी शत्रूला सामील झाला ? अशक्य ! त्रिवार सांगतों अशक्य ! अशक्य ! ! अशक्य ! ! ! "

" मलादेखील असेंच वाटतें कीं, सटवोजी असलें निमकहरामपणाचें काम कधींच करणार नाहीं." तेजकर्ण म्हणाला.

" मलादेखील तसेंच वाटतें. सटवोजीच्या वस्तु असें होणें शक्यच नाहीं. मी त्याला चांगला ओळखतों. बाजीराव पेशवे कांहीं इतके भोळे नाहींत. ते सटवोजीला आपला उजवा हात मानतात तो उगाच का ? " अनुपसिंग म्हणाला.

" पण अशक्य गोष्टीदेखील कधीं कधीं शक्य होतात, त्यांतलाच हा प्रकार आहे." निहालकर्ण जाधवांकडे वळून म्हणाला. " जाधवजी ! तुमचा सटवोजी नुसता शत्रुपक्षाला सामील झाला असता, तरी देखील मीं म्हटलें असतें कीं, तो निंबाळकर, घाटगे, चंद्रसेन जाधव वगैरे हरामखोर विश्वासघातकी

मराठ्यांपेक्षां जास्त अधःपतित झालेला नाहीं. पण सटवोजीनें आपल्या नीचपणानें त्या त्रिवर्गीच्याही पुढचा पल्ला गांठला आहे."

"सांगा, त्यानें काय केलें?" जाधवांनीं क्रोधानें थरथर कांपत विचारलें. त्यांचा उजवा हात तरवारीच्या मुठीवर घट्ट होता तसाच होता.

निहालकर्ण उत्तरला, "राजकन्येला पकडून मोंगलांच्या स्वाधीन करण्याची कसाबकरणी तुमच्या सटवोजीनें केली."–जाधव मानेनें नकार देऊं लागले तें पाहून तो पुढें म्हणाला, "नकार देऊं नका; मी सांगतों तें अक्षरशः खरें आहे. सटवोजी राजकन्येला कैद करून मोंगलांच्या स्वाधीन करूनच थांबला नाहीं, तर त्यानें तिला उज्जयनीला नेऊन शहाजाद्याच्या जेनानखान्यांत गुदरण्याची कामगिरी स्वसंतोषानें आपल्या शिरावर घेतली आहे. आणखी आश्चर्याची गोष्ट तुम्हांला सांगावयाची म्हणजे ह्या नीचपणाबद्दल बक्षिसी म्हणून त्याला काशीबाई खासेरावा-कडून बहाल करण्यांत येणार आहे. आतांच आमच्या हेरानें विश्वसनीय बातमी आणली त्यावरून मी हें सांगतों आहें.—राजकन्या व काशीबाई आपल्या दासींसह ओंकारेश्वरीं यात्रेसाठीं गेल्या होत्या त्या संगमावरून पंचक्रोशीची नावेंतून प्रदक्षिणा करण्यासाठीं निघाल्या असतां मध्येंच त्यांच्यावर अजमेरीसिंगाच्या वतीनें सटवोजीनें हल्ला केला, व दोघींनाही कैद करून उज्जयनीकडे नेलें."

"एकूण खासेरावही शेवटीं फितूर झाला म्हणावयाचा!" तेजकर्ण म्हणाला.

"होय. खासेरावही फितूर झाला. माणकोजीनें सुलतानपुरावर छापा घालून खासेरावाला त्याच्या सर्व मंडळीसह कैद करून नेलें असें आमचा हेर सांगतो खरा; पण माझें मन मला सांगतें कीं, ही निव्वळ दिखाऊ सबब आहे खासेराव म्हणजे कांहीं शेणामेणाची बाहुली नव्हे कीं, ती माणकोजीनें उचलून खांकोटीला मारावी! उलट राजकन्येला कैद करण्याच्या वेळीं सटवोजी व माणकोजी यांची झटापट होऊन त्या झटापटींत माणकोजी ठार झाला, तो राजकन्येला कैद करण्याचा माणकोजीचा इरादा नव्हता म्हणून! माणकोजीवर प्रथम अजमेरीसिंगानें राज-कन्येला कैद करण्याची कामगिरी सोंपविली होती हें खरें; व माणकोजीनेंही केवळ काशीबाईच्या अभिलाषानें ती कामगिरी आपल्या शिरावर घेतली होती. राजकन्या व काशीबाई या एकदम हातीं लागतांच काशीबाईला तेवढी आपल्या ताब्यांत घेऊन राजकन्येला मोकळी सोडण्याला माणकोजी तयार होता. तोंच अजमेरी-सिंगाच्या वतीनें सटवोजी तेथें खासेरावासह आला, व खासेरावाच्या साह्यानें

त्या दोघींनाही कैद करून घेऊन गेला. कांहीं झालें तरी काशीबाई माणकोजीच्या स्वाधीन करावयाची नाहीं असा खासेरावाचा निर्धार, करीन तर काशीबाईशींच लग्न करीन अशी सटवोजीची तर प्रतिज्ञा, आणि सटवोजीला खासेराव सामील! त्या दोघांनीं मिळून माणकोजीला ठार केलें, व त्या दोघींसह ते उज्जयनीकडे निघून गेले. आतां जाधवजी! मला सांगा, जाधवांच्या वंशांत खरा कुलांगार कोण? चंद्रसेन कीं तुमचा सटवोजी?"

"तुमचें म्हणणें बरोबर आहे. निहालजी! तुम्हीं माझ्या वंशावर जे आरोप केले, ते अक्षरशः खरे आहेत. माझा सटवोजी–पण आतां तो माझा सटवोजी कसला? माझा सटवोजी मी म्हणतों, जन्मतांच मेला किंवा तो जन्मालाच आला नाहीं. यापुढें त्या पोराचें व माझें नातें संपलें. आतां तो माझा पोर नव्हे व मी त्याचा पिता नव्हे! असें नुसतें बडबडून तें नातें तुटत नाहीं व मी माझ्यावरील आरोपांतून सुटत नाहीं हें तर खरेंच! पण—म्हणूनच निहालजी! आपणां सर्वांसमोर मी पोटच्या एकुलत्या एका पोराची—चुकलों, मला पोटचा पोरच नाहीं. पोटच्या पोराइतकी प्रिय वस्तु मनुष्याला त्रिभुवनांत दुसरी नाहीं हें खरें; पण मला पोटचा पोरच नाहीं. माझी बायको वांझ—वांझच होती असेंच मी म्हणतों. पोटचा पोर नाहीं म्हटल्यावर मग माझ्या आई भवानीशिवाय प्रिय अशी दुसरी कोणतीच वस्तु ह्या त्रिभुवनांत नाहीं. जिच्या पुण्यप्रसादानें आमच्या छत्रपति शिवाजीमहाराजांनीं म्लेंच्छांचा संहार करून हिंदवी स्वराज्याची स्थापना केली, जिच्या कृपादृष्टीखालीं आज सारा मराठमोळा तळहातावर शीर घेऊन हिंदुपदपादशाहीसाठीं अहर्निश कष्टत आहे, त्या आम्हां मराठ्यांच्या सामर्थ्य–समृद्धि शांतिदात्या आईभवानीच्या–चरणांची आण वाहून मी आपणां सर्वांच्या साक्षीनें जाहीर करतों कीं, "ही माझी" जाधव आवेशानें आपली तरवार म्यानांतून पूर्णपणें बाहेर काढून म्हणाले, "तरवार त्या चांडाळाचा शिरच्छेद करून त्याच्या रक्तानें माझ्या कुळाला लागलेला कलंक धुवून काढीपावेतों मी म्यान करणार नाहीं. माझी आई पतिव्रता होती व आपणां सर्वांच्या मतें मी खरा स्वदेशाभिमानी वीर असेन, तर ती वीरप्रसू होती हेंही आपण कबूल कराल! तिच्या पातिव्रत्याची हीच कसोटी कीं, तिच्या कुसव्यांत जन्म घेतलेल्या मीं माझा हा विषारी वंशांकुर छेदून माझ्या वंशाचा पाकपणा सर्वांच्या प्रत्ययाला आणून दिला पाहिजे. कैक पूर्वजन्मींचीं पापें माझ्या

सांचिताला होतीं, तीं अशीं फळाला आलीं ! आजवर मीं नेकजात मराठा म्हणून जें नांव कमावलें, तें माझ्या दुर्दैवाला सहन झालें नाहीं, म्हणून—स्वदेशाभिमान व स्वामिनिष्ठा यांविषयीं मला केवढा जबरदस्त अभिमान ! धन्यांच्या जिवासाठीं व राजांच्या नांवासाठीं मीं आजवर माझ्या जीवनसर्वस्वाची पायघडी जी अखंड पसरून ठेविली होती, त्या पायघडीचें माझ्याच कार्य्यानें असें पायपुसणें करून सोडावें ! हरहर ! आजवर चहूंमुलखीं एवढें नांव कमावलें, तें आज गमावलें ! हे केंस !—" जाधव थाड् थाड् कपाळावर हात मारून घेत दोन्ही हातांनीं आपले केंस घसाघस ओरबाडीत एकाएकीं ढसढसां रडूं लागून म्हणाले, "हे माझे केंस माझ्या मायभूमीच्या उद्धारासाठीं अहर्निश झटतां झटतां काळ्याचे पांढरे झाले, व ह्या केंसांकडे पाहून माझे धनी श्रीमंत पेशवेही मला वडिलांप्रमाणें मान देत आले, त्यांची सारी प्रतिष्ठा आज माझ्या पूर्वजांच्या पुण्याईसह मातीमोल झाली ! या वज्रलेप कलंकानें काळवंडलेलें हें माझें थोबाड—" ते आपल्या हातांनीं आपलें तोंड थाड् थाड् फोडून घेत आक्रोशले, "हें अपशकुनी थोबाड मी आतां पेशव्यांना कसें बरें दाखवूं ! "*

मनस्तापाच्या अतिरेकांत जाधवांना एकाएकीं जबर मूर्च्छा येऊन ते बेशुद्ध पडले त्यामुळें त्यांचें तोंड आपोआप बंद झालें. थोडक्यांत वचावलें, तेजकर्णानें त्यांना झोक जातां जातां सांवरलें म्हणून बरें ! नाहींपेक्षां काळ्या पाषाणाच्या अणकुचीदार पायरीवर त्यांचें मस्तक आदळून मोठाच अनर्थ ओढवला असता.

सर्व मंडळीनीं ताबडतोब जाधवांना उपचार सुरू केले. लौकरच जाधव सावध झाले. पण त्यांना पुन्हा बोलण्याची संधि मिळून त्यामुळें पुन्हा मनस्ताप वाढूं नये यासाठीं देवालयाच्या आंतील बाजूला निवाऱ्याच्या जागीं नेऊन त्यांना थोडा वेळ निजविण्यांत आलें.

"बरें; पण आतां पुढें काय ?" सर्व मंडळी पुन्हा देवालयाबाहेरील पटांगणांत विचारविनिमयासाठीं एकत्र जमतांच अनुपसिंगानें विचारलें.

---

* पिलाजी जाधवांच्या पराक्रमाविषयीं व स्वामिनिष्ठेविषयीं पेशवाईवरील कादंबऱ्यांत दुसऱ्या कादंबरीपासून कथौघाबरोबर माहिती देण्यांत आली आहे, यास्तव एथें त्याचा पुनर्विस्तार करण्याचें कारण नाहीं.

" पुढें काय ? " तेजकर्ण निश्चयपूर्ण कठोर स्वरांत उद्गारला, " आतां तो प्रश्नच उरला नाहीं."

" बालकर्णाला बंधमुक्त करून आणण्याची जबाबदारी मी पत्करतों, आणि–"

अनुपसिंगाला तोंडचें वाक्य पूर्ण करण्याला अवसर न देतां तेजकर्ण म्हणाला, " अनुपसिंगजी ! हें काय वेड्यासारखें बोलतां ! शत्रूनें नगारा वाजवून दिलेलें आव्हान टिमकीच्या दुबळ्या साथीनें स्वीकारावयाचें कीं काय ? राजकन्येवर प्राणसंकट कोसळलें असतां बालकर्णाच्या मुक्ततेचा प्रश्न कसला घेऊन बसलां ! प्रथम राजकन्येची मुक्तता, मग इतर सारें. बालकर्णाची–राजकन्येवर ओढवलेल्या आकस्मिक संकटानें मंडलोईंचीच–नव्हे, आमच्याबरोबर तुमच्यासारख्या साऱ्या ठाकूर-चौधऱ्यांचीही पेशव्यांपाशीं किती नापत झाली असेल याची तुम्हांला कल्पना तरी आहे का ? उभ्या माळव्यांत आपली सत्ता कोठें निर्वेध असेल तर ती पश्चिम माळव्यांत–मंडलोईंच्या मुलुखांत, असा पेशव्यांचा विश्वास होता. त्याच मुलुखांत राजकन्येवर संकट कोसळलेलें पाहून पेशवे काय म्हणतील ? हा मांडवगड म्हणजे सिंहांची गुहा ! ह्या गुहेंतील सिंहांकडे वांकड्या डोळ्यानें पहाण्याची प्रत्यक्ष कळिकाळाचीही छाती नाहीं अशी मांडवगडची थोरवी आजवर गाजली; पण तोच मांडवगड ह्या एका गोष्टीनें दिवाभीताच्या घरट्याच्या मोलाचा झाला आहे ! " तेजकर्ण एक दीर्घ उसासा सोडून किंचित् थांबून लगेच निहालकर्णाकडे वळून म्हणाला, " बस्स ! निहालजी ! माझा निश्चय ठरला, कीं या घटकेला राजकन्येच्या मुक्ततेच्या कामगिरीवर निघावयाचें. राजकन्या हातीं लागल्याशिवाय मी पुन्हा ह्या मांडवगडाकडे मागें वळून पहाणार देखील नाहीं. गडाची सारी व्यवस्था तूं पहा; माझ्या ऐवजीं आतां तूं साऱ्या गोष्टी मुखत्यारीनें करावयाच्या आहेत." तो लगेच अनुपसिंगाकडे वळून म्हणाला, " आणि अनुपसिंगजी ! तुम्हीही निहालजीच्या मदतीसाठीं इकडेच रहा."

" पण—" असें म्हणून अनुपसिंग अडखळला.

" मीं तुमच्या पणांतील आशय ओळखला. पण मी एवढेंच सांगतों कीं, बालकर्ण तुमचा जिव्हाळ्याचा मित्र आहे तर माझा पोटजाळ आहे. त्याच्या कल्याणाची जितकी काळजी तुम्हांला तितकीच मलाही आहे." तो पुन्हा निहालकर्णाकडे वळून म्हणाला, "उदईक ओंकारेश्वरीं मनुष्य पाठवून चंद्रशेखरांना प्राप्त परिस्थिति कळवा, म्हणजे त्यांना लग्नसमारंभाच्या तयारींत गुंतून पडण्याचें

कारण उरणार नाहीं, व ते तुमच्या साह्याला येण्याला मोकळे होतील. त्यांना आणखी असेंही कळवा कीं, आपण सर्व मंडळी ह्या आवर्तांतून मुक्त होतांच बालकर्ण व भागाबाई यांचा लग्नसमारंभ थाटानें साजरा करूं. आणि आतां अगोदर पुढच्या तयारीला लागा. प्रथम राजकन्येचा शोध केला पाहिजे"

"तो शोध मी करणार!" जाधव सावध होऊन देवालयांतून बाहेर आले व तेजकर्णाला म्हणाले, "राजकन्येचा शोध व अपराध्याला शासन ह्या दोन्ही गोष्टी पार पाडल्याशिवाय माझ्या मनाला शांतता मिळावयाची नाहीं."

तेजकर्ण त्यांना थोपवीत म्हणाला, "जाधवजी! तुम्ही शांत रहा. आम्ही सारें करतों. तुमची प्रकृति बरी नाहीं, हा ताप तुम्हांला सोसवणार नाहीं."

"माझी प्रकृति आतां ठीक आहे. शिवाय ती एकदां वाचेवाटे निघालेला शब्द खरा झाल्याशिवाय बरी व्हावयाचीही नाहीं. नुसत्या मेलेल्या अन्नपाण्यावर जगणारे नेभळे जीव आम्ही नाहीं; माशांना जसें पाणी, तद्वत् आम्हांला जगावयाला इभ्रत अवश्य असते. आमची इभ्रत धोक्यांत आली, कीं पाण्यावेगळ्या मासोळीसारखी आमची दैन्यावस्था होते. तें असो. राव! तुम्हांला माझें हात जोडून सांगणें आहे कीं, माझ्या ऐवजीं बंदोबस्ताची कामगिरी योग्य प्रकारें पत्करली जाईल अशी व्यवस्था मीं केली आहे. शिवाय इकडील बंदोबस्त करून भोपाळच्या रोंखानें ताबडतोब चालून येण्याविषयीं श्रीमंतांचा हुकूम मला आजच मिळाल्याचें तुम्हांला माहीत आहेच. तेव्हां आपण असें करूं, दोघेही एकदमच कामगिरीवर निघूं."

जाधवांचा निश्चय त्यांच्या चर्येवर स्पष्ट प्रतिबिंबित झालेला सर्वांना दीपप्रकाशांत दिसून येत होता. त्या निश्चयाची ढोबळ खूण म्हणजे थोड्या वेळापूर्वी त्यांनीं एकवार तरवार जी सटवोजीला देहान्त शासन दिल्याविना म्यान न करण्याच्या प्रतिज्ञेनें म्यानाबाहेर काढली होती, ती या वेळींही त्यांच्या हातीं तशीच मोकळी तळपत होती सटवोजीचा अपराध सर्वांच्याच दृष्टीनें अक्षम्य होता. पण प्रत्यक्ष जन्मदात्या पित्याच्या मुखानें पुत्राला देहान्त शासन मिळण्याचा उच्चार झालेला ऐकतांच व त्या निश्चयाच्या पूर्ततेसाठीं त्यांनीं हातीं घेतलेली तरवार अजून म्यान केली नाहीं हें पहातांच सर्वांना सटवोजीविषयीं तो अपराधी असतांही अनुकंपा वाटूं लागली; मग जाधवांविषयीं—पोटच्या पोराचें निधनदुःख भोगणें विनापराध

ज्यांच्या कपाळीं आलें होतें—त्यांच्याविषयीं त्या मंडळीला हळहळ वाटली यांत नवल तें काय ?

जाधव जरा बाजूला गेले तेवढी संधि साधून निहालकर्ण तेजकर्णाला म्हणाला, " बाबा ! जाधव आपल्या भीष्मप्रतिज्ञेपासून ढळणें शक्य नाहीं; यास्तव त्यांना तुम्हीं आपल्याबरोबरच घ्यावें हें चांगलें."

" माझें देखील तसेंच मत आहे." अनुपसिंग म्हणाला.

" आणि मींदेखील तसाच विचार केला आहे." तेजकर्ण म्हणाला. " सटवोजी महान् अपराधी आहे हें जरी खरें, तरी त्याला त्या अपराधाबद्दल देहान्त शासन व तें प्रत्यक्ष जन्मदात्या पित्याच्या हातून मिळावें असें मला वाटत नाहीं. राजकन्येची मुक्तता होण्यापुरताच आपला प्रश्न आहे; व तो प्रश्न सोडविण्याच्या कामीं जाधवांचा फार उपयोग होईल अशी मला खात्री आहे. सटवोजी कितीही अधःपतित झाला असला तरी तो कांहीं असल्या बेरडगिरींत निढावलेला नाहीं. जाधवांची नुसती झुळूक लागतांच त्याचें डोकें ठिकाणावर खास येईल. मग युद्धाचा प्रसंगच पडणार नाहीं. बरें; जाधव माझ्याबरोबर आले म्हणजे त्यांना दोन समजुतीच्या गोष्टी सांगून त्यांना त्यांच्या कठोर कृतनिश्चयापासून परावृत्त करण्याचा प्रयत्नही मला करतां येईल."

इतक्यांत जाधव तेथें आले; त्याबरोबर तो विषय सर्वांनींच आवरता घेतला. जाधव आणि तेजकर्ण यांनीं रातोरात थोड्या निवडक सैनिकांसह राजकन्येच्या शोधार्थ जावयाचें ठरविलें. बोलत बोलत सर्व मंडळी देवालयाबाहेर पडते न पडते तोंच श्यामलाल देवदर्शनाच्या निमित्तानें तेथें आला. वास्तविक ती देवदर्शनाची वेळ नव्हती, श्यामलाल इतका देवभक्तही नव्हता, आणि थोड्या वेळापूर्वींच त्यानें देवदर्शन घेतलें होतें. पण भिंतीला कान लावून बसण्याची दुर्दम संवय त्याला होती, व तिचे चोज पुरविण्यासाठींच तो धडपडत होता.

श्यामलालला पहातांच तेजकर्णानें हांक मारून सांगितलें, " श्यामलाल ! तुमच्याकडे एक कामगिरी आहे."

तें ऐकतांच श्यामलालच्या अंतःकरणांत आनंदकुतूहलानें इतका कोलाहल माजविला, कीं सांगण्याची सोय नाहीं. इतक्या अपरात्रीं आपणाला यजमान कामगिरी सांगत आहेत अर्थात् ती अत्यंत महत्त्वाची असलीच पाहिजे, याविषयीं श्यामलालला तिळप्राय शंका नव्हती. थोड्या वेळापूर्वीं बालकर्णाच्या बंदिवासाची

बातमी ऐकून निराशेचे ओरखडे त्याच्या अंतःकरणावर उमटले होते ते या नव्या संधीच्या दिव्यौषधीनें आगाऊच भरून निघाले. त्यानें मनांतून याबद्दल परमेश्वराला शतशः धन्यवाद दिले, व धन्याची हांक ऐकतांच त्याचा पाळींव श्वान ज्याप्रमाणें पुच्छान्दोलन करीत उतावळेपणानें धन्याच्या तोंडाकडे टक लावून त्याच्या पायांत घोंटाळूं लागतो, त्याप्रमाणें आविर्भाव करून पुढें होऊन तेजकर्णाला विचारलें, " यजमान ! आपण कसली कामगिरी मला सांगणार आहां ? "

तेजकर्ण म्हणाला, " उदईक सकाळींच तुम्ही पुन्हा ओंकारेश्वरीं जाऊन चंद्रशेखरांना कळवा, कीं बालकर्ण भैरवगडावर शत्रूच्या कैदेंत असल्यामुळें तूर्त विवाहाचा बेत रहित झाला असें समजावें.--एवढें त्यांना कळवा."

श्यामलालचा चेहरा अगदीं बापुडवाणा झाला. त्यानें ती कामगिरी पत्करली खरी; पण केवळ निरुपायानें ! त्याला त्या वेळीं सगळ्यांपेक्षां विशेष भय वाटत असेल तर घरांतील बायकोचें ! तिनें त्याला पूर्वीच अपशकुनी ठरविलें होतें व त्याच्या निमित्तानें बालकर्णाच्या लग्नांत कांहींतरी अकल्पित विघ्न उत्पन्न होणार असें ध्वनित केलें होतें. ती तिची भविष्यवाणी खोटी पाडण्यासाठीं श्यामलालचा सारा अट्टाहास चालला होता; तोच अखेर अंगीं आला असें पाहून बायको आपणाला हंसेल याचें भय त्याला वाटत होतें. तरीही श्यामलालनें त्याही प्रसंगीं आपली कल्पकता लढवलीच. 'घरीं जातांच बायकोनें आपणाला कामगिरीचा शेवट काय झाला असें विचारण्यापूर्वीं आपणच तिला चार सणसणीत शिव्या हांसडून सांगूं कीं, हा तुझ्या दांतकसरीचा परिणाम ! तूं प्रारंभींच अशुभ बोललीस म्हणून असें झालें'. असा पुढचा बेत करून तो तेथून निघून गेला.

त्याच रात्रौ पहांटेच्या दोन घटका रात्रीच्या सुमाराला एक तरुण घोडेस्वार मांडवगडाच्या प्रवेशद्वारापाशीं आपला घोडा दौडीत येऊन पोंचला. त्या स्वारानें प्रवेशद्वारावरील पहारेकऱ्याला सांगितलें, " मी थोरले राव व जाधव यांच्याकडून आलों आहें. आतांच्या आतां मला धाकटया रावांची भेट घ्यावयाची आहे."

" तुझ्यापाशीं परवाना आहे काय ? " पहारेकऱ्यानें विचारलें.

" नाहीं. पण परवान्यासाठीं तूं माझी खोटी करशील तर त्यामुळें जो अनर्थ ओढवेल त्याची सारी जबाबदारी तुझ्या शिरावर राहील."

" मी हुकुमाचा बंदा आहें. परवानगीशिवाय कोणालाही आंत सोडण्याचा

मला हुकूम नाहीं. तूं उजाडेपावेतों एथेंच थांब. उजाडल्यावर धाकट्या रावांची भेट होईल."

"आणि आतां भेट होणारच नाहीं ?"

"नाहीं."

"कां ?"

"ते रात्रभर जागत होते व आतां कुठें अंमळ झोंपीं गेले असतील. लुग्या-सुग्यांच्या कामासाठीं त्यांना त्रास कसा द्यावा ?"

"भल्या गृहस्था ! हें काम माझ्या घरचें नाहीं. तुझ्या धन्यांना तेवढी झोंप पाहिजे असते आणि आम्हांला नको असते काय ? थोरले राव व जाधव रातोरात जे बाहेर पडले, ते त्यांना तरी झोंप नको म्हणून कीं काय ? रावांच्या बिछान्यासभोंवार शत्रूनें वणवा पेटविलेला असतांना तो विझविणें जास्त महत्त्वाचें कीं रावांची झोंप जास्त महत्त्वाची ?"

त्या तरुणाच्या ह्या कळकळीच्या उद्गारावरून पहारेकऱ्यानें अटकळ केली, कीं खरोखरच कसल्या तरी महत्त्वाच्या कामासाठीं हा तरुण आला असावा. त्यानें त्याला विचारिलें, "मी धाकट्या धनीसाहेबांना कळवून त्यांची परवानगी घेऊन येतों. परंतु तूं कोणाकडून व कशासाठीं आलास म्हणून त्यांना सांगूं ?"

"हें पहा ! परवानगीसाठीं वाट पहाण्यांत वेळ दवडणें धोक्याचें आहे. थोरले राव व जाधव मुख्यतः राजकन्येच्या शोधार्थ रातोरात बाहेर पडले आहेत हें तुला माहीत आहे ना ?"

"होय."

"झालें तर. मला राजकन्येचा तपास लागला आहे व तिला शत्रूच्या मगर-मिठींतून सुखरूपपणें सोडवून आणण्यासाठींच धाकट्या रावांची आवश्यकता आहे. उजाडण्यापूर्वीं आम्हीं चपळाई केली, तरच राजकन्या हातीं लागण्याचा संभव आहे."

"मग मी काय करूं ?"

"तूं मला असाच धाकट्या धन्यांकडे घेऊन चल."

पहारेकऱ्यालाही त्या तरुणाचें मत ग्राह्य वाटलें. तो आपल्या दुसऱ्या जोडीदाराला पहारा पहावयाला सांगून त्या तरुणासह आंत गेला. आंत जातांच त्यानें प्रथम निहालकर्णाला झोंपेंतून जागें केलें. तेव्हां निहालकर्ण अकालीं झोंप-

मोड झाल्यामुळें त्याच्यावर रागावला. पण राजकन्येविषयींची वार्ता पहारेकऱ्यानें निवेदन करतांच निहालकर्णानें एका क्षणाचाही विलंब न लावतां त्या नव्या तरुण दूताची भेट घेतली.

" मी जाधवांचा सेवक आहें." तो तरुण म्हणाला, " राजकन्येवर कोसळलेल्या संकटाची बातमी आम्हांला चार घटका रात्रीला कळली, व धन्यांवर मार्गांत संकट कोसळलें तेंही कळलें; म्हणून आम्ही ताबडतोब शोधार्थ निघालों. थोरले राव व माझे धनी राजकन्येच्या तपासासाठीं रातोरात निघाले ते आम्हांला मार्गांतच भेटले. राजकन्या शत्रूच्या हातीं सांपडली आहे व ते तिला उज्जयनीकडे शहाजाद्यापाशीं घेऊन जाणार आहेत हें खरें. पण आमचें सैन्य त्यांना अडविण्याच्या कामगिरीवर निघाल्याची वार्ता त्या लोकांच्या कानीं गेल्यामुळें ते अजमेरीसिंग व राजा शिवसिंग यांच्या सैन्याची वाट पहात नर्मदाकांठीं असलेल्या सुभगेश्वराच्या देवालयांत दडून बसले आहेत. अजमेरीसिंग व शिवसिंग यांच्याकडे त्यांचे दूत रवाना झाले आहेत व सूर्योदयापूर्वीं तें सैन्य तेथें यावयाचें आहे. त्यापूर्वीं आपण चपळाई केली तरच राजकन्या हातीं लागेल."

त्या तरुणानें सांगितलेल्या माहितीवर विश्वासून निहालकर्ण अनुपसिंगासह ताबडतोब निवडक पंचवीस सैनिकांची तुकडी बरोबर घेऊन राजकन्येच्या रक्षणार्थ निघाला. गडाच्या पायथ्याशीं नर्मदाकांठीं असलेल्या सुभगेश्वराच्या मंदिराच्या आसमंतात् जाईतों निहालकर्ण, अनुपसिंग व तो बातमीदार तरुण हे तिघेही आपले घोडे जवळ जवळ चालवून गोष्टी बोलत होते. आणखी अंमळ जवळ जातांच त्या तरुणानें निहालकर्णाला सुचविलें, " मला वाटतें, आपण आपले घोडे इथेंच ठेवावे, व मदतगार सैनिकांनाही इथेंच थांबावयाला सांगून तिघांनीं आंत जावें. बहुधा देवालयांत राजकन्येच्या रक्षणासाठीं फारसे लोक नसतील. ते कदाचित् वाटचालीच्या श्रमांमुळें झोंपीं गेले असतील.तसें असल्यास आपण एकट्या राजकन्येला जागी करून बाहेर आणूं. तसा प्रसंगच पडला तर आपल्या सैनिकांना बोलावून घेऊं म्हणजे झालें."

त्या तरुणाचा हाही विचार निहालकर्ण व अनुपसिंग यांना पटला. ते घोड्यावरून खालीं उतरले व त्या तरुणाच्या पाठोपाठ चालूं लागले. जातां जातां निहालकर्णानें आपल्या सैनिकांना आज्ञा केली, " तुम्ही इथेंच सावधगिरीनें उभे

रहा. आम्ही जर गरज लागली तर त्रिवार शंखनाद करून तुम्हांला इषारा देऊं, कीं लगेच तुम्ही धावून या."

सुभगेश्वराचें देवालय मांडवगडाच्या पायथ्याशीं वृक्षाच्छादित व अडचणीच्या अशा खोल दरींत थेट नर्मदेच्या कांठावरील एका प्रचंड खडकाळ टेकडीवर होतें. तेथवर जाण्याचा मार्ग अत्यंत अवघड व धोक्याचा असल्यानें तेथें कोणाची फारशी रहदारी नसे. त्यामुळें चोर, लुटारू, दंगेखोर अशा लोकांना लपून रहाण्याला ती एक अत्यंत सुरक्षित अशी जागा होती. अशा जागीं ज्या अर्थी राजकन्येला शत्रूनें आणून ठेविलें आहे व ज्या अर्थी आपणाला आपल्या इतक्या सैनिकांचें साह्य आहे, त्या अर्थी राजकन्येची सुटका होणें अशक्य नाहीं. अशा आशावादी विचारांत निहालकर्ण व अनुपसिंग हे दोघेही त्या तरुणाबरोबर देवालयापर्यंतची पाव कोस वाट हां हां म्हणतां चालून गेले. त्यांनीं देवालयासभोंवारच्या तटाच्या आंत प्रवेश केला मात्र, तोंच त्यांच्या सभोंवारची सारी सृष्टि बदलली. तो तरुण देवालयांत राजकन्या कोठें आहे, ती झोंपीं गेली आहे कीं काय, तिच्या सभोंवार पहारा कितपत आहे, वगैरे माहिती काढण्यासाठीं त्या दोघांच्या जरा पुढें गेला होता व त्याच्या सूचनेप्रमाणें निहालकर्ण आणि अनुपसिंग यांनीं वागावयाचें होतें. पण तो तरुण माघारा येण्याऐवजीं देवालयांतून भराभर दहा सशस्त्र शिपाई आपले भाले सरसावून त्या दोघांवर चालून आले, व ते दोघे आल्या वाटेनें चार पावलें माघारें जाऊं पहातात तों त्यांच्या मागचा मार्गही परस्पर बाहेरून आलेल्या दुसऱ्या दहा सैनिकांनीं रोंखून धरिलेला !

हा प्रकार अगदीं अकल्पित घडल्यामुळें निहालकर्ण व अनुपसिंग हे दोघेही गोंधळून गेले. त्यांच्या मनानें घेतलें कीं, हे शत्रूचे लोक आपण येथें येऊन पोंचण्यापूर्वीच आले असावे, व त्यांनीं आपल्या नव्या तरुण दोस्ताला देवालयांत जायबंदी केलें असावें. त्यांना स्वतःविषयीं जितकी चिंता वाटत होती, त्याहीपेक्षां त्या नव्या तरुण सोबत्याची जास्त चिंता वाटत होती. ह्या संकटांतून पार पडण्याला शत्रूशीं दोन हात करण्याशिवाय गत्यंतरच नाहीं असें पाहून आपल्या सैनिकांना इषारा देण्यासाठीं निहालकर्णानें जोरानें शंख फुंकला. इतक्यांत त्यांचा नवा तरुण दोस्त त्या शिपायांच्या गराड्यांतून पुढें येतांना त्या

दोघांना आढळला. कदाचित् शत्रूचे लोक त्याच्यावर हल्ला करतील तर त्याचें रक्षण करावें ह्या इरायानें ते दोघेही आपल्या तरवारी सरसावून पुढें झाले.

पण काय आश्चर्य! शत्रूच्या सैनिकांनीं त्या तरुणाला जरादेखील प्रतिबंध केला नाहीं; उलट त्याला आपल्यामधून वाट दिली, व तो पुढें येतांच त्याच्या सभोंवार कोंडी केली. त्या कोंडींतून तो तरुण गंभीरपणानें उद्गारला. "निहालकर्ण! अनुपसिंग! तुम्ही माझे कैदी आहां. आतां तुमचे सैनिक तुमच्या साह्याला धावून येतील या भरंवशावर तुम्ही अतिप्रसंग करूं पहाल तर व्यर्थ प्राणाला मुकाल. कारण तुमच्या सैनिकांची लांडगेतोड करण्यासाठीं माझ्या पन्नास सैनिकांची तुकडी आतांच तिकडे रवाना झाली आहे. तुम्हांला मीं राजद्रोहाच्या आरोपावरून कैद केलें आहे; व तुम्हांला आपले प्राण वांचवावयाचे असतील तर त्याला एकच मार्ग मोकळा आहे."

"इतका नीच विश्वासघातकी तूं कोण रे?" निहालकर्णानें त्या तरुणावर दांतओंठ खात विचारलें, "हरामखोरा! आम्हांला असा गोता दिलास काय? ही कोणत्या जन्मींची दावेदारी साधलीस?"

"ही या जन्मींचीच दावेदारी; काय समजलास? हतभाग्या! एकवार माझ्याकडे नीट पहा, मला नीट ओळख, कीं तुला माझी ओळख पटेल; व मीं असें कां केलें याविषयीं जरा देखील शंका राहणार नाहीं. आणि याद राख, असे मगरूरपणाचे उद्गार जर पुन्हा तुझ्या तोंडून बाहेर पडले, तर माझ्या हातांतील तरवारीच्या एका फटकाऱ्यासरसा इथें, या पटांगणांत तुझ्या रक्ताचा सडा घातला जाईल." लगेच तो तरुण आपल्या सैनिकांकडे वळून म्हणाला, "या दोघांनाही जेरबंदांनीं चांगलें बांधून कैद करा."

नेमका त्याच वेळीं एक वरवर तरी सामान्य दिसणारा मनुष्य त्या दगलबाज तरुणापाशीं येऊन उभा राहिला. त्या तरुणानें त्याला हांक मारून विचारलें, "चमेलीसिंग! काय खबर आणलीस?"

पूर्व दिवशीं ओंकारेश्वरीं बेलविक्याच्या वेषानें संचार करणारा निजामाच्या पक्षाचा हेर चमेलीसिंग वाचकांच्या परिचयाचा आहेच. तो प्रसन्न चित्तानें उत्तरला, "आपण ज्या गोष्टींविषयीं इतकी यातायात करीत होतां त्या सर्व गोष्टी यथास्थित सिद्धीला गेल्या."

"काय काय झालें ?" त्या तरुणानें पुन्हा आतुरतेनें विचारलें, "राजकन्या व काशीबाई कैद होऊन उज्जयनीकडे रवाना झाल्या तें मला कळलें. पण पुढें ?"

"चंद्रशेखर देखील निजामाशीं तडजोड करण्यासाठीं उज्जयनीकडे रवाना झाला."

"ही बातमी जुनीच आहे. आणखी कांहीं नवी बातमी ?" त्या तरुणानें पुन्हा प्रश्न केला.

चंद्रशेखरांविषयीं बातमी ऐकून निहालकर्ण व अनुपसिंग ह्या उभयतांच्याही अंतःकरणाला जोराचा धक्का बसला.

चमेलीसिंग पुढें उद्गारला, "भागाबाई स्वखुषीनें बालकर्णाशीं लग्न करण्याचें नाकारून शहाजाद्याच्या जनानखान्यांतील सुखोपभोग भोगण्यासाठीं कालिदासाबरोबर रात्रौ निघून गेली."

"खरेंच ?"

"खरेंच."

ही वार्ता ऐकून त्या तरुणाचा आनंद गगनांत मावेनासा झाला. त्यानें चमेलीसिंगाच्या हातावर टाळी देऊन म्हटलें, "परमेश्वर आपला साह्यकारी आहे."

ही वार्ता ऐकून तर निहालकर्ण व अनुपसिंग यांच्या हृदयावर जणुं वज्राघात झाला. त्यांनीं दोन दीर्घ उसासे सोडून कपाळाला हात लावले.

"बरें; आणखी काय खबर ?" त्या तरुणानें चमेलीसिंगाला विचारलें.

"आणखी खबर—आपणाला राजा शिवसिंगजींचा निरोप आहे. पण तो अत्यंत महत्त्वाचा आहे. आपण जरा बाजूला या."

तो निरोप ऐकण्यासाठीं तो तरुण चमेलीसिंगाबरोबर जरा बाजूला गेला.

निजामाच्या पक्षांतील इतकीं अंतरंगी कारस्थानें उभारणारा तो विश्वासघातकी तरुण कोण असेल बरें ? आणि भागाबाई—स्वाभिमान व स्वदेशाभिमान यांची मूर्तिमंत पुतळी भागाबाई—बालकर्णावर आपल्या प्राणापलीकडे प्रेम करणारी भागाबाई—बालकर्णाचा तिरस्कार करून शहाजाद्याच्या जनानखान्यांतील अनीतिकारक विलासविहार भोगण्याला संतोषानें तयार झाली, असें कसें झालें ?

## प्रकरण एकोणिसावें

# गणेशतीर्थावर

निहालकर्ण व अनुपसिंग यांना तूर्त मांडवगडाच्या पायथ्याशीं सुभगेश्वराच्या देवालयांत प्राप्त परिस्थितीशीं झगडण्याला सोडून आपणाला आतां प्रथम बाजीराव, मल्हारराव बांडे, सज्जनसिंग, वनवासी वगैरे मंडळींच्या हालचालींचें ज्ञान करून घेण्यासाठीं उज्जयनीच्या मार्गाकडे वळलें पाहिजे. कारण, त्या सर्व मंडळींचा रोख मुख्यतः भैरवगड उज्जयनीकडेच होता; व बाजीराव वगैरे मंडळींची भैरवगडाच्या आसमंतात् गणेशतीर्थावर भेट होऊन तेथें काय तें पुढील गुप्त खलबत ठरावयाचें होतें, हें आपणांला पूर्वी कळून चुकलेलेंच आहे.

देवदूतसंघाच्या भूमिगत मुख्य स्थानाहून बाजीराव व वनवासी हे आपापल्या अंगीकृत कामगिरीवर निघाल्यावर मल्हारराव बांड्यांनीं सटवोजी जाधव ओंकारेश्वर-मांडवगडाकडून माघारा आल्यावर त्याच्यासह बाजिरावांच्या मागोमाग जावयाचें ठरलें होतें. परंतु सटवोजी जो कालिदासाबरोबर गेला, तो माघारा येण्यापूर्वीच मल्हाररावांना एकलिंगजी नांवाच्या देवदूतामार्फत पाताळकुंडाच्या आसपास सज्जनसिंगाच्या रक्षणार्थ जावें अशा आशयाची बाजिरावांची आज्ञा झाली, व ती आज्ञा प्रमाण मानून मल्हारराव तावडतोब दुसऱ्या एका देवदूतासह पाताळकुंडाकडे निघून गेले. त्यांची तिकडे काय गत झाली, हें आपणांला मागें विदित झालें आहेच. अर्थात् सटवोजी व मल्हारराव यांची भेट होण्याचा योग बिघडला. सटवोजीविषयीं जे प्रवाद पूर्वी आपल्या कानीं आले आहेत, त्यांमुळें एरव्हीं तो योग बिघडला असता किंवा नाहीं हें अजमावून पाहाण्याचें तूर्त आपणाला कांहीं कारण नाहीं; ओघाओघानें त्या सर्व गोष्टींचा परिस्फोट होणारच आहे. आतां तूर्त आपणाला सज्जनसिंग, जो मल्हाररावांचे पाताळखिंडींतील सैनिक बरोबर घेऊन मल्हाररावांच्या शोधार्थ निघाला, त्याचें पुढें काय झालें तें पहावयाचें आहे.

एक दिवस गेला, दोन दिवस गेले, तीन दिवस गेले; सज्जनसिंग त्या सैनिकांसह आसपासच्या संभवनीय जागीं मल्हाररावांचा तपास करीत होता. तेवढ्यासाठीं त्यानें मल्हाररावांच्या सैनिकांना मुद्दाम मोक्याच्या जागा सांगून दाही दिशांना तपासासाठीं

पाठविलें होतें; व स्वतःही तो आपल्या डोंगरी अनुयायांसह त्याच हेतूनें वणवण करीत हिंडत होता. पण मल्हाररावांचा तपास कांहीं केल्या लागेना. त्या दरम्यान् त्याला महत् प्रयासानें तपास एवढाच लागला कीं, बाजीराव पेशवे यांनीं कालिसादापाशीं आपण सेनापति दाभाडे आहों असा बहाणा करून त्याच्याकडून बऱ्याच अंतस्थ बातम्या काढून घेतल्या असून त्यांचा व त्यांच्या मंडळीचा गणेशतीर्थावर पांचसात दिवसांत एकत्र जमण्याचा संकेत ठरला आहे. याशिवाय मल्हारराव पाताळ-खिंडींत येऊन कसे गोत्यांत पडले याविषयीं कसून चौकशी करतां मल्हार-रावांच्याच सैनिकांकडून तो वृत्तान्त सज्जनसिंगाला कळला होता. त्यावरून बाजिरावांना अत्यंत विश्वासार्ह वाटणारा वनवासी हा खराखुरा देशोद्धारक साधु नसून अनुराधसिंग, निजाम वगैरे शत्रूंचा हस्तक आहे; त्यानें माळव्यांतील पेशव्यांचा उद्योग समूळ हाणून पाडण्यासाठीं देवदूतसंघाचें थोतांड उभारलें आहे; बाजीराव, मल्हारराव वगैरे मंडळींची जूट फोडून एकेकाला दगा देण्याच्या उद्देशानेंच वनवासीनें बाजिरावांच्या नांवावर सज्जनसिंगाचें रक्षण करण्याचें थोतांड रचून त्या थोतांडाची सांगता एकलिंगजी या नांवाच्या आपल्या हस्तकामार्फत केली; असा निष्कर्ष सज्जनसिंगानें काढला. सज्जनसिंग व बाजीराव यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा स्नेह होता. सज्जनसिंगानें प्रत्यक्ष आपल्या वडील बंधूविरुद्ध अर्थात अनुराधसिंगाविरुद्ध—तो बादशहाची सेवा पत्करून देशद्रोहाला प्रवृत्त झाला व पेशव्यांवर चालून आला म्हणून—शस्त्र उगारून अनुराधसिंगाचा सोळा आणे मोड करण्याच्या कामीं यश मिळविलें होतें, व तो बाजिरावांना आपल्या वडील बंधूच्या ठायीं मानूं लागला होता. बाजिरावांनींही उज्जयनीच्या आसपासचा प्रांत सज्जनसिंगाच्या हवालीं करून व भैरवगडावर त्याचें ठाणें मांडून देऊन अनुराधसिंगाशीं विरोध केल्यामुळें त्याचें जें नुकसान झालें होतें त्याची तात्पुरती भरपाई करून दिली होती, व मध्येंच उपस्थित झालेली निजामाची पुंडाई मोडून दिल्लीच्या बादशहाला नरम करून त्याच्यापासून इष्ट असा तह करून घेतल्यावर भदावरच्या राज्यावर अनुराधसिंगाच्या ऐवजीं सज्जनसिंगाची नेमणूक करावयाची असा बाजिरावांचा उत्कट मानस असल्याचें सज्जनसिंगाला माहीत होतें. मात्र सज्जनसिंग बाजिरावांनीं उभारलेल्या स्वातंत्र्ययुद्धांत या राजवैभवाच्या आशेनें त्यांच्या बाजूनें लढत होता असें नाहीं. सज्जनसिंग हा धर्मसिंहानें पूर्वीं स्थापिलेल्या स्वातंत्र्यसंघाचा एक प्रमुख घटक होता व त्या पवित्र

ध्येयाप्रीत्यर्थ त्यानें वर्षानुवर्षे अज्ञातवास पत्करिला होता, याचें ज्ञान वाचकांना पूर्वीच झालें असल्यानें त्याच गोष्टी नुसत्या सांकेतिक निर्देशापलीकडे जास्त विस्तारानें सांगितल्या पाहिजेत असें नाहीं.

इतक्या कळकळीनें मायदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं ऋणंगमिकारी बनलेल्या सज्जनसिंगाला जेव्हां बाजीराव हे वनवासीसारख्या थोतांडी भोंदू फितुराच्या हातांतील बाहुलें बनले आहेत असें वाटलें, तेव्हां बाजिरावांना वेळींच सावध करून त्यांच्या साह्यानें प्रथम वनवासीचा व त्याच्या देवदूतसेनेचा योग्य बंदोबस्त जेणेंकरून केला जाईल अशी तजवीज करणें हें पहिलें कर्तव्यसें वाटून त्याप्रमाणें तो बाजिरावांची भेट शक्य तितक्या तांतडीनें घेण्याच्या उद्योगाला लागला. बाजीराव व त्यांची विश्वासांतील मंडळी—वनवासीदेखील—गणेशतीर्थावर लौकरच एकत्र जमावयाची आहेत हें सज्जनसिंगाला माहीत झाल्यामुळें बाजीराव कधीं एकदां गणेशतीर्थावर येतात व त्यांची भेट घेऊन त्यांना आपण वनवासीविषयीं कधीं एकदां सावध करितों असें होऊन गेलें होतें. तेवढ्यासाठीं तो गणेशतीर्थापासून थोड्या अंतरावर दबा धरून बसला होता.

अखेर एके दिवशीं त्याच्या गुप्त बातमीदारांकडून त्याला खबर मिळाली कीं, सेनापति दाभाडे आज गणेशतीर्थावर मुक्कामाला आहेत. बाजिरावांनीं गनिमी काव्यानें आपण सेनापति दाभाडे असल्याचा बहाणा केल्याचें त्याला पूर्वीच माहीत असल्यानें सज्जनसिंग दाभाड्यांच्या आगमनाचें नांव ऐकून पिचकला नाहीं; त्यानें ती गोष्ट अगदीं गुप्त ठेवून गणेशतीर्थी आपला एक सेवक पाठवून सेनापति दाभाड्यांना भेटण्याची आपली इच्छा दर्शविली. त्या सेवकापाशीं त्यानें एक विस्तृत पत्र लिहून दिलें होतें, व वनवासी हा शत्रुपक्षाचा हेर असल्यानें त्याचें पारिपत्य करण्याच्या कामीं सर्वांनीं प्रथम मनःपूर्वक झटलें पाहिजे असें त्या पत्रांत ध्वनित केलें होतें. तें पत्र शत्रुपक्षांतील कोणा माणसाच्या हातीं लागलें तरी त्याला आपणाविषयीं संशय येऊं नये म्हणून सज्जनसिंगानें तें पत्र मुद्दाम सांकेतिक भाषेंत व तेंही सेनापति दाभाड्यांच्या नांवानें लिहिलें होतें.

सज्जनसिंगाच्या त्या पत्राला उचित असें सेनापति दाभाड्यांचें उत्तर तावडतोब मिळालें, व सज्जनसिंग लगेच सडाच आपला पुढील कार्यभाग साध्य करण्यासाठीं त्याच दिवशीं घटकाभर रात्रीला गणेशतीर्थावर जाऊन पोंचला. तेथें जातांच त्याला त्या रात्रौ क्षिप्रेच्या तीरावरील एका जुनाट पण अलीकडे झाडून

साफसूफ केलेल्या वाड्यांत वस्तीला जागा मिळाली; व भेटीचा वेळ उदईकचा ठरला.

पण—पण काय ! सज्जनसिंग त्या वाड्यांत जाऊन पोंचला मात्र, व लगेच त्या वाड्याच्या महादरवाजाला कुलूप ठोकण्यांत येऊन वाड्यावर हत्यारबंद मराठे शिपायांचा खडा पहारा बसला. तो वाड्यांत जाऊन पहातो तों आंत एकही सेवक नाहीं व कसलीही सोय नाहीं. तो साऱ्या वाड्याभर हिंडला, तों तेथें पुरेसा दीप-प्रकाश देखील नव्हता; मग नोकरचाकर कुठचे ! वाड्याच्या वरच्या मजल्यावरील दिवाणखान्यांत एक जुनी बैठक आंथरलेली होती, व त्या बैठकीवर एक दोन जुनीं कोचें होतीं, एवढीच काय ती सोय ! त्यानें आतां कोणी येईल, मग येईल म्हणून वाट पाहिली, नोकरांना हांका मारून पाहिल्या; पण व्यर्थ ! आपण वाड्यांतील पाहुणे नसून तुरुंगांतील कैदी आहों अशी त्याची खात्री होण्याला फार वेळ लागला नाहीं ! हें काय !

सज्जनसिंगाचें मन तो एकंदर प्रकार पाहून क्षणोक्षणीं जास्त जास्त संशयाच्या भोंवऱ्यांत गुरफटून जाऊं लागलें, व तो खिन्न मनानें आपल्या मनाशींच प्राप्त परिस्थितीविषयीं विचार करीत त्या शून्य व भयाण वाड्यांतील मुख्य दालनांत येरझारा घालीत स्वतःशीच बोलूं लागला, "हें काय ! मी खरोखरच सेनापति दाभाड्यांच्या हातीं लागलों व म्हणून तर त्यांनीं मला कैद केलें नसेल ना ! "

पण त्या रात्रीच्या प्रशान्त वेळीं सज्जनसिंगाला त्याच्या शंकेचें कोण उत्तर देणार ! बाकी, त्यानें ती शंका जगाला विचारलीही नव्हती, व जगापासून तो त्या शंकेच्या उत्तराची अपेक्षाही करीत नव्हता. त्यानें तो प्रश्न आपल्या मनाला विचारला, व मनानें त्याला उत्तर दिलें कीं, " होय. तूं दाभाड्यांच्याच हातीं सांपडलास. आतां तुझीं शंभर वर्षे भरलीं. पेशव्यांशीं तुझी दोस्ती आहे हें दाभाड्यांना माहीत आहे व म्हणूनच दाभाड्यांचा तुझ्यावर दांत आहे. पेशव्यांना दाभाडे पाण्यांत पहातात, त्याप्रमाणेंच त्यांच्या साह्यकाऱ्यांनाही पाण्यांत पहातात. निजाम तुझा शत्रु, पाठचा भाऊ अनुराधासिंग तुझा शत्रु, दाभाडे तुझे शत्रु, फार काय ! ..." अर्थात् तें सज्जनसिंगाच्या मनाचेंच उत्तर; त्यांतून सज्जनसिंगाला संभवनीय वाटलेल्या परिस्थितीचाच मूक प्रतिध्वनि उमटावयाचा ! सज्जनसिंगानें प्रारंभापासून आपण दाभाड्यांचे साह्यकारी असल्याची जी भूमिका घेतली होती, ती त्याला आतां पूर्णपणें आठवूं लागली, व त्याच अनुरोधानें त्याचें मन त्याला

पडसाद देऊं लागलें, " फार काय, तूं जरी कोणत्याही उद्देशानें स्वतः दाभाड्याचा अर्थात् पेशव्यांच्या प्रतिपक्षाचा साहयकारी असल्याचें कल्पनाजाल सभोंवारच्या सृष्टीवर पसरीत आला असलास, तरी त्याची खबर पेशव्यांच्या कानीं गेली असेल यांत तिळप्राय शंका नाहीं. मग पेशवे तुला काय म्हणतील ? ते तुला नीच–विश्वासघातकी–देशद्रोही म्हणणार नाहींत काय ? "

" अर्थात् !" त्या स्वतःच्या मनाच्या प्रश्नाला सज्जनसिंगानें मनोमन उत्तर दिलें, " पेशवे मला विश्वासघातकी म्हणतील. मी आजवर मायभूमीच्या स्वातंत्र्या-साठीं प्रत्यक्ष सख्ख्या भावाचाही वैरी झालों; देवदत्तसंघाच्या क्रांतिकारक चळवळींत पुढाकार घेऊन देशांतील कैक तरुणांना माझ्या नादानें वनवासी बनविलें; बायको–मुलांवर संकट कोसळलें तरी देखील शत्रूला शरण न जातां बायको–मुलांच्या भवितव्याची काळजी न करितां देशोद्धाराचा उद्योग थांबविला नाहीं; इतकी माझी नीतनम स्वदेशनिष्ठा पाहूनच पेशवे माझ्यावर प्रेमाची पांखरछाया धरून माझ्या जीविताला जपत आहेत. त्या पेशव्यांना हा प्रकार आतां कळल्याशिवाय थोडाच रहाणार आहे ! मग ते मला काय म्हणतील !–आणि माझी बायको–मुलें ? ज्यांनीं माझ्या स्वदेशसेवेच्या उद्योगाला सुयश चिंतीत त्या चांडाळाच्या–अनुराधाच्या बंदिवासाचा मार्ग आनंदानें पत्करिला व जीं आज त्या बंदिशाळेंत नानापरींच्या हालअपेष्टा भोगीत असतील, त्यांना या सज्जनसिंगाचा इतका अधःपात झाल्याची बातमी ऐकून किती खेद होईल बरें ! माझी अर्धांगी 'असल्या देशद्रोही नवऱ्याच्या नांवानें कुंकूं लावण्यापेक्षां तें मुळींच न लावलेलें बरें' असें म्हणून मी मेलों असें समजून तें कुंकूं पुसून टाकील; माझा लहानगा वीरसिंगही 'आपण अशा नादान देशद्रोही बापाच्या पोटीं वृथा जन्माला आलों' असें म्हणून धाय मोकलून रडेल; अशी सर्वत्र माझी छीः थूः होईल; व ती केवळ गैरसमजुतीनें ! पण ती गैरसमजूत दूर करण्याला मला तोंड नाहीं. आतां या शत्रूच्या मगर-मिठींतून माझी मुक्तता होणें शक्यच नाहीं. मी क्रांतिकारक आहें, मी बादशाही सत्तेचा उघड उघड शत्रु आहें; ही गोष्ट जगजाहीर झालेली असतांना मी आतां माझ्या बचावासाठीं दाभाड्यांपाशीं बादशहा व निजाम यांच्या कैवाराच्या गोष्टी बोलूं लागलों, तरी त्यांना त्या थोड्याच खऱ्या वाटणार आहेत ! बरें; मी आतां पेशव्यांच्या बाजूचा नाहीं अशी दाभाड्यांची खात्री करून देण्याचा प्रयत्न केला, तरी दाभाड्यांचा त्यावर थोडाच विश्वास बसणार आहे ! ..."

" एकूण काय !"...सज्जनसिंग मनस्तापाच्या अतिरेकानें सुन्न मस्तक झालेला व पिसाळलेल्या मनोवृत्तींबरोबर वहात चाललेला असा दिवाणखान्यांतून गच्चीवर येऊन उभा राहिला तरी त्याचें विचारभ्रमण सुरूच होतें, " एकूण काय ? माझा अवतार संपला ! मला आतां जगांत तोंड दाखविण्याला जागा उरली नाहीं. आणि ही आपत्ति व विटंबना हकनाहक माझ्यावर ओढवली ! या भोक्तृत्वाला मी जबाबदार आहे काय ? पेशवे आपण दाभाडे असल्याचा बहाणा करून इकडे संचार करीत आहेत अशी खबर लागल्यामुळें मीं एवढें कारस्थान केलें; त्यांत माझें काय चुकलें ? पण माझें कांहीं चुकलें नाहीं, अशी जगाची खात्री मी कशी पटवून देऊं शकणार ? हर ! हर ! जगांत सत्याचा शेवटीं जय होतो असें म्हणतात. पण त्या सत्याच्या शाश्वत तत्त्वाला एकट्या माझ्यापुरताच कसा ताळ उरला नाहीं ? माझा सत्यवादीपणा प्रकाशांत येण्याला जरादेखील अवकाश कसा उरला नाहीं ? हें माझें पूर्वदुःसंचित माझ्या मार्गांत आडवें येत आहे काय ? या जाचांतून माझी सुटका कशी होईल बरें ? मी मरणाला भीत नाहीं, जन्माला आलेल्या प्रत्येक प्राण्याला मरण हें यावयाचेंच; पण अपकीर्ति व तीही हकनाहक होऊन मरण येणार, म्हणून मला तें अत्यंत कष्टप्रद वाटतें. बरें; मी जर आतां अखेरपावेतों पेशव्यांच्या विरुद्ध असल्याचा बहाणा केला, तर तरी मला दाभाड्यांच्या मगरमिठींतून मुक्तता करून घेतां येईल काय ?........."

असे विचार एकसारखे सज्जनसिंगाच्या मनांत घोळत होते, व तो एकदां दिवाणखान्यांत तर पुन्हा गच्चीवर अशा येरझारा घालीत होता. मधून मधून त्यानें समोरच दिसणाऱ्या क्षिप्रेच्या प्रवाहाकडे नजर फेंकावी, गणेशालयाच्या शिखराकडे पहावें, तेथून दूरवर असणाऱ्या भैरवगडाकडे डोकावून पहाण्याचा प्रयत्न करावा, —कारण त्या काळोख्या रात्रीं त्याला तेथून भैरवगड दिसणें शक्यच नव्हतें—असा प्रकार जवळ जवळ मध्यरात्रीपावेतों सुरू होता. मध्यरात्रीच्या सुमाराला अतिश्रांत झाल्यामुळें दिवाणखान्यांतील एका कोचावर पहुडला तरीही त्याच्या मस्तकांत दारुण विचारांचें काहूर सुरूच होतें. त्या विचारगर्तेत परिभ्रमण करतां करतां त्याचा डोळा लागला.

बाजिरावांनीं त्या वाड्यावर जे पहारेकरी नेमिलेले होते, तेही दिवसभर घोडदौडीमुळें अत्यंत थकलेले होते. तेदेखील मध्यरात्रीच्या सुमाराला निद्रादेवीच्या हल्ल्यानें घायाळ होऊन डुलक्या घेऊं लागले, व थोड्याच वेळांत झोंपीं गेले.

आणखी थोड्या वेळानें एक नखशिखान्त काळा बुरखा घेतलेली व्यक्ति पली-कडच्या गणेशालयांतून बाहेर पडली व क्षिप्राघाटावरून मंद मंद पावलें टाकीत मधून मधून आपल्या हालचालींवर कोणाचें लक्ष्य आहे किंवा कसें याविषयीं कानोसा घेत त्या वाड्याच्या दरवाजापाशीं येऊन पोंचली. त्या व्यक्तीनें कांहीं क्षण दरवाजांत थांबून पहारेकरी जागे आहेत कीं झोंपले आहेत, याचा कानोसा घेतला. ते दोघेही झोंपीं गेले आहेत अशी खात्री होतांच त्या व्यक्तीनें प्रथम त्यांच्या जवळचीं शस्त्रें अत्यंत सावधगिरीनें काढून घेऊन सहज नजरेच्या टप्प्यांत येणार नाहींत इतक्या अंतरावर दूर नेऊन फेंकून दिलीं, व नंतर दरवाजाकडे वळून पाहिलें, तों दरवाजाला कुलूप! पण त्या व्यक्तीच्या सुदैवानें त्या कुलुपाची किल्ली त्या निद्रिस्थ पहारेकऱ्याच्या हातीं असलेली तिला आढळली. लगेच त्या व्यक्तीनें मोठ्या शिताफीनें ती किल्ली काढून घेतली, व वाड्याचा दरवाजा उघडला. किल्ली घेतांना जरी पहारेकरी जागा झाला नाहीं, तरी कुलुपाच्या आवाजानें तो जागा झाला, व धडपडत उठून त्या बुरखेवाल्या व्यक्तीवर झडप घालूं लागला. पण तेवढ्यांत त्या व्यक्तीनें आपल्या बुरख्याखालून एक तीक्ष्ण खंजीर बाहेर काढला, व त्या पहारेकऱ्याच्या छातींत खुपसला. त्या प्राणघातक वारासरसा तो पहारेकरी एकदां—फक्त एकदांच—किंचाळी मारून खालीं कोसळला. ती बुरखेवाली व्यक्ति तशीच लगबगीनें आंत गेली, व आंत जातांच दरवाजा आंतून बंद करून घेऊन एका दालनांतून दुसऱ्या दालनांत अशी हिंडत हिंडत चौकस दृष्टीनें शोध करीत सज्जन-सिंग ज्या माडीवरच्या दिवाणखान्यांत झोंपीं गेला होता, त्याचा जिना चढून दरवाजांत प्रविष्ट झाली.

इकडे दरवाजावरील दोन झोंपाळू पहारेकऱ्यांपैकीं एकाचा अंत झाला. त्याच्या अंतकाळच्या किंचाळीनें दुसरा पहारेकरी खडबडून जागा झाला, व प्रथम आपलें शस्त्र सभोंवार चांचपडून पाहूं लागला. पण शस्त्र कांहीं त्याच्या हातीं लागेना. तशा स्थितींतही त्यानें एकदम दरवाजावर झडप घातली. पण त्यापूर्वींच कांहीं क्षण दरवाजा आंतून बंद झाला होता. दरवाजाचें कुलूप जाग्यावर नाहीं असें पाहून कोणीतरी आंत गेलें असावें एवढें त्या पहारेकऱ्यानें ओळखलें; पण कोण आंत गेलें हें त्याला मुळींच कळलें नाहीं. त्यामुळें तो बुचकळ्यांत पडला, व जोडीदाराचें प्रेत दरवाजांत पडलेलें पाहून तर त्याच्या तोंडचें पाणीच पळालें. तो या अकल्पित घटनेची पेशव्यांना वर्दी देण्यासाठीं त्यांच्या वाड्याकडे पळत गेला.

दरवाजा उघडून आंत गेलेल्या व्यक्तीला दरवाजाबाहेर चाललेल्या घडामोडींची अर्थात् कांहींच जाणीव नव्हती. ती व्यक्ति सज्जनसिंग ज्या दिवाणखान्यांत कोचावर झोंपीं गेला होता त्या दिवाणखान्याच्या दरवाजांत जिन्याच्या तोंडाशीं उभी राहून थोडा वेळ सज्जनसिंगाकडे निरखून पहात होती. थोडा वेळ निरखून पाहिल्यावर त्या व्यक्तीनें आपल्या तोंडावरील बुरखा हलकेच बाजूला सारला. त्या वेळीं सज्जनसिंग गाढ झोंपीं गेला होता म्हणून, नाहींपेक्षां ती बुरखेवाली व्यक्ति कोणी मध्यम वयाची लावण्यवती आहे असें त्याला आढळून आलें असतें. त्या लावण्यवतीचे लांब सडक केंस अव्यवस्थितपणें पाठीवर इतस्ततः मोकळे सुटले होते. तिनें मळकट शुभ्र वस्त्र परिधान केलें होत तिची चर्या सुंदर खरी; पण ती एखाद्या सुंदर कोमेजलेल्या गुलाबपुष्पाप्रमाणें दिसत होती. त्यावरून कोणीही अनुमान केलें असतें कीं, ती कोणी थोर कुलांतील वैभवशाली स्त्री दैवदुर्विलासामुळें विपन्नावस्थेच्या फेऱ्यांत सांपडून हालअपेष्टा भोगीत आयुष्य कंठीत असावी. त्या स्त्रीनें हलके हलके एकेक पाऊल पुढें टाकीत अत्यंत चौकस दृष्टीनें सज्जनसिंगाकडे पहात त्या कोचापर्यंतचा पल्ला गांठला. तेथें कांहीं क्षण थांबून तिनें कानोसा घेतला, व सज्जनसिंग गाढ झोंपीं गेला आहे अशी खात्री करून घेऊन प्रथम त्याच्या कोचाखालीं असलेली तरवार उचलून घेतली. बराच वेळपर्यंत तिची दृष्टि सज्जनसिंगाच्या गोंडस व तजेलेदार चर्येवर खिळून राहिली होती. पहातां पहातां त्या स्त्रीच्या नेत्रांवाटे आंसवें गळूं लागलीं. ती वारंवार पदरानें पुशीत ती पुनःपुन्हा सज्जनसिंगाच्या चर्येकडे पहात होती, व मधून मधून आतांच उचलून घेतलेल्या तरवारीच्या धारेकडे आणि लगेच आपल्या जंबियाच्या तीक्ष्ण टोंकाकडे नजर फेंकीत होती. त्या स्त्रीच्या त्या एकंदर हालचालींवरून कोणालाही जबर संशय आला असता कीं ती सज्जनसिंगाचा घात करण्याच्या अंतस्थ हेतूनें तेथवर आली असावी. मध्येंच सज्जनसिंग एकदां कुशीला वळला त्याबरोबर ती स्त्री दचकून कोचामागें लपली; व तो पूर्ववत् घोरूं लागला असें पाहून पुन्हा आपला जंबिया सरसावून उभी राहिली. तिनें एकवार आपला जंबिया जोरानें उगारून सज्जनसिंगाच्या छातीपर्यंत नेलाही; पण पुन्हा तिला काय वाटलें कोण जाणे, ती दोन पावलें मागें सरून स्वतःशींच पुटपुटली, " छे ! हें योग्य नव्हे. सज्जनसिंग अपराधी खरा, त्याला प्राणदंडाची शिक्षा मिळणें सर्वथैव योग्य आहे हें खरें; पण आपणावर ओढवणारें

मरण हें कशाचें मोल आहे हें त्याला त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या क्षणाला तरी कळलेंच पाहिजे. तरच त्याच्या हत्येच्या पापाचें धनीपण मजकडे येणार नाहीं. मी केवळ खुनी नाहीं, तर स्वातंत्र्यसंघाची खरीखुरी अनुयायी आहें, अशी त्याला मनाची समजूत करण्यासाठीं मीं त्याला प्रथम जागें केलें पाहिजे, त्याला त्याच्या अपराधाची स्पष्ट जाणीव करून दिली पाहिजे, व मग त्याला देहान्त शासन देण्याचा प्रश्न." असें अर्धवट स्वगत बोलून त्या स्त्रीनें हांक मारली, "सज्जन!"

सज्जनसिंग गाढ झोंपीं गेला होता; तो त्या पहिल्या हांकेसरसा जागा झाला नाहीं.

त्या स्त्रीनें पुन्हा हांक मारली, "सज्जन!"

त्या दुसऱ्या हांकेसरसा सज्जनसिंग अर्धवट जागृत होऊन सभोंवार पहात उद्गारला, "कोण आहे!"

पण तेवढ्यांत ती स्त्री दचकून मागें सरली व कोचाच्या बाजूला लपली. सज्जनसिंग पुन्हा झोंपीं गेला.

"छे! त्याची व माझी प्रथमच नजरभेट होतां उपयोगी नाही. आजवर मी ज्याला माझ्या धाकट्या बंधूप्रमाणें, नव्हे पोटच्या मुलाप्रमाणें वागवीत आलें, त्याला देहान्त शासन करण्याचें हें भयंकर दिव्य पार पाडणें आज माझ्या कपाळीं आलें आहे! तेवढ्यासाठीं आवश्यक तेवढा परकेपणा राखतां यावा यासाठीं मला पूर्ववत अवगुंठन घेणें प्राप्तच आहे." असें स्वतःच्या मनाशीं उद्गारत त्या स्त्रीनें पुन्हा पूर्ववत बुरखा धारण केला, व मनाचा धडा करून ती पुन्हा सज्जनसिंगाच्या कोचापाशीं गेली. तेथें जातांच तिनें एकवार वर पाहून दोन्ही हात जोडून मनोमन परमेश्वराची प्रार्थना केली, व मग सज्जनसिंगाला हातानें हलवून जागृत केलें.

सज्जनसिंग जागृत होऊन समोर पहातो तों एक बुरखेवाली व्यक्ति उभी! त्याच क्षणाला त्याच्या मनांत शंका आली, कीं ही एखादी पिशाच्चलीला तर नसेल! कारण तो वाडा सज्जनसिंगाच्या पूर्वपरिचयाचा होता. विक्रमसिंहानें मायदेशाच्या उद्धारासाठीं कांहीं वर्षांमागें स्वातंत्र्यसंघ स्थापन केला होता तेव्हां त्या संघाच्या गुप्त बैठकीच्या ज्या कांहीं ऐकांतिक जागा ठरून गेलेल्या होत्या, त्यांपैकीं प्रस्तुतचा वाडा ही एक जागा होती. फार वर्षांपासून तो वाडा भूतमहाल या नांवानें प्रसिद्ध होता; व सामान्य लोकांत तर तो भूतखाना याच

नांवानें प्रसिद्ध होता. तेथें नेहमीं पिशाच्चांचें साम्राज्य असतें असा बोभाट असल्यामुळेंच त्या वाड्यांत कोणी वस्ती करूं धजत नसे. रात्रीच्या वेळीं तर त्या वाड्याच्या आजूबाजूला कोणी फिरकतदेखील नसे. स्वातंत्र्यसंघ अस्तित्वांत होता तेव्हां स्वातंत्र्यवीरांच्या गुप्त बैठकी तेथें रात्रीच्या वेळीं अत्यंत गुप्तपणें भरत. स्वातंत्र्यवीर तेथें रात्रीच्या वेळीं यावयाचे ते मध्यरात्रीच्या सुमाराला नखशिखान्त काळ्या रंगाचे बुरखे पांघरून दहा दिशांनीं दहाजण येत, त्यामुळें कोणीं पाहिलें तरी त्याच्या पूर्वग्रहदूषित मनाला तीं पिशाच्चेंच आहेत असें वाटे, स्वातंत्र्यसंघाच्या आंतील हालचाली पिशाच्चलीलांत जमा धरल्या जात असत. सज्जनसिंग हा स्वातंत्र्यसंघाचा एक घटक असल्यामुळें त्याला या सर्व गोष्टी माहीत होत्या. तरी पण आज त्याचें मन सभोंवारच्या एकंदर प्रतिकूल परिस्थितीच्या कठोर आघातांनीं बरेंच घायाळ झालेलें असल्याकारणानें झोंपेंतून दचकून उठतांच त्याला ती एकंदर पूर्वस्मृति आठवून पिशाच्चाचा संशय आला, व तो पहिल्या सपाट्याला मटकन खालीं बसला. अर्थात हें पिशाच्चाचें भय अगदीं थोडा वेळ त्याचें मन ताब्यांत ठेवूं शकलें. समोरची बुरखेवाली व्यक्ति पिशाच्च नसून खरीखुरी मनुष्याकृति आहे हें त्याला लौकरच ओळखतां आलें, व तेवढ्यांत त्या बुरखेवाल्या व्यक्तीनेंही उद्गार काढले, "सज्जन ! तूं जागा झालास ?"

"होय. पण कोण तूं ?" सज्जनसिंगानें तो स्वर ऐकून दचकून विचारलें.

"मी मृत्यु–साक्षात मृत्यु मी आहें. तुझ्या घोर अपराधाबद्दल तुला देहान्त शासन करण्यासाठीं माझें आगमन झालें आहे. शिक्षेची अंमलबजावणी करण्यापूर्वी तुला आपल्या अपराधांचें स्मरण करून परमेश्वराचें नांव घेतां यावें. एवढ्याचसाठीं मीं तुला मुद्दाम झोंपेंतून जागृत करून एवढी संधि दिली आहे. तूं आपलीं पापें आठव, परमेश्वरापाशीं त्या पापांबद्दल मनःपूर्वक क्षमा माग, व मरण्याला तयार हो !"

सज्जनसिंगाला एकदम मरणाची शिक्षा फर्मावणारी ती स्त्री कोण असेल बरें ?

## प्रकरण विसावें

# इंद्रकुमारी

सज्जनसिंगही एकदम चकित झाला, कीं आपणाला एकदम मरणाची शिक्षा फर्मावणारी ही बुरखेवाली व्यक्ति कोण; आणि आपल्या कसल्या अपराधाबद्दल ही व्यक्ति आपणाला मरणाची शिक्षा देत आहे !

सज्जनसिंगाच्या स्वतःच्या मतें त्याच्या हातून अपराध असा कोणताच घडला नव्हता. तो दाभाड्यांना फितूर झाला नव्हता, निजामाला फितूर झाला नव्हता, बादशहाला फितूर झाला नव्हता; त्याची स्वातंत्र्यनिष्ठा अढळ होती; मग त्याला देहान्त शासन देण्याला त्या कोणा व्यक्तीनें कां म्हणून तयार व्हावें ! हा प्रश्न वाचकांपुरता तरी त्या व्यक्तीच्या आत्मगत बोलांवरून कांहींसा सुटला आहे. त्या व्यक्तीच्या दृष्टीनें सज्जनसिंग हा दाभाड्यांना सामील होऊन हिंदवीसाम्राज्याच्या योजनेचा नाश करण्यासाठीं झटणारा दुर्जन होता, हें उघड आहे. परंतु स्वतः सज्जनसिंगाच्या मनाला तशा कल्पनेचा नुसता स्पर्शही झालेला नसल्यानें स्वातंत्र्याचा कैवार घेणारी कोणी देशोद्धारक व्यक्ति त्या घटकेला आपणाला देशद्रोहाबद्दल देहान्त शासन करण्यासाठीं उभी असेल असें त्याला मुळींच वाटलें नाहीं. त्या वेळीं सहजच त्याला वाटलें कीं, हा कोणी तरी दाभाड्यांचा दूत किंवा आपल्यांतून फुटून दाभाड्यांना सामील झालेला कोणी फितूर आपण आतां खासे पिंजऱ्यांत अडकलों असें पाहून आजवरच्या आपल्या स्वातंत्र्यप्रेमाबद्दल अर्थात बादशहाशीं द्रोह केल्याबद्दल आपणाला ठार करण्यासाठीं एथें आला आहे. कदाचित् हा अनुराधसिंगाचाही कोणी दूत—त्याच्याकडून आलेला एखादा मारेकरी असेल, अशीही सबळ शंका सज्जनसिंगाच्या मनांत आली, व तीच हां हां म्हणतां बलवत्तर झाली. ही मागाहूनची शंका त्याच्या मनांत हां हां म्हणतां इतकी बलवत्तर होण्याचें कारण तो भैरवगडावर असतांना अनुराधसिंगानें त्याला जिवें मारण्याचा आसुरी डाव रचिला होता, व तो तेव्हां फसला होता. तेव्हांपासून अनुराधसिंगाचे गुप्त दूत आपल्या प्राणांवर टपून सर्वत्र हिंडत असतील याविषयीं त्याला शंका नव्हती. असे कांहीं मारेकरी आपल्या शोधार्थ चोहींकडे गुप्त वेषानें हिंडत असल्याचें त्यानें अनेकवार ऐकलें होतें.

ः यातलाच एखादा दूत समोर उभा असावा व त्याची आपणाला ओळख पटेल या भयानें त्यानें तोंडावरून काळा बुरखा घेतला असावा, एथवर संशयाची सांखळी जुळतांच ती बुरखेवाली व्यक्ति आपल्या कोणत्या अपराधा-बद्दल आपणाला देहान्त शासन करण्यासाठीं उभी आहे, याचाही अंदाज सज्जन-सिंगानें आपल्या मताप्रमाणें काय करावयाचा तो केला, व प्राप्त प्रसंगाला तोंड देण्यासाठीं–त्या अज्ञात मारेकऱ्यांशीं दोन हात करण्यासाठीं आपली तरवार उचलून घेण्याकरितां पायांखालीं पाहिलें, तों तरवार तेथें नाहीं ! तेवढ्यांत त्याची नजर समोरच्या व्यक्तीकडे गेली व त्या व्यक्तीच्या हातीं ती तरवार त्याला आढळली. तेव्हां मात्र सज्जनसिंगाला कळून चुकलें कीं, आतां आपलीं शंभर वर्षें भरलीं ! तो त्या व्यक्तीला म्हणाला, “ विश्वासघातक्या दगेखोरा ! तूं माझी तरवार घेऊन मला निःशस्त्र करून मगच या वल्गना करीत आहेस ! हें का-पुरुषाचें काम आहे ! तुला माझ्या धैर्याची व शौर्याची परीक्षा पहावयाची असेल, तर माझी तरवार माझ्या हातीं प्रथम दे, व मग आपणां दोघांचे दोन हात होऊंद्या ! पाहिजे तर तुझ्या धन्याला–त्या भ्याडाला बोलावून आण ! आणि तोंडा-वर तो बुरखा कां घेतला आहेस ? तुझा तो बुरखाच स्पष्ट साक्ष देत आहे, कीं तुला उघड्या तोंडानें मला अपराधी ठरविण्याची व माझी हत्या करण्याची छाती नाहीं. बाकी, तूं बुरख्याखालीं तोंड लपविलेंस तरी मी ओळखून आहें, कीं तूं माझ्या झाडवेऱ्याचा–अनुराधसिंगाचा कोणीतरी सेवक आहेस. त्या नीच, हरामखोर, देश-द्रोह्याच्या दृष्टीनें मी अपराधी ठरणें साहजिकच आहे. मला कोणीकडून तरी एकदां या जगाआड करण्याचा अनुराधसिंगाचा फारा दिवसांचा दुष्ट हेतु आजवर सिद्धीला गेला नाहीं, ती माझी घातवेळा त्यानें आज साधली ! अनुराधसिंगाच्या दृष्टीनें माझा अपराध काय, तर मी राजद्रोह केला !—”

“ देशद्रोह्या विश्वासघातक्या ! देशद्रोहापेक्षां दुसरा कोणता भयंकर गुन्हा या जगांत संभवनीय आहे ? तो महान् अपराध लपविण्यासाठीं तूं माझ्या डोळ्यांत निरनिराळ्या उपायांनीं धूळ फेंकण्याचा प्रयत्न करीत आहेस; पण अशानें मी फसणार नाहीं. मला तुझ्या इतर कसल्याही गोष्टींची गरज नाहीं. तूं ईश्वराचें नांव घेतलेंस का ?”

“ अरेरे ! ” सज्जनसिंग त्या स्त्रीचा स्वर ऐकून उद्गारला, “ तुझ्या स्वरांत

इतकें ओतप्रोत पावित्र्य भरलेलें आहे, त्याचा लवलेश तरी तुझ्या अंतःकरणाला लागला असता, तर तूं माझ्यापुढें आपलें तोंड लपाविलें नसतेंस !"

" मीं बुरखा घेतला तो तोंड लपविण्यासाठीं नाहीं, तर महापातक्या !—पण तें तरी कशाला बोलूं ? हा पहा मीं बुरखा फेंकून दिला !" असें म्हणून त्या स्त्रीनें लगेच आपल्या चेहऱ्यावरील बुरखा दूर लोटीत उद्गार काढले, " अभागी सज्जन ! पहा ! आतां तरी तुझ्या साऱ्या कल्पना फोल ठरल्या ना ? मी तुझ्या बंधूच्या–त्या नराधमाच्या पापी अन्नावर पोसलेली मारेकरीण नाहीं ना ? मी तुझी वैरीण नाहीं ना ? तूं मला ओळखलेंस का ?"

त्या स्त्रीच्या तोंडावरील बुरखा दूर होतांच सज्जनसिंगाची तिच्याशीं दृष्टादृष्ट झाली मात्र, व लगेच दुसऱ्या क्षणाला त्याला तिची ओळख पटली. ती त्याची गुरुपत्नी–त्याला एका काळीं देवतेप्रमाणें वंद्य असणारी व त्याच्यावर पोटच्या मुलाप्रमाणें प्रेम करणारी इंद्रकुमारी–एका काळीं मारवाडांत अस्तित्वांत असणाऱ्या व कालांतराने विस्कळित होऊन नामशेष झालेल्या स्वातंत्र्यसंघाचा संस्थापक विक्रमसिंह याची पत्नी–मारवाडची राजकन्या इंद्रकुमारी होती !

सज्जनसिंगानें इंद्रकुमारीला ओळखलें, व लगेच तिच्या पायांवर लोटांगण घालून अश्रूंचा अभिषेक करीत गहिंवरलेल्या कंठानें उद्गार काढले, " देवी ! मातुश्री ! तुम्ही मला भेटलां यामुळें मला किती आनंद झाला आहे, तें वर्णन करण्याला माझ्यापाशीं शब्द नाहीत."

इंद्रकुमारी ज्या परिस्थितीला भीत होती, तीच तिच्या अपेक्षेप्रमाणें दत्त करून तिच्यासमोर उभी राहिली. एकमेकांचा एकमेकांना उघडपणें परिचय घडल्यावर आपली न्यायनिष्ठुरता वरीच निस्तेज होईल असें तिला जें प्रारंभीं वाटलें तेंच क्षणोक्षणीं सत्य ठरूं लागलें. सज्जनसिंग हा फितूर पतितात्मा आहे अशी तिची बालंबाल खात्री असतांही त्यानें जेव्हां तिला ओळखून, 'देवी ! मातुश्री !' अशा प्रेमळ व जिव्हाळ्याच्या परिचित शब्दांनीं हांक मारली तेव्हांच तिचें अंतःकरण द्रवूं लागलें, व सज्जनसिंगाची मिठी झुगारून देण्यासाठीं वेगानें पुढें सरूं पहाणारे तिचे पाय ती नको नको म्हणत असतां जागच्याजागीं स्तब्ध राहिले. तरीही इंद्रकुमारी हिय्या करून तिरस्कारपूर्ण शब्दांत उद्गारली, " अभागी सज्जन ! दूर हो ! माझ्या पायांना तुझ्या पापिष्टाच्या स्पर्शाचा विटाळ होत आहे. मला पाहून तुला आनंद वाटला असेल; पण तुझें मुखावलोकन झाल्यानें मला किती दुःख झालें आहे

याची तुला कल्पना होणें शक्य नाहीं. सज्जन ! सज्जन ! आम्हां सर्वांचा तुझ्यावर केवढा भरंवसा ! साऱ्या राजस्थानाला तुझ्या पराक्रमांची व धडाडीची केवढी आशा ! विक्रमसिंहजींना स्वातंत्र्याच्या चळवळीपायीं आपले पंचप्राण गमवावे लागले व या जगांतील माझा आधार तुटला, तरीदेखील मी शोक करीत बसलें नाहीं व वैधव्याची क्षिति बाळगिली नाहीं. मी स्वतःदेखील त्यांच्याबरोबरच दहा दिशांना रानोमाळीं भटकणारी भणंगभिकारीण बनून आजवर दरीखोऱ्यांत थंडीवाऱ्यांत कसेबसे दिवस कंठीत जगलें ती कशासाठीं ? विक्रमसिंहजींनीं स्वातंत्र्याच्या चळवळीचें अमृतबीज जें तेजस्वी तरुण पिढीच्या अंतःकरणांत पेरलें, त्या बीजांना अंकुर फुटतात न फुटतात तोंच त्या स्वातंत्र्याच्या नंदनवनाची मशागत करणारा फुलमाळी शत्रूच्या कारस्थानांना बळी पडला, तरी तूं–सज्जन ! तूं त्यांच्यामागें त्यांची उणीव भरून काढशील व स्वातंत्र्यसंघाची विस्कळित झालेली घडी पुन्हा नीट बसवून आपल्या मायदेशाचे पांग फेडशील, ते तुझे प्रताप पहाण्यासाठीं माझ्या खऱ्या-खुऱ्या अज्ञातवासाला प्रारंभ झाल्यापासून माझा पाठीराखा भाऊ माझ्या मस्तकावर कृपेचें छत्र धरून माझ्या बरोबरीनें हालअपेष्टा भोगीत असतांना त्याला देखील तुझ्याविषयीं किती अभिमान वाटावा ! अधूनमधून कधीं तुझ्या पराक्रमांची मंगलवार्ता ऐकू आली, कीं आम्हां उभयतांच्याही अंगावर मूठभर मांस वाढावें, व आम्हीं परमेश्वराची अनन्य भावानें करुणा भाकावी कीं, परमेश्वरा ! सज्जनसिंगाच्या हाताला यश दे; मातृभूमीचा उद्धार करण्यासाठीं त्याला उदंड आयुरारोग्य दे ! थोड्या दिवसांपूर्वी तूं आपल्या पाठोपाठच्या देशद्रोही भावाची देखील यत्किंचितही पर्वा न बाळगितां पेशव्यांनीं आरंभिलेल्या हिंदवीसाम्राज्यसंस्थापनेच्या मंगल कार्याला स्वतःला पूर्णपणें वाहून घेतलेंस व पेशव्यांच्या वतीनें भावावर शस्त्र उचलण्यालाही भ्याला नाहींस, हें ऐकून आम्हांला किती समाधान वाटलें म्हणून सांगूं ! परमेश्वरापाशीं तेव्हां आम्हीं बहीण–भावंडांनीं अंतःकरणपूर्वक मागणें मागितलें कीं परमेश्वरा ! आमचेंही आयुरारोग्य तूं सज्जनसिंगाच्या वांट्याला घाल, व मातृभूमीच्या उद्धाराच्या कामीं त्याच्या हाताला पूर्ण यश दे ! त्यानंतर उज्जयनीला जमलेल्या साऱ्या चांडाळांच्या अनुमतीनें त्या नीच अनुराधसिंगानें–तूं रागावूं नकोस; तो तुझा सख्खा भाऊ असला तरी नीच तो नीचच !–त्या राक्षसानें भैरवगडांतून

तुला हुसकून लावून ठार करण्याचा डाव मांडला, तूं अज्ञातवासी बनलास व तुझ्या बायको-मुलांना रौरवनरकांत—त्या नीच अनुराधसिंगाच्या बंदिशालेंत डाम्बून पडावें लागलें, ही अमंगळ वार्ता कानीं येतांच आमच्या हृदयाचे शतशः तुकडे झाले; तरी त्यांतही आम्हांला संतोष वाटला तो एवढाच कीं, इतकी आपल्या सर्वस्वाची होळी धण धण पेटत असलेली डोळ्यांसमोर दिसत असतांही तूं आपल्या अंगीकृत महाव्रतापासून ढळला नाहींस !—आणि इतक्या अनंत हालअपेष्टा भोगून संपादन केलेलें श्रेय तूं आज अकल्पितपणें मातीमेळ करायला तयार झालास !"

" पण आई ! तुम्हीं शांतपणानें माझे दुबळे बोल ऐकून घ्याल तर—"

" नकोत ! तुझे दुबळे बोल मला मुळींच ऐकायला नकोत. तूं काय बोलणार तें मला माहीत आहे. तूं हेंच सांगणार ना, कीं शत्रूच्या ससेमिऱ्यापुढें तुझा टिकाव लागणें शक्य नव्हतें म्हणून तुला शत्रूसमोर नमतें घ्यावें लागलें ? पण मी म्हणतें, शत्रु करून करून काय करता ! त्यानें तुझ्या बायको-मुलांचा अमानुष छळ केला असता, त्यांना हालहाल करून ठार केलें असतें, तुलाही रानावनांतून हुडकून काढून ठार केलें असतें, एवढेंच ना ! मग त्यांत काय बिघडलें असतें ? स्वातंत्र्यवीरांनीं मरणाला भ्यावें, हीच शिकवण तूं तुझ्या गुरूपासून संपादन केलीस काय ? स्वातंत्र्यवीरांच्या शपथेचा हाच निष्कर्ष काय ?" बोलतां बोलतां इंद्रकुमारी कंठीं गहिंवर दाटून आल्यामुळें स्फुंदत स्फुंदत थांबली, व पदर डोळ्यांना लावून अधिकाधिक स्फुंदूं लागली. तरी पण ती मनाची फारच खंबीर ! तिनें ते हुंदके हां हां म्हणतां आवरते घेतले, डोळ्यांतील अश्रु एकवार पुसून आंतील अश्रु आंतल्या आंत निग्रहानें गिळून टाकले, व सज्जनसिंग कांहीं बोलण्याचा प्रयत्न करीत होता तरी त्याला बोलण्याचा अवसर न देतां त्याच्या मिठींतून आपले पाय ओढून घेऊन चार पावलें दूर सरून म्हटलें, " बस्स ! मला जास्त कांहीं बोलायचेंही नाहीं व ऐकायचेंही नाहीं. एकेक क्षण जात आहे तसतसें माझें मन दुबळें बनून मला कर्तव्यविन्मुख करूं पहात आहे. स्वातंत्र्यसंघाच्या घटकाला न शोभण्याजोगें वर्तन माझ्या हातून घडूं पहात आहे. स्वातंत्र्यसंघाचा जो घटक शपथभंग करील त्याला देहान्त प्रायश्चित भोगणें प्राप्त असतें, हें तुला माहीत आहे ना ?"

" होय. पण—"

" मला पण—परंतु कांहींही नको. तूं अपराधी आहेस; तुला देहान्त शासन मिळणें अवश्य आहे. अजूनही तुझ्या ठायीं माणुसकीचा लवलेश असेल तर तूं ही तलवार घे—" इंद्रकुमारी आपल्या हातांतील सज्जनसिंगाची तरवार त्याच्या पुढें ठेवून म्हणाली, " आणि आपल्या हातानें आपणाला शासन कर. हृदय पाषाणापेक्षांही घट्ट करून मी हें तुला सांगत आहें; कारण माझ्या वाणींतील धैर्य आतां माझ्या हातीं उरलेलें नाहीं. एवढ्या कालहरणाचा हा असा अनिष्ट परिणाम झाला. पोटच्या मुलाप्रमाणें मानलेल्या तुझें मरण पहाण्यांत मला किती दुःख होत आहे व होईल तें एक माझें अंतःकरण जाणे व दुसरा परमेश्वर जाणे ! हें दारुण दुःख निवारण्यासाठीं मीदेखील तुझ्याबरोबरच ह्या जगाचा शेवटचा निरोप घेणार आहें. कारण माझी सारी आशा तुझ्या ठायीं—कर्मचांडाळा ! तुझ्या ठायीं एकवटलेली होती. विक्रमसिंहजींचा शत्रूच्या हातून शेवट झाला;—पतिव्रतेला पतिनिधनापेक्षां दुसरें कोणतें दारुण दुःख होणार ! पण ती दुर्वार्ता कानीं येतांच मी सती जाण्याचें टाकून जिवंत राहिलें; फार काय, कुलांगारा ! त्यांचें क्रियाकर्मांतरदेखील मीं कोणाकडून करविलें नाहीं; कारण तूं भेटशील व तुझ्या हातून त्यांचें क्रियाकर्मांतर पार पाडीन अशी मला उमेद होती. त्यांनींही मला स्वप्नांत येऊन सांगितलें होतें कीं, 'माझी उत्तरक्रिया व्हायची असेल तर ती करण्याला एकटा सज्जनसिंग समर्थ आहे व त्याच्याच हातून ती व्हावी. सज्जनसिंग माझा धर्मपुत्र आहे. तो माझ्या उत्तरक्रियेच्या वेळीं माझ्या स्वातंत्र्यसंघाचें कार्य अव्याहत पुढें चालविण्याची शपथ घेईल तेव्हांच मी पिंड घेईन.' तो त्यांचा मनोरथ पूर्ण होण्याची आशा समूळ खुंटली. आतां मी तरी कशाला जगूं रे ! "

पुढें इंद्रकुमारीच्यानें मुळींच बोलवेना व उभेंही राहवेना. तिचे पाय खचल्यासारखे होऊन ती मटकन् खालीं बसली, व दोन्ही गुडघ्यांवर टेंकलेल्या हातांनीं कपाळ घट्ट धरून ओक्साबोक्शीं रडूं लागली.

सज्जनसिंगालाही इंद्रकुमारीची ती करुणास्पद स्थिति पाहवेना. त्याला देखील इंद्रकुमारीच्या मुखानें आजवरचा कारुण्यपूर्ण वृत्तान्त ऐकता ऐकतां पराकाष्ठेचें दुःख होत होतें, व तें दुःख हृदयांत न साभावल्यामुळें अश्रूंच्या रूपानें त्याच्या नेत्रांवाटे वाहूं लागलें होतें. पण तो पुरुष होता, व त्यांतूनही असामान्य धीर-वीर-गंभीर वृत्तीचा पुरुष होता. त्यानें कांहीं निःश्वासांनीं त्या दुःखाला मोकळा मार्ग करून देऊन दोन्ही हातांच्या उपडया मनगटांनीं डोळ्यांत चमकणारा एखाद-

दुसरा अश्रु पुशीत ती तरवार उचलून हातीं घेतली, व इंद्रकुमारीला म्हटलें, " आई ! मी मरणाला भीत नाहीं; अपकीर्तीला भितों. पण अपकीर्ति जर टळण्यासारखी नसेल, तर ती ऐकण्याला या जगांत जास्त दिवस जिवंत रहावें असें मला मुळींच वाटत नाहीं. मरण्याला मी आनंदानें तयार आहें. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें मी कोणत्याही प्रकारें अपराधी नाहीं हें जरी ईश्वरसाक्ष सत्य आहे, तरीदेखील शत्रूच्या हातून विटंबनापूर्वक मरण येण्यापेक्षां मला माझ्या स्वतः-च्या अथवा तुमच्या हातून मरण येणें जास्त आनंददायक वाटेल. नव्हे—आई ! तुमच्या हातून किंवा तुमच्या आज्ञेनें मरण आलें तर तें पुण्यवंताचें मरण माझ्या वांट्याला आलें असें मी समजेन—"

" काय ! तूं शत्रूच्या हातून येणाऱ्या मरणाला भितोस ? "

" नाहीं. मी मरणाला मुळींच भीत नाहीं; पण ज्या शत्रूंना आम्हीं स्वातंत्र्य वीरांनीं आजवर खडे चारले, त्यांच्या हातून मरण—"

" पुरे ! स्वातंत्र्यवीरांची विटंबना झाली एवढी पुष्कळ झाली. स्वखुषीनें शत्रूशीं संगनमत करून शत्रूच्या गोटांत हीन स्वार्थभावनापूर्वक प्रविष्ट होणाऱ्या व स्वातंत्र्यवीरांच्या ब्रीदाला कलंक लावणाऱ्या तुला स्वातंत्र्यवीर कोण म्हणेल ? "

" माझें ऐकून तर घ्याल ? आई ! मी स्वातंत्र्यवीरांच्या ब्रीदाला कलंक लावला नाहीं. आतां, मी शत्रूच्या गोटांत येऊन पडलों आहें खरा; पण हें माझें दुर्दैव ! "

" नामर्दा ! अजून तरी खरें बोल ! स्वतःच्या बदकरणीनें महत्पाप संपादन करून त्या बिचाऱ्या दैवाला बोल कां लावतोस ? शत्रूच्या गोटांत तूं आपल्या पायांनींच चालून आलास ना ? कीं तुला शत्रूनें ओढून आणलें ? अजून तरी खरें बोल ! तुला माझ्या गळ्याची शपथ आहे ! "

" आई ! तुमच्या गळ्याची शपथ; मी माझ्या पायांनीं एथवर चालत आलों खरा; पण मी सद्धेतुपूर्वक प्रयत्नांची कांस धरून चालत असतांना माझ्या दुर्दैवानें मला दगा दिला हेंही तितकेंच खरें."

" मग काय ! दाभाडे हे पेशव्यांचे हाडवैरी आहेत, व पेशव्यांच्या नाशासाठीं पाहिजे त्या उलाढाली करण्याला ते सदैव एका पायावर तयार असतात, हें तुला माहीत नव्हतें ? "

" तें मला माहीत होतें; पण माझी समजूत होती कीं, ही छावणी दाभाड्यांची नसून

पेशव्यांची आहे. पेशव्यांनीं आपण दाभाडे असल्याचा बहाणा करून अनुराधसिंगजी-च्या पदरच्या एका कवीला चार दिवसांपूर्वी खासें चकविलें, व सध्यांही पेशवे दाभाड्यांच्याच नांवानें या प्रांतांत संचार करीत आहेत असें मीं ऐकलें. त्यांचा शोध करीत हिंडत असतां मला दाभाड्यांचा मुक्काम आज गणेशतीर्थावर आहे अशी खबर मिळाली, म्हणून दाभाडे म्हणजेच पेशवे असा संकेतार्थ ओळखून मी निर्धास्तपणें इकडे आलों. पण इकडे येऊन पहातों, तों हा खरोखरच दाभाड्यांचा मुक्काम !—" सज्जनसिंग बोलतां बोलतां थबकून कसला तरी कानोसा घेऊं लागला.

"कां ? तूं एकाएकीं असा थबकलास कां ?" इंद्रकुमारीनें विचारलें.

"नाहीं, मला कांहीं तरी भास झाला." असें म्हणून सज्जनसिंग पुन्हा अंमळ कानोसा घेऊन उद्गारला, "आई ! अशा वेळीं तुम्हीं इथें रहाणें धोक्याचें आहे. कारण, ही बोलून चालून शत्रूची छावणी. तशांतून आपण वहिमी माणसें पडलों. मला माझ्यापेक्षां तुमची फार काळजी वाटते. तुम्हीं इथून शक्य तितक्या लौकर बाहेर पाय काढावा हें चांगलें."

इंद्रकुमारी आंत आली तेव्हांचा तिचा आवेश व आतांची शांत वृत्ति यांत हा केवढा फरक ! कांहीं वेळापूर्वी सज्जनसिंगाला अपराधी समजून देहान्त शासन करण्यासाठीं निर्धारपूर्वक चालून आलेल्या तिचें मन सज्जनसिंगाविषयीं इतकें द्रवलें हें आश्चर्य नव्हे काय ? पण खरें पहातां त्यांत आश्चर्य कसलें ? सज्जन-सिंगाला प्रगटपणें दर्शन देण्याला किंवा त्याच्याशीं फार वेळ संभाषण करण्याल इंद्रकुमारी भीत होती ती एवढ्यासाठींच. पण आपला निश्चय थोडा लांबणी-वर पडल्यामुळें अपूर्ण राहिला म्हणून तिला विषाद मात्र वाटला नाहीं. उलट सज्जनसिंगाच्या मुखानें त्याची निर्दोषता ऐकण्यांत तिला आनंदच वाटत होता, व आपणाबरोबरच सज्जनसिंगाचीही मुक्तता व्हावी असेंही तिला वाटत होतें. खरें पहातां आज कैक वर्षांनीं त्या धर्माच्या माय-लेंकरांची अगदीं अकल्पितपणें भेट झाली होती, व दोघांनाही आपापली कर्म-कहाणी एकमेकांना निवेदन करण्याची खरी उत्कंठा आतां वाटूं लागली होती. एथवर दोघांच्याही हृदयाकाशांत दाटलेले संशयाचे काळेकुट्ट मेघ व त्या मेघावरणामुळें हृदयाच्या कोनाकोंपऱ्यांत मुसमुसून राहिलेला निराशेचा व गैर-समजाचा अंधार कांहींसा इंद्रकुमारीच्या प्रेमळ स्वभावामुळें व बराचसा सज्जन-

सिंगाच्या सज्जनपणामुळें—विशेषतः त्याच्या निवेदनाच्या वेगवान वायुप्रवाहानें त्या संशयाच्या मेघांची नुकतीच पांगापांग होऊं लागून विरळ होऊं लागला होता. उभयतांच्याही अंतःकरणांत एकमेकांविषयीं जिव्हाळ्याच्या सहसंवेदना उत्पन्न होण्याला खरा प्रारंभ झाला होता. सज्जनसिंग म्हणजे पूर्ण निर्दोषी असेल अशी इंद्रकुमारीची अजून पूर्ण खात्री झाली नव्हती; 'पी हळद व हो गोरी' अशा उतावळ्या वृत्तीची इंद्रकुमारी नव्हती. त्यानें आतां अगदीं अखेरीला जें निवेदन केलें, त्यावरून मात्र तिला त्याच्याविषयीं खरीखुरी अनुकंपा वाटूं लागली होती. तो खरोखरच फसला असेल असेही तिला खात्री पटूं लागली होती. तोही आपणाबरोबर संकटमुक्त होऊन यापूर्वी त्याच्या हातून कळून किंवा न कळून कोणत्याही चुका झाल्या असल्या तरी त्याचें पुढील आयुष्य देशोद्धाराच्या सत्कार्यी वेंचलें जावें असें तिला अंतःकरणापासून वाटूं लागलें होतें. इतका वेळ निराशेच्या गड्ड अंधारांत तिनें स्वतःला सज्जनसिंगासह इतकें गुरफटून घेतलें होतें कीं, त्यांतच—त्याच घटकेला आपला व सज्जनसिंगाचाही शेवट व्हावयाचा असें गृहीत धरून ती पूर्ण बेफिकीरपणानें वागत होती; पण परमेश्वराची इच्छा तशी नव्हती. त्याच्या मनांतून सज्जनसिंग व इंद्रकुमारी या दोघांच्याही आयुष्याचा विनियोग देशोद्धाराच्या कामीं होईल तितका करून घ्यावयाचा होता; म्हणूनच त्यानें इंद्रकुमारीच्या अंतःकरणांत अकालीं उत्पन्न झालेल्या आततायीपणाच्या नैराश्यपूर्ण इच्छेला पाठबळ दिलें नाहीं. आणि सज्जनसिंग तरी जो त्याच्या मतें शत्रूच्या चक्रव्यूहांत सांपडला, त्या विधिघटनेच्या मागें कांहीं देशोपकारी असें विधिघटित नसेल कशावरून ?

असो. तात्पर्य काय, कीं सज्जनसिंगानें इंद्रकुमारीच्या सुरक्षितपणाचा प्रश्न सोडविण्याला सुरुवात करतांच इंद्रकुमारीला तो अप्रिय वाटला नाहीं. तिला त्या चक्रव्यूहांतून आपली सुटका व्हावी असें तर वाटलेंच; पण आपणाबरोबरच सज्जनसिंगाचीही सुटका व्हावी असेंही वाटलें. ती त्याला म्हणाली, "माझ्या सुटकेची काळजी तुला वाटते; पण तुझ्या सुटकेची काय गत ?"

"जशी परमेश्वराची इच्छा असेल तसें होईल." सज्जनसिंग कांहींशा खिन्न स्वरांत उद्गारला.

"परमेश्वराची इच्छा आपल्या मायदेशाचें मंगल व्हावें अशीच आहे. एरव्हीं मला त्यानें इतक्या कडेकोट बंदोबस्तांतून एथवर येण्याचा मार्ग दाखविला नसता

व आपणां माय-लेंकरांची भेट अशा अकल्पित कारणानें करून दिली नसती. परवां-काल-आज या तीन दिवसांत मजवर कोणकोणत्या भयंकर आपत्ति कोसळल्या व त्यांतून मी कसकशी सुरक्षित बाहेर पडलें, याची आठवण झाली कीं परमेश्वरी कृपेची साक्ष तंतोतंत माझ्या मनाला पटते. शत्रूचा छापा आमच्यावर कां पडावा? त्या भयानें त्रिभुवनेश्वरापासून एथवर रात्र-दिवस, थंडी-वारा, मार्गांतील कांटेखुंटे, यांचें भय न बाळगतां व प्राणांचीही पर्वा न करतां वणवण करीत याच दिशेनें पळत येण्याची इच्छा कां व्हावी? धर्मसिंह व मी अशीं उभयतां एकदम अचानक शत्रूंच्या हातीं सांपडलों असतां माझ्या डोळ्यांदेखत धर्मसिंह शत्रूच्या हातीं कैद होऊन माझा तेवढा बचाव कां व्हावा? तुलाही कोणत्याही कारणानें शत्रूच्या गोटांत येण्याची वासना कां व्हावी? ती खबर मला नेमकी मिळून सर्व कडेकोट पहारे निर्भयपणानें एकजात तुडवीत एथवर येण्याचें मला धैर्य कां प्राप्त व्हावें? अर्थात यांतही परमेश्वराचा कांहींतरी मंगल हेतु खास आहे. तुझी व माझी भेट होऊन तुझ्या मुक्ततेचा मार्ग माझ्या वस्तु मोकळा व्हावा व आपणां उभयतांच्या हातून आणखी देशसेवा घडावी, अशी परमेश्वराची सदिच्छा असल्यामुळेंच हे सर्व योगायोग जुळून आले असले पाहिजेत. परमेश्वराच्या इच्छामात्रेंकरून या सर्व अघटित घटना जुळून येत आहेत; आपण माणसें केवळ निमित्तमात्र आहोंत.—पण मुक्तकंठानें कर्मकहाणी निवेदन करीत बसण्याची ही वेळ नव्हे. एकदां आपण सुखरूपणें शत्रूच्या गोटापार होऊं, व मग प्रथम बाजीराव पेशव्यांचा तपास करून त्यांना हा सर्व वृत्तान्त निवेदन करूं. वनवासीच्या बाबतींत त्यांना आपण शक्य तितक्या लौकर सावध केलें पाहिजे."

इतक्यांत जिन्याच्या दरवाजांतून एका व्यक्तीनें एकाएकीं आंत पाऊल टाकलें, व सज्जनसिंग आणि इंद्रकुमारी हीं दोघेंजणें उभीं होतीं तिकडे जातां जातां उद्गार काढले, "माताजी! सज्जनसिंगजी! बाजीराव पेशव्यांना हा सर्व वृत्तान्त कळला आहे, व आपणां उभयतांच्या निर्दोषतेबद्दल त्यांची पूर्ण खात्री झाली आहे. इतकेंच काय, पण सज्जनसिंगजी! त्यांच्याकडून तुम्हांला केवळ समजुतीच्या घोंटाळ्यामुळें जो त्रास झाला, त्याबद्दल त्यांना तुम्हीं उभयतांनींही मनःपूर्वक क्षमा करावी.

ती व्यक्ति नुसतें एवढें बोलूनच थांबली नाहीं; तिनें प्रथम इंद्रकुमारीच्या चरणांना वंदन करून लगेच सज्जनसिंगाला प्रेमानें मिठी मारून त्याला आपल्या हृदयाशीं घट्ट धरलें.

प्रकरण एकविसावें

# वनवासी–शत्रु कीं मित्र ?

सज्जनसिंगाला प्रेमभरानें मिठी मारणारी व इंद्रकुमारीला वंदन करणारी ती व्यक्ति अन्य कोणीही नसून ते बाजीराव पेशवे होते. गणेशतीर्थावर दाभाड्यांच्या नांवानें बाजीराव पेशवेच त्या दिवशीं वास्तव्य करीत होते. त्यांनींच कांहीं समजुतीच्या घोंटाळ्यामुळें सज्जनसिंगाला फितूर समजून आपल्या लोकांकरवीं भूतमहालांत कोंडविलें होतें, व कोणी अज्ञात व्यक्ति एका पहारेकऱ्याला ठार करून आंत घुसल्याचें ऐकून सज्जनसिंगाविषयीं जास्तच संशयग्रस्त होऊन ते त्यांना व त्या बुरखेवाल्या व्यक्तीला कठोर शासन करण्यासाठीं रातोरात त्यांच्या रहात्या महालांतून भूतमहालांत येण्याला भुयारांतून एक चोरदरवाजा होता त्या दरवाजानें तेथें आले होते.

इंद्रकुमारी व सज्जनसिंग यांना घेऊन बाजीराव भूतमहालांतून आपल्या महालांत गेले. तेथें त्यांनीं खुलासेवार बोलून परस्परांचा गैरसमज दूर करून घेतला. बाजीराव प्रसंगोपात्त दाभाड्यांच्या नांवानें वावरत हें वाचकांना पूर्वी माहीत झालें आहेच. वनवासी वगैरे मंडळीचा निरोप घेऊन बाजीराव जे निघाले, ते मार्गांत कांहीं ठाकूर-चौधरी वगैरे मातबर लोकांना भेटून व निजामाशीं लढण्याच्या कामीं त्यांची मदत निश्चित करून पूर्वसंकेताप्रमाणें गणेशतीर्थावर वास्तव्यासाठीं आले. दरम्यान् त्यांना मल्हारराव बांड्यांची फसगत झाल्याचें वृत्त त्यांच्या एका हेराकडून कळलें. तो खरा प्रकार काय होता हें बाजिरावांना माहीत नसल्यानें, व त्यांच्या कानीं ज्या बातम्या आल्या त्याही अपुऱ्या असल्यानें बाजिरावांचा प्रारंभीं असा ओझरता समज झाला कीं सज्जनसिंग शत्रूला फितूर झाला असावा, व त्यानें पूर्वपरिचयाचा फायदा घेऊन मल्हारराव वगैरे आपल्या मंडळी सभोंवार हें कांहींतरी मोहजाल पसरलें असावें. सज्जनसिंग मागाहून मल्हाररावांचा शोध करीत गेला, तोही मल्हाररावांना दगा देण्यासाठींच गेला असावा असें त्यांच्या मनानें घेतलें. पण सर्व मंडळी पूर्वसंकेतानुसार येऊन भेटेपावेतों त्यांना खरा व निश्चित वृत्तांत कळणें शक्य नव्हतें.

बाजीराव गणेशतीर्थावर वास्तव्याला आल्यावर प्रथमच त्यांना सज्जनसिंगाचें पत्र मिळालें.तें पत्र त्यांना दाभाडे समजून सज्जनसिंगानें लिहिलें होतें.तें पत्र त्यानें कोणत्या भावानें लिहिलें होतें हें आपणांला पूर्वी कळलेंच आहे. पण बाजिरावांच्या संशयग्रस्त मनानें घेतलें कीं, सज्जनसिंग हा शत्रूला फितूर झाला असावा, व दाभाडे आमचे प्रतिस्पर्धी आहेत हें ओळखूनच त्यानें दाभाड्यांशीं संगनमत चालविलें असावें. अशा फितुराला शासन अवश्य झालेंच पाहिजे असें बाजिरावांच्या मनानें घेऊन त्यांनीं पुढील सर्व खबरदारी घेतली. परंतु ते भुयारांतून त्या बुरखेवाल्या व्यक्तीचा शोध करण्यासाठीं व शत्रुकारस्थानाचा कांहीं सुगावा लागला तर तो पाहाण्यासाठीं भूतमहालांत आले, व त्यांना सज्जनसिंग आणि इंद्रकुमारी यांचें संभाषण ऐकावयाला मिळालें, त्यावरून त्यांची खातरजमा झाली कीं, सज्जनसिंग अथवा इंद्रकुमारी यांच्यापैकीं कोणीच फितुर नाहीं. बाजिरावांनीं आपल्या गैरसमजाचा सारा वृत्तांत सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांना आपल्या विश्रांतिमहालांत नेऊन तेथें निवेदन केला, व त्यावरून त्या दोघांचाही गैरसमज अनायासें दूर झाला.

पण बाजीराव आतां इंद्रकुमारीच्या तेथील आगमनांतील रहस्य ओळखण्यासाठीं उत्कंठित झाले होते. त्यांनीं प्रथम आपला खुलासा करून त्याच्या योगानें इंद्र-कुमारी व सज्जनसिंग यांचें समाधान झालें असें पहातांच, पूर्वी कालिदासाकडून कळलेल्या वृत्तान्ताला अनुसरून इंद्रकुमारीला प्रश्न केला, “ माताजी ! तुम्ही आज कोठून आलां ! त्रिभुवनेश्वराच्या देवालयांतून आलां काय ? ”

सज्जनसिंगाला इतका वेळ तो भूतमहालांत आपल्या भोक्तृत्वांत गुरफटून गेल्यामुळें त्या वृत्तान्ताबाबत प्रश्न विचारण्याला सवड झाली नव्हती. त्यानेंही बाजिरावांच्या प्रश्नाला दुजोरा दिला.

“ इतक्या वर्षांच्या वनवासाची कहाणी मी निवेदन करूं लागलें तर त्याला फार वेळ लागेल. इतके दिवस आम्ही वनवास नव्हे तर वनवासांतही अज्ञात-वास भोगीत आहों.”

“ तुम्ही म्हणजे कोण ! ” सज्जनसिंगानें विचारलें.

“ मी आणि माझा पाठिराखा बंधु धर्मसिंह.” इंद्रकुमारीनें एक उसासा सोडीत बाजिरावांकडे वळून प्रश्न केला, “ पण श्रीमंत ! आम्ही त्रिभुवनेश्वराच्या मंदिरांत असल्याची बातमी आपणाला कशी कळली ?”

बाजिरावांनीं त्यांना कालिदासाकडून कळलेला सर्व वृत्तांत निवेदन केला, व वनवासानें इंद्रकुमारी आणि सज्जनसिंग यांचा शोध करण्याची कामगिरी आपल्या शिरावर घेतल्याचेंही सांगितलें. वनवासीचें नांव ऐकतांच सज्जनसिंगाचे डोळे संतापानें लाल झाले. तो गंभीर चर्या करून बाजिरावांना म्हणाला," श्रीमंत ! वनवासी हा कोण असावा अशी आपली कल्पना आहे ?"

" कां बरें ? तुम्हीं असा प्रश्न कां केला ?" बाजिरावांनीं वनवासीच्या इतक्या दिवसांच्या सहवासांत त्यांना स्वतःला जो अनुभव व जी माहिती मिळाली होती, ती सर्व त्या दोघांना निवेदन केली.

सज्जनसिंग बाजिरावांचे वनवासीच्या परमगौरवपर उद्गार ऐकून उपहासपूर्वक हंसून म्हणाला, " श्रीमंत ! आपण सर्पाच्या कांतीला भुललां, व त्या भरांत सर्पाच्या दाढांत विष असतें हें विसरलां."

सज्जनसिंगाचे वनवासीबाबतचे उद्गार ऐकून बाजिरावांना राग आला. तशांत इंद्रकुमारीलाही त्याच वेळीं आपलें अंतःकरण खुलें करून आपले अनुभव कथन करण्याची इच्छा झाली. ती सज्जनसिंगाच्या विधानांना दुजोऱ्यादाखल म्हणाली, " श्रीमंत ! सज्जनसिंग म्हणतो तें अक्षरशः खरें आहे. कालिया नागाच्या फूत्कारांनीं कालिया डोहाच्या सभोंवारचा कैक कोस प्रदेश विषदाहानें करपून जात असे असें आपण श्रीकृष्णलीलांत ऐकतों, त्याप्रमाणेंच या वनवासीच्या कपट-कारस्थानांची विषारी छाया या प्रांतांत सर्वत्र फार दूरवर पसरली असून त्या छायेखालीं कोण केव्हां कसा विषदाहानें करपून जाईल याचा नेम नाहीं—"

" पण मातोजी ! माझें जरा ऐकून तर घ्याल ! " इंद्रकुमारीचें बोलणें पूर्णपणें ऐकून न घेतां बाजीराव म्हणाले, " तुमची दृष्टि सज्जनसिंगाच्या कटु बोलांनीं कांहींशी मलिन झाली आहे, म्हणून तुम्ही त्या महाभागाविषयीं असे अनुदारपणाचे उद्गार काढूं शकलां. बाकी, यांत तुमचा दोष नाहीं. स्त्रिया या निसर्गतःच भावनाप्रधान असतात."

" पण मी सज्जनसिंगाच्या शब्दांवर विश्वासून बोलत आहें अशी जी आपली कल्पना आहे तीच साफ चुकीची आहे. स्त्रिया भावनाप्रधान असतात हें खरें असेल; पण स्त्रियादेखील माणसेंच असतात, व त्यांना जगाचा खारट तुरट अनुभव असल्याशिवाय किंवा जगांतील वस्तुमात्राचें अंतरंग ओळखण्याची कांहींशी पात्रता एखाद्या स्त्रीच्या अंगीं असल्याशिवाय ती वर्षेंचीं वर्षें पुरुषांच्या

साह्याशिवाय रानावनांतून रात्रंदिवस भटकत असतांना अष्टौप्रहर शत्रूपासून बचावूं शकणार नाहीं ! माझ्या इतक्या दिवसांच्या अनुभवानें मला एवढें कळूं लागलें आहे, कीं जगांतील प्रत्येक गोष्ट नीट पारखून घेतली तरच आपला तरणोपाय असतो. इतके दिवस मी जगांत वांवरत आहें, त्यांत जो अनुभव मला मिळाला तोच माझा खरा गुरु ! ”

इंद्रकुमारीचे सडेतोड बोल बाजिरावांच्या मनाला बरेच झोंबले. त्यांनीं इंद्रकुमारीला विचारलें, “ माताजी ! मला तुमचा अनुभव कसा तो ऐकावयाचा आहे.”

इंद्रकुमारी उद्गारली, “ मित्रांच्या मैत्रीवर बिब्बा घालणें हें पाप असेल; पण वनवासी हा आपला मित्र नसून आपला शत्रु आहे. आपल्यापाशीं बोलल्याप्रमाणें त्यानें मी व माझा भाऊ या दोघांचा शोध करण्याचा प्रयत्न केला खरा. पण त्यापूर्वींच आम्हीं शितावरून भाताची परीक्षा केली होती, व ती तंतोतंत बरोबर ठरली.”

“ पण भाताची परीक्षा करण्याला एक शीत तरी तुमच्या हातीं कोणतें सांपडलें ? ” बाजिरावांनीं प्रश्न केला.

“ एकलिंगजी हा वनवासीचा उजवा हात आहे हें तर खरें ? ”

“ होय. एकूण तुम्हांला बरीच अंतरंगांतील माहिती दिसते ! ”

“ ऐका.” इंद्रकुमारी बाजिरावांना हातानें गप्प रहाण्यासाठीं खुणावीत म्हणाली, “ सज्जनसिंग संकटांत असल्याची खबर मल्हाररावांना आपण दिली होती का ?”

“ नाहीं.” बाजीराव उत्तरले.

“ नाहीं ? वाः ! मग मात्र कमाल झाली ! श्रीमंतांच्या आज्ञेवरून एकलिंगजीनें मल्हाररावांना ती खबर दिली व म्हणूनच मल्हारराव इतक्या तांतडीतें पाताळकुंडापाशीं आले असें त्यांच्याच लोकांकडून मला नक्की कळलें.”

“ तें साफ खोटें आहे. आम्हांला एकलिंगजी भेटला देखील नाहीं, व सज्जनसिंग अमक्याच ठिकाणीं संकटांत सांपडलेला असल्याचें आम्हांला आज तुम्ही स्वतः एथें येईपावेतों मुळींच माहीत नव्हतें. इथें कांहींतरी विपरीत प्रकार असला पाहिजे खास.” बाजीराव म्हणाले.

बाजिरावांच्या मनांत वनवासीविषयीं उत्पन्न झालेला ओझरता संशय आतां क्षणोक्षणीं अधिकाधिक जोरावत चालला. इंद्रकुमारीलाही आपल्या कथनाबद्दल अधिकाधिक आत्मविश्वास वाटूं लागला. .ती पुढें म्हणाली, “ श्रीमंत ! वनवासी

व एकलिंगजी यांचें गुरुशिष्याचें नातें केवळ आपणांसारख्या व आमच्यासारख्या लोकांच्या डोळ्यांना पाणी लावण्यासाठीं.—कोळी मासे पकडतांना आमिष लावतो, त्यांतलाच हा प्रकार होय. पण अंतरंगें मात्र उभयतांचींही काळींकुट्ट आहेत. गुरु आणि शिष्य दोघेही सारखेच विषयान्ध आहेत. फार काय, गुरु तर परदाराभिलाषाचें पाप जोडण्यालाही न शरमण्याइतका निर्ढावलेला बेरड आहे. आतां प्रसंगच आला म्हणून सांगणें प्राप्त आहे,—माझाही अभिलाष त्या बेरडानें धरला होता. पण माझें दैव थोर म्हणून मीं तेव्हां कसाबसा स्वतःचा बचाव केला. माझी अशी पूर्ण खात्री आहे कीं, तो माझ्या सासरच्या किंवा माहेरच्या घराण्यांतील कोणीतरी नोकर असावा; तो मला चांगली ओळखीत असावा. एरव्हीं त्यानें माझ्याविषयीं सलगीचे उद्गार काढण्याचा प्रयत्न केला नसता."

बाजीराव म्हणाले, "माताजी ! हा तुमच्या समजुतीचा घोटाळा आहे. वनवासी हा विक्रमसिंहांच्या दृढ परिचयाचा असून त्यानें विक्रमसिंहांची आम्हांला भेट करून देण्याचेंही कबूल केलें आहे. कालिदासाच्या मुखांतून तुम्ही त्रिभुवनतीर्थावर असल्याची वार्ता कळतांच तो किती आपुलकीनें तुमचा शोध करण्याला उद्युक्त झाला, तें आम्हीं प्रत्यक्ष आमच्या डोळ्यांनीं पाहिलें आहे."

इंद्रकुमारी दाटलेल्या कंठानें म्हणाली, "मग ! मी सांगतें काय, कीं वनवासी मी मी म्हणाऱ्या चतुरांच्याही डोळ्यांत हां हां म्हणतां धूळ फेंकण्याला निर्ढावलेला आहे म्हणून ! विक्रमसिंहजींची भेट आतां वनवासी आपणांला घडवून देणार ! त्यांची व ह्या वनवासीची मैत्री—निदान ओळख तरी असती, तर ती निदान मला—त्यांच्या सहचारिणीला तरी कळली नसती का ?"

बाजिरावांच्या मनावर इंद्रकुमारीच्या बोलण्याचा परिणाम झाला. खरोखरच वनवासी हा शत्रूच्या पक्षाचा कोणीतरी जबाबदार व महाकारस्थानी पुरुष असला पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें. सज्जनसिंगानें मल्हाररावांच्या बाबतींत घडलेला प्रकार सांगितला त्यावरून त्यांचा संशय दृढ झाला कीं, एकलिंगजीनें मल्हाररावांना गोत्यांत आणण्यासाठीं डाव टाकला तो वनवासीच्या आज्ञेवरूनच टाकला असला पाहिजे. इंद्रकुमारीनें वनवासी आपला दुराभिलाष करीत असल्याचें सांगितलें त्यावरून वनवासीनें इंद्रकुमारीचा शोध करण्याची कामगिरीच प्रथम कां उचलली याचा तर्क केला. देवदूतसंघ, त्याच्या हालचाली, त्याचीं उच्च ध्येयें वगैरेविषयीं इतके दिवस बाजिरावांच्या मनांत वसणारा आदर आज पार रसातळाला

गेला, व त्यांच्या मुखांतून ओघासरसे उद्गार बाहेर पडले, " एकूण परमेश्वराची आपणां सर्वांवर कृपा आहे, म्हणूनच आज वनवासीच्या कृष्णकारस्थानांचा अचूक सुगावा आपणांला लागला. आतां पहिली गोष्ट—"

" पहिली गोष्ट ही कीं, वनवसी सांपडेल तिथें प्रथम ठेंचून त्याचा नायनाट केला पाहिजे." इंद्रकुमारी उद्गारली.

इंद्रकुमारीच्या शब्दांना संमतिदर्शक मान तुकावीत बाजीराव म्हणाले, " तें तर ठरलेंच; व तो बेत अंमलांत यावयाला आतां फारसे सायासही पडावयाचे नाहींत. वनवासीनें एथें येऊन आमची भेट घेण्याचें कबूल केलें आहे त्याप्रमाणें तो बहुधा आज येईलच."

" त्याचा काय नेम सांगावा ? कदाचित् आपल्या कुटिल कारस्थानाचा स्फोट झाल्याचें त्याच्या कानांवर गेल्यास तो येणारही नाहीं; किंवा आपणाला गोता देण्यासाठीं आणखी एखादा डाव रचण्यालाही कमी करणार नाहीं ! " सज्जनसिंग म्हणाला.

" तें पहातां येईल. त्याची काळजी करण्याचें कारण नाहीं." असें म्हणून बाजिरावांनीं आपल्या एका विश्वासू अधिकाऱ्याला एका बाजूला बोलावून घेऊन त्याला वनवासीच्या शोधाविषयीं व बंदोबस्ताविषयीं जरूर त्या सूचना दिल्या, व पुन्हा ते इंद्रकुमारी आणि सज्जनसिंग हीं दोघें बसलीं होतीं त्या बैठकखान्यांत आले. इंद्रकुमारी आज अचानक गणेशतीर्थावर कशी आली याविषयीं त्यांना व सज्जनसिंगालाही कुतूहल वाटत होतें; त्याविषयीं बाजिरावांनीं इंद्रकुमारीपाशीं चौकशी केली, " बरें; माताजी ! त्रिभुवनेश्वराच्या देवालयापासून एथवरचा मार्ग आपणाला कसा सांपडला ? "

" खरेंच; आई ! तुमची कहाणी ऐकण्याची मला देखील फार उत्कंठा लागून राहिली आहे." सज्जनसिंग म्हणाला.

इंद्रकुमारी त्या उभयतांच्याही विनंतीला मान कसा देणार नाहीं !

प्रकरण बाविसावें

## कालिदासाचें पुनरागमन

इंद्रकुमारीनें त्रिभुवनेश्वराच्या देवालयांत कालिदासाशीं झालेलें आपलें सारें संभाषण वगैरे सर्व प्रकार निवेदन केला व पुढें सांगितलें, "ते दोघे (कालिदास व भवानीराम) मला न सांगतां अकस्मात् आपले घोडे घेऊन निघून गेले, त्याबरोबर आम्हांला संशय आला, कीं हे कोणी शत्रूचे लोक तर नसतील! अनुराधसिंगाला आमची चाहूल लागली आहे व तो आमच्या शोधांत आहे अशी बातमी त्याच दिवशीं धर्मसिंहानें आणली होती. त्यांतलेच हे कोणी लोक असतील असें आम्हांला वाटून आम्ही तशींच ताबडतोब रातोरात तेथून निघालों, तीं अर्ध्या कोसावर एका दाट झाडींत एक गुहा आहे, तिथें जाऊन वस्ती केली. दुसऱ्या दिवशीं आम्हीं फत्तेबादचा पल्ला गांठला. आमचा विचार पुन्हा एकवार आमच्या बंधुराजांच्या आश्रयाला जाऊन रहाण्याचा होता. बंधुराज उज्जयनीला असल्याचें आम्हांला तेथें कळलें, तेव्हां धर्मसिंहानें मला मागें ठेवून एकट्यानेंच वेषांतरानें उज्जयनींत जाऊन बंधुराजांना भेटण्याचें ठरविलें व तो निघूनही गेला. माझाही त्याच्याबरोबरच उज्जयनीला जाण्याचा विचार होता. पण धर्मसिंह म्हणाला कीं नको; आणि मलाही तें विचाराअंतीं पटलें."— ती बाजिरावांकडे वळून म्हणाली. "कां कीं, आपल्या पराक्रमी तीर्थरूपांनीं दिल्लीवर चाल करून बादशहाच्या छातीवर पाय देऊन स्वराज्य—चौथाई—सरदेशमुखीच्या सनदा संपादन केल्या, विक्रमसिंहजींनींही अल्लाहजरतांची भूमिका घेऊन माझी बादशहाच्या जनानखान्यांतून मुक्तता केली,—जवळजवळ माझ्यापायींच बादशहाला आपल्या प्राणांना मुकावें लागलें, तेव्हांपासून बादशाही अंमलदारांच्या व खुद्द बादशाही वंशांतील एकूणएक पुरुषांच्या डोळ्यांत मी सलत आहें. बादशहाच्या जनानखान्यांत आलेली हिंदु राजकन्या पूर्ववत् अभंग पावित्र्यानिशीं मुक्त झाली, यांत त्या सर्वांचें जणुं नाकच कापलें गेलें. तो अपमानाचा डाग ह्या नाहीं तर त्या मार्गानें धुऊन काढण्यासाठीं सध्यांच्या बादशहाला काय किंवा शहाजाद्याला काय, मला पुन्हा बादशाही जनानखान्यांत ओढून नेऊन माझी विटंबना करायची आहे. विक्रमसिंहजींना पकडून

या अंगांतून नाहींसे करतांना मी व धर्मसिंह या उभयतांचीही तीच गत करावी असा आमच्या शत्रूंचा डाव होता. पण आम्ही त्यांच्या हातावर तुरी देऊन निसटल्यामुळें त्यांचा नाइलाज झाला. असें कांहीं आहे. तेव्हां मी माझा बचाव करण्यासाठीं मागें राहिलें, व धर्मसिंह तसाच परवां उज्जयनीकडे निघून गेला. तो कालच फत्तेबाद एथें संकेतस्थलीं येऊन मला भेटणार होता.मीं त्याची बराच वेळ वाट पाहिली, पण तो कांहीं आला नाहीं. त्याच दिवशीं मला मल्हाररावांवर कोसळले-ल्या संकटाची खबर मिळाली. प्रथम मलादेखील वनवासी इतका विश्वासघातकी असेल हें खरें वाटलें नाहीं. पण मागाहून जेव्हां जास्त जास्त माहिती मला मिळाली, तेव्हां मात्र माझी खात्री झाली."

" जास्त माहिती काय मिळाली ? " बाजिरावांनीं विचारलें.

" दुर्गादास या नांवाचा एक मोठा धनिक जमीनदार वनवासीचा कैवारी व साह्यकर्ता आहे. आपणाला तो माहीत असेलच ! "

" होय. ऐकून माहीत आहे." बाजीराव म्हणाले.

" कोण; दुर्गादास ! एका काळीं अनुराधसिंगजींच्या पूर्ण मर्जीत असणारा त्यांच्या नाकांतील केंस–त्यांच्या तळहातावरचा फोड दुर्गादास ! " सज्जनसिंग भ्रुकुटि वक्र करून विस्मयपूर्वक विचारूं लागला.

" होय. तोच दुर्गादास. तो अजूनही अनुराधसिंगजींच्या पूर्ण मर्जीत आहे; इतकेंच काय, पण बरेच रजपूत राजे व शहाजादे देखील त्याला फार मानतात." इंद्रकुमारी उत्तरली.

" कारण काय बरें ! " बाजिरावांनीं प्रश्न केला.

" श्रीमंत ! मी बायको माणूस पडलें. त्या कारणांचा उच्चार करण्याला माझी जीभ धजत नाहीं." इंद्रकुमारी शरमल्यासारखें करून किंचित् खालीं मान घालून अपेक्षापूर्ण दृष्टीनें सज्जनसिंगाकडे पहात म्हणाली.

" श्रीमंत ! अष्टौप्रहर विलासकर्दमांत लोळत राहून पशूंनाही खालीं पहावयाला लावणाऱ्या या भूभारभूत राजेरजवाड्यांच्या व बादशहा–शहाजाद्यांच्या लाजिरवाण्या आयुष्याची आपणाला चांगली ओळख आहेच. असल्या मानवी पशूंच्या पाशवी वासना तृप्त करण्यासाठीं झटणारे नीच मनुष्यच त्यांच्या गळ्यांतले ताईत शोभावयाचे ! " सज्जनसिंग म्हणाला.

" समजलें ! एकूण अशा वृत्तीचा तो दुर्गादास आहे म्हणावयाचा ! " बाजीराव किंचित् भुंवया चढवीत म्हणाले.

" होय. आणि तो वनवासीचा जिवलग मित्र, साहयकर्ता, वनवासीला वेळोवेळीं द्रव्यबळ व मनुष्यबळ पुरविणारा, असा हरकामी माणूस आहे ! चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या म्हणतात त्या या अशा ! दुर्गादास जातकुळीनेंही नीचच आहे. त्याची एक बहीण अनुराधसिंगजींची परमप्रिय विलासदासी आहे, व त्याला चंचला या नांवाची एक उपवर कन्या आहे, तीही आपल्या बापाला शोभण्यासारखीच आहे."

" म्हणजे कशी ? " बाजिरावांनीं प्रश्न केला.

" म्हणजे तशीच ! " इंद्रकुमारी स्मितहास्यपूर्वक उद्गारली, व अंमळ ओशाळेपणानें जरा अधोवदन झाली. तिला ओशाळी करण्याचा बाजिरावांचा मनोदय नव्हता; त्यांनीं सहज ओघासरसा प्रश्न विचारला होता. पण त्या प्रश्नाचा असा परिणाम झालेला पाहून त्यांनाही किंचित ओशाळल्यासारखें झालें.

सज्जनसिंग मध्येंच म्हणाला, " श्रीमंत ! जगांत मनुष्यमात्राला जबरदस्त मोह असे दोनच; एक कनक व दुसरी कान्ता. त्यांपैकीं दुसरें मोहजाल हातीं घेऊन दुर्गादासाची कन्या चंचला कोणाही उपयुक्त माणसाला त्या जाळ्यांत गुरफटविण्याला नेहमीं सिद्ध असते, असें मीं ऐकलें आहे. बाकी, दुर्गादासाच्या वंशाला असा शापच आहे. विक्रमसिंहजींच्या नेतृत्वाखालीं आमचा स्वातंत्र्यसंघ जोमांत कार्य करीत होता तेव्हांही दुर्गादासाची बहीण कल्याणी, स्वातंत्र्यवीरांचा तपोभंग करण्यासाठीं सज्ज असे, व ती तेव्हां तारुण्याच्या ऐन उमेदींत असून फारच सुंदर दिसत असल्यानें तिच्या नादीं लागून तेव्हां अनेक स्वातंत्र्यवीरांचा तपोभंग झालाही. स्वातंत्र्यसंघाचे गुप्त बेत बाहेर फुटले व त्यामुळें सर्वच कार्याचा विचका होऊन संघाचा नायनाट झाला, त्याला कारण कल्याणी व तिच्यासारख्याच आणखी कांहीं दुराचारी सौंदर्यवती होत. कल्याणी आतां अनुराधसिंगाच्या विलासमंदिरांत राजविलास भोगण्यांत दंग आहे, व तिची जागा तिच्या भाचीनें—चंचलेनें भरून काढली आहे. पुराणकालीं निरनिराळ्या तपोनिधींच्या तपश्चर्येचा भंग करण्यासाठीं अप्सरा स्वर्गांतून मृत्युलोकांत येत, त्यांतलाच हा प्रकार आहे."

" बरें; पण एकलिंगजीचा या सर्व गोष्टींशीं काय संबंध ? " बाजिरावांनीं विचारलें.

" एकलिंगजी हा वनवासीचा उजवा हात आहे. यापेक्षां त्यांच्या आणखी काय भानगडी असतील त्या भगवंताला माहीत ! पण वनवासीच्या आज्ञेबरहुकूम एकलिंगजी वागत असला पाहिजे. आणखी असें कीं वनवासी काय, एकलिंगजी काय किंवा त्यांच्या वर्गांतील आणखी कोणी चांडाळ काय, उमललेल्या कमला-सभोंवार बुभुक्षित मधुकरांचा गुंजारवयुक्त पिंगा सुरू असावयाचाच ! "

" अस्सें ! आतां आलें सारें ध्यानीं. बरें; तिथून तुम्ही इकडे कशा आलां ? बाजिरावांनीं प्रश्न केला.

" आपण आज-काल इतक्यांत इथें—गणेशतीर्थावर येणार असल्याबद्दलची बातमी मला फत्तेबादलाच मिळाली."

" ती कशी काय ? "

" माझ्यावर श्रद्धाळूपणानें ममता करणारीं कांहीं चतुर माणसें आहेत, त्यांनीं दुर्गादासाच्या वाड्यांत वेषांतरानें प्रवेश करून ही माहिती मिळविली. अर्थात् वाड्यांतील मंडळीला ही माहिती खुद्द वनवासीकडूनच कळली असली पाहिजे."

" बरोबर आहे." सज्जनसिंग मध्येंच कांहीं आठवल्यासारखें करून म्हणाला, " वनवासी व त्याचे देवदूत हे सारे शत्रुपक्षाचे लोक असावे यांत तिळमात्र संशय नाहीं. मल्हाररावांच्या सैनिकांकडून मला कळलें कीं, मल्हाररावांना माझें नांव सांगून फसवून मुक्कामाबाहेर काढणारा मनुष्यही देवदूतच होता. त्यानें आपल्या जवळचें स्वस्तिकचिन्ह मल्हाररावांना दाखविलें म्हणूनच ते फसले."

या शिळोप्याच्या गोष्टी आणखी कोठवर चालल्या असत्या कोण जाणे. पण तेवढ्यांत सर्वांचा सुपरिचित असा कवि कालिदास धूमकेतूप्रमाणें तेथें अचानक उगवला. त्याला आंत पाठवून द्यावयाचें किंवा कसें असें पहारेकऱ्यानें विचारतांच बाजिरावांनीं त्याला 'होय' असें सांगितलें. पहारेकरी बाहेर गेल्यावर प्रथम बाजीराव आंत जाऊन आपला वेष जरूर तेवढा—कालिदासाला पहिल्या भेटींतील दाभाड्यांची बरोबर ओळख पटावी इतपत—पालटून बाहेर आले. त्यांच्याकडे पाहून इंद्रकुमारी व सज्जनसिंग यांना मोठा अचंबा वाटला. तीं दोघें कालिदास आल्याची वार्ता ऐकून पेंचांत पडलीं होतीं कीं, आतां त्यानें आपणांला ओळखलें

तर कसें होणार ! पण बाजिरावांकडे पहातांच त्यांनाही वाटूं लागलें कीं, आपण-देखील अशाच एखाद्या युक्तीचा अवलंब केला तर कसें होईल !

इतक्यांत बाजीराव त्या दोघांच्या विस्मयपूर्ण चर्येकडे पाहून स्मितहास्यपूर्वक उद्गारले, " आम्ही आतां सेनापति दाभाडे बनलों आहों."

" तें मीं ओळखलें." सज्जनसिंग हंसत हंसत म्हणाला, " आपलें ठीक आहे; कारण त्या शंखाला आधींच तारतम्यज्ञान कमी व शिवाय त्यानें आपणाला यापूर्वी कधीं पाहिलेलेंही नाहीं. पण आमचें तसें नाहीं. मला तर कालिदास पूर्ण-पणें ओळखतो, व यांनाही परवांच त्यानें पाहिलें आहे."

" मला वाटतें, आम्हीं इथेंच कुठेंतरी थोडा वेळ लपून बसावें." एवढें इंद्रकुमारी बोलते न बोलते, तोंच कालिदास तेथें दत्त म्हणून हजर ! त्याची दृष्टि अगदीं प्रथम नेमकी इंद्रकुमारीकडेच वळली. तो म्हणाला, " माताजी मीं तुम्हांला ओळखलें." लगेच तो सज्जनसिंगाकडे वळून म्हणाला, " आणि सज्जनजी ! तुम्हांलाही मीं ओळखलें. पण माझ्यापुढें तुम्हांला लाजण्याचें कांहींच कारण नाहीं. तुम्ही माझे धनी आहां. तशांत ज्या अर्थी तुम्ही दाभाडे सेनापतींच्या आश्रयाला आला आहां व दाभाड्यांनींही आमच्या पक्षाचा स्वखुषीनें अंगीकार केला आहे, त्या अर्थी आतां तुम्ही आम्ही सारीं एक ! उशिरां कां होईना; पण तुम्हांला आमच्या पक्षाला येऊन मिळण्याची सुबुद्धि सुचली, ही तुमच्यावर व आमच्यावरही परमेश्वराची मोठीच कृपा म्हणावयाची. हें पहा, मनुष्यानें जन्माला आल्यासारखें सुखासमाधानानें आयुष्य वेंचावें. उगाच लहान तोंडीं मोठा घांस घेऊन आपला नाश आणि जगाचें हंसें सहन करण्यांत शहाणपणा नाहीं. तुम्ही आम्हांला येऊन मिळालां, ठीक झालें. आतां अनुराधसिंगजी काय, अभय-सिंगजी काय, किंवा बादशाही सत्तेचे इतर कैवारी काय, तुम्हां उभयतांचा हा भलेपणा पाहून इतके खूष होतील कीं ज्याचें नांव तें ! सज्जनजी ! आतां तुम्हांला अनुराधसिंगजींकडून राज्याचा योग्य हिस्सा व शिवाय निजामाकडून निराळी जहागीर मिळेल अशी तजवीज करण्याचें काम माझें. आतां तुमचे रानावनांतून वणवण हिंडण्याचे दिवस संपले असें समजा." तो बाजिरावांकडे पाहून म्हणाला, " श्रीमंत ! अगदीं बरोबर अंदाज केला कीं नाहीं ? "

" अगदीं बरोबर ! " बाजिराव म्हणाले. त्याच वेळीं ते मनांत पुटपुटले " बेट्या ! शंख आहेस झालें ! "

" माणसाला धोरण असावें लागतें तें असें ! " कालिदास इंद्रकुमारी व सज्जनसिंग यांच्याकडे वळून म्हणाला, " कोणता मनुष्य कुठें आला आहे हें पाहून—नुसतें पाहून तो कोणत्या उद्देशानें तेथें आला असावा हें ओळखणें सामान्य माणसाचें कामच नव्हे ! "

" खरें आहे ! " इंद्रकुमारी गालांतल्या गालांत हंसत पण स्त्रीस्वभावसुलभ शालीनतेचें अतिक्रमण न करितां उद्गारली. सज्जनसिंगानें तिच्या संमतिदर्शक शब्दांना आपल्या अस्फुट स्मितवदनाची साक्ष दिली. पण त्याच वेळीं त्या दोघांनीं एकमेकांकडे व बाजिरावांकडेही पाहिलें, तेव्हां त्या तिघांच्याही नजरभरारीच्या मुक्या बोलांतून एकमतानें एकच अर्थ निघाला. तो हा कीं—पण तो पुनः पुन्हा बोलून कशाला दाखवा !

कालिदासाची अपेक्षा होती कीं सज्जनसिंग व इंद्रकुमारी आपणाशीं फार मोकळेपणानें बोलतील. निदान इंद्रकुमारीनें तरी आपणाशीं फार बोलावें असें त्याला वाटत होतें. तो आपण होऊन म्हणाला, " माताजी ! आतां मला अगोदर सांगा, तुम्ही त्रिभुवनेश्वराच्या देवालयांतून इकडे कधीं व कशा आलां ? मोकळेपणानें सांगा. त्या दिवशीं तुम्ही माझ्यावर—नव्हे कालिदासावर रागावला होतां, तोच मी. पण मीं तो राग मनांत ठेविलेला नाहीं, व आतां तुम्ही आम्ही एक झाल्यामुळें तुमच्याही मनांत कांहीं किल्मिष उरलें नसेल, अशी मला आशा आहे."

कालिदासाच्या आश्वासनपर शब्दांनीं इंद्रकुमारीला बराच धीर आला, व ती प्रसंगवधानपूर्वक कोमल स्वरांत मार्मिकपणें उद्गारली, " कविराज ! त्या दिवशीं मी तुमची परीक्षा पहाण्यासाठीं मुद्दाम तसें बोललें. तुम्ही माझ्या टोमणेवजा बोलण्यावर चिडाल, व—तुम्ही कधीं रागावत नाहीं, महासागराप्रमाणें शांत व गंभीर अशी तुमची नेहमींची वृत्ति असते असें मीं कैक वेळां ऐकलें होतें, त्या तुम्हांला एकदांतरी चिडवावें अशा इराद्यानें मी तें बोललें होतें."

कवीच तो ! त्याला चण्याच्या झाडावर चढण्याला कितीसा उशीर ! त्यानें प्रसन्नतापूर्वक इंद्रकुमारीला विचारलें, " एकूण तुम्हांला व्रिजलाल कवीप्रमाणेंच कालिदासही आवडतो म्हणावयाचा तर ! "

" यांत काय संशय ! " इंद्रकुमारी म्हणाली.

" हें मला पूर्वीच माहीत होतें–नव्हे–तुम्हांला जेव्हां मीं त्या दिवशीं सायंकाळीं सूर्यास्ताच्या सुमाराला त्रिभुवनतीर्थावर पाणी भरतांना पाहिलें, तेव्हांच नुसत्या तुमच्या पाठमोऱ्या दर्शनानेंच मीं ओळखलें कीं माझ्या चहात्या मंडळींपैकीं तुम्ही एक आहां.––"

आतां हें कविराजांचें गुऱ्हाळ आणखी किती लांबेल याचा पत्ता नाहीं हें ओळखून बाजिरावांनीं मुद्दाम विषयांतर केलें, " बरें; कविराज ! तुम्ही आज कोठून आलां ? ज्या कामगिरीवर गेलां होतां त्या कामगिरीचें काय झालें ? "

## प्रकरण तेविसावें

# कालिदासाचें निवेदन

सजनसिंग व इंद्रकुमारी लक्ष्यपूर्वक ऐकूं लागलीं. कालिदास आपला प्रवास-वृत्तान्त सांगूं लागला, " श्रीमंत ! कालिदासानें एखादी कामगिरी पत्करली रे पत्करली, कीं विजयश्री कालिदासाच्या पायांतळच्या छायेबरोबर चालत येऊं लागते. हेंच पहा, आपला निरोप घेऊन सटवोजी जाधवासह मी प्रथम ओंकारेश्वरीं गेलों. तेथें जातांच चंद्रशेखराला भेटून त्याला चार हिताच्या गोष्टी समजावून सांगितल्या; तो निजामाची सत्ता मान्य करावयाला तयार होऊन राजनिष्ठेची शपथ घेण्यासाठीं त्याच दिवशीं उज्जयनीला यावयाला निघाला देखील. कदाचित् तो इतक्यांत उज्जयनीला जाऊन पोंचलाही असेल."

" शाबास ! " चंद्रशेखर शत्रूला फितूर झाल्याचें ऐकून बाजिरावांना मनांतून जरी अत्यंत विषाद वाटला, तरी वाह्यात्कारीं त्यांना घेतल्या सोंगाची बतावणी करणें प्राप्तच होतें. त्यांनीं आपलें मन शक्य तितकें निर्विकार असल्याचें दर्शविण्याचा प्रयत्न करीत विचारलें, " बरें; भागाबाईचें काय झालें ? "

" तेंच मी आतां सांगत होतों. भागाबाई माझ्या पूर्ण आटोक्यांत आली आणि काय ! ती शहाजाद्याच्या विलासमंदिरांत जाण्याला इतकी उत्सुक बनली आहे, कीं ज्याचें नांव तें ! "

" असें ?"

" तर ! या कवीश्वराच्या वाणीचा प्रभाव तसा विलक्षण आहे. भागाबाईनें मला गौरवपूर्वक पाचारण करून माझ्यापाशीं आपलें अंतःकरण उघडें केलें व मींही माझी सारी कवित्वशक्ति खर्च करून शहाजाद्याचें वैभव तिच्या मनांत असें ठसवून दिलें कीं वाः !–हें पहा सेनापति ! या कामांत भवानीराम व मी अशा दोघांत चढाओढ लागली आहे. भवान्यानें माझ्यापुढें चंद्रशेखरापाशीं जाऊन त्यांना उज्जयनीला पाठविलें, तर मीं त्याच्या लेंकीला वाड्याबाहेर काढलें. त्यानें मांडवगडावर आपल्या कारस्थानाचा प्रयोग करून निहालकर्ण व अनुपसिंग यांना कैदेंत डाम्बून ठेविलें आहे, तर मीं मांडवगडाच्या ऐन गड्ड्यालाच हात घातला

आहे. राव तेजकर्ण हे गजराबाईसाहेबांचा शोध करण्यासाठीं मांडवगडाहून निघाले, ते मला नुकते कालच वाटेंत भेटले. ते अर्थात् पेशव्यांचे कैवारी आहेत—"

" काय म्हणतां ! गजराबाईचें काय झाले ! " बाजिरावांनीं बसल्या जाग्या वरून ताडकन् उठून उभे रहात विचारलें, " गजराबाई शत्रूच्या हातीं सांपडली काय ! "

" अहो ! तसें नव्हे ! माझें ऐकाल तर खरें ! गजराबाई मित्रांच्या हातीं सांपडली, व त्यांच्याच हातून ती आतां शहाजाद्याच्या जनानखान्यांत रवाना व्हावयाची आहे. 'परमेश्वरा ! माझ्या मित्रांपासून माझें रक्षण कर', असें म्हणण्या ची पाळी आज राजकन्येवर आली आहे. पेशव्यांची बोटें पेशव्यांच्या डोळ्यांत खुपसण्याचा हा राजकारणी डाव आहे. तो डाव इतक्या कौशल्यानें खेळण्याचें सारें श्रेय तुमच्या विश्वासू सेवकाला—सटवोजीला आहे. तो मला मार्गांत भेटला, त्यानें मुद्दाम तुम्हांला कळविण्याला सांगितलें आहे."

वज्राघात ! बाजिरावांच्या हृदयावर या वार्तेचा जणुं वज्राघात झाला. सटवोजी जाधव—त्यांचा उजवा हात सटवोजी जाधव इतका विश्वासघातकी निघाला. हें ऐकून त्यांच्या हृदयावर वज्राघात कसा होणार नाहीं ! मात्र सटवोजीच्या हातून ही नीचपणाची गोष्ट होईल अशी खात्री वाटेना. परंतु त्यांनीं या वेळीं सटवोजीची बाजू स्वानुभवाच्या जोरावर सांवरण्याचा प्रयत्न केला नाहीं. कारण नुक्तीच वनवासी च्या बाबतींत त्यांना अद्दल घडली होती. आणखी असें कीं, सध्यां त्यांनीं दाभाड्यांची भूमिका घेतल्यामुळें घेतल्या सोंगाची बेमालूम बतावणी करण्यासाठीं त्यांना राजकन्येच्या कैदेची बातमी ऐकून झालेला आनंद चर्येवर व वाणींतही दाखविणें अपरिहार्य होतें.

" वाः ! हें तर फारच छान झालें." बाजीराव मनांतल्या मनांत 'सटवोजी-इतका पागल कसा निपजला' हा विचार घोळवीत उद्गारले.

" अहो ! खरें 'छान' तें याच्या पुढेंच आहे. ऐका तरी ! " पोपट ज्याप्रमाणें पोपटपंचीच्या रंगांत आला कीं, मस्तक फुलवून नेत्र विस्फारित करतो, त्याप्रमाणें आविर्भाव आणून कालिदास म्हणाला, " त्या लेकानें राजकन्येला कैद केलें म्हणून त्याला देहान्त शासन करण्यासाठीं व राज-कन्येची मुक्तता करण्यासाठीं पिलाजी जाधव व राव तेजकर्ण हे दोघेही उंज्जयनीकडे यावयाला निघाले आहेत; त्यांना देखील अचूकपणें आपल्या

जाळ्यांत आणून सोडण्यासाठीं मीं निराळीच बेमालूम युक्ति अंमलांत आणली आहे. ती ऐकून तर आपण तोंडांत बोटेंच घालाल ! मग हा कालिदास किती पाताळयंत्री–किती राजकारणधुरंधर पुरुष आहे याची आपल्याला कांहींशी कल्पना करतां येईल."

बळेंच हास्य आपल्या चर्येवर दर्शवीत बाजीराव म्हणाले, "कविराज पडलां आपण ! रवीची दृष्टि पोंचत नाहीं तेथें कवीची दृष्टि पोंचते.—"

"अगदीं बरोबर बोललां !" कविराज जास्त झपाट्यानें चण्याच्या झाडावर चढतां चढतां उद्गारले, "कवित्व आणि राजकारणधुरंधरता यांचा असा गोड संगम ज्याच्या ठायीं झाला, त्याला या पृथ्वीतलावर अशक्य अथवा अगम्य असें काय आहे !"

"पण तुम्हीं कोणती युक्ति तेजकर्ण व पिलाजी जाधव यांना आमच्या ताब्यांत आणून सोडण्यासाठीं योजिली आहे ती प्रथम कळूं दे तर खरी !" बाजीराव कालिदासाच्या 'ताळ ना तंत्र' अशा थाटाच्या वाचाळतेला मनांतून कंटाळून म्हणाले.

कालिदास आपल्या मिशीवर ताव देत उद्गारला, "ती दोन्ही मंडळी पेशव्यांची कट्टी कैवारी दिसली; तेव्हां त्यांना मी स्वतः बाजिरावांचाच पक्षपाती असल्याचें भासविलें. माझ्या शब्दांवर त्यांचा विश्वास बसावा म्हणून त्यांच्या तोंडावर बाजीराव पेशव्यांची इतकी ओतप्रोत स्तुति केली, कीं ती स्वतः पेशव्यांनीं ऐकली असती तर त्यांनीं देखील प्रसन्न होऊन आपल्या मस्तकावरील मंदिल काढून माझ्या मस्तकावर ठेवला असता, व मला आपल्या उजव्या हाताशीं उच्चासनावर बसवून घेतलें असतें. माझ्या शब्दांवर विसंबून ते दोघेही आतां सायंकाळपावेतों एथें आपल्या भेटीला यावयाचे आहेत. मग त्यांचा कसा काय समाचार घ्यावयाचा तो आपण घ्यालच. आपण ऐन वेळीं फसूं नये यास्तव आपणाला आगाऊ सूचना देण्यासाठीं मी तांतडीनें अगोदर इकडे आलों."

"ठीक आहे. पण राजकन्येची पुढें काय गत झाली तें आम्हांला नाहीं कळलें !"

"सटवोजीनें राजकन्येला पकडून आपल्या ताब्यांत घेतलें असून तो तिला आज अगर उद्यां प्रथम उज्जयनींत माझ्या वाड्यांत घेऊन येईल, व मग मी तिला योग्य ठिकाणीं पाठवून देईन. प्रथम थेट उज्जयनीला जाण्याचा त्याचा विचार होता; पण मार्गांत त्याची व माझी गांठ पडली व मीं त्याला असें

सुचविलें. मात्र आधींच एक गोष्ट सांगून ठेवतों, माझा असें सुचविण्यांत एक हेतु आहे."

"तो कोणता?"

भवानीरामाशीं ओंकारेश्वर येथें गोमती-संगमावर झालेली बाचाबाची निवेदन करून कालिदास आंतल्या आंत धुमसत म्हणाला, "राजकन्येला कैद केल्याचें यश एकट्यानें लुबाडण्याचा भवानीरामाचा बेत होता; त्याला खो देण्यासाठीं मीं हा डाव टाकला आहे. बाकी, भागाबाईला तर मींच मोहिनीमंत्र घालून गुंगवून आणली आहे; तेवढें यशदेखील माझी शहाजाद्यापाशीं व अनुराधसिंगजी-पाशीं प्रतिष्ठा वाढविण्याला पुरेसें आहे. त्यांत आणखी हा भर!"

"बरें; भागाबाई सध्यां कुठें आहे?"

"तिच्या इच्छेप्रमाणें तिला सध्यां भैरवगडावर राहतां येईल अशी व्यवस्था मीं केली आहे. कारण असें कीं, तूर्त चंद्रशेखर उज्जयनीला असणार. त्याच्या मनांतून जर भागाबाईला शहाजाद्याच्या जनानखान्यांत पाठवावयाचें नसलें, तर उगाच बापलेकींचा बेबनाव होण्याला संधि कां द्या! त्यांचा डोळा चुकवून शहाजाद्यालाच साधल्यास आज किंवा उद्यां रात्रौ भैरवगडावर नेऊं व तिथें भागाबाईशीं त्याची भेट करवून देऊं, की बिनबोभाट काम झालें." कालिदास जरा डोकें खाजवून कांहींतरी आठवल्यासारखें करून म्हणाला, "हां! खरेंच, महत्त्वाची गोष्ट सांगावयाची तशीच राहून गेली! मांडवगड शत्रूच्या हातांतून आमच्या हातीं ही महत्त्वाची बातमी आपणाला सांगण्याला मीं विसरलोंच! भवानीरामानें तो डाव साधला. अजमेरीसिंग व शिवसिंग हे भरपूर सैन्य घेऊन मांडवगडाच्या आजूबाजूचा भाग निजामाच्या अंमलांत आणण्यासाठीं तिकडे निघून गेलेच होते; व शहाजाद्याकडून मंडलोईना करण्यांत आलेला निर्वाणीचा हुकूम भवानीरामाच्याच हातीं होता. त्यानें युक्तिप्रयुक्तीनें निहालकर्ण व अनुपसिंग यांना गडाबाहेर काढून गडाच्या पायथ्याशीं असलेल्या सुरगेश्वराच्या मंदिरांत नेऊन तेथें त्यांना कैद केलें. आणि मग अजमेरीसिंग व शिवसिंग यांना खबर देऊन मांडवगड पाडाव केला. मंडलोई व चंद्रशेखर चौधरी यांची अशी गत झाल्यावर त्यांच्या छायेखालीं असणाऱ्या सुलतानपूरच्या खासेराव जाधवांचाही मोड झाला व तो एकदम निजामाच्या पक्षाला जाऊन मिळाला, हें नव्यानें सांगावयाला हवें असें नाहीं. खासेरावावर हें संकट कोसळलें नसतें; पण त्यानें

प्रथम आपली मुलगी रावरंभा निंबाळकरांच्या घराण्यांत देण्याचें ठरविलें होतें, तो बेत मागाहून राजकन्या गजराबाई हिच्या संगतीला लागून बदलला व पिलाजी जाधवाच्या मुलाला ती देऊं केली. त्यामुळें निंबाळकर चिडले, व त्यांनीं तिकडे दगल माजविली."

"तात्पर्य काय, कीं कुठेंही पहा, कनक आणि कान्ता—त्यांतल्या त्यांत विशेषतः कान्ता हेंच बखेड्यांचें मूळ!" बाजीराव हळहळत म्हणाले. क्रमाक्रमानें या दुर्वार्ता ऐकून त्यांची कंबर खचल्यासारखी झाली. पण आपण आतां दाभाड्यांची भूमिका घेतली आहे हें लक्ष्यांत घेऊन त्यांनीं आतांचे आपले शब्द सुधारून देण्यासाठीं म्हटलें, "बाकी, हे सारे प्रकार आपल्या फायद्याचेच होत आहेत. पेशव्यां-ची चोहींकडे जितकी फजिती होईल व त्यांच्या पक्षाची घडी जितकी जास्त विस्कळेल, तितकी आम्हांला हवीच आहे. बरें, आतां तुम्ही कुठें जाणार?"

"आतां मी प्रथम उज्जयनीला जाणार. तिथें जाऊन प्रथम शहाजादा व भागाबाई यांची भैरवगडावर भेट होईल अशी तजवीज करणार." तो सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांच्याकडे वळून म्हणाला, "आणि तुम्हां दोघांविषयींही मी अनुराधसिंगापाशीं शक्य तेवढी रदबदली करीन व तुमचें पुढील जीवित सुखांत जाईल अशी तजवीज करीन. त्याला तुमची कांहीं हरकत नाहीं ना?"

कालिदासाच्या या प्रश्नानें सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांचें अंतःकरण डिवचल्या-सारखें झालें. कालिदासाच्या प्रश्नाला आवेशपूर्ण असें एखादें उणेंदुणें उत्तर देण्यासाठीं त्या दोघांचेही ओंठ स्फुरण पावूं लागले तेव्हां बाजिरावांचें तिकडे पूर्ण लक्ष होतें. त्या दोघांनाही उत्तर देण्याला अवसर मिळूं नये अशा इरादानें बाजीराव उतावळे-पणानें स्वतःच उत्तरले, "तुम्ही जरूर तशी तजवीज करा. त्यांची कांहींच हरकत नाहीं. आणि हें पहा, शक्य तर असेंही करा—एकवार अनुराधसिंगाची व या दोघांची आमच्या देखत प्रत्यक्ष भेट झालेली बरी. म्हणजे उभयपक्षांची एकदांची कायमची दिलजमाई करून देतां येईल. खरें ना?"

बाजीराव वरच्याप्रमाणें बोलतांना सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांच्या चर्यांकडे निरखून पहात होते. बाजिरावांचे डावपेंच त्या दोघांच्याही पूर्ण परिचयाचे असल्यामुळें 'मी म्हणतों त्याला मुकाट्यानें मान तुकवा' असा बाजिरावांच्या नेत्रकटाक्षांतील गूढार्थ त्या दोघांनाही तेव्हांच कळला. बाजिरावांच्या

प्रश्नाला त्या दोघांनींही एकदम एकाच सुरांत उत्तर दिलें, "होय. अगदीं खरें. श्रीमंत काय करतील त्याच्या बाहेर रेंसभरदेखील आम्ही जाणार नाहीं."

'श्रीमंत' हा शब्द कानीं पडतांच बाजिरावांची चर्या किंचित् गोरीमोरी झाली. कालिदासाला त्यावरून आपणाविषयीं संशय येईल कीं काय, अशा भयाचें तें द्योतक होतें. पण सुदैवानें तसें कांहींच झालें नाहीं. तें कालिदासाच्या लक्षांत देखील आलें नाहीं. त्यानें त्या त्रिवर्गाच्या मताला खुल्या दिलानें मान्यता देण्यासाठीं मान तुकावीत विचारलें, "कबूल! अगदीं सोळा आणे कबूल! मग अनुराधसिंगजींनीं कधीं व कुठें आपणां मंडळीला येऊन भेटावें?"

बाजीराव उत्तरले, "त्यांनीं येऊन भेटावयाला नको. आम्हीच त्यांना एक दोन दिवसांत येऊन भेटूं. भेटण्यापूर्वी त्यांना कळवूं. तुम्ही त्यांना सांगून ठेवा म्हणजे झालें."

याप्रमाणें संभाषण होऊन नंतर कालिदास लगेच उज्जयनीकडे जावयाला निघाला. जातां जातां त्यानें बाजिरावांना विचारलें, "बरें; आतां तुमची आमची भेट पुन्हा केव्हां?"

"भेटीला हो काय तोटा! उज्जयनीला नरेंद्रमंडळाची बैठक व्हावयाची आहे ती एकदांची होंऊ दे;–उत्पन्न झालेल्या लढ्याचा शेवट सर्वांच्या मनाजोगा झाला, तर सर्वच भानगडी मिटल्या. मग आजच आम्हांला पेशव्यांशीं उघड उघड दावेदारी मांडावयाला नको. पण लढा न मिटतां पेटलाच तर आम्ही त्यांचे दांत त्यांच्या घशांत घालावयाला तयार आहोंच. मात्र तुम्हांला वारंवार सांगावयाचें तें हें कीं, आमच्या आगमनाची बातमी आजच जाहीर करूं नका. उज्जयनीला नरेंद्रमंडळांत काय काय वाटाघाटी चालल्या आहेत वगैरे सर्व गोष्टी आम्हांला तुमच्याकडून लौकर कळल्या तर फार बरें होईल."

"त्या सर्व गोष्टी तुम्हांला कळतील. त्याविषयीं चिंता करण्याचें कारण नाहीं. मी मुळीं असें करतों, आज रात्रौ मी स्वतःच सर्व चौकशी करून येतों व तुम्हांला भेटतों. समक्ष भेटींत सर्व गोष्टींचा निर्णय होईलच. आज नाहींच जमलें तर उद्यां तुमचा मुक्काम इथेंच आहे ना?"

"होय, आणि वेळीं मुक्काम इथें नसला,–कारण दरम्यान् पेशव्यांनीं एखाद्या महत्त्वाच्या कामगिरीवर आमची योजना केली तर सेवाधर्मानुसार आम्हांला तिकडे जावें लागेल. पण आम्ही एवढी व्यवस्था मात्र करूं,–तुमच्याकडून बातमी

एथें आमच्या मुक्कामावर पोंचली, रे पोंचली, कीं आम्ही कोठेंही असलों तरी आमच्याकडे रवाना होईल."

" पण इतक्या सर्व खटपटींचा मोबदला मिळविण्यासाठीं मी एक गोष्ट मात्र करणार, व तिला तुमचा अडथळा असणार नाहीं अशी मला आशा आहे. " दाभाडे सेनापतींना पेशव्यांच्या पक्षांतून फोडून निजामाशीं त्यांचें सख्य करून दिल्याचें श्रेय मी माझ्या एकट्याच्या मालकीचें समजणार. काय समजलां ! तुमची याला कांहीं हरकत नाहीं ना ! "

" आमची मुळींच हरकत नाहीं. तुम्ही खुशाल तसें समजा." कालिदास चांगलाच रंगांत आलेला पाहून बाजीराव त्याला हळूच म्हणाले, " आणखी हें 'पहा तुमची इच्छा असेल तर आम्ही तुमच्या राजकारणधुरंधरतेच्या कीर्तींत नवी अलौकिक भर पडेल असा आणखी एक रामबाण उपाय तुम्हांला सुचवा-वयाला तयार आहों."

" तर मग तो जरूर सुचवा." कालिदास अगदीं अधीर होऊन म्हणाला, " प्रथम तो उपाय सुचवा. मी तो जरूर अमलांत आणीन."

" बालकर्ण सध्यां भैरवगडावर कैदेंत आहे ना ? "

" होय; आहे खरा."

" तो जर निजामाच्या पक्षाला सामील झाला, तर कसें होईल ? "

" वा: ! मग तर सोन्यापेक्षां पिवळें होईल. पण बालकर्ण त्याला तयार होईल असें मला वाटत नाहीं."

" तुम्हांला काय त्याचें ? तो तयार झाला म्हणजे झालें ना ? त्याला उपाय असा आहे कीं, आम्हांला जर एकदां बालकर्णाची भेट घेण्याची व कांहीं काळ त्याच्या सान्निध्यांत रहाण्याची मोकळीक मिळाली तर आम्ही खात्रीपूर्वक त्याला आमच्या बाजूला वश करून घेऊं. आमचा शब्द तो पाळील अशी आम्हांला पूर्ण खात्री आहे. तुम्ही हा एक उपाय म्हणून अनुराधसिंगजींना व पाहिजे तर निजामाला देखील सुचवा व जमलें तर पहा. एक बालकर्ण वश झाला कीं सारे मंडलोई वश झाले असें समजा. असें झाल्यानें निजामाचें, तुमचें व आमचें सर्वांचें काम होईल. पेशव्यांचा पक्ष त्यामुळें चांगलाच कमजोर झालेला पाहून व मंडलोईसारख्या बलाढ्य घराण्यांत हात शिरकवण्याला मिळाला म्हणून

निजामाला आनंद वाटेल; पेशव्यांचा पराजय झालेला पाहून आम्हांला समाधान वाटेल; व तुमची सर्वत्र राजकार्यकौशल्याबद्दल परमावधीची ख्याति होईल.”

“ तुमची ही योजना मला पटते.” कालिदास जरा डोकें खाजवून विचार करून म्हणाला, “ मी म्हणतों, हें काम करण्यासाठीं अनुराधसिंगांच्या अनुमतीस्तव आपणांला अडून बसण्याचें मुळींच कारण नाहीं. तुम्ही सांगाल त्या दिवशीं व सांगाल त्या वेळीं मी तुमची वालकर्णाशीं भेट घडवून आणूं शकेन. तुमच्या प्रयत्नांना देवदयेनें यश आलेंच तर—”

“ यश आलेंच तर असें काय म्हणतां ! यश येणारच; नक्की यश येणार. आमचा स्वभावच असा आहे कीं, गोष्ट हमखास आमच्या हातून तडीला जाणारी नसेल, तिच्याविषयींची जबाबदारी आम्ही कधींच आपल्या शिरावर घेणार नाहीं. असें पहा, आम्ही तुमच्या आमच्या पहिल्या भेटींतच मंडलोईंना वश करण्याची जबाबदारी कां शिरावर घेतली नाहीं व आतांच कां घेतली !”

“ कां घेतली ! ”

“ कविराज ! व्यवहारशास्त्राचा असा एक नियम आहे कीं, विंचवाशीं खेळावयाचें झालें तर त्याची नांगी तोडून मग खेळावें. मंडलोई हे विंचू खरे; पण तुम्हीं आतां सांगितलें त्यावरून त्यांची नांगी तुटलेली आहे. हातचा मांडवगड गेल्यामुळें आतां ते परावलंबी झाले आहेत. आपलें गतवैभव पुन्हा आपणाला मिळावें अशी त्यांची इच्छा असणारच; आणि त्यांनीं निजामाचीही सत्ता मान्य केल्यावर त्यांची दौलत त्यांच्याकडेच ठेवण्याला निजामाची कांहींच हरकत नसावी—”

“ नसावी काय ! नाहींच.”

“ झालें तर. तसेंच हें तडजोडीचें घोडें येऊन जाऊन एका ठिकाणीं अडलें असतें. भागाबाई जर शहाजाद्याला वश झाली नसती, तर जरा कठीण प्रसंग प्राप्त झाला असता. पण तो प्रसंग तुम्हीं पूर्वीच निवारण केला आहे.”

“ हो ! तें काम मीं सोळा आणे सोडून सत्रा आणे केलें आहे. त्याविषयीं तुम्हाला मुळींच शंका बाळगावयाला नको.”

“ सांगण्याचें तात्पर्य काय कीं, आम्हांला संधि मिळाल्यास मंडलोईंचें मस्तक निजामासमोर नमलें जाईल अशी तजवीज करण्याची जबाबदारी आम्ही खखुषीनें

आमच्या शिरावर घेतों. आतां तुम्हीं सांगितलें त्याप्रमाणें पिलाजी जाधव व राव तेजकर्ण आमच्याकडे यावयाचेच आहेत."

"अहो ! जरा सावधगिरीनें बोला !" कालिदास भुवया चढवीत व किंचित् मान डोलवीत मारे दूरदर्शीपणाचा आव आणून म्हणाला, "ते दोघे तुमच्याकडे येणार नसून पेशव्यांकडे यावयाचे आहेत."

"हो ! हो ! आम्हांला माहीत आहे. पण ते कोणाकडेही आले तरी आमच्याकडेच येणार. आम्ही दाभाडे व पेशवे मनांतून एकमेकांचे कितीही वैरी असलों तरी जनांत दिसावयाला एकच आहोंत, व जाधव मंडलोई हेही आमच्यांतलेच. ते म्हणजे आमच्या शब्दाबाहेर जातील असेंच केवळ नाहीं. त्यांनादेखील आम्ही शक्य तों आमच्या बाजूला ओढून घेऊं"

"वा: ! मग तर फारच छान ! तें यशही मग माझ्याच वांटणीला येणार. कारण तुमची व त्यांची भेट होणार माझ्या खटपटीमुळेंच !" या वेळीं कालिदासचा चेहरा मृच्छकटिकांतील शकारासारखा झाला.

बाजिरावांनीं त्याच्या मूर्खोक्तीला मान तुकावली हें सांगावयाला नकोच.

कालिदास तसाच थोडा वेळ मद्याच्या निशेंत गुंग झालेल्या मद्यप्याप्रमाणें स्वत:शीं विचार करीत स्तब्ध बसला होता. बाजिरावांनीं अंमळशानें त्याला विचारलें, "कविराज ! इतका गूढ विचार कसला चालला आहे ?"

"गूढ विचार चालला आहे. महाशय ! मी केवढा मोठा राजकारणधुरंधर पुरुष आहें याबद्दल आपणां सर्वांची खात्री झालीच आहे ! खरें ना ?"

"नाहीं. अजून पुरी खात्री झाली नाहीं. आतां बोलून सारलेल्या साऱ्या गोष्टी जेव्हां आपल्या कृतीनें सिद्ध करून दाखवाल, तेव्हांच खात्री होईल." बाजीराव म्हणाले.

"त्या सर्व गोष्टी यथावत् कृतीनें पार पडतील. तुम्हांला या कालिदासाच्या सामर्थ्याची परीक्षाच पहावयाची असेल तर मी अनुराधसिंग, निजाम किंवा दुसरा कोणीही यांची परवानगी न घेतांही तुम्हांला भैरवगडावर नेऊन सोडीन !"

"मग कांहीं हरकत नाहीं."

"मग मी असें विचारतों कीं, तुम्हांला जयसिंगजींच्या पदरचा रत्नाकर कवि माहीत असेलच. त्याच्यापेक्षां माझी योग्यता सर्व प्रकारें कितीतरी पटीनें थोर आहे असें तुम्ही उघडपणें बोलूं शकणार नाहीं का ?"

" जरूर बोलूं शकूं."

" बस्स ! तेवढेंच मला पाहिजे आहे. माझा नांवलौकिक ऐकून त्या रत्न्यानें एकवार लाजेनें खालीं मान घातली, कीं मी धन्य झालों." एवढें बोलून कालिदास आपोआप थबकला. त्याला मनांतल्या मनांत स्वतःच्या अवास्तव वाचाळते-बद्दल लाज वाटली कीं काय न कळे ! त्यानें एकाएकीं तो विषय बदलून पूर्वींच्याच विषयावर बोलण्याची सुरवात केली. पण बाजिरावांनीं त्या संधीचाही उज्जयनींतील राजमंडळामध्यें चालणाऱ्या नानाविध खलबतांविषयीं शक्य तेवढी अंतरंगांतील बातमी काढून घेण्याच्या कामीं उपयोग करून घेतला. चांगल्या दोन प्रहर पावेतों त्यांच्या विविध विषयांवर गप्पागोष्टी चालल्या होत्या. त्या दिवशीं दोन प्रहरीं बाजिरावांनीं कालिदासाला आणखी प्रसन्न करण्यासाठीं थाटाची मेजवानीही दिली. नंतर कबूल केल्याप्रमाणें सर्व व्यवस्था सूर्योदयापूर्वी करण्याचें पुन्हा एकवार कबूल करून व सज्जनसिंग हे आपले धाकटे धनी आहेत हें स्मरून त्यांचाही नम्रतापूर्वक निरोप घेऊन कालिदास उज्जयनीला निघून गेला. बाजीराव इतके चतुर व प्रसंगावधानी कीं त्यांनीं अनुराधसिंग, निजाम व शहाजादा यांना देण्यासाठीं उत्तमोत्तम नजराणेही कालिदासाबरोबर देण्याला कमी केलें नाहीं ! अर्थात् ते नजराणे दाभाड्यांकडून पूर्वोक्त मंडळींला पोंचते होत होते, व त्यांमुळें भलेपणा दाभाड्यांना मिळावयाचा होता !

## प्रकरण चोविसावें

# शशिमोहन

"श्रीमंत ! आपले हे कविराज मूर्ख आहेत म्हणून समजायचें, कीं शहाणे म्हणून ?" कालिदासाला चार पावलें पोंचवून सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांच्यासह बाजीराव गणेशालयांतून देवदर्शन करून नंतर क्षिप्रेच्या घाटावर विश्रांतीसाठीं बसले, तेव्हां गोष्टीवरून गोष्ट निघाली असतां इंद्रकुमारीनें विचारलें.

बाजीराव हास्यवदनपूर्वक उत्तरले, "असें पहा, तो मूर्ख असला तरी ज्या अर्थी त्याचा मूर्खपणा आपणाला हितकर आहे, त्या अर्थी आपण त्याला मानलें पाहिजे."

"तो बोलल्याप्रमाणें साऱ्या गोष्टी करील असें आपणांला वाटतें का ?"

"हो ! यांत काय संशय ?" बाजीराव सज्जनसिंगाकडे वळून म्हणाले, "आम्हांला वाटतें, या बाबतींत सज्जनसिंगजींचें मत विशेष ग्राह्य धरतां येईल. कारण कालिदास हा त्यांचा दरबारी कवि आहे."

सज्जनसिंग म्हणाला, "जसा दरबार तसे दरबारांतील कवि ! कावळा दरबारचा धनी झाला कीं त्याचे सारे दरबारी मानकरी कावळेच असावयाचे, व त्यांच्या आवडीच्या वस्तु तेवढ्याच दरबारांत यावयाच्या."

इंद्रकुमारी म्हणाली, "बाकी मी आजवर अनुराधसिंगजींची व कालिदासची जी कीर्ति ऐकत आलें, त्यावरून असल्या राजाला असले स्तुतिपाठकच रुचायचे. स्मशानांत भुतांचेंच वास्तव्य असायचें." इंद्रकुमारी बाजिरावांकडे पहात म्हणाली, "बरें; श्रीमंत ! आपण मला माझ्या सासरीं पुन्हा पाठविण्याच्या व सज्जनसिंगजींनाही अनुराधसिंगाकडून गतवैभव मिळवून देण्याच्या कालिदासाच्या योजनेला मान्यता दिली, त्या मान्यतेचा अर्थ काय ?"

"त्या मान्यतेचा अर्थ तोच—आमच्या मताप्रमाणें आधीं सहसा तसा प्रसंगच कधीं येणार नाहीं.—"

"नाहीं–नाहीं. तसा प्रसंग जरूर येईल." सज्जनसिंग गंभीरपणानें म्हणाला, "मी जर आमच्या बंधुराजांच्या तंत्राप्रमाणें वागावयाचें ठरवून मायदेशाशीं बेइमान ठरलों, तर माझें गतवैभव पुन्हा परत मिळविण्याच्या कामीं मला मुळींच

आयास पडणार नाहींत. पण असें मेलेल्या मढ्याच्या ताळूवरचें लोणी खाण्याला मी निर्ढावलेला नाहीं. आग लागो त्या वैभवाला !—"

" पण सज्जनसिंग ! तुम्ही माझें ऐकून तर घ्याल ! तुमच्या जाज्वल्य स्वदेशाभिमानविषयीं आमची खात्री नाहीं अशी का तुमची समजूत आहे ?"

" तशीच आपली समजूत आहे. तसें नसतें तर मीं भिक्षेकऱ्याप्रमाणें माझ्या बंधूंच्या घरीं जाऊन याचना करावी असें आपण कधींच म्हटलें नसतें." बोलतां बोलतां सज्जनसिंगाचा स्वर गंभीरतेच्या पहिल्या सप्तकांतून संतप्ततेच्या दुसऱ्या सप्तकांत समाविष्ट होऊं लागला.

पण बाजीराव जरादेखील न डगमगतां उलट जास्त शांतपणानें म्हणाले, " सज्जनसिंगजी ! पुराणांतरींची परिक्षिति राजाची गोष्ट तुम्हांला माहीत आहे ना ? सूडाच्या भावनेनें प्रवृत्त झालेल्या तक्षकानें बोरांतील आळी बनून इष्ट स्थल कसें गांठलें ? यावरून तुम्हांला काय बोध घेतां येतो बरें ?"

" पण अशी एखादी महत्त्वाची कामगिरी आपण माझ्या माथीं मारणार आहां का ?"

" अर्थात ! उगीच बोलत नाहीं."

" आणि माझ्यादेखील ?" इंद्रकुमारीनें प्रश्न केला.

" आपल्यादेखील." बाजीराव उत्तरले.

" तर मग आमची त्याला ना नाहीं. ध्येयप्राप्तीसाठीं आपण आम्हांला जें जें करावयाला सांगाल तें तें करण्याला आमची पूर्ण तयारी आहे." सज्जनसिंग पुन्हा पहिल्या सप्तकांत आपला स्वर उतरवून म्हणाला.

" असें पहा,—" बाजीराव पुढें म्हणाले, " एथवर हातीं आलेल्या माहितीवरून तरी या मोहिमेचीं लक्षणें ठीक दिसत नाहींत. एकेक दिवस—नव्हे एकेक घटका उजाडत आहे ती नव्या नव्या आपत्तींना बरोबर घेऊन येत आहे. मंडलोईंचा आधार आतां तुटल्यांतच जमा. वनवासीवर आमचा एवढा भरंवसा, तो तर दगलबाज ठरू पहात आहे. चंद्रशेखरही ऐन वेळीं दगा देणार अशीं चिन्हें स्पष्ट दिसत आहेत. राजकन्येविषयीं काय भानगड झाली आहे त्याचाही नीटसा तपास अजून लागत नाहीं."

" पण राजकन्येला कैद करणारा सटवोजी आपला विश्वासू माणूस आहे ना ?" सज्जनसिंगानें प्रश्न केला.

" होय. पण विश्वासाची दुनिया आतां उरली नाहीं.कशाचाच कशाला मेळ बसत नाहींसें झालें आहे. अशा परिस्थितींत कांहीं साधलें तर गनिमी काव्यानेंच साधेल; एरव्हीं शक्य नाहीं. आम्हांला तर आतां असें वाटूं लागलें आहे कीं, शहाजाद्यानें अनायासें नरेंद्रमंडळाच्या बैठकीसाठीं उज्जयनीला बोलावलेंच आहे, तिकडे जावें व चोराची लंगोटी जी काय हातीं लागेल ती घेऊन तूर्त झांकली मूठ सव्वा-लाखाचीच ठेवावी. पुन्हा कालांतरानें चांगली तयारी करून मग दिल्लीला खासा शह द्यावा."

पण बोलतां बोलतां बाजिरावांचा उजवा डोळा लवूं लागला. असल्या शुभाशुभ लक्षणांवर त्यांचा थोडाफार विश्वास होता. तेवढ्यांत आकाशांत सायंसूर्य जो सकाळपासून कुंद हवेमुळें मेघावडंबराखालीं झांकून गेला होता, तो मेघावडंबर दूर झाल्यामुळें पूर्ण तेजाळतेनें प्रकाशूं लागला. त्या मोकळ्या हवेचा जितका सुपरिणाम मंडळीच्या मनावर झाला. तितकाच त्या शुभचिन्हांचाही झाला. निराशेच्या अंधारांत आशेची विद्युल्लता चमकूं लागली. ठिकठिकाणीं रवाना झालेले बाजिरावांचे हेर माघारे येऊन एकीपेक्षां एक उत्तेजक अशा बातम्या बाजिरावांना कळवूं लागले. एका बातमीदारानें बातमी आणली, " सध्यां अज्ञातवासांत असलेला बुधसिंग सातपुड्याच्या दरी-खोऱ्यांतून भिल्लारी डोंगरी लोकांचें प्रचंड सैन्य जमवून एक दोन दिवसांतच उज्जयनीवर छापा घालण्याच्या विचारांत आहे; आणि बरींच वर्षें बेपत्ता असलेला, जो शत्रुशासनाला बळी पडला असावा अशी सर्वांची ठाम कल्पना आहे, तो विक्रमसिंह आपल्या अनुयायांसह बुधसिंगाच्या पाठपुरावा करण्याला तयार आहे."

दुसऱ्या बातमीदारानें तर बुधसिंगाचें पत्र आणून बाजिरावांना दिलें. त्या पत्रांत त्यानें बाजिरावांना स्पष्टपणें कळविलें होतें:—

" मायदेशाचें मंगल होण्याचा समय अगदीं जवळ येऊन ठेपला आहे असें दिसतें. कारण माझ्या युद्धसिद्धतेच्या तयारीला दिवसेंदिवस चांगलेंच यश येत आहे. विशेष आनंदाची गोष्ट ही कीं, शत्रूनें माझा पराजय करून मला गिरिकंदरांत पळ काढावयाला लावलें तरीदेखील माझी रयत माझ्याशीं बेइमान झाली नाहीं. माझ्या रयतेनें निजामाची सत्ता मान्य करण्याचें साफ नाकारलें;इतकेंच नव्हे तर मी सांगेन तेव्हां सांगेन त्या ठिकाणीं शत्रूशीं झगडण्यासाठीं रणांगणावर येण्याला माझी आबालवृद्ध रयत एका

पायावर तयार आहे. उज्जयनीला एकदोन दिवसांत नरेंद्रमंडळाची बैठक भरावयाची आहे,व आपणाला त्या बैठकीसाठीं शहाजाद्याचें आमंत्रण असून आपण तेथें जाणार आहां,आपणाशीं प्रस्तुतचा लढा मिटविण्याच्या बाबतींत वाटाघाटही व्हावयाची आहे, असें मी ऐकतों. त्या वाटाघाटींतून कांहींच तथ्य निर्माण होणार नाहीं अशी माझी खात्री असल्यानें मीं शत्रुपक्षाचे सारे म्होरके एकत्र जमले आहेत अशी संधि साधून उज्जयनीचें रणक्षेत्र बनविण्याचें ठरविलें आहे. आपलाही तडजोडीवर विश्वास असेल असें मला वाटत नाहीं. यास्तव आपणही आपल्याकडून प्रसंगोपात्त फलदायी होणारी तयारी ठेवालच."

  

तिसरा एक तरुण जो बाजिरावांना बातमी देण्यासाठीं म्हणून आला होता, तो मात्र पहिल्या दोन बातमीदारांहून अगदीं निराळा होता. त्याचा पेहरावही त्या देशच्या एखाद्या सामान्य माणसाला साजेसा होता, व त्याच्या चर्येंत एक प्रकारचें निराळेंच पाणी खेळत होतें. बाजिरावांनीं त्याच्याकडे वळून पाहिलें तो अगदीं निश्चलपणें किंचित् बाजूला उभा होता. त्याच्याकडे पाहून तेथल्या इतर माणसांना साहजिकच प्रश्न पडला कीं, हा कोण असावा ? बाजिरावांना त्या दोन हेरांशीं काय बोलावयाचें तें बोलून होतांच ते त्या तरुणाकडे वळले. त्यांना देखील त्या तरुणाची ओळख नव्हती; म्हणूनच त्यांनीं त्याला जरा कड्या स्वरांत विचारलें, " तूं कोण ? "

बाजिरावांच्या या प्रश्नांत पुष्कळच गूढार्थ सांठलेला होता. त्यांनीं आपणाला एकांतीं विचारविनिमय करण्याला अवसर सांपडावा म्हणून मुद्दाम क्षिप्रेच्या घाटावर बैठक दिली होती; तेथें कोणालाही परवानगीशिवाय प्रवेश मिळणें शक्य नव्हतें. आतां बातमीदार तेथें आले खरें; ती त्यांची गोष्ट अगदीं निराळी होती. बाजीराव तेव्हां ज्या परिस्थितींत होते ती परिस्थिति क्षणाक्षणाला नवीं नवीं रूपें धारण करीत असल्याकारणानें व जसा प्रसंग प्राप्त होईल तसें त्याला तोंड किंवा पाठ देण्याची जबाबदारी बाजिरावांवर ओघानेंच येऊन पडल्याकारणानें त्यांनीं आपल्या बातमीदारांवर त्या जबाबदारीचा बराच मोठा बोजा टाकलेला होता. बातमीदार ज्या बातम्या आणणार त्या बातम्यांवर बाजिरावांची सारी मदार असावयाची; यामुळें बाजीराव कोठेंही, कसल्याही महत्त्वाच्या कामांत गुंतलेले

असले तरी बातमीदाराला त्यांच्यासाठीं कधींच तिष्ठत बसावें लागत नसे. इतकी व्यवस्था असल्यामुळेंच आज त्या बातमीदारांना बाजीराव पेशव्यांच्या क्षिप्रा घाटावरील खासगी बैठकीच्या जागींही अविलंबानें प्रवेश मिळाला. पण ही सवलत फक्त बातमीदारांपुरती झाली, व तीही त्यांच्या खास बातमीदारांपुरती. अन्य कोणाला बाजिरावांची भेट घ्यावयाची झाली, तर ती घेण्यासाठीं बरेच कष्ट पडत. बाजिरावांची आगाऊ परवानगी तरी असावी लागे किंवा भेट घेऊं इच्छिणारा मनुष्य पूर्ण परिचित तरी असावा लागे. परंतु तो तिसरा तरुण तेथील कोणाच्या पूर्ण परिचयाचाही नव्हता व त्यानें आगाऊ परवानगी घेतल्याचेंही बाजिरावांना स्मरेना. त्यामुळें बाजिरावांनीं त्या तरुणाला एकदम संशयग्रस्त होऊन 'तूं कोण' असा प्रश्न केला.

पण आश्चर्याची व तितकीच कौतुकाची गोष्ट ही कीं, तो तरुण जरादेखील डगमगला नाहीं किंवा आपल्या जाग्यावरून रेंसभरदेखील ढळला नाहीं. त्यानें धीरगंभीर वृत्तीनें आपल्या उत्तरीयाखालीं हात घालून एक कसली तरी वस्तु काढून बाजिरावांना दाखविली, व त्याबरोबर पर्जन्यवृष्टीनें अग्नि शांत व्हावा त्याप्रमाणें बाजिरावांचा राग शांत झाला.

" एकूण तूं देवदूत आहेस ! " बाजिराव त्या तरुणाला म्हणाले. त्यांनीं जी वस्तु पाहून त्या देवदूताला ओळखलें ती वस्तु म्हणजे स्वस्तिकचिन्ह होतें, हें वाचकांनीं ओळखलें असेलच. देवदूत असला कीं त्याला बाजिरावांना भेटण्याच्या बाबतींत बातमीदारांइतकीच मोकळीक होती; म्हणूनच त्या देवदूताला इतक्या लौकर बाजिरावांची भेट घेणें शक्य झालें, हें नव्यानें सांगावयाला नकोच.

देवदूतानें बाजिरावांच्या उद्गारांना अनुलक्षून मान किंचित् डोलविली व दोन्ही हात जोडून त्यांना अभिवादन केलें.

" तुझें नांव काय बरें ! " बाजिरावांनीं प्रश्न केला.

तो देवदूत तेथें आल्यापासून सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांच्या तोंडांकडे टक लावून पहात होता. त्याला त्या दोघांच्या ठायीं एवढें काय वैशिष्टय आढळून आलें न कळे; पण तो त्या दोघांकडे पहाण्यांत इतकें आत्मभान विसरून गेला होता कीं बाजिरावांनीं त्याला नांव विचारलें तें त्याला प्रथम ऐकूं गेलें नाहीं.

" तूं बहिरा आहेस कीं काय ! " बाजिरावांनीं पुन्हा अंमळ मोठ्यानें प्रश्न केला.

तो प्रश्न ऐकून मात्र तो देवदूत दचकून भानावर आला व हात जोडून विचारूं लागला, " आपण काय विचारलें तिकडे माझें लक्ष्य नव्हतें."

" तुझें नांव काय ? " बाजिरावांनीं पुन्हा प्रश्न केला.

" माझें नांव शशिमोहन."

मल्हारराव यांच्यांना देवदूतसंघाच्या भूमिगत गुप्त निवासस्थानापासून पाताळ कुंडापर्यंत मार्ग दाखविणारा देवदूत शशिमोहनच होता, हें वाचकांना आठवत असेलच. तें कांहीं बाजीराव, सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांना माहीत नव्हतें. पण काय असेल तें असो, इंद्रकुमारी 'शशिमोहन' हें नांव कानीं पडतांच कावरी-बावरी होऊन बुभुक्षित दृष्टीनें शशिमोहनाकडे पाहूं लागली. शशिमोहन इतका वेळ तिच्याकडे पहात होता; पण आतां तिची दृष्टि आपणाकडे वळली असें पाहून तो मुद्दाम तोंड चुकवूं लागला. कदाचित् त्याचें तोंड चुकवणें कोणाच्या ध्यानीं आलें नसेल. पण इंद्रकुमारीचें पहाणें मात्र तेव्हांच त्याच्या ध्यानीं आलें.

" शशिमोहन ! तूं कोठून आलास ? " बाजिरावांनीं प्रश्न केला.

बाजिरावांच्या प्रश्नाला शशिमोहनकडून काय उत्तर मिळतें तें ऐकण्याला इंद्रकुमारीचे कर्ण अत्यंत अधीर झालेले सज्जनसिंगाला आढळले, म्हणून त्यानें तिच्याकडे प्रश्नार्थक दृष्टीनें पाहिलें. तिनें हळूच त्याला शशिमोहनाकडे अंगुलि निर्देश करून विचारलें, " तुला हें नांव आठवत का ? " यावर सज्जनसिंग डोकें खाजवून आठवूं लागला. " आठवत नाहीं ? त्याचा चेहरा तरी तुझ्या ओळखीचा दिसतो का ?" तिनें पुन्हा विचारलें. ती आणखी एखादी खुणेची गोष्ट सज्जनसिंगाला निवेदन करून त्याच्या पूर्वस्मृतिजागृतीला चालना देण्याचा प्रयत्न करणार होती म्हणून कीं काय, तिचे ओठ हलूं लागले. पण तितक्यांत शशिमोहन बाजिरावांच्या प्रश्नावर उतरला, " श्रीमंतांनीं कृपा करून जरा बाजूला एकान्तांत आल्यास मी त्यांच्याशीं दोन शब्द मोकळ्या मनानें बोलूं शकेन."

" तोच तो असावा." शशिमोहनचें उत्तर ऐकून इंद्रकुमारी स्वगत उद्गारली, " त्यानें मला ओळखलें असावें, व म्हणूनच आपली ओळख देण्याला तो इतका लाजत असावा."

" ही मंडळी कोणी परकी नाहींत. तुला येथें बोलावयाला मुळींच हरकत नाहीं." बाजीराव म्हणाले.

" तें खरें; पण माझी श्रीमंतांना पुन्हा अशी विनंति आहे कीं, त्यांनीं मला माझ्या श्रेष्ठांनीं घालून दिलेले दंडक मोडण्याला भाग पाडूं नये. श्रीमंतांना सर्व कांहीं माहीत आहे." शशिमोहन पुन्हा विनम्रपणें म्हणाला.

बाजीराव देवदूतसंघाच्या कडक शिस्तीशीं चांगलेच परिचित झालेले असल्यानें शशिमोहनानें शिस्तीचा प्रश्न काढतांच तो त्यांना रुचला. अपरिचिताच्या देखत कोणतीही गोष्ट न बोलण्याचा देवदूतसंघाचा दंडक होता, व तो बाजिरावांना माहीत होता. ते लगेच म्हणाले, " ठीक आहे. चला, आपण पलीकडील शिवालयांत जाऊं."

लगेच बाजीराव व त्यांच्या मागोमाग शशिमोहन असे दोघेही तेथून थोडया अंतरावर असलेल्या शिवालयाकडे निघून गेले. जातांना ते इंद्रकुमारी व सज्जनसिंग यांना म्हणाले, " तुम्ही दोघेंही वाडयांत जा. तोंवर आम्ही येतोंच."

इंद्रकुमारी व सज्जनसिंग वाड्यांत जावयाला निघालीं तेव्हां इंद्रकुमारी शशिमोहनच्या शिस्तीला अनुसरून सज्जनसिंगाला म्हणाली, " अहाहा ! अहाहा ! अगदीं सोन्याइतकी सोनपितळ चकाकतें आहे ! "

" कां ! काय झालें ! " सज्जनसिंगानें विचारलें.

इंद्रकुमारी उत्तरली, " वनवासीच्या देवदूतसंघांत शिस्तीचा आव तर मारे विक्रमसिंहजींच्या स्वातंत्र्यसंघाचा आणला आहे ! मी आतां जें तुला विचारीत होतें तें तेंच. तो शशिमोहन माझ्या परिचयाचा दिसतो. तो तुझ्याही परिचयाचा आहे किंवा कसें हें मी विचारीत होतें."

" तेंच मी आठवतों आहें. मला तें नांव कांहीं आठवत नाहीं; पण चेहरा मात्र कांहींसा ओळखीचा दिसतो. कुठें बरें याला मीं पाहिलें असावें ?—मला वाटतें, विक्रमसिंहजींनीं एकदां रानांतून एक पोरगा वाघाच्या जबड्यांतून ओढून आणला व तेव्हांपासून बरेंच दिवसपावेतों पोटच्या पोराप्रमाणें त्याचें लालनपालन केलें, तोच हा."

" बरोबर ! अगदीं बरोबर ! मीं त्याला प्रथमच ओळखलें; व त्यानेंही मला ओळखलें असावें. एरव्हीं तो इतका कावराबावरा झाला नसता. मला आणखी असाही संशय येतो कीं, विक्रमसिंहजींच्या स्वातंत्र्यसंघांतील कांहीं घरभेदे शत्रूला सामील झाले आहेत, त्यांपैकींच वनवासी व हा शशिमोहन हे दोघे असावे.—विक्रमसिंहजींच्या स्वातंत्र्यसंघाला समाजांत जी अपूर्व मान्यता होती, तिचा

फायदा घेण्यासाठीं या हरामखोरांनीं स्वातंत्र्यसंघाची शिस्त अक्षरशः उचलले-ली दिसते. खरोखर, असल्या देशकंटकांना जगांतून प्रथम नाहींसें केलें पाहिजे."

याप्रमाणें त्या दोघांचें संभाषण वाड्यांत जाईतों व वाड्यांत गेल्यावरही थोडा वेळ सुरूच होतें. त्याला बाजिरावांच्या आगमनानें खंड पडला.

"काय म्हणतो आपला शशिमोहन ?" सज्जनसिंगानें किंचित् सलगीच्या भाषेंत बाजिरावांना विचारलें.

बाजिरावांनीं आपल्या अंगरख्याच्या खिशांतून एक पत्र काढून सज्जनसिंगाच्या हातीं दिलें. सज्जनसिंगानें तें वाचून पाहिलें, तें वाचतां वाचतां त्याच्या चर्ये-वरील छाया एकसारख्या बदलत होत्या. असें त्या पत्रांत आहे तरी काय म्हणून बुचकळ्यांत पडलेल्या इंद्रकुमारीच्या हातीं सज्जनसिंगानें तें पत्र वाचून झाल्यावर दिलें व तिनें तें वाचून पाहिलें, तेव्हां तिच्या चर्येवरही क्षणोक्षणीं निरनिराळ्या भावना उमटतांना बाजीराव पहात होते व पहातां पहातां स्वतःशींच ते स्मितहास्य करीत होते. असें त्या पत्रांत काय होतें बरें ?

## प्रकरण पंचविसावें

# हा दूत कोण?

तें पत्र वनवासीनें बाजिरावांना लिहिलेलें होतें, व त्यांत पुढीलप्रमाणें मजकूर होता—

" इंद्रकुमारीचा तपास पुष्कळ केला, पण तो विफल ठरला. सज्जनसिंग इतक्यांत तुम्हांला येऊन मिळाले असतीलच. धर्मसिंगाचा शोध मात्र लागण्यासारखा आहे व मी त्या खटपटींत आहें. बुधसिंगजींची गांठ पडली होती. आपणांला नरेंद्रमंडळाच्या बैठकीला हजर रहाण्याविषयीं आमंत्रण आहे त्याप्रमाणेंच त्यांनाही आमंत्रण आहे. पण सुदैवाची गोष्ट ही की, त्यांचा सध्यांच्या काळीं तरी असल्या तडजोडीच्या राजकारणावर मुळींच विश्वास नाहीं. त्यांचें तर असें मत आहे कीं, कांहीं तरी दगा देण्याच्या इरायानें निजामानें शहाजाद्याला पुढें करून हा डाव रचिला असेल. यास्तव आपण या गोष्टीचा पुन्हा एकवार विचार करावा. मी प्रारंभापासूनच असल्या सौम्य–मिळमिळीत उपाययोजनेच्या विरुद्ध आहें हें आपण जाणतांच. क्रांतीचे प्रज्वलित स्फुल्लिंग पाडणें जोंवर माझ्या हातीं आहे, तोंवर त्या स्फुल्लिंगांच्या योगानें प्रतिपक्षाच्या घरादाराला आग लावून प्रतिपक्षाला भस्मसात् करून टाकण्याला मी मागें पुढें पहाणार नाहीं. सुदैवानें बुधसिंगजींचे विचारही माझ्या विचारांशीं तंतोतंत जुळतात. यास्तव आम्ही उभयतांनी एक विचारानें योग्य वेळीं उज्जयनीवर चाल करून 'मूले कुठारः' या न्यायानें शत्रूचा धुव्वा उडविण्याचें ठरविलें आहे. आपण जरी तडजोडीच्या वाटाघाटींत गुंतलेले असलां, तरी प्रसंगोपात्त समरांगणावर चालून येण्याच्या तयारीनेंच आपण तिकडे जाल अशी मला आशा आहे. माझे देवदूत मजबरोबर आहेतच; शिवाय बुधसिंगजींची सारी प्रजा अद्यापि त्यांच्याशीं पूर्ण राजनिष्ठ असून त्यांच्यासाठीं प्राण-देखील वेंचावयाला तयार आहे. अनुराधसिंगादि अनेक राजांनीं व खुद्द निजामाच्या मुलानेंही बुंदीचें राज्य गिळंकृत करण्याच्या नाना युक्त्या करून पाहिल्या; पण त्यांत त्यांना यत्किंचित् देखील यश आलें नाहीं.

बुधसिंगांचे स्वामिनिष्ठ सेनापति पूर्णपणें राजनिष्ठ असून ते बुधसिंग सांगतील त्या ठिकाणीं आपल्या सैन्यासह शत्रूवर तुटून पडण्याला तयार आहेत.

" आपणांला आणखी एक अत्यानंदाची गोष्ट सांगावयाची ती ही कीं, आपण इतके दिवस ज्या वीर पुरुषाच्या साहचर्याची चातकाप्रमाणें अपेक्षा करीत होतां, त्याची आपणाला आज रात्रौ मध्यरात्रींच्या सुमाराला तेथील गणेशालयांत भेट होईल. विक्रमसिंहजी माझे अभिन्नहृदयी मित्र आहेत. माझे गुरुही तेच; ते व मी एक! ही गोष्ट मीं आजवर आपणांपासून मुद्दाम लपवून ठेविली होती; कारण कीं, कोणाला त्यांचे क्रांतीचे मार्ग रुचतील व कोणाला रुचणार नाहींत. आणखी असें कीं, विक्रमसिंहजी इहलोक सोडून गेले असा शत्रूचा जो सार्वत्रिक समज आज कैक दिवसांचा आहे, तोच आणखी कांहीं काळ अबाधितपणें कायम रहाणें आमच्या ध्येयाच्या दृष्टीनें अवश्य आहे. माझ्याप्रमाणेंच विक्रमसिंहजींचाही ठाम ग्रह आहे कीं, मोगलांसारख्या सर्वस्वीं परक्या—भिन्न मनोवृत्तीच्या व भिन्न संस्कृतीच्या राज्यकर्त्यांशीं तडजोडीनें वागून आपणां भारतवर्षीयांचा कधींच पल्ला यावयाचा नाहीं. तरीपण आपणांसारख्या समर्थांची पूर्ण सहानुभूति मिळविल्याशिवाय क्रांतिकारकांची चळवळ सुलभतेनें यशस्वी व्हावयाची नाहीं, हें विक्रमसिंहजी ओळखतात; व म्हणूनच जशी आपणांला त्यांच्या साह्याची अपेक्षा वाटते तशीच त्यांनाही आपल्या साह्याची अपेक्षा वाटते. आपणां उभयतांच्या भेटींत कांहीं समाधानकारक मार्ग निघाला तर सोन्यापेक्षां पिंवळें झालें. तें कांहीं असलें तरी ज्या अर्थी विक्रमसिंहजी आज आपणांपुढें प्रगट होत आहेत, त्या अर्थी यापुढें वनवासीचें स्वतंत्र अस्तित्व आपणापुरतें तरी संपलें. आपणा—माझ्यांत आजवर जो विचारविनिमय घडला, तो वेळोवेळीं खडान्‌खडा विक्रमसिंहजींना कळविण्यांत आला आहे. आपल्या—माझ्यासंबंधीं त्यांना अज्ञात अशी एकही गोष्ट राहिलेली नाहीं. इतर महत्त्वाच्या गोष्टी स्वतः विक्रमसिंहजी आपणांशीं बोलतील. इति.

वनवासी."

  

पत्र वाचून होतांच इंद्रकुमारीनें बाजिरावांना विचारलें, "श्रीमंत ! आपला या पत्रावर विश्वास बसतो का ?"

"मला तर हें कांहींतरी थोतांड असावें असें अजूनही वाटतें. या पत्रांत एकलिंगजीच्या घालमेलींचा ओझरता देखील उल्लेख करण्यांत आलेला नाहीं." सज्जनसिंग म्हणाला.

"तो प्रकार वनवासीला कदाचित् कळला नसेल !" इंद्रकुमारी म्हणाली.

"कळला नसेल ! त्रिभुवन पालथें घालून नाहीं तेथल्या बातम्या काढणाऱ्या वनवासीला तो प्रकार कळला नसेल हें संभवनीय तरी आहे का !" सज्जनसिंग पुन्हा कठोर स्वरांत उद्गारला.

इंद्रकुमारीला सज्जनसिंगाचे बोल रुचावे तितके रुचले नाहींत. विक्रमसिंहाविषयींची सुवार्ता वाचून तिचा ग्रह वनवासीविषयीं बराच अनुकूल झाला होता. ती सज्जनसिंगाची समजूत पाडण्याच्या हेतूनें म्हणाली, "असें पहा सज्जन ! वनवासी एक परता विश्वास टाकण्याला अयोग्य असा माणूस असेल असें धरून चाललें, तरी विक्रमसिंह जे त्याच्या संगतीला लागले आहेत ते उगाच का ?"

"पण पत्रांतील मजकूर खरा असला तरच्या या साऱ्या गोष्टी ना ? विक्रमसिंहजी हयात असतीलच याचा तरी काय भरंवसा ? मी अभद्र बोललों म्हणून तुम्ही रागावूं नका. मला विक्रमसिंहजी जन्मदात्या पित्याच्या ठायीं पूज्य आहेत हें तुम्ही जाणतांच. त्यांना भगवान् श्रीएकलिंगजीनें उदंड आयुरारोग्य द्यावें; माझें आयुष्य त्यांच्या वांट्याला जाऊन मला अकालीं मृत्यु आला तरी हरकत नाहीं. पण आपणां क्षुद्र मंदधी मानवांच्या सर्व वासना सदैव फलद्रूप होतात असें थोडेंच आहे ?" तो बाजिरावांकडे वळून म्हणाला, "मला तर वाटतें कीं, श्रीमंतांना विक्रमसिंहजींची भेट घेण्याची फार उत्कंठा लागल्याचें वनवासीला माहीत होतें, त्या उत्कंठेचा फायदा घेऊन वनवासी श्रीमंतांना या नव्या मोहजालांत गुरफटून टाकण्याचा डाव रचीत आहे."

"मग काय; हें सारें खोटेंच ? बुधसिंगजी देखील वनवासीला सामील झाल्याचें आपण वाचलें, तें सुद्धां खोटें ?" इंद्रकुमारीनें विस्मयपूर्वक आपल्या डाव्या हाताच्या मुठीवर हनुवटी टेंकून बसल्या बसल्या विचारलें, "सज्जन ! पुरुषांचीं मनें जात्याच कठोर असतात; त्यांना नानापरींच्या अमंगळ कल्पना मनांत घोळवितां येतात."

" पण आई ! हा पुरुषांचा दुर्गुण होय असें तुम्हांला वाटतें का ! मी तर म्हणेन कीं, बायकांनींदेखील आपलीं मनें इतकीं कठोर बनविलींच पाहिजेत; एरव्हीं त्यांचा अशा आणीबाणीच्या वेळीं पल्ला यावयाचा नाहीं. तुमच्या बोलण्याचा रोंख कुठें आहे तें मीं ओळखलें."

" माझा माझ्या अढळ पातिव्रत्यावर व सच्चारित्र्यावर पूर्ण विश्वास आहे. माझ्या मनानें माझें मन इतकें निर्विकार, इतकें निर्मल व इतकें कर्तव्यजागृत आहे कीं, अनृत–अमंगळ अशी कल्पना, वासना किंवा भावना कधींही माझ्या मनाला स्पर्शून मन अमंगळ करूं शकणार नाहीं." इंद्रकुमारी आपल्या भालप्रदेशाला बोट लावून गद्गद स्वरांत उद्गारली, " माझें मन मला आतां अशी स्पष्ट ग्वाही देत आहे कीं, या ललाटींचा सौभाग्यटिळक भवितव्यतेनें अजून अभंग राखला आहे. माझी अंतरसाक्षी देवता मला प्रतिक्षणीं विश्वासपूर्वक आश्वासीत आहे कीं, 'मुली ! तूं कष्टी होऊं नकोस. तुझा सौभाग्यसूर्य मावळला नसून प्रतिकूल परिस्थितीच्या घनदाट नीलाभ्रांखालीं तो कांहीं काळ झांकला गेला आहे'. तो सूर्य मावळला म्हणून आमच्या शत्रूंनीं जयद्रथाप्रमाणें कितीही टाळ्या पिटल्या व टिर्‍या बडविल्या तरी योग्य वेळीं तो सूर्य निरभ्र आकाशांत आपल्या दिव्य तेजानें प्रकाशूं लागेलच लागेल."

इंद्रकुमारीच्या ह्या आत्मविश्वासपूर्ण बोलांनीं सज्जनसिंगाचें वनवासीच्या पत्रांतील मजकुराच्या सत्यत्वाविषयीं जरी यत्किंचितदेखील समाधान झालें नाहीं, तरी इंद्रकुमारीच्या उद्गारांतील प्रत्येक शब्द–प्रत्येक कानामात्रा वास्तवतेच्या कसोटीला उतरावी असें मात्र त्याला अंतःकरणापासून वाटत होतें; व त्यानें ती आपली शुभेच्छा उघड बोलूनही दाखविली. इंद्रकुमारीच्या स्त्रीहृदयाला तेवढ्यानेंच बरेंचसें समाधान वाटलें.

पण बाजीराव या बाबतींत कांहींच बोलत नाहींत, हें सज्जनसिंगाला अंमळ चमत्कारिक वाटलें. तो त्यांना म्हणाला, " श्रीमंत ! आपण कांहींच कां बोलत नाहीं ? कांहींतरी बोला ना ! "

बाजीराव शांतपणें पण खोंचदार भाषेंत उद्गारले, " सज्जनसिंग ! आमचा स्वभाव बराचसा तुमच्या परिचयाचा आहेच. असल्या महत्त्वाच्या विषयांत माणसानें कांहींतरी बोलण्यापेक्षां कांहींच न बोलणें चांगलें असें आम्हांला वाटतें.

आम्हीं तरी या बाबतींत असें ठरविलें आहे कीं, विक्रमसिंहजी आज रात्रौ संकेतस्थलीं आम्हांला भेटेपावेतों—"

" पण आपला त्या पत्रावर विश्वास बसतो का ? " सज्जनसिंगानें विचारलें.

" आमचा विश्वास बसला म्हणजे तुमचाही बसावा असे दुराग्रही आम्ही नाहीं. " बाजीराव उत्तरले.

तरीही सज्जनसिंगाच्या मनांत उद्भवलेली शंका मात्र अजून पूर्ववत् कायम होती. त्या शंकेचें निरसन शक्य तितक्या लौकर आपण स्वतःच करून घ्यावयाचें मनांत योजून सज्जनसिंगानें बाजिरावांना विचारलें, " श्रीमंत ! वनवासीचा मुक्काम सध्यां कुठें आहे असें देवदूत म्हणाला ? "

" नरसिंहगडावर. कां बरें इतकी चौकशी ? तुम्हांला वनवासीच्या खरेखोटे-पणाबद्दल खातरजमा करून घ्यावयाची आहे किंवा कसें ? "

" होय. पण आपली आज्ञा झाली तर."

" आमची कांहीं हरकत नाहीं. पण आम्हांला असें वाटतें कीं, आमच्यापैकीं कोणीही वनवासीविषयीं इतकें साशंक असण्याचें कारण नाहीं. येऊन जाऊन आपणांला एकलिंगजीविषयींची शंका आहे, व ती आम्हांलाही आहे. पण त्या चुकीला सर्वस्वीं एकटा एकलिंगजीच जबाबदार आहे. वनवासीच्या संमतीशिवाय ती घालमेल झाली आहे व तिच्याविषयीं वनवासीनें चौकशी करून तपासही चालविला आहे. "

" पण मीं या गोष्टीचा पूर्ण तपास लावण्याचा प्रयत्न केला तर त्याला आपली कांहीं हरकत आहे का ? " सज्जनसिंगानें विचारलें.

" आमची हरकत कांहीं नाहीं. पण थोडया वेळापूर्वी आम्हीं सुचविल्यांप्रमाणें तुम्हा दोघांनाही उज्जयनींत जाऊन जी कामगिरी पार पाडावयाची आहे ती अत्यंत महत्त्वाची आहे." बाजीराव गंभीर चर्या करून उद्गारले.

बाजिरावांचे उद्गार इंद्रकुमारीला पटले. जितक्या झपाट्यानें तिचें मन वनवासी-विषयीं कलुषित झालें होतें, तितक्याच झपाट्यानें तें निवळलें. तिच्या मनांत असा फरक पडण्याला मुख्यतः तें पत्र—ज्या पत्रांत वनवासीनें विक्रमसिंहाविषयींची सुवार्ता लिहिली होती तें पत्र—कारण झालें होतें. तिचा वनवासीवर खरा आक्षेप त्यानें लोलुपतेनें तिची चौकशी केली हाच होता, व वनवासी कालिदासाच्या

शब्दांवर विश्वासून तिच्या शोधार्थ गेल्यामुळें त्या आक्षेपाला जास्त बळकटी आली होती. तो आक्षेप पूर्णांशानें नाहीं तरी निदान बहुंशानें 'कावीळ झालेल्याला सारेंच पिंवळें दिसतें' या न्यायाचा होता. विकारवशतेच्या अथवा भावनाप्रधानतेच्या भरांत क्षणांत उत्पन्न होणारे मनोविकल्प दूर होण्यालाही फारसे सायास पडतात असें नाहीं. त्यांतूनही कार्यकारणभावाची संगति जुळली म्हणजे तर विकल्पांची निवृत्ति होण्याला क्षणाचाही विलंब लागत नाहीं. बाजिरावांनीं वनवासीविषयीं पुन्हा विश्वास व आदर दाखविण्याला प्रारंभ केला; एकलिंगजीवर ज्या अर्थी वनवासीचा रोष झाला होता त्या अर्थी एकलिंगजीनें केवळ स्वतःच्या जबाबदारीवर शत्रूला फितूर होऊन अथवा अन्य कांहीं कारणानें मल्हाररावांना गोता दिला असावा हें ठरल्यासारखें झालें. राहतां राहिला इंद्रकुमारीच्या अभिलाषाबाबतचा आक्षेप. त्या आक्षेपाचें महत्त्व जितकें इंद्रकुमारीला होतें तितकें बाजीराव व सज्जनसिंग यांना नव्हतें. इंद्रकुमारीनें त्या आक्षेपाचा खुलासा आपल्या मनालाच विचारला, तेव्हां तिच्या मनाकडून तिला उत्तर मिळालें, " ज्या अर्थी वनवासी-बरोबरच विक्रमसिंहजीही बाजिरावांच्या भेटीला यावयाचे आहेत, त्या अर्थी ते परस्परांचे जिवलग व विश्वासू मित्र असले पाहिजेत यांत संशय नाहीं. विक्रम-सिंहजी हे सहजासहजीं फसण्याइतके भोळे नाहींत; व शिवाय बुधसिंगदेखील ज्या अर्थी वनवासीला साह्य आहेत, त्या अर्थी वनवासी शत्रुपक्षाचा असण्याचा संभव फारच कमी. आतां त्यानें चौकशी केली, ती विक्रमसिंहजींच्या वतीनें मित्रकार्य म्हणून केली असेल. त्या चौकशींतून विपरीत अर्थ काढणें बरोबर नाहीं."

इंद्रकुमारीला हा तिच्या मनाचा हितोपदेश मानणें प्राप्तच होतें. खरें सांगा-वयाचें तर ती एक इष्टापत्तिच तिच्यावर कोसळली होती. त्या इष्टापत्तींत एक उणीव राहून गेल्याचा तिला भास झाला, व ती संशयनिवृत्ति करून घेण्यासाठीं तिनें बाजिरावांना विचारलें, " श्रीमंत ! आपण देवदूतापाशीं मी एथें असल्या-बद्दल बोललां का ?"

" तर ! अवश्य बोललों." बाजीराव उद्गारले, " आमचा उद्देश असा कीं, आमच्यासाठीं नाहीं, आणखी कशासाठीं नाहीं पण निदान आपल्या प्राणां-पलीकडे प्रिय असलेल्या सहचारिणीसाठीं तरी विक्रमसिंहजींनीं आजच्या आज रातोरात इकडे यावें."

इंद्रकुमारीला आवडतें तेंच बाजीराव बोलले, व तें तिला आवडलेंही. पण तें आवडलें असें मनःसंकोचामुळें दर्शवावयाचें नाहीं अशा हेतूनें ती स्मितवदनानें उलट उद्गारली, "ते सहचारिणीचा प्रश्न इतका जिव्हाळ्याला लावून घेणारे असते तर इतकीं वर्षे खडतर अज्ञातवास त्यांनीं पत्करला नसता. त्यांना सहचारिणी व तिच्या सहवासांत साजरा होणारा संसार यांपेक्षां आपल्या मातृदेशाच्या संसाराची जास्त काळजी आहे, व ते आपणांला भेटायला येतील ते त्यासाठींच येतील."

इंद्रकुमारीच्या मार्मिकतेच्या उद्गारांवर बाजिरावांना समाधानपूर्वक स्तब्ध बसणें भागच होतें. पण इंद्रकुमारीच्या भावनांत वास्तवता कितपत होती !

## प्रकरण सविसावें

# विक्रमसिंहाविषयीं

आणखी बराच वेळपावेतों याच विषयावर भवति न भवति सुरू होती, ती सूर्यास्ताच्या समयीं पिलाजी जाधव व राव तेजकर्ण हे तेथें येऊन पोंचल्या मुळें थांबली. ते दोघे आल्यापासून नव्या नव्या चित्तवेधक गोष्टींना प्रारंभ झाला. कालिदासाची व त्या दोघांची भेट झाल्याचें बाजिरावांना कालिदासाच्या मुखानेंच कळलें असल्यानें त्याच्या विदूषकी लीला आतां आपणाला या मंडळींच्या मुखानें ऐकावयाला सांपडणार अशी बाजिरावांची खात्री होती. पण ती वेळ कोणालाही फारसा विनोद रुचण्यासारखी नव्हती. विशेषतः राजकन्येला सटवोजी जाधवानें शत्रुगृहीं नेलें व मांडवगड शत्रूच्या हातीं पाडाव होऊन निहालकर्ण आणि अनुपसिंग कैद झाले, या दुर्वार्तेनें सर्वांच्या तोंडचें पाणी पळविलें होतें. राजकन्येचा विषय बाजिरावांपाशीं बोलून दाखविण्यालाही पिलाजी लाजत होता. पण बाजिरावांना एकवार त्या गोष्टीचा निर्णय करून घ्यावयाचा होता. कालिदासाच्या शब्दांवर राजकन्येच्या बाबतींत तरी काडीचाही विश्वास ठेवण्याला ते तयार नव्हते. सटवोजी जाधव हा आपल्या अत्यंत विश्वासाचा-आपला उजवा हात-तो असलें नीचतम कृत्य कधींही करणार नाहीं अशी बाजिरावांची मनोमन खात्री होती. त्यानें ज्या अर्थी राजकन्येला आपल्या ताब्यांत घेतली आहे, त्या अर्थी त्यांत त्यानें कांहीं तरी गनिमी कावा लढविला असावा, असाच बाजिरावांचा या वेळेपर्यंतचा-पिलाजी जाधव व राव तेजकर्ण भेटेपर्यंतचा-ठाम समज होता. पण त्या दोघांच्या मुलाखतींत त्यांचा तो समज साफ पालटला.

कान्तेचा मोहपाश तरुणाला अगदीं दुबळा करून सोडतो, पोलादासारखीं कठीण काष्ठें पोखरून टाकणारा भुंगा कोंवळ्या लुसलुशीत कमळांत बंदिवान होऊन पडतो, हा तरी स्त्रीविषयक प्रेमाचाच-नव्हे लालसेचा-अभिलाषाचाच परिणाम नव्हे काय ! फार दूर कशाला ! गुणी व सुंदर स्त्रीचा अभिलाष मनुष्याला कसा बंदिवान-देहानें नाहीं तरी मनानें बंदिवान-करून सोडतो याचा स्वानुभवही त्या वेळीं बाजिरावांना विचारांत घेण्याजोगा होता. त्यामुळें सटवोजी स्त्रीविषयांत फसला

असला पाहिजे खास. असा त्यांचा ग्रह सहज झाला, व आतां राजकन्येची मुक्तता कशी करावी हा प्रश्न प्रामुख्यानें त्यांचें मस्तक भणाणून सोडूं लागला.

राजकन्येवर संकट व तें आपल्या पोटच्या गोळ्याच्या हातून ओढवलेलें ऐकून पिलाजी जाधव वर मान करून पाहाण्यालाही लाजत होते. तेजकर्णदेखील आपल्या मागें मांडवगड शत्रूच्या भक्ष्यस्थानीं पडल्याची वार्ता ऐकून व चंद्रशेखर शहाजाद्याला शरण आला असून त्याची मुलगी बालकर्णाशीं लग्न करावयाचें नाकारून शहाजाद्याची विलासदासी व्हावयाला तयार झाली आहे असें ऐकून पराकाष्ठेचा कष्टी झाला. वास्तविक या वेळीं बाजिरावांना इतरांनीं धीर द्यावयाला पाहिजे होता; पण तें बाजूलाच राहून बाजिरावांनाच त्या दोघांचें शांतवन करणें भाग पडलें. ते त्या दोघांनाही शक्य तेवढा धीर देऊन म्हणाले, "तुमच्यासारख्या कसलेल्या वीरांनीं परिस्थितीचें अक्राळविक्राळ स्वरूप पाहून असे हातपाय गाळणें योग्य नाहीं. खऱ्या वीरानें संकटकालीं डगमगतां कामा नये, दुप्पट धैर्यानें संकटाशीं झगडण्यासाठीं उसळी मारून पुढें धावलें पाहिजे. संकटाच्या रूपानें परमेश्वर आपली कसोटी पाहात असतो."

"श्रीमंत ! मी संकटांना भीत नाहीं !" पिलाजी जाधव दोन हातांनीं आपलें मस्तक घट्ट दाबून धरून उद्गारले, "संकटें हीं आमचीं नेहमींचीं खेळणीं आहेत व नित्य अशीं नवीं नवीं खेळणीं संपादन करण्यांतच आम्हांला खरी करमणूक वाटते."

"तर मग तुम्ही इतके कष्टी कां ? आम्हीं ओळखलें, तुमच्या मुलाच्या हातुन एवढा अघोर अन्याय घडला म्हणून तुम्ही कष्टी झालां आहां."

"त्या कुलांगारानें आपल्या बद्करणीनें माझ्या मागच्या पुढच्या बेचाळीस पिढ्या नरकांत लोटल्या व म्हातारपणीं या पिलाजीला जगांत तोंड दाखविण्याला जागा नाहींशी केली !—"

इतक्यांत पहारेकऱ्यानें उज्जयनीहून कोणी दूत बाजिरावांच्या भेटीला आल्याची वर्दी आणली. त्याबरोबर इतर सर्व विषय जेथल्या तेथें थांबले व बाजिरावांनीं त्या दूताला आंत बोलावून घेतलें. एखाद्या राजपुत्राला शोभण्यासारखें त्या तरुणाचें तेजस्वी मुखमंडळ पाहून प्रत्येकाला विचार पडला कीं, हा कोण ?

आपणाला कोणी ओळखूं शकत नाहीं असें पाहून त्या तरुणानें बाजिरावांना विचारलें, "श्रीमंत ! आपणदेखील मला ओळखलें नाहीं का ?"

त्या तरुणाचा बरोबरीच्या नात्याचा प्रश्न ऐकून बाजिरावांना व इतर सर्वांना वाटलें कीं, हा कांहीं कोणी सामान्य दूत नसावा. बाजिरावांनीं त्याला विचारलें, " तुम्ही कोठून आलां ? "

" मी उज्जयनहून आलों. " तो तरुण उत्तरला.

बाजिरावांनीं व इतर मंडळीनेंही ओळखलें, कीं हा कोणीतरी वेषधारी आहे. वरवर दिसतें तें याचें खरें स्वरूप नाहीं.

" तुम्ही कोण ? " बाजिरावांनीं विचारलें.

" माझी खरी ओळख आपणाला पटल्यानें कदाचित आपणाला विषाद वाटेल. कदाचित् कां ? नक्की विषाद वाटेल; व कदाचित माझ्याशीं दोन शब्द बोलण्यांतही आपणाला कमीपणा वाटेल." तो तरुण उद्गारला.

बाजिरावांनीं पुन्हा पूर्वीपेक्षां जास्त चौकस दृष्टीनें त्या तरुणाकडे न्याहाळून पहात विचारलें, " विषाद वाटेल कीं काय वाटेल, हें ओळख पटल्याशिवाय कोणीं कसें सांगावें ? पण तुम्ही कोण ? "

" प्रथम मला असें कळूं द्या कीं, इथें कुणी परकी मंडळी तर नाहीं ना ? "

" तुमच्या दृष्टीनें परकी मंडळी कोण व आपुलकीची मंडळी कोण हें तरी आम्हांला कळूं द्या ! तुम्ही कोणासमोर बोलत आहां तें तरी तुम्हांला माहीत आहे का ? "

" हो ! तें मला पूर्णपणें माहीत आहे."

" मग आम्हांला अगोदर सांगा, तुम्ही कोणासमोर बोलत आहां ? "

तो तरुण बाजिरावांच्या त्या प्रश्नाचें उत्तर देतांना अडखळत म्हणाला, " ही सर्व मंडळी आपली आहे, व या मंडळीच्या देखत बोलावयाला हरकत नाहीं असें मी धरून चालतों."

" अलबत ! " बाजीराव उत्तरले.

" आपण श्रीमंत बाजीराव पेशवे आहांत हें मला माहीत आहे." तरुण उत्तरला.

" बरें; पुढें ? "

" आपण माझे चुलते आहां. अजूनही आपणाला माझी ओळख पटत नाहीं का ? " त्या तरुणानें चट्कन् आपली कृत्रिम दाढी काढून हातीं घेऊन बाजिरावांना विचारलें, " आतां तरी ओळख पटते का ? "

" हें काय ? कोण तुम्ही ? सभासिंग ! तुम्ही का ते ? " असें म्हणून बाजिरावांनीं आपल्या आसनावरून उठून तो तरुण उभा होता तेथें जाऊन त्याला गाढालिंगन दिलें. तो प्रकार पाहून सर्व मंडळींनीं तोंडांत बोटें घातलीं. पिलाजी जाधव 'सभासिंग' हें नांव आपल्या जिव्हाग्रीं घोळवीत व त्या तरुणाचा चेहरा न्याहाळीत विचार करूं लागले. बुंदेलखंडांतील अजनेरचें खोरें, जैतगडचा किल्ला, पन्ना राजधानी वगैरे देखावे त्यांच्या अंतश्चक्षूंसमोर तरळूं लागले.

तो बुंदलेखंडचा युवराज–बुंदेलखंडाच्या राजा छत्रसालाचा नातू सभासिंग होता. महंमदखान बंगषानें बुंदलेखंडावर स्वारी करून छत्रसालचें राज्य धुळीला मिळविण्याचा घाट घातला तेव्हां बाजीराव पेशव्यांनींच छत्रसालाला हात दिला होता, व त्या वेळीं पिलाजी जाधव बाजिरावांबरोबर होते. राजा छत्रसालाचें त्या वेळेपासून बाजिरावांवर अकृत्रिम प्रेम जडलें होतें. बंगषाचा पराभव करून व छत्रसालाचें राज्य निर्वेध करून बाजीराव माघारे निघाले; तेव्हां छत्रसालानें त्यांचा यथोचित गौरव करून मस्तानीसारखें त्रिभुवनाच्या मोलाचें रत्न त्यांना त्यानें त्याच वेळीं अर्पण केलें होतें; व त्या दिवसापासून त्यांना आपला तृतीय पुत्र मानलें होतें. कालांतरानें छत्रसालाचा निर्वाणकाल समीप आला तेव्हां त्यानें आपल्या राज्याचे सारखे तीन भाग करून त्यांतले दोन भाग आपल्या दोन मुलांसाठीं ठेवून तिसरा भाग बाजिरावांना देऊन त्यांना एकवार पुत्र मानल्याचें वचन सार्थ केलें होतें. हा प्रकार पिलाजीरावांनाही माहीत असल्यामुळें सभासिंगानें बाजिरावांना 'तुम्ही माझे काका' असें म्हटलें त्यांतील रहस्य पिलाजीरावांच्याही ध्यानीं आलें.

बाजीराव संतोषपूर्वक म्हणाले, " वा ! सभासिंग ! तुम्हीं तर अगदीं कमाल करून सोडली ! वेषांतराची कला तुम्हांला इतकी बेमालूम अवगत आहे हें आम्हांला माहीत नव्हतें. पण आज तुम्हांला असें वेषांतर करण्याचें कारण काय?"

सभासिंग विषादपूर्वक म्हणाला, " श्रीमंत ! दिवाभीतांना दिवसाच्या प्रकाशांत फिरण्याचें धैर्य होत नाहीं, म्हणून तीं रात्रीं फिरतात. माझी स्थिति सध्यां दिवाभीताप्रमाणेंच आहे. मी वर दिसावयाला तरी निजामाच्या पक्षाचा आहें. हें ऐकून आपणाला आमच्या घराण्याविषयीं अत्यंत तिरस्कार वाटत असेल नाहीं ? "

" नाहीं, मुळींच नाहीं. आपल्या माणसांविषयीं आमचा गैरसमज कसा होईल ?"

" पण आपणाला, बातमी पूर्वी कळली होती ना ? "

" तर ! एवढी महत्त्वाची बातमी कळणार नाहीं असें कसें होईल ? आमचे गोविंदपंत बुंदेले* तुमच्या शेजारीं आहेतच. त्यांनीं आम्हांला तुमची बातमी कळविली."

" त्यांचाही आमच्याविषयीं प्रारंभीं फार गैरसमज झाला होता, व अजूनही तो कांहीं अंशीं शिल्लक असेल."

" आतां शिल्लक असेलच असें कांहीं म्हणवत नाहीं; मात्र त्यांनीं प्रारंभींच तुम्ही निजामाला जाऊन मिळालां असें कळतांच आमच्याकडे तक्रार केली, व परस्पर जगत्रायजींना तंबी पोंचविण्यासाठीं आमची परवानगी मागितली; त्यावरून तेव्हां तरी ते फार खवळले होते एवढें मात्र खरें."

" मग आपण त्यांना काय सांगितलें ? "

" आम्हीं त्यांची समजूत केली, कीं परस्पर आम्ही बुंदेलखंडापुरत्या राजकारणाची पूर्ण खबरदारी घेत आहों; तुम्ही त्यांत तूर्त हात घालण्याचें कारण नाहीं. त्याबरोबरच त्यांना वाईट वाटूं नये म्हणून तुमच्या सर्व प्रकारच्या हालचालींवर नजर ठेवण्याची कामगिरीही आम्हीं त्यांना सांगितली होती. असो. आणखी काय नवलविशेष ? "

" आणखी नवलविशेष बरेंच आहे; पण तें मला इथें सांगतां येत नाहीं. आतां मी आपणाकडे आलों आहें तो फार नाजुक कामगिरीसाठीं आलों आहें. मनांत एक व जनांत एक असें दोन प्रकारचें आयुष्य सध्यां मी कंठीत आहें, हें आपण जाणतांच. यासाठीं आपण एखाद्या पूर्ण एकांताच्या जागीं जाऊन बोलूं."

* बाजिरावांच्या प्रोत्साहनामुळें ज्या अनेक थोर पुरुषांना आपली कर्तबगारी दाखविण्याला अवसर मिळाला, अशा शिंदे—होळकर यांच्या श्रेणींतीलच गोविंदपंत बुंदेले हे एक होत. हे जातीनें कऱ्हाडे ब्राह्मण. रत्नागिरी जिल्ह्यांतील नेवरें एथील रहाणारे. ते बाजिरावांच्या पदरीं शागिर्दपेशापासून उदयाला आले. इ. सन १७३३ त बुंदेलखंडाचा जो भाग बाजिरावांना प्राप्त झाला, त्याची व्यवस्था पहाण्याच्या कामीं त्यांनीं गोविंदपंतांची नेमणूक केली. शौर्यानें व धूर्ततेनें वागून गोविंदपंतांनीं आपला जम चांगला बसविला आणि तेव्हांपासून उत्तरेकडील मराठे सरदारांत त्यांची गणना प्रामुख्यानें होऊं लागली.

" बरें तर चला." असें म्हणून बाजीराव सभासिंगाला घेऊन वाड्याबाहेर पडले, ते थेट पुन्हा क्षिप्रेच्या घाटावर येऊन बसले व म्हणाले, " आतां बोला."

सभासिंग एका शिलाखंडावर बसून म्हणाला, " श्रीमंत ! निजामाला आपण ओळखतांच ! संन्याशाच्या हातानें विंचू मारण्याचा कलेंत निजाम किती निष्णात आहे हें आपणाला माहीत आहेच."

" होय."

" त्या कुटिल वृत्तीला अनुसरून निजामानें आज मला संन्याशाचा हात बनवून तो आपल्या हातीं धरला आहे. आपलीं बहुतेक सर्व कारस्थानें निजाम व त्याच्या पक्षाचे दरोबस्त लोक यांना माहीत झालीं आहेत."

" असें कसें झालें बरें ? " बाजिरावांनीं प्रश्न केला.

सभासिंग उत्तरला, " दुर्गादास या नांवाचा एक पाताळयंत्री व नीच मनोवृत्तीचा माणूस अनुराधसिंगाचा जीव कीं प्राण आहे. कुठें अनुराधसिंगासारखा राजपुरुष व कुठें दुर्गादासासारखा कवडीकिंमतीचा हलकट माणूस ! या दोघांची इतकी जीवश्चकंठश्च मैत्री कशी जमली असें आपणाला वाटेल; पण त्या अपवित्र गोष्टींचा उच्चार करून मी माझी वाचा विटाळूं इच्छीत नाहीं. यांत काय तें आपण समजा."

बाजिरावांना दुर्गादासाविषयींचा वृत्तान्त थोड्या वेळापूर्वी इंद्रकुमारीच्या तोंडून कळला होताच. ते म्हणाले, " तें सारें आम्हांला माहीत आहे."

" झालें तर. कल्याणी या नांवाची दुर्गादासाची बहीण—"

" तें माहीत आहे. पुढें काय तें बोला."

" ती कल्याणीच या कुटिल कारस्थानाची खरी सूत्रचालक आहे. अनुराधसिंगाचें सारें वैभव तिच्या पायाशीं लोळत असून अनुराधसिंगही तिच्या ताटाखालील मांजर बनून राहिलेला आहे. ती जशीं सूत्रें हालवील, तशीं हीं बाहुलीं नाचावयाचीं."

बाजिरावांना या गोष्टी पूर्वींच माहीत झालेल्या असल्यानें ते सभासिंगाच्या तोंडून मुद्द्याच्या व महत्त्वाच्या गोष्टी तेवढ्या ऐकण्याला आतुर झाले होते. त्यांनीं उतावळेपणानें विचारलें, " तें सर्व आम्हांला माहीत आहे. पण आमच्या कारस्थानांशीं कल्याणीचा काय संबंध ? "

" तो आपणच अंदाजावयाचा आहे. मीं असें ऐकलें आहे कीं, दुर्गादासाच्या मार्फत कल्याणीनें कांहीं चतुर माणसें आपल्या पक्षांतील गुप्त बातम्या काढण्यासाठीं निरनिराळ्या वेषांनीं रवाना केलीं आहेत; किंवा निदान आपल्या निकटचीं कांहीं माणसें तिला फितूर तरी झालीं आहेत. तीं कोण कोण आहेत, त्यांचे उद्योग कसकसे चालतात, वगैरे गोष्टींचा विचार आपण करावयाचा आहे. बाकी आपण असल्या गुंतागुंतीच्या राजकारणांत मुरलेले आहां, आपणाला मीं कालच्या पोरानें या गोष्टी काय शिकवाव्या ? या अवांतर गोष्टी बोलतां बोलतां मी मुख्यतः ज्या कार्यासाठीं आलों तें कार्य तसेंच राहून गेलें. मी आज मुख्यतः निजामाचा हस्तक या नात्यानें आपणासमोर आलों आहें हें आपण जाणतांच ! "

" होय."

"ऐका. त्या नात्यानें मी जो आलों आहें तो आपणाकडे म्हणजे श्रीमंत पेशव्यांकडे आलों नसून सेनापति दाभाड्यांकडे आलों आहें."

दाभाड्यांचें नांव निघतांच बाजिरावांच्या मनानें नक्की घेतलें कीं, दाभाड्यांच्या आगमनाची इतकी विश्वसनीय बातमी कालिदासासारख्या राजकारणधुरंधर (!) पुरुषाशिवाय दुसऱ्या कोणाकडूनही उज्जयनीला जाऊन पोंचण्याचा संभव नाहीं.

प्रकरण सत्ताविसावें

# ती मध्यरात्रीची वेळ

स्वभासिंग पुढें बोलूं लागला, " आपल्या म्हणजे पेशव्यांच्या हालचालींचा नक्की पत्ता निजामाला अजून मिळालेला नाहीं; पण पेशवे परवां नरेंद्रमंडळाच्या बैठकीसाठीं उज्जयनीला येणार एवढें मात्र त्याला पक्कें माहीत आहे. त्याप्रमाणेंच आज गणेशतीर्थावर मुक्काम आहे तो दाभाड्यांचा, असेंही तो खात्रीलायक धरून चालला आहे."

" वाइटांतून बरें काढावयाचें तर त्यांतल्यात्यांत ही फार समाधानाची गोष्ट आहे. बहुधा कालिदासाच्या सांगण्यावरून हा तपास अनुराधसिंग व निजाम यांना लागला असेल ! " बाजीराव म्हणाले.

" होय. त्याप्रमाणेंच सज्जनसिंग वगैरे ज्वलज्जहाल स्वातंत्र्यवादी मंडळीही दाभाड्यांना सामील झाली आहे, असेंही आम्हांला कळलें आहे."

" तेंही खरें."

" काय खरें ? "

बाजीराव आपल्या छातीला हात लावून म्हणाले, " या दाभाड्यांना ती मंडळी येऊन मिळण्याच्या तयारींत आहेत हें अक्षरशः खरें."

" असो. यावरून निजामाची अशी कल्पना झाली आहे, कीं मराठ्यांचा पक्ष दिवसेंदिवस अधिकाधिक कमजोर होऊं लागला असून आणखी असेच थोडे दिवस गेले तर मराठ्यांशीं प्रत्यक्ष सामना न करतांही ते दिवसेंदिवस दुबळे होऊन अखेर काळें करून महाराष्ट्रांत माघारे निघून जातील."

" मूर्ख ! बेअकली ! निजामाला मराठ्यांच्या मर्दुमकीचा इतक्या दिवसांचा अनुभव असतांही त्याला मराठ्यांची ओळख पटली नाहीं काय ? फुकट !—फुकट !—गुलामाचीं एक शेंकडा वर्षें अगदीं फुकट गेलीं. आणि आयुष्याबरोबर अक्कलही गेली असें वाटतें. त्याला म्हणावें, बेट्या ! मराठ्यांनीं एकवार पुढें पाऊल टाकलें, कीं ते मरतील पण मागें हटणार नाहींत."

"ऐका तरी ! दाभाडे, सज्जनसिंग वगैरे मंडळी बाजिरावांच्या विरुद्ध आहेत, या एका गोष्टीवर विश्वासून निजाम मनांत मांडे खात आहे."

" पण दाभाडे खरोखरच आमच्याविरुद्ध निजामाला उघड उघड साह्य करण्याला तयार आहेत किंवा कसें ? "

" नाहीं. कालिदासप्रणीत दाभाड्यांपेक्षां अन्य कोणत्याही दाभाड्यांनीं निजामाच्या पक्षाचा अंगीकार केलेला नाहीं. त्याविषयीं आपणाला चिंता करण्याचें कारण नाहीं."

" मग कांहीं चिंता नाहीं. मग निजामाला खुशाल मनांत मांडे खाऊं द्या. पण परवांच्या नरेंद्रमंडळाच्या सभेचें धोरण काय राहाणार ? "

" त्या बाबतींतच जयसिंगजींना आपणाशीं आगाऊ कांहीं खासगी वाटाघाट करावयाची आहे, व त्यासाठीं आपणाला त्यांनीं आजच्या आज रात्रौ मजबरोबर उज्जयनीजवळच्या संकेतस्थलीं बोलावलें आहे. ही झाली जयसिंगजींची खासगी व गुप्त कामगिरी; पण मी खरें पाहतां निजामाच्या वतीनें अनुराधसिंगजींकडून कामगिरीवर आलों आहें व तीही दाभाड्यांकडे म्हणून आलों आहें, हें आपण जाणतांच. निजाम वगैरे मंडळीला आपल्या साह्याची अत्यंत अपेक्षा आहे. पेशव्यांनीं सेनापति त्रिंबकराव दाभाड्यांना विश्वासघातानें दगा दिला त्याबद्दल सेनापतीच्या आप्तेष्टांना जितका खेद होत असेल त्याहीपेक्षां जास्त खेद बादशाही सरकाराला व निजामाला होत आहे."

" हो—हो ! तें आम्हांला माहीत आहे ! पण आम्हीं म्हणजे दाभाड्यांनीं काय करावें असा त्यांचा मानस आहे ? "

" त्यांचा मानस आपणाला अनुराधसिंगजींच्या मुखांतून कळेलच. त्याकरितांच अनुराधसिंगजी आपली भेट घेण्यासाठीं उत्सुक झाले आहेत. आपण तरी त्यांच्या भेटीला जावें किंवा त्यांनीं तरी आपल्या भेटीला यावें; पण ही भेट नरेंद्र-मंडळाच्या बैठकीच्या पूर्वी झाली पाहिजे असा त्यांचा उत्कट मानस आहे. आतां हा पेंच कसा निवारण करणार ? "

" हा पेंच निवारण करणें फारसें अवघड नाहीं. आम्हीं जो मंत्र कालिदासापाशीं जपला, तोच तुमच्यापाशीं जपतों, व तोच तुम्ही अनुराधसिंग, निजाम वगैरे मंडळीपाशीं जपा. तो मंत्र हा कीं, पेशव्यांचें व आमचें वैमनस्य असलें तरी आम्ही दोघेही एकाच छत्रपतीचे सेवक असल्यानें एकाला दुसऱ्याशीं अकारण कुरापत काढून उघड उघड फटकून वागतां येणार नाहीं. शिवाय, दैववशात् या बखेड्यामुळें आमचें व पेशव्यांचें युद्ध जुंपलें तर त्यांत परिणामीं फजिती व सर्व-

नाश आमचाच होणार. त्यापेक्षां आम्ही तूर्त बाह्यात्कारीं पेशव्यांच्या बाजूचे असल्याचा बेमालूम बहाणा करतों, व ऐन रणांगणाचा प्रसंग येईल तेव्हां मराठ्यां-पैकीं पराजय प्रथम कबूल करून स्वखुषीनें शत्रूच्या हातीं जिंकले जाणारे आम्ही. ही युक्ति कशी काय आहे? मुख्यतः आम्हांला दाभाडे व प्रतिपक्ष यांच्या भेटी-गांठीचा प्रसंग टाळावयाचा आहे; तेवढा या युक्तीनें टळेल कीं नाहीं?"

"नाहीं." सभासिंग थोडा वेळ स्वतःशीं विचार करून म्हणाला, "मग मला वाटतें, त्याला निराळी कांहीं तरी युक्ति योजिली पाहिजे. कारण असें कीं, पेशवे व दाभाडे यांची फाटाफूट शत्रुपक्षीय लोक तितकीशी जमेला धरीत नाहींत. त्यांचा—विशेषतः निजामाचा असा समज आहे कीं, दाभाडे व पेशवे एकमेकांचे कितीही वैरी असले तरी त्या दोघांचेंही भवितव्य मराठशाहीच्या भवितव्यावर अवलंबून असल्यानें मराठ-शाहीच्या हिताहिताचा सध्यांसारखा महत्त्वाचा प्रश्न उत्पन्न होतो तेव्हां ते आपसांतील वैरभाव विसरून एकजुटीनें शत्रूशीं सामना द्यावयाला कमी करणार नाहींत."

"हें तर मोठेंच आश्चर्य! दाभाडे आज इतकीं वर्षे आमच्याशीं वैर साधीत आहेत; आपलें स्वतःचें नाक कापूनदेखील आम्हांला अपशकून करण्याची त्यांची सदैव तयारी असते; असें असतां निजाम असें म्हणतो!— देव करो व निजामाची हीच भावना अखेरपावेतों कायम राहो."

"तें ठीक आहे; पण निजामाची ती भावना या वेळीं आपणाला जाचक होत आहे. दाभाडे वश झाल्याचें अनुराधसिंगामार्फत निजामाला कळलें तेव्हां प्रथम तो त्यावर विश्वासच ठेवीना. अनुराधसिंगाचा कालिदासाच्या बोलण्या-विषयीं कांहींतरी चुकीचा समज झाला असेल असें त्याला वाटलें, व त्यानें स्वतः कालिदासाला बोलावून त्याची भेट घेतली. कालिदासानें आपल्या काव्यमय भाषेंत वस्तुस्थितीला जरूर तें तिखटमीठ लावून तीच गोष्ट निजाम व शहाजादा यांच्या बैठकींत सांगितली."

शहाजाद्याचें नांव निघतांच चंद्रशेखर व भागाबाई यांच्याविषयीं कालिदास जें बोलला होता त्याची बाजिरावांना आठवण झाली. त्यांनीं विचारलें, "शहाजादा आज भैरवगडावर* जावयाचा आहे का?"

---

* भैरवगड हा किल्ला उज्जयनीच्या ईशान्येला सुमारें दोन मैलांच्या अंतरावर क्षिप्रेच्या कांठीं आहे. हा फार जुनाट व मजबूत किल्ला असून त्याच्या सभोंवारची

" तें मला माहीत नाहीं. शहाजादा भैरवगडावर जावयाचा होता का ?" सभासिंगानें उलट प्रश्न केला.

" भागाबाई या नांवाची ओंकारेश्वरच्या चौधरी चंद्रशेखराची मुलगी सध्यां भैरवगडावर आहे ना ?" बाजिरावांनीं पुन्हा विचारलें.

सभासिंग उत्तरला, " होय. भागाबाई या नांवाची एक खुबसुरत तरुणी कालिदासानें भैरवगडावर आणून ठेविली आहे असें मीं ऐकलें खरें. मला वाटतें उज्जयनीच्या किल्ल्यांत आजच बंदिवान होऊन पडलेल्या चौधरी चंद्रशेखराची ती मुलगी असावी. मला कांहीं नक्की माहीत नाहीं; पण कालिदास बोलत असतांना मीं ओझरतें ऐकलें त्यावरून मला वाटतें."

" काय ! चंद्रशेखर कैदेंत पडला ?" बाजीराव व तेजकर्ण यांनीं एकदम आश्चर्यपूर्वक प्रश्न केला.

" होय." सभासिंग उत्तरला.

" तो कां बरें ?" बाजिरावांनीं विचारलें.

" त्यानें आपल्या कन्येला शहाजाद्याच्या जनानखान्यांत पाठविण्याचें नाकारलें म्हणून ! आणि जिच्या रक्षणासाठीं त्यानें एवढा राजरोष सहन केला, ती कमनशिबी पोरटी आपण होऊन शहाजाद्याची विलासदासी व्हावयाला तयार झाली आहे !" बोलतां बोलतां सभासिंगानें संतापानें एक उसासा सोडला.

" बरें; तें मागाहून पाहातां येईल." तेजकर्णाला या गोष्टी बोलल्यानें फार संताप येतो असें पाहून बाजीराव तो विषय तेवढ्यावरच आवरता घेऊन म्हणाले, " बालकर्णाची भेट घेण्याची दाभाड्यांना मोकळीक मिळाली पाहिजे होती, ती मिळाली आहे का ?"

" तशी मोकळीक मिळण्याचा संभव आहे. परंतु त्यापूर्वी दाभाड्यांची निजामाशीं—निदान निजामाच्या वतीनें अनुराधसिंगाशीं तरी भेट झाली पाहिजे." सभासिंग उत्तरला.

---

वनश्रीची शोभा अत्यंत आल्हाददायक अशी आहे. किल्ल्याच्या पायथ्याशीं तर वनश्रीचें वैभव अपूर्व असून त्या मनोहर प्रांतांतच पांच सात देवालयें अति प्राचीन काळीं बांधिलेलीं पाहून निसर्गसौंदर्याबरोबरच दैवी पावित्र्याचे विचारही मनांत एकसमयावच्छेदेंकरून उद्भवतात.

" एकूण दाभाड्यांनीं एकदां प्रत्यक्षपणें उज्जयनींत पायधूळ झाडल्याशिवाय पुढच्या गोष्टी रांकेला लागत नाहींत असेंच म्हणावयाचें." बाजीराव खोंचिकपणें गालांतल्या गालांत हंसत म्हणाले.

"अगदीं बरोबर बोललां." सभासिंग म्हणाला, "तेवढी एक गोष्ट आपण केली, कीं सर्व भानगडी आपोआप मिटतील. आतां हें एक मोठेंच धाडस आहे हें खरें. पण असल्या मोठ्या धाडसाशिवाय मोठी फलश्रुति व्हावयाची नाहीं. आपण आज रात्रौ माझ्याबरोबर उज्जयनीला जयसिंगजींची भेट घेण्यासाठीं येणारच ना ?"

" होय. पण–" बाजिरावांना नक्की उत्तर देतां येईना. मध्यरात्रीच्या सुमाराला त्यांना नजीकच्या शिवालयांत विक्रमसिंहाची भेट घ्यावयाची होती, ती आठवण झाल्यामुळें ते अडखळले.

" पणबीण कांहीं नाहीं. आपण जयसिंगजींची भेट ही घेतलीच पाहिजे, व तीही आजच घेतली पाहिजे. कारण उदईक त्यांना अन्य ठिकाणीं कांहीं अत्यंत जरुरीच्या कामासाठीं जावयाचें आहे, व परवां नरेंद्रमंडळाची बैठक."

" एकूण नरेंद्रमंडळाच्या बैठकीला जयसिंगजी हजर रहाणार नाहींत तर ?"

" ते त्या बैठकीला जरूर हजर राहतील. पण तेथें त्यांना मोकळ्या मनानें कांहीं बोलतां येणार नाहीं. म्हणून त्यांनीं आपली खासगी भेट घेण्याचें योजिलें आहे."

विक्रमसिंहाची भेट घेणें जितकें महत्त्वाचें होतें तितकें किंवा त्याहून जास्त महत्त्वाचें काम जयसिंगाच्या भेटीचें होतें. पण विक्रमसिंहाची भेट घेण्याचें कार्यही त्यांना लांवणीवर टाकावयाचें नव्हतें. म्हणून त्यांनीं आपल्या मनाशीं कांहीं बेत ठरवून सभासिंगाला विचारलें, " आम्हांला जयसिंगजींकडून रातोरात परत येतां येईल किंवा नाहीं ? "

" हो ! येतां येईल. पण अनुराधसिंगजींना दाभाड्यांच्या भेटीची आवश्यकता आहे. त्याचें काय करावयाचें ? "

बाजीराव थोडा वेळ स्वतःच्या मनाशीं विचार करून म्हणाले, " त्याच्याबद्दल आपणाला असें करतां येईल.—तुम्ही अनुराधसिंगजींना असें सांगा कीं, उदईक किंवा उदईक नच जमल्यास तेथील नरेंद्रमंडळाची बैठक आटोपतांच दुसऱ्या दिवशीं दाभाडे तुम्हांला भेटतील. त्यांना म्हणावें कीं, आजच ते भेटावयाला येणार होते; पण पेशव्यांनीं कांहीं अत्यंत निकडीची कामगिरी त्यांना सांगितल्या-

कारणानें त्यांना प्रथम तिकडे जाणें भाग पडलें. एवढें तुम्हीं सांगितलें, कीं काम भागलें."

"हीही योजना कांहीं वाईट नाहीं. तोंवर आपली व जयसिंगजींची भेट झाल्यावर त्या भेटींतून जें काय निष्पन्न होईल त्यावर आपलें पुढील धोरणही आंखतां येईल." सभासिंग म्हणाला.

"वरें; पण निजामाकडील हालचालींविषयीं तुम्ही कांहीं बोललां नाहीं !"

"आतां आपण बरोबर जातोंच आहों, तेव्हां बोलूं."

"ठीक आहे. आपण आतां भोजन करून रातोरात घोड्यांवर स्वार होऊन निघूं." असें म्हणून बाजीराव सभासिंगासह आपल्या वाड्यांत जावयाला निघाले. तों वाड्यांत पिलाजी जाधव, राव तेजकर्ण, सज्जनसिंग व इंद्रकुमारी ही मंडळी आपसांत कांहीं बेत करीत बसली होती. त्या मंडळीला सभासिंगाची नांवापुरती ओळख पूर्वी झालीच होती. तरीही तो निजामाच्या पक्षाचा माणूस असें समजून सर्वजण त्याच्याकडे तिरस्कारपूर्ण दृष्टीनें पहात होते. परंतु बाजिरावांनीं पुन्हा एकवार सभासिंगाविषयीं खातरजमा बोलून दाखविल्यावर मंडळीचा तो संशय दूर झाला.

  

भोजनाच्या निमित्तानें सर्व मंडळी एकत्र बसली. तेव्हां सर्वांची एक पंगत मांडलेली पाहून पिलाजी जाधव व सभासिंग बाजिरावांच्या पाटाला पाट लावून बसण्याला संकोच करूं लागले. बाजिरावांनीं त्यांच्या संकोचाचें कारण ओळखलें. 'पेशवे ब्राह्मण, त्यांच्या पंक्तीला आम्हीं अब्राह्मणांनीं कसें बसावें' या विचारानें त्या मंडळीची वृत्ति संकोचपूर्ण बनली होती. पण बाजिरावांनीं त्यांना आग्रहपूर्वक आपल्या पंक्तीला बसवितांना स्पष्ट व मनमोकळेपणानें सांगितलें, 'जातिधर्माचें अवडंबर रणक्षेत्रावर कधींही माजावितां उपयोगी नाहीं. शत्रु व मित्र या दोनच जाती रणक्षेत्रावर संभवतात आणि तेवढ्यापुरताच जातिभेद आपण पाळावयाचा असतो."

आपपरभावना पूर्णपणें विसरून अत्यंत आपुलकीनें वागणाऱ्या त्या महाभाग धन्याविषयीं कोणत्या सेवकाला उत्कट अभिमान वाटणार नाहीं ! सर्व मंडळीनें बाजिरावांच्या या आत्मीय भावनेचें कौतुक करीत एकाच पंक्तीला भोजन केलें. सभासिंगाशीं मंडळीच्या ओळखी त्याच वेळीं झाल्या, व त्या ओळखींना अनुसरून बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टी सभासिंगाच्या मुखांतून निघाल्या. सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांच्याविषयीं

कालिदासानें जरूर त्या गोष्टींचा अगोदरच प्रसार केला असल्याकारणानें उज्जयनींत जमलेल्या राजमंडळांत त्या दिवशीं तो एक महत्त्वाच्या चर्चेचा विषय झाला होता. स्वतः सभासिंगानें ती चर्चा आपल्या कानांनीं ऐकली होती. तो विषय सभासिंगानें आपण होऊन काढतांच सज्जनसिंगानें कुतूहलपूर्वक विचारलें, " मग ! अनुराधसिंगजी व इतर राजमंडळी यांचें आमच्याविषयीं काय मत आहे ? "

सभासिंग उत्तरला, " आपणांविषयींही बहुतेकांच्या मनांत फार आदर आहे. दुर्जनसाल, अनुराधसिंगजी वगैरे अपवाद अर्थातच जमेला धरावयाचे नाहींत."

" मग आदर कुणाच्या मनांत आहे ? " सज्जनसिंगानें प्रश्न केला.

" कुणाच्या असें कां म्हणतां ! प्रत्यक्ष निजाम व त्याचा मुलगा यांच्या मनांतदेखील आपणां उभयतांविषयीं इतका आदर आहे कीं, आपणाला तें सांगितलें तर खरें देखील वाटावयाचें नाहीं. पण अनुराधसिंग, दुर्जनसाल वगैरे मंडळीविषयीं बादशाही पक्षाच्या मनांत तरी कितीसा आदर असेल असें आपल्याला वाटतें ? " सभासिंगानें विचारलें.

" कां बरें ! त्यांच्याविषयीं बादशाही पक्षाच्या मनांत अलोट आदर असला पाहिजे. त्यांतल्या त्यांत सध्यांसारख्या वेळीं—हिंदु आणि मुसलमान हे साम्राज्यसत्तेसाठीं मारूं किंवा मरूं पण माघार घेणार नाहीं अशा निर्धारानें एकमेकांशीं झगडत असतांनाही अनुराधसिंगजींसारख्या मंडळीनें हिंदूंचा पक्ष सोडून मुसलमानांचा पक्ष धरला, याबद्दल बादशाहीपक्ष त्यांचें कौतुक करील तितकें थोडेंच आहे." बाजीराव म्हणाले.

" ही आपली कल्पना—निव्वळ कल्पना आहे." सभासिंग म्हणाला, " मीं प्रत्यक्ष निजाम व त्याच्या प्रभावळींतील इतर कांहीं खासे अधिकारी यांच्या तोंडून जे उद्गार ऐकले आहेत, त्यांवरून खात्रीपूर्वक सांगतों कीं, अनुराधसिंग वगैरे मंडळी त्यांना देशद्रोही, धर्मद्रोही वाटतात. आतां, त्यांनीं अशा लोकांना आपल्या हाताशीं धरलें आहे हें खरें; पण मार्गांतील कंटकांपासून पायांचें रक्षण करण्यापुरताच पादत्राणांचा उपयोग, त्याप्रमाणेंच हिंदवी साम्राज्यवादी प्रतिपक्षाच्या मानेवर सुरी फिरविण्यापुरताच या देशद्रोह्यांचा बादशाही पक्षाला उपयोग करावयाचा आहे. फार दूरची गोष्ट कशाला ? मी निजामाच्या सक्तीच्या आग्रहावरून त्याच्या झेंड्याखालीं येऊन उभा राहिलों, म्हणून माझ्यावर तरी त्याचा विश्वास असेल किंवा माझ्याविषयीं त्याच्या मनांत आदर असेल अशी

आपणां कोणाची कल्पना असेल तर ती साफ चुकीची ठरेल. उलट बादशाही पक्षाचे लोक 'तुम्ही स्वातंत्र्यासाठीं तळहातावर शीर घेऊन झगडणाऱ्या राजा छत्रसालाचे नातू असून तुमच्या हिंदवी-स्वातंत्र्यदेवतेची दिवसाढवळ्या विटंबना करण्याला सज्ज झालेल्या आम्हां मूर्तिभंजकांना साह्य झालां, हाच तुमचा हिंदु बाणा काय' असें विचारून मला हिणवितात, व आम्हांला तमाशांतील माकडां-ची उपमा देतात."

" आणि तरीही तुम्ही त्यांच्या पक्षाला चिकटून रहातां ? एकूण धन्य तुमच्या स्वाभिमानाची व शौर्याची ! " इंद्रकुमारी भोजनगृहाच्या पलीकडील पडदानशीन महालांत बसली होती तेथून म्हणाली. ती याहीपेक्षां जळजळीत बोलावयाची, पण सज्जनसिंगानें तिला तेवढ्यांत हातानें खूण करून गप्प केलें.

" माताजी ! तुम्ही म्हणतां तें अगदीं अक्षरशः खरें आहे. पण भावी काल आज ना उद्यां तुमच्या प्रश्नाचें उत्तर देईल." सभासिंग शांतपणें म्हणाला.

बाजिरावांना व इतर मंडळीलाही भरपंक्तींत सभासिंगासारख्या पाहुण्याचा इंद्रकुमारीसारख्या एका पाहुण्यामाणसाकडूनच अपमान झालेला मुळींच रुचला नाहीं. बरें; ही नापसंती उघडपणें प्रगट करण्याची सोय नव्हती. कारण दोघेही पाहुणीं पडलीं ! तरी पण त्यांनीं इंद्रकुमारीला ओझरतें सूचित केलें, " माताजी ! आम्ही सभासिंगाविषयीं तूर्त जास्त कांहीं बोलत नाहीं. पण एवढें मात्र सांगतों कीं, तुम्हीं आज त्यांच्यावर केलेला आरोप कालांतरानें आपण होऊन आपल्या तोंडानें परत घ्याल व झाल्या गेल्या आगळिकीबद्दल त्यांची अंतःकरणपूर्वक क्षमा मागाल." या अप्रिय विषयाला उत्तर-प्रयुत्तराचे आणखी डेळेफांटे फुटूं नयेत अशा इच्छेनें बाजिरावांनीं चटकन् इष्ट असें विषयांतर केलें, " बरें; सभासिंगजी ! निजामाचें सज्जनसिंगजी व इंद्र-कुमारी माताजी यांच्याविषयीं काय मत आहे तें नाहीं सांगितलेंत."

" निजाम त्या दोघांनाही धन्यवाद देतो. सज्जनसिंगांना दुखवून हातचें दवडण्यांत अनुराधसिंगानें अक्षम्य चूक केली, त्यांना त्यानें हाताशीं राखून ठेवलें असतें तर 'गप्प बसावयाला काय घेशील' या न्यायानें त्यांचा फार उपयोग झाला असता असें निजामाचें स्पष्ट मत आहे. आणि म्हणूनच कोणत्याही उपायानें कां होईना, पण त्यांचा लाभ झाल्यास तो निजामाला हवा आहे. इंद्रकुमारीदेवींविषयीं तर त्याच्या मुखांतून असे प्रशंसोद्गार निघतात कीं, तो त्यांना देवता मानीत असावा

असेंच वाटतें. मी त्याच्या तोंडून असे उद्गार निघाल्याचें ऐकिलें आहे कीं, हिंदूंतील इंद्रकुमारीदेवीसारख्या देवता जोंवर आपली पुण्याई देशोद्धाराच्या कारणें वेंचावयाला स्वसंतोषानें व स्वयंस्फूर्तीनें पुढें येत आहेत, तोंवर मोगल बादशाहीनें हिंदूंची हिंदुपदपादशाहीची आकांक्षा दडपून टाकण्याचा प्रयत्न करणें हें सूर्यावर थुंकण्याप्रमाणें हास्यास्पद होणार यांत संशय नाहीं. श्रीमंत ! आतां मला सांगा, निजामासारख्या कट्या शत्रूच्या मुखांतून असे प्रशंसोद्गार निघाल्यावर त्यांचें मोल कोणत्या मापानें करावें ! " सभासिंग म्हणाला.

" तेंही खरें आहे. निजामाला मनुष्याची खरी पारख आहे, म्हणूनच तो ज्याला त्याला पक्केपणीं ओळखून आज सारी बादशहात आपल्या करंगळीच्या टोंकावर नाचवीत आहे." बाजीराव भोजनपात्रावरून उठतां उठतां म्हणाले.

निजामाच्या या विशिष्ट मनोभावनांचा आपण आपल्या हितसाधनाकडे कसा फायदा करून घ्यावा हा विचार—जुनाच तो पण नव्यानें—त्यांच्या मनांत घोळूं लागला. सभासिंगानें भोजनोत्तर उज्जयनीला जाण्याची तयारी करतां करतां पूर्वानुसंधान राखून आणखी कांहीं गोष्टी सांगितल्या, त्यांत 'कालिदासानें सांगितल्यावरून व निजामानें संमति दिल्यावरून अनुराधासिंग व मारवाडाधिपति अजितासिंग ऊर्फ धोकळसिंग हे अनुक्रमें आपला भाऊ सज्जनसिंग व आपली वहीण इंद्रकुमारी यांना गणेशतीर्थावर उदईक मान्यतापूर्वक निमंत्रण पाठविणार आहेत' अशी एक विशेष मुद्दयाची गोष्ट सांगितली. बाजिरावांनीं सज्जनसिंग व इंद्रकुमारी या दोघांना बाजूला घेऊन या संधीचा पुरेपूर फायदा आपण कसा घेतला पाहिजे हें नीट समजावून सांगितलें, व त्या दोघांनीं तें विशेष चिकित्सा न करतां कबूलही केलें.

राहातां राहिली एक गोष्ट, ती विक्रमासिंहाच्या आगमनासंबंधाची. विक्रमासिंह मध्यरात्रीच्या सुमाराला शिवालयांत येऊन भेटणार होता. पण बाजिरावांना तर त्यापूर्वींच उज्जयनीला जाणें प्राप्त होतें. आतां कसें करावयाचें याविषयीं क्षणभर स्वतःशीं विचार करून त्यांनीं अखेर ती कामगिरी सज्जनसिंग व इंद्रकुमारी यांच्यावर सोंपविली. त्या दोघांनाही—विशेषतः इंद्रकुमारीला—आपणावर ही इष्टापत्तिच ओढवली असें वाटलें. तरी पण विक्रमासिंहजी न येतां कांहीं अन्यथा प्रकार झाला तर कसें करावयाचें हा प्रश्न इंद्रकुमारी व सज्जनसिंग या दोघांपुढें उभा राहिलाच. त्याविषयींचें निराकरण बाजिरावांना त्यांनीं विचारतांच बाजिरावांनीं

सहज हंसत हंसत फुलांच्या झेल्याप्रमाणें मृदु असा साखरटोमणा दिला, " सज्जन सिंगजी ! अगोदर मला सांगा,आकाश कोसळलें तर तें आपण कसें सांवरावयाचें ? "

सज्जनसिंग व इंद्रकुमारी हीं दोघेंही तो विचित्र प्रश्न ऐकून आपसांत हंसूं लागलीं. बाजिरावांनीं त्यांना पुन्हा तोच प्रश्न केला.

" इतक्या आचरटपणानें भरलेला आमचा प्रश्न आहे असाच श्रीमंतांच्या बोलण्याचा रोंख दिसतो." इंद्रकुमारी किंचित खालीं मान घालून शालीनतापूर्वक म्हणाली. सज्जनसिंगानेंही आपल्या ओझरत्या ओशाळया हास्यानें आपल्या मनांतील तोच भाव दर्शविला.

" छे ! छे ! असें कसें म्हणावें ? " बाजीराव पूर्ववत स्मितहास्यपूर्वक म्हणाले.

" मग असा टोमणा देण्याचें काय कारण ? " सज्जनसिंगानें विचारलें. इंद्रकुमारी-नेंही त्याच प्रश्नाचा पुनरुच्चार केला.

बाजीराव निरुत्तर झाले. पण त्यांत त्यांना मानखंडना मात्र मुळींच वाटली नाहीं. त्यांनीं मनमोकळेपणानें त्या दोघांचीही समजूत केली कीं, वनवासी हा खरोखरच विश्वासपात्र मनुष्य आहे. वेळीं पूर्वेचा सूर्य पश्चिमेला उगवेल, पण त्याच्या ठायीं असत्य संभवणार नाहीं."

" आणि मग एकलिंगजीनें मल्हाररावांबाबत भानगड केली, तिची काय वाट ? " हा प्रश्न सज्जनसिंगानें ओघानेंच विचारला.

" त्या प्रश्नाचा निर्णय खुद्द वनवासींनाही अजून झालेला नाहीं." बाजीराव उत्तरले, " आपणांप्रमाणेंच त्यांचीही मति त्या प्रकारानें अगदीं गुंग होऊन गेली आहे. ते त्याविषयीं कसून तपास करीत आहेत."

याप्रमाणें विचारविनिमय होऊन बाजीराव सभासिंगासह उज्जयनीकडे जावया-ला आपापल्या घोड्यांवर स्वार होऊन निघाले. प्रथम बाजिरावांचा विचार सड्यानेंच जाण्याचा होता. पण पिलाजी जाधव व राव तेजकर्ण तेथें रिकामेच होते व सध्यांच्या परिस्थितींत त्यांनीं आपणापासून दूर व्हावें असा बाजिरावांचा मानस नव्हता. त्या दोघांनाही बाजिरावांच्या जीविताविषयीं विशेष काळजी वाटत असल्यामुळें त्यांच्या सन्निध रहाण्याची इच्छा होती. शिवाय जयसिंगजीं-शीं खासगी वाटाघाट करून राजकन्या व बालकर्ण यांच्या मुक्ततेची कांहीं तात्कालिक तजवीज करतां आली तर ती त्यांना पहावयाची होती. पिलाजी जाधव व तेजकर्ण यांनीं बाजिरावांसन्निध रहाण्याची, इतकेंच काय पण

त्यांनीं आपलें सैन्य थोड्या अंतरावर ठेविलें होतें तें आपणांबरोबर घेण्याची इच्छा दर्शविली; व बाजिरावांनाही सारासार विचाराअंतीं त्या योजनेला मान्यता द्यावी लागली.

  

बाजीराव, सभासिंग, तेजकर्ण, पिलाजी जाधव वगैरे मंडळी त्या रात्रीच्या दुसऱ्या प्रहरीं उज्जयनीकडे रवाना झाली. त्याच रात्रौ मध्यरात्रीच्या सुमाराला सज्जनसिंग व इंद्रकुमारी विक्रमसिंहाच्या आगमनाची वाट पहात शिवालयांत जाऊन थांबलीं. बरोबर मध्यरात्रीच्या सुमाराला त्या देवालयाच्या दरवाजांत एक तरुण येऊन उभा राहिला व आंत डोकावून पाहूं लागला. इंद्रकुमारीला चाहूल लागतांच तिनें देवालयांतील दिवा हातीं घेऊन त्या तरुणाचा चेहरा न्याहाळून पाहिला; पण ओळख कांहीं पटेना. तो तरुण एकदम त्या दोघांना पाहून प्रथम जरा बाचकला. काय बोलावें व काय न बोलावें हेंच त्याला सुचेना. तो बाचकल्याचें पाहून सज्जनसिंगाला संशय आला. संशयाच्या पिशाच्चानें हां हां म्हणतां सज्जनसिंगाच्या अंतःकरणांत एवढें अगडबंब स्वरूप धारण केलें कीं, त्याच्या झपाट्यानें पूर्णपणें पछाडल्या गेलेल्या सज्जनसिंगानें वनवासीविषयींचे सर्व पूर्वदुराग्रह आठवून व त्या तरुणाला वनवासीचाच खलशिष्य मानून, वाघानें कोंकरावर झडप घालावी त्याप्रमाणें त्याच्यावर झडप घातली. इंद्रकुमारीही सज्जनसिंगाच्या साह्यार्थ त्याच्या मागें येऊन जंबिया सरसावून उभी राहिली. तो बिचारा तरुण त्या आकस्मिक हल्ल्यामुळें गांगरून जाऊन मोठ्यानें ओरडला; त्याबरोबर पलीकडील वृक्षछायेखालून कोणी एक व्यक्ति तीरासारखी धांवत पुढें आली. त्या व्यक्तीनें एकदम सज्जनसिंगाचा गळा पकडला. इंद्रकुमारी उजव्या हातीं जंबिया व डाव्या हातीं दिवा अशी पवित्र्यावर पुढें झाली, व ती आपल्या हातांतील जंबिया त्या अज्ञात व्यक्तीवर फेंकणार तोंच तिच्या हातांतील जंबिया खालीं पडला. असें कसें झालें ?

## प्रकरण अठ्ठाविसावें

# ती कोण?

ज्या संकेतस्थलीं बाजीराव व जयसिंग यांची भेट होण्याचें सभासिंगाच्या सांगण्यावरून नक्की झालें होतें, तें ठिकाण म्हणजे उज्जयनीजवळच्या जयगड या नांवाचा भुईकोट किल्ला* होय. जयसिंगाचा एक मुख्य राजवाडा उज्जयनी नगरींत होता, पण कधीं कधीं श्रांत झालेल्या मनाला विश्रांति देण्या-साठीं जयसिंग या जयगडावरील लहानशाच पण टुमदार अशा राजवाड्यांत येऊन राही. मात्र आज जयसिंग जयगडावर आला होता तो हवा पालटण्यासाठीं अथवा आपल्या श्रांत मनाला विश्रांति देण्यासाठींच केवळ आला होता असें नाहीं; तर त्याला आज बाजिरावांची अत्यंत गुप्तपणें भेट घ्यावयाची होती. जयसिंगाचा खास वास्तव्याचा भव्य व विविध विलासविहारांच्या सर्व साधनांनीं संपन्न असा राजवाडा शहाजाद्याच्या तैनातींत अडकून पडला होता व इतर लहानमोठ्या अनेक राजवाड्यांत प्रांतोप्रांतींच्या राजेरजवाड्यांनीं व अमीर उम-रावांनीं वास्तव्य केलें होतें. त्यांतूनही ज्या वाड्यांत जयसिंग शहाजाद्याच्या त्या आगमनप्रसंगीं वास्तव्य करीत होता, त्याच वाड्यांत पाहुण्यांची गर्दी झाली होती. जयसिंगाचा मेहुणा–जयसिंगाच्या आवडत्या धाकट्या राणीचा भाऊ व माधवसिंगाचा–जयसिंगाच्या धाकट्या पुत्राचा मामा–मारवाडाधिपति जगत्सिंग हा नरेंद्रमंडळाच्या बैठकीसाठींच आला होता खरा; पण तो आपल्या परिवारासह आला होता व रहात्या वाड्याचा खरा यजमान असा तोच शोभत होता.

जगत्सिंग हा जयसिंगाच्या धाकट्या राणीचा सख्खा भाऊ होता. त्याला फारशी दानत नव्हती. जयसिंगाच्या राज्यांत सहजासहजीं ढवळाढवळ करण्याची संधि मिळाली तर ती दवडूं नये अशा मताचा तो होता. त्याच्या धाकट्याबहिणीवर अर्थात् माधवसिंगाच्या आईवर त्याचें स्वार्थी प्रेम होतें. निदान तो भगिनी-

---

* उज्जयनीहून भैरवगडाकडे जातांना मध्यंतरीं सुमारें एक मैलाच्या अंतरावर एक भुईकोट क़िल्ला आहे. अलीकडच्या काळांत भारतवर्षांत पूर्वकालीन किल्ल्यांचें महत्त्व अगदीं नष्ट झाल्यामुळें या भुईकोट किल्ल्यांत सध्यां उज्जयनीचा सेंट्रल जेल आहे!

प्रेमाचा बहाणा तर फारच बेमालूम करी. राणीला मात्र सती द्रौपदीच्या पाठीराख्या कृष्णासारखा हा पाठिराखा भाऊ परम प्रिय वाटे. जयसिंगाच्या घरांत जगत्सिंगाचें ठाणें मांडलें गेल्यामुळें साहाजिकपणेंच अभयसिंह, त्याचा परिवार, त्याची धाकटी बहीण, त्याचा भाचा, व जिकडे मूर्ति तिकडे तिची छाया या न्यायानें जयसिंगाची धाकटी राणी आणि माधवसिंग यांचा दासदासीगण ही मंडळी एका बाजूला,व जयसिंग दुसऱ्या बाजूला अशी दुफळी झाली होती. ईश्वरसिंग जयसिंगाचा ज्येष्ठ पुत्र—या कसल्याच भानगडींत नसल्यानें व तो आपल्या वंशांतील अंतःकलह टाळण्यासाठीं सर्व राजवैभवावर लाथ मारण्यालाही सदैव सिद्ध असल्यानें तो अमक्या एका बाजूला होता असें म्हणण्याचें कारणच नाहीं. शिवाय, तो आज जवळ जवळ पंधरा दिवस प्रवासांतच होता. जयसिंगाची मौनसंमति मिळवून बाजिरावांच्या अर्थात् मराठयांच्या सत्पक्षाला विजयश्री जेणेंकरून प्राप्त होईल अशी उपाययोजना करण्याकडे त्याच्या चित्ताचा सारा लय लागून राहिला होता. अलीकडे जयसिंगाच्या जिवाचा खरा विसांवा काय तो तेवढा एकच; व त्याला जयसिंगानें लौकरच युवराज्याभिषेक करून राज्यकारभाराचा आपल्या मस्तकावरील बराचसा भार त्याच्या मस्तकावर टाकण्याचें ठरविलें होतें, हें वाचकांना, पूर्वी हस्तें परहस्तें माहीत झालें आहेच.

यावप्रमाणें जयसिंगाची गृहस्थिति बिघडावयाला व मराठे आणि बादशहा यांची चुरस विकोपाला जाण्याला एक गांठ पडल्यामुळें जयसिंगाचें मन द्विधा झालें होतें. नुसत्या या दोनच अडचणी असत्या तर गोष्ट निराळी होती; पण या अडचणींच्या पोटीं आणखी एक नवी अडचण निर्माण झाली; तिनें तर जयसिंगाची मति अगदीं गुंग करून टाकली. त्या अडचणींचें यथावत् हिडिस स्वरूप वाचकांना पुढें कळणारच आहे.

असो. बाजीराव, पिलाजी जाधव, रावतेजकर्ण व सभासिंग अशी चार मंडळी निवडक सैन्यासह जयगडाकडे यावयाला गणेशतीर्थापासून निघाली, ती सुमारें दोन प्रहर रात्रीला जयगडाजवळ येऊन पोंचली. कोणालाही या हालचालींची यत्किंचित्‌देखील दाद लागूं नये म्हणून बाजिरावांच्या सांगण्यावरून पिलाजी जाधव व रावतेजकर्ण या दोघांनीं जयगडापासून थोड्या अंतरावर जयगड व भैरवगड यांच्या बरोबर मध्यावर एका रमणीय व विस्तीर्ण अशा वनराजीच्या आश्रयानें आपल्या सर्व सैन्याला खडें ठेविलें, व ते दोघे स्वतः हुजऱ्यांचा वेष घेऊन आपल्या वस्त्रांखालीं आपलीं जरुरीचीं सर्व

हत्यारें लपवून बाजिरावांबरोबर निघाले. आज रात्रौ भेटीचा कार्यक्रम पूर्वीच ठरल्यामुळें व शिवाय सभासिंग हा माहीतगार बरोबर असल्यामुळें गडाच्या प्रवेशद्वारावरील पहाऱ्याचें वगैरे कसलेंच भय बाळगण्याचें कारण नव्हतें; इतकेंच काय, पण बाजिरावांची व सभासिंगाचीही अशी अपेक्षा होती कीं, स्वतः जयसिंग गडाच्या प्रवेशद्वारापाशीं पाहुण्यांचें स्वागत करण्यासाठीं खडे असतील.

आणि हेंही खरें कीं, बाजीराव वगैरे मंडळी गडाच्या प्रवेशद्वारांत जाऊन प्रविष्ट होतांच त्यांचें स्वागत झालें; पण तें जयसिंगाकडून मात्र झालें नाहीं. त्याच्याऐवजीं जगत्‌सिंगानें बाजिरावांचें यथायोग्य स्वागत करून त्यांना गौरवपूर्वक राजमहालाकडे येण्याला विनंति केली.

बाजिरावांना विशेषतः सभासिंगाला हा प्रकार चमत्कारिक वाटला. जगत्‌सिंग हा वेळींवखतीं निजामाशीं दोस्ती करण्यालाही कमी करणारा नसल्यामुळें व माधवसिंगाला युवराज्याभिषेक व्हावा यासाठीं काय पाहिजे त्या घालमेली करण्याची त्याची तयारी असल्याचें सभासिंगाला माहीत असल्याकारणानें त्याच्या मनांत सकृद्दर्शनींच दृढ शंका आली कीं, हा गृहस्थ बाजिरावांना गोत्यांत घालून त्या मोबदल्यांत निजाम व जहाजादा यांच्याकडून आपला कार्यभाग साधून घेण्याच्या तर विचारांत नसेल ना ! त्यानें लगेच पिलाजी जाधवांना ससैन्य सावध रहाण्याबद्दल हळूच इषारा दिला. पिलाजी जाधव बाजिरावांच्या शरीररक्षणाचें काम एकट्या तेजकर्णावर सोंपवून स्वतः आपल्या सैन्याकडे निघून गेले.

"राजे जयसिंगजी कुठें आहेत ?" बाजिरावांनीं जगत्‌सिंगामागोमाग मंद गतीनें पाऊल उचलीत विचारलें.

"जयसिंगजी इथेंच आहेत; पण ते थोडे आजारी असल्यानें अंथरुणावर पडून आहेत. त्यांच्यासाठीं व स्वतः माझ्यासाठीं असें उभयतांच्या तर्फेनें मी आपलें स्वागत करीत आहें." जगत्‌सिंग शांतपणें म्हणाला.

सभासिंग जगत्‌सिंगाशीं दृष्टादृष्ट झाल्यापासून एखाद्या कोंडल्या गेलेल्या मांजरासारखा त्याच्याकडे दावाग्निपूर्ण दृष्टीनें पाहात होता. त्याच्या त्या पाहण्यांतील गूढार्थ बाजिरावांच्या तेव्हांच ध्यानीं आला. जयसिंगानें अत्यंत गुप्तपणें बाजिरावांची भेट घ्यावयाचें ठरविलें होतें, व ती कामगिरी तितक्याच गुप्तपणानें सभासिंगाला पार पाडावयाची होती. म्हणूनच सभासिंगानें वेषांतर करून मुसलमानी पेहराव धारण केला होता. त्या पेहरावांत जगत्‌सिंग आपणाला

ओळखतो कीं काय, असें सकारण भय सभासिंगाला वाटत होतें; व त्याची दाबाग्निपूर्ण दृष्टि हें त्याचें द्योतक होतें.

बाजीराव जगत्‌सिंगाच्या तोंडून जयसिंगाच्या आजारीपणाची वार्ता ऐकताच अस्वस्थ चित्त होऊन म्हणाले, "त्यांना एकाएकीं आजारी पडावयाला काय झालें ?"

"त्यांचें असेंच." जगत्‌सिंग उडवाउडवीच्या भाषेत उत्तरला, "अलीकडे ते उगाच मनस्ताप करून घेतात, व तो त्यांच्या प्रकृतीला कांहीं मानवत नाहीं. मग अंथरुणावर पडून राहातात झालें."

"पण आज त्यांना मनस्ताप करून घेण्याला काय कारण झालें ?" बाजिरावांनीं पुन्हा विचारलें.

"विशेष कांहीं झालें नाहीं. आपण अगोदर राजमहालांत जाऊं तर खरे ! मग हळुहळू आपणाला सारें सांगतों." जगत्‌सिंग म्हणाला.

बाजीराव जगत्‌सिंगाच्या शब्दाला आपद्धर्म म्हणून मान्यता देण्याचें स्वतःच्या मनाशीं ठरवून मागें वळून पहात सभासिंगाला म्हणाले, "सागरसिंगजी ! आपण प्रथम राजांची भेट घेऊं."

"होय." असें म्हणून सभासिंगानें आपल्या मनाशीं खूणगांठ मारली कीं, ही भेट संपेपावेतों आपण सागरसिंग आहों.

"ठीक आहे; प्रथम राजांकडे चला. पण मलाही आपली एकदां एकांतांत भेट घ्यावयाची आहे, तें राजांची भेट आटोपल्यावर पाहूं." जगत्‌सिंग म्हणाला. त्याच्या उच्चारांवरून त्याला आपली राजांच्या भेटीची योजना फारशी रुचली नाहीं असें बाजिरावांना, व तेजकर्ण आणि सभासिंग यांनाही दिसून आलें. पण त्यांनीं मुद्दामच तिकडे कानाडोळा केला.

थोड्याच वेळांत मशालींच्या झगझगीत प्रकाशांत बरोबरच्या मंडळींसह जगत्‌सिंग राजप्रासादांतील एका सुसज्जित महालापाशीं येऊन पोंचला. त्याबरोबर एक हुजऱ्या पुढें येऊन मुजरा करून उभा राहिला.

"याच महालांत राजे विश्रांति घेत आहेत. आपण आंत जा." जगत्‌सिंग समोरच्या नोकराकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाला, "हा माणूस आपणांला आंत राजांपाशीं घेऊन जाईल." त्यानें त्या हुजऱ्याला विचारलें, "राजे जागे आहेत का ?"

"बहुधा सरकारस्वारी जागी असेल." हुजऱ्या उत्तरला.

"बरें; यांना मग राजांच्या भेटीचें कार्य आटोपल्यावर माझ्या महालांत घेऊन ये." असें हुजऱ्याला सांगून जगतसिंग माघारीं जाऊं लागला.

सभासिंग तें पाहून जगत्‌सिंगाचा डोळा चुकवून बाजिरावांच्या कानाशीं लागून म्हणाला, "श्रीमंत ! जगत्‌सिंगजींना आपण कोणत्या तरी निमित्तानें इथेंच ठेवून घ्या. आपण बाहेर पडेपावेतों ते आपल्या डोळ्यांसमोर असलेले चांगले."

बाजिरावांना चटकन सभासिंगाची सल्ला पटली. त्यांनीं सभासिंगालाच सांगितलें, "जा, त्यांना आम्ही बोलावतों असें सांगा."

जगत्‌सिंग फार दूर गेला नव्हताच. तो सुमारें पन्नास पावलें गेला असेल नसेल तोंच त्याला सभासिंगानें—नव्हे सागरसिंगानें गांठलें व बाजीराव पेशवे मागें बोलावीत असल्याचें त्याला लवून मुजरा करून सांगितलें. बोलतांना आपणाला जगतसिंग ओळखील कीं काय हें भय सभासिंगाला होतेंच. म्हणून त्यानें मुद्दाम आपला आवाज बदलला होता.

जगत्‌सिंगाला हांक मारण्याला सभासिंग गेला तों इकडे बाजिरावांनीं प्रथम सर्व शिष्टाचार बाजूला ठेवून त्या महालांत प्रवेश केला. हुजऱ्यानें त्यांना त्या महालाच्या आंतील एका सुसज्जित दालनांत, जयसिंग एका आरामशीर कोचावर पहुडला होता तेथवर नेलें. त्यांना पहातांच जयसिंगानें उठून त्यांना मिठी मारली व भेट झाल्याबद्दल परम संतोष व्यक्त केला.

बाजिरावांनीं तेजकर्णाला जगतसिंगावर नजर ठेवावयाला सांगून जयसिंगाला म्हटलें, "हें पहा जयसिंगजी ! आमच्या गुप्त भेटीची बातमी फुटूं नये पण फुटली, त्याला इलाज नाहीं. आतां आपण एवढेंच करा; ही वेळ एकमेकांच्या गल वृत्ताच्या चौकशीनें साजरी होऊं दे. आपणांला आमच्याशीं ज्या महत्त्वाच्या गोष्टी बोलावयाच्या असतील, त्या बोलण्यासाठीं आपण आणखी एका प्रहरानें या किल्ल्याबाहेरील वनराजीपाशीं या. तेथें आम्ही थांबतों." एवढें बोलत बोलत बाजीराव त्या दालनांतून बाहेरच्या बैठकखान्यांत येऊन उभे राहिले.

जयसिंगानें बाजिरावांच्या त्रुटित शब्दांतील गूढार्थ ध्यानीं घेऊन 'बरें आहे' या एका शब्दांतच त्यांची प्रसंगोचित बोळवण केली, व हुजऱ्याला सांगितलें "हें पहा, जगतसिंगजींनीं अथवा आणखी कोणीं विचारलें तर मी झोंपीं गेलों आहें व सूर्योदयापावेतों कोणीं झोंपेंतून उठवूं नये असें सांग."

" जशी सरकारांची आज्ञा ! " असें म्हणून हुजऱ्या बाहेर गेला.

सुदैवानें जगत्‌सिंगालाही आंत येण्याला थोडा अवकाश लागला, म्हणून सर्व शोभून गेलें. बाजीराव इतक्या रात्रौ तेथें कां आले वगैरे माहिती जगत्‌सिंगाला मुळींच नव्हती. ती माहिती मिळविण्यासाठीं जगत्‌सिंगानें सभासिंगाला बाहेरच्या बाहेर गांठून त्याच्याकडून माहिती काढण्याचा प्रयत्न केला. पण सभासिंग कसला वस्ताद ! तो त्याला थोडीच दाद देतो !

असो. जगत्‌सिंग बैठकखान्यांत येतो तों बाजीराव तेथें जणुं काय जगत्‌सिंगासाठींच तिष्ठत उभे !

" श्रीमंतांनीं मला कां बोलावलें ? मी मुद्दाम गेलों तो अशासाठीं कीं, श्रीमंतांना राजांशीं कांहीं खासगी बोलावयाचें असल्यास तें बोलण्याची पूर्ण मुभा मिळावी." जगत्‌सिंग म्हणाला.

आतां बाजीराव आपणाला जयसिंगाचें आमंत्रण गेलें असल्याबद्दलचें बोलून जातात कीं काय, या भयानें ती फजिती टाळण्यासाठीं सभासिंग मध्येंच सूचनार्थ उद्गारला, " महाराजांना मीं सांगितलें कीं, श्रीमंत आज सहज जयसिंगजींना भेटण्यासाठीं आले होते. जयसिंगजींनीं निमंत्रण पाठविलें असल्याचें हे सांगतात; पण आपणाला तर या क्षणापावेतों तसें आमंत्रण मुळींच पोंचलेलें नाहीं ! "

बाजिरावांनीं 'ता' म्हणतांच 'ताकभात' असें ओळखलें. पण तिकडे जणुं आपलें लक्ष्यच नाहीं असें दर्शवून जगत्‌सिंगाच्या प्रश्नाला उत्तर दिलें, " उद्यांच्या नरेंद्रमंडळाच्या बैठकीच्या बाबतींत राजांशीं आम्हांला कांहीं विचारविनिमय करावयाचा होता; म्हणून आम्ही मुद्दाम इकडे आलों."

" पण मग आपणाला जर राजांचा निरोप पोंचला नाहीं असें आपलें म्हणणें, तर राजे इथें आहेत हें आपणाला कसें कळलें ? " जगत्‌सिंगानें अंमळ गुतांगुतीचा प्रश्न विचारला.

जगत्‌सिंगानें याप्रमाणें संशयाचें जाळें विणण्याचा उपक्रम केलेला पहातांच बाजीराव जास्त सावधपणानें बोलूं लागले, " वाः ! जगत्‌सिंगजी ! इतके दिवस—नव्हे इतकीं वर्षें एकमेकांना परिचित असणाऱ्या आम्हांला एकमेकांच्या मामुली हालचालीदेखील जर ओळखतां आल्या नाहींत, तर मग आम्हीं राजकारणें कशाला करावीं ? "

" बरें; आपणाला राजांची भेट घ्यावयाची आहे ना ?" जगत्‌सिंगानें विचारलें.

" होय. पण आपण आमच्याबरोबर असलां म्हणून कोठें बिघडलें ? परवांच्या बैठकीचे आपणही राजांप्रमाणें एक प्रमुख घटक आहांतच, व आमच्या दृष्टीनें राजांपेक्षां आपल्याच शब्दाला उद्यांच्या बैठकींत जास्त किंमत येणार आहे. आपण स्वतंत्र राजे या नात्यानें बैठकींत हजर राहणार, तेव्हां आम्हीं आरंभिलेल्या उद्योगांचें भवितव्य सर्वस्वीं आपणासारख्यांच्या शब्दावर अवलंबून आहे."

" मला वाटलें कीं, आपणाला राजांची खासगी भेट घ्यावयाची असेल; म्हणून मी दूर गेलों." जगत्‌सिंग म्हणाला, " आतां आपला आग्रह असेल अगर हरकत नसेल तर आपणाबरोबर राहण्याला माझी मुळींच हरकत नाहीं." लगेच त्यानें हुजऱ्याला विचारलें, " राजे काय करीत आहेत ? "

" सरकारस्वारीचा नुक्ताच डोळा लागला आहे व सूर्योदयापावेतों कोणींही आपली झोंपमोड करूं नये असा सरकारस्वारीचा हुकूम असल्याचें परिचारक सांगतो." हुजऱ्या हात जोडून नम्रतापूर्वक म्हणाला.

" आतां कसें करणार ? " जगत्‌सिंगानें बाजिरावांना विचारलें.

" राजे आजारी असतील तर केवळ आपल्यासाठीं त्यांची झोंपमोड करण्याचें कारण नाहीं. परवां त्यांची व आमची भेट होणारच आहे." बाजीराव अगदीं शांतपणानें म्हणाले.

" तर मग चला; आपण आपल्या महालांत थोडा वेळ बसूं." जगत्‌सिंग म्हणाला.

" चला." बाजीराव म्हणाले.

लगेच बाजीराव, तेजकर्ण व सभासिंग—नव्हे सागरसिंग, ही मंडळी जगत्‌सिंगाबरोबर त्या महालाबाहेर पडली, व त्याच्या मागोमाग त्याच्या महालाकडे निघाली. बाजीराव तेवढ्यांत जातां जातां जयसिंगाच्या हुजऱ्याला म्हणाले, " आम्ही केव्हां बाहेर येतों तें लक्ष्य ठेवून राजांना कळीव."

जयसिंगाच्या जिवाला जीव देणाऱ्या त्या एकनिष्ठ सेवकानें एकंदर परिस्थिति ध्यानीं घेऊन बाजिरावांना होकार दिला, तोही नुसत्या मानेनें दिला.

इतकें झालें तरी जगत्‌सिंग आज नेमका त्या जागीं कां व कसा आला हा प्रश्न सुटावयाचाच होता.

जगत्सिंगाचा महाल म्हणजे जयगडावरील जुना राजमहाल. जयसिंगाचें वास्तव्य तेथें ज्या महालांत होतें त्या नव्या महालापासून तो अवघा शंभर कदमांच्या अंतरावर होता. त्या राजमहालाच्या दरवाजापाशीं जातांच जगत्सिंग बाजिरावांना म्हणाला, "श्रीमंत ! आपल्या धाकट्या वहिनीसाहेब मुद्दाम आपल्या आगमनाची वार्ता ऐकून आपल्या भेटीसाठीं इथें आल्या आहेत, व त्यांचे चिरंजीव माधवसिंगजीही त्यांच्याबरोबर आहेत."

"अस्सें ? वा ! मग तर फारच छान ! पण राणीसाहेबांना मुद्दाम इकडे येण्याचें काय कारण ?" बाजिरावांनीं मनांतलें आश्चर्य शक्य तों मनांत लपविण्याचा प्रयत्न करीत विचारलें.

"तें आतां आपणाला कळेलच." जगत्सिंग राजमहालांत प्रविष्ट होतां होतां म्हणाला, "आम्हांला आपणाशीं कांहीं अत्यंत महत्त्वाच्या कामीं विचारविनिमय करावयाचा आहे. आपल्याबरोबरची ही मंडळी थोडा वेळ अलीकडच्या बैठकखान्यांत बसली तर कांहीं हरकत आहे का ?"

बाजीराव क्षणभर—फक्त क्षणभरच स्वतःशीं विचार करून व 'काय होईल तें होईल. देव तारी त्याला कोण मारी' अशी मनाची मनोमन समजूत करून प्रगटपणें उत्तरले, "कांहीं हरकत नाहीं."

सर्व मंडळी आंत गेल्यावर तेजकर्ण व सभासिंग यांना जगत्सिंगाच्या आज्ञेवरून एका परिचारकानें एका प्रशस्त दालनांत नेऊन बसविलें. राणी व माधवसिंग हीं नांवें ऐकून सभासिंगाच्या तोंडचें पाणी पळालें होतें कीं—राणीनें किंवा माधवसिंगानें आपणाला ओळखल्यास पुढें काय गत होईल ? पण परमेश्वरानेंच त्याची चिंता निवारण केली.

जगत्सिंगासह बाजीराव त्या राजमहालांतील सुशृंगारित दिवाणखान्यांत जातात तों त्यांचें स्वागत करण्यासाठीं एक तरुण व सौंदर्यसंपन्न अशी बहुमोल वस्त्रालंकारभूषित स्त्री दरवाजांत उभी ! ती कोण ?

प्रकरण एकोणतिसाव

# राणीची भेट

ती राणी होती. त्या काळीं तरी उभ्या राजस्थानांत ज्या स्त्रिया अत्यंत रूपवती म्हणून विख्यात होत्या व ज्यांच्या पाणिग्रहणासाठीं त्या त्या वेळीं राजस्थानांतील यौवनवैभवसंपन्न रजपूत राजपुरुष जणुं झुरणीला लागलेले होते, अशा अगदीं थोड्या सौंदर्यवती राजस्त्रियांपैकीं राणी ही एक होती. तशांत ती सर्व रजपुतांत पुरातन व पवित्र मानिलेल्या मेवाडच्या राजकुलांत जन्मलेली असल्यानें तर त्या काळीं तिच्यासारखी सर्वतोपरी परमश्रेष्ठ राजकन्या तीच होती, व ती जयसिंगाला लाभली होती.

बाजिरावांची भेट घेण्यासाठीं उत्सुक झालेल्या स्त्रियांना त्या वेळीं सामान्यतः कोणत्याही राजमहालांत व श्रीमंतांच्या वाड्यांत वाण नव्हती. वास्तविक सौंदर्य—व त्यांतून शौर्य-धैर्यादि गुणांनीं कौस्तुभाप्रमाणें तेजाळणारें सौंदर्य—ही मनुष्यमात्राची उपास्य वस्तु व्हावी ही जगाची रीतच आहे, व बाजीराव त्याला अपवाद नव्हते. त्याप्रमाणेंच समाजांतील इतर स्त्रियांना बाजिरावांचें सौंदर्य पाहून आनंद वाटत नसे असेंही नाहीं. असें असतांही एथें राजस्त्रियांचाच व इतर श्रीमानांच्या स्त्रियांचाच उल्लेख करण्याचें कारण—कामुकतेचें पिशाच्च सामान्यतः सत्तासुखसंपन्न पुरुषाप्रमाणेंच त्यांच्या स्त्रियांना जास्त पछाडीत असतें. बाजिरावांचा इतक्या दिवसांचा अनुभवही असाच होता.:: त्यामुळें राणीनें भेट घेण्याचा प्रयत्न केल्याचें निदर्शनाला येतांच त्यांच्या मनांत पूर्वानुभवाच्या स्मृति जागृत होऊन त्यांनीं एका विशिष्ट दृष्टीनें राणीकडे पाहिलें. त्या पहिल्या दृष्टभेटींतच राणीच्या गहिऱ्या नजरेंतील चांचल्य त्यांच्या अनुभवाला आलें. राणीलाही बाजिरावांना डोळांभर पाहून आत्यंतिक आल्हाद झाला.

राणीला बाजिरावांची कोणीं ओळख करून देण्याचें कारणच पडलें नाहीं.

---

:: पेशव्यांच्या बखरींत व महाराष्ट्राच्या विविध इतिहासकथांत बाजिरावांवर निजामाच्या जनानखान्यांतील बेगमांसारख्या थोर स्त्रियादेखील मोहित झाल्याचे दाखले सांपडतात.

राणीनें त्यांना व त्यांनीं राणीला तात्काळ ओळखलें. राणी त्यांना म्हणाली, "श्रीमंतांची भेट घेण्यासाठीं मी मुद्दाम आज इथें तिष्ठत उभी आहें."

"राणीसाहेबांना आमच्यासाठीं फार श्रम पडले !" बाजीराव म्हणाले.

याप्रमाणें प्रारंभींचा मासुली 'परस्परं प्रशंसन्ति' संस्कार उरकल्यावर राणीच्या सांगण्यावरून त्यांच्या मागोमाग बाजीराव आंत गेले. जगत्सिंग त्यांच्याबरोबर होताच. आंतील सुसज्जित दिवाणखान्यांत जातांच जगत्सिंगानें बाजिरावांना दिवाणखान्याच्या मध्यभागीं मांडण्यांत आलेल्या तीन उच्चासनांपैकीं एका उच्चासनावर बसविलें, व त्यांच्याजवळचें उजव्या बाजूचें उच्चासन स्वतः ग्रहण केलें. राणी बाजिरावांच्या डाव्या बाजूच्या उच्चासनावर विराजमान झाली.

राणी व जगत्सिंग या दोघांनाही उद्देशून बाजीराव म्हणाले, "आपणांकडून आमची जितकी लौकर मोकळीक होईल तितकें चांगलें. कारण आपण जाणतांच कीं, आमच्यासारख्यांच्या मार्गे राजकारणाच्या सत्राशेंसाठ भानगडी नेहमींच असावयाच्या."

"गोष्ट कबूल आहे, आणि आम्हींही तुम्हांला आज मुद्दाम एथें पाचारण केलें, तें अशाच कांहीं राजकारणाच्या भानगडींबाबत विचारविनिमय करण्यासाठीं." जगत्सिंग बोलूं लागला, "आपण मला अगोदर सांगा, सध्यां ज्या आवर्तांत आपण सांपडलां आहां, त्यांतून सहज अनायासें बाहेर पडतां येईल अशी आपली खात्री आहे काय ?"

जगत्सिंगाचा तो प्रश्न विद्युल्लतेच्या चमकीप्रमाणें बाजिरावांना भासला. त्यांच्या संशयित मनाला वाटलें कीं, आपणाला या बसल्या जागीं दगा देण्याचा या मंडळीचा बेत आहे. त्याबरोबर त्यांनीं आपल्या कमरपट्ट्यांतील तरवारीला हात घालीत बसल्या जाग्यावरून ताड्कन् उठून कडर्या स्वरांत विचारलें, "आम्हांला विश्वासघातानें दगा देण्याचा आपला विचार आहे काय ?"

तेजकर्ण व सभासिंग हे पलीकडच्या दालनांत बसले असले तरी त्यांचीं कर्णेंद्रियें फार तीक्ष्ण बनून जवळच्या दालनांतील बाजीराव वगैरे मंडळीचा संवाद ऐकण्यासाठीं सज्ज होतीं. आपणांवर कोणाचाही प्रत्यक्ष डोळा नाहीं असें पाहून ते दोघेही आपल्या दालनाच्या दरवाजांत उभे राहून सारें ऐकत होते. बाजिरावांचे उद्गार कानीं पडतांच ते दोघेही आपलीं शस्त्रें सरसावून त्या बैठकखान्याच्या दरवाजापाशीं पण अंमळ आडवशाला येऊन सावधपणें उभे राहिले.

बाजीराव एकाएकीं असे वर्दळीवर आल्याचें पाहून राणीदेखील विस्मयचकित होऊन गेली, व जगत्‌सिंगाच्या तोंडाकडे टकमक पाहूं लागली. पण त्या समजुतीच्या घोटाळ्याचें निराकारण जगत्‌सिंगाच्या शब्दांनीं ताबडतोब झालें. तो बाजिरावांना शांत रहाण्यासाठीं काकुळतीच्या शब्दांनीं विनंति करीत म्हणाला, “ श्रीमंत ! आपण अगोदर शांत व्हा. आपण माझ्या बोलण्याचा भलताच अर्थ घेतला. मराठे व निजाम यांच्यांत जो निकराचा झगडा सध्यां सुरू आहे, त्याला अनुलक्षून मी बोललों.”

विद्युल्लता चमकली, पण सारी क्षणभरच ! बाजिरावांना जितका लौकर संशययुक्त संताप आला तितक्या लौकर त्यांच्या संशयाचें निराकारण होऊन संतापशमन झालें. ते आपल्या उतावळेपणाबद्दल आपणालाच मनांतल्या मनांत दोष देत जगत्‌सिंगाला म्हणाले, “ जगत्‌सिंगजी ! आमचा गैरसमज झाला, त्याबद्दल आम्हांला क्षमा करा.”

राणी कोमल स्वरांत बाजिरावांना म्हणाली,“ श्रीमंत! आपल्यासारख्या थोरांच्या दर्शनानें पावन झालेल्या पाषाणालाही संतोषाच्या भरांत फुलें फुलावीं, त्या आपणाला असा दगा देण्यासारखें नीच कृत्य ज्या बैठकींत राणी आहे त्या बैठकींत होईल असें आपणाला वाटलें तरी कसें ! ”

“ तो विषय आतां संपला.” जगत्‌सिंग पुन्हा मूळ मुद्द्यावर येऊन म्हणाला, “ श्रीमंत ! आपणाला वेळ फार थोडा आहे, व आम्हांलाही हातीं घेतलेल्य कार्याच्या महत्त्वाच्या दृष्टीनें ही बैठक शक्य तितकी लौकर आटोपणें अवश्य आहे. सध्यां आपल्या म्हणजे मराठ्यांच्या पक्षाची सर्व बाजूंनीं कशी पांगापांग व बेजूग झाली आहे हें आपण जाणतांच.”

“ नाहीं. आम्हांला तसें वाटत नाहीं. ” बाजीराव म्हणाले. त्यांना बहुतेक सर्व गोष्टींची खबर होती. परंतु बोलण्याच्या भरांत या बैठकींत कांहीं नवीन माहिती मिळाली तर चोराची लंगोटी हातीं सांपडली तेवढीच सई अशा विचारानें त्यांनीं मुद्दाम ‘ना-नकळे’चा सामला सुरू केला.

जगत्‌सिंग पूर्वीपेक्षां किंचित् आढ्यतेनें म्हणाला, “ असें पहा, आम्ही बोलून चालून आपल्या प्रतिपक्षाचे लोक आहोंत हें आपणाला माहीत आहेच.—”

" पण तें आम्हांला माहीत असलें तरी मायदेशाच्या मंगलाची जबाबदारी जशी आम्हां मराठ्यांच्या शिरावर आहे तशीच आपणां रजपुतादि हिंदूंच्याही शिरावर असून ती न ओळखण्याइतके आपण अजाण असाल असें आम्हीं म्हटल्यानें आपला अपमान केल्यासारखें होईल. साऱ्या थोर थोर रजपुतांनीं मुसंड्यांसमोर माना नमविल्या, मुसंड्यांशीं सोयरिकी करून आपल्या पाक कुळाला बट्टा लावला; पण एकट्या मेवाडच्या राजवंशानें मात्र सर्वतोपरी नांव राखलें. ऐन संकटाच्या वेळीं याप्रमाणें स्वत्व गाजविणाऱ्या धीरोदात्त शिसोदिया वंशांत जन्मलेल्या आपणाला आज बादशाहीच्या पडत्या काळाचा योग्य फायदा घेण्याची इच्छा होणार नाहीं असें कोणीं कसें म्हणावें ? " बाजीराव उद्गारले. त्याच वेळीं त्यांनीं स्वगत उद्गार काढले, " शहाण्याला मार शब्दांचा; मूर्खाला टोणप्यांचा ! "

शब्दांचा मार जाणण्याइतकें तरी शहाणपण जगतसिंगाच्या अंगीं खास होतें. बाजिरावांच्या त्या साखरघोळ कानउघाडणीचा जगतसिंगाच्या मनावर बराच परिणाम झाला. ते शब्द स्तुतिवाचक आहेत असें त्याला मुळींच वाटलें नाहीं व त्याला त्याबद्दल मनांतून बाजिरावांचा रागही आला. पण तो त्यानें जनांत बोलून मात्र दाखविला नाहीं. तो बाजिरावांच्या बोलण्याला बगल देण्याच्या कावेबाजपणाच्या इरादानें म्हणाला, " श्रीमंत ! आपलें व आमचें ध्येय एक आहे हें नव्यानें सांगावयाला नकोच, व आपले जयसिंगजीही त्याच ध्येयाला चिकटून राहाणारे आहेत. पण त्या ध्येयसिद्धीचे मार्ग प्रत्येकाचे निरनिराळे असणें शक्य आहे."

" निःसंशय शक्य आहे. पण त्यांत प्रश्न एवढाच आहे—विचार एवढाच करावयाला हवा असतो कीं, आपण चोखाळीत असलेला मार्ग ध्येयाकडेच जातो किंवा अन्य कोठें जातो ? " बाजीराव उद्गारले.

" श्रीमंत ! खुल्या दिलाच्या बैठकींत असली घालून-पाडून बोलण्याची भाषा असू नये असें मला वाटतें." राणी म्हणाली, " आम्हांला—मला काय किंवा जगत्सिंगजींना काय, आपणांइतकीच देशोद्धाराची कळकळ वाटते, म्हणून तर आम्ही आज इतके श्रम घेऊन आपल्या आगमनाची वार्ता कळतांच एथें आलों. वास्तविक राजांनीं आम्हांला चोरून आपणाला आमंत्रण देण्याची कांहीं आवश्यकता नव्हती. असो. आपली व राजांची भेट झाली नाहीं वाटतें ? "

" नाहीं. राजे झोंपीं गेले आहेत." बाजीराव आपणाला जयसिंगाचें निमंत्रण आलें होतें ही गोष्ट पुढील धोरणाकडे लक्ष्य देऊन वेळींच नाशाबीत करण्याच्या अंतस्थ इरादानें म्हणाले, " आणि राणीसाहेब ! आम्ही आज आलों ते राजांच्या निमंत्रणावरून आलों नाहीं ! इतर कांहीं जरुरीच्या कामासाठीं या बाजूला आलों होतों, तेव्हां सहज म्हटलें कीं, राजांची इथें भेट झाली तर पहावी."

" असो. कोणत्याही निमित्तानें कां होईना; पण आपली भेट झाली, व तीही नरेंद्रमंडळाच्या बैठकीपूर्वी झाली." जगतसिंग म्हणाला.

" आम्हांला याचा अर्थच कळत नाहीं !" बाजीराव जगतसिंगाचें बोलणें पूर्णपणें ऐकून घेण्यापूर्वीच म्हणाले, " यावरून असें वाटतें कीं, नरेंद्रमंडळाच्या बैठकींतील भवितव्य आपणा उभयतांना माहीत असावें !"

" होय. तें आम्हांला माहीत आहे. इतकेंच काय, पण त्या भवितव्याची निर्मिति ही बहुतांशीं आमच्या हातीं आहे. आपत्कालानें आम्हां सर्वच राजस्थानवासी रजपुतांना गांजून टाकलें आहे खरें; पण तरीही मेवाडनें आपलें थोर नांव अजून कायम राखलें आहे. आपणाला कदाचित माहीत नसेल म्हणून सांगतों कीं, विक्रमसिंहजींच्या स्वातंत्र्यसंघाचा पहिला नेता हा मेवाडाधीश जगत्सिंगच होता. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, वर्तमानकाळींही मेवाड ही एक जबरदस्त शक्ति आहे असें निजामाला, वजिराला, शहाजाद्याला व बादशहालाही वाटतें; म्हणून तर सध्यां पेंचांतून पार पडण्याचा मार्ग शोधण्यासाठीं त्याला आमची संमति घेणें भाग पडलें."

" एकूण परवांची राजसभा ही आमच्याशीं तडजोडीची वाटाघाट करण्यासाठीं भरावयाची नाहींच तर ?" बाजीराव उद्गारले.

जगत्सिंग उत्तरला, " होय. पण निजामांची नेहमींचीच वृत्ति अशी कीं, त्याचे दाखवायचे दांत निराळे असतात व खायचे दांत निराळे असतात. त्यानें बाह्यात्कारीं आपणांशीं तडजोडीची वाटाघाट करण्यासाठीं परवांची सभा बोलावली आहे हें खरें. परंतु त्या सभेचा खरा हेतु आमच्याशीं तडजोड करण्याचा आहे."

" आपणाशीं म्हणजे ?"

" आमच्याशीं म्हणजे सामान्यें करून आम्हां सर्व रजपूत राजांशीं व विशेषतः आमच्याशीं ! कारण बरेच रजपूत राजे कोणत्या ना कोणत्या निमित्तानें बादशाही

सत्तेच्या ताटाखालील मांजरें बनलेले आहेतच. त्यांच्याशीं तडजोड करण्याची निजामाला तत्त्वतः काय गरज ? "

" हें आपलें विधान सत्य तर आहेच; पण शिवाय तें आपल्या तोंडून निघाल्यामुळें त्याला विशेष महत्त्व आहे. बरें, पण आपण परवां भरणाऱ्या बैठकीविषयीं काय म्हणत होतां ? "

" परवांच्या बैठकींत आमची भूमिका कोणती तें आतां आपल्या साक्षीनें ठरवून टाकण्याचा माझा मानस आहे. माळवा-राजपुतान्यांतील बहुतेक सारे राजे-रजवाडे व ठाकूर-चौधरी मेवाडच्या मागून चालावयाला तयार आहेत हें आपण जाणतांच."

बोलतां बोलतां बाजिरावांच्या अंतरंगाचा ठाव घेण्याचा प्रयत्न जर जगत्‌सिंगानें केला असता, तर आपण उपड्या घागरीवर पाणी ओतीत असल्याचें त्याच्या ध्यानीं आलें असतें.

## प्रकरण तिसावें

# समेट संपला !

मेवाडचें राज्य म्हणजे वेजीं उतरलेलें मोतीं आहे. विशेषतः जगत्‌सिंगाच्या कारकीर्दींत मेवाडची अतिशय नापत झालेली आहे, हें बाजीराव पूर्णपणें ओळखून होते; व निजामार्शी त्याप्रमाणेंच दिल्लीदरबारांतही जगत्‌सिंगाला किती मान आहे हेंही त्यांना माहीत होतें. असें असतांही त्यांना त्या वेळीं निष्कारण वाद विकोपाला न्यावयाचा नसल्यानें त्यांनीं जगत्‌सिंगाच्या होला हो ठोकून दिली.

"आतां आपणाला जर आपल्या अंगीकृत कार्यांत आमचें साहाय्य हवें असेल, तर आपणही कांहीं गोष्टींत आम्हांला साहाय्य करण्याला तयार झालें पाहिजे." जगत्‌सिंग म्हणाला.

"श्रीमंत ! दे वाण घे वाण हा जगाचा रोजचाच व्यवहार आहे." राणी म्हणाली.

"आम्हीं आपणांला कोणत्या गोष्टींत साहाय्य करावें अशी आपली इच्छा आहे ?" बाजिरावांनीं जगत्‌सिंग व राणी या दोघांना अनुलक्षून प्रश्न केला.

"मेवाडच्या राजकुलाविषयीं आपणाला अत्यंत अभिमान वाटतो ना !" जगत्‌सिंगानें विचारलें.

"यांत काय संशय ! हा प्रश्नच तुम्हीं आम्हांला विचारावयाला नको होता."

"मेवाडच्या राजघराण्याची थोरवी आपणाला मान्य आहेच, त्याअर्थी ती थोरवी यावच्चंद्रदिवाकरौ अखंड टिकावी, इतकेंच काय पण ती दिवसेंदिवस शुक्लेंदुवत् वर्धमान व्हावी असें आपणाला वाटत असलेंच पाहिजे. खरें ना ?"

"तर मग या मेवाडच्या वंशांकुराला राजवैभवाची जोड मिळण्यासाठीं आपण शक्य तेवढा हातभार लावाल असेंच मी गृहित धरून चालतें." राणी बोलूं लागली, "श्रीमंत ! मी मेवाडची राजकन्या आहें. मेवाडच्या राजघराण्याची पवित्रता ध्यानीं घेऊन रजपुतांतील शिष्ट जनांनीं आपल्या सदाचारानें असा दंडक घालून दिला आहे कीं, मेवाडच्या राजकन्येच्या उदरीं जो राजपुत्र जन्माला आलेला असेल, तो वयानें कनिष्ठ असला तरी मान्यतेनें श्रेष्ठ समजला जावा व तोच राज्याचा अधिकारी व्हावा. मी मेवाडची राजकन्या आहें व माधवसिंग

हा माझा एकुलता एक पुत्र आहे. मीं आतां आपणाला सांगितलें त्याप्रमाणें आतां राजांचें वय होत असल्यामुळें त्यांच्या मस्तकावरील राज्यकारभार हल्का होण्या-साठीं—देवदयेनें त्यांना पुत्रप्राप्ति झाली आहे—युवराजाची नेमणूक होणें अवश्य आहे. तो युवराज्याभिषेक माझ्या पुत्राला व्हावा अशी माझी इच्छा आहे.''

"आणि राणीच्या इच्छेला पूर्ण विचारांतीं माझी पूर्ण अनुमति आहे.'' जगतसिंग म्हणाला.

राणी पुढें बोलूं लागली, "श्रीमंत! आपल्या कानांपर्यंत या गोष्टीचा बोभाटा आणण्याचें कारण राजांची बुद्धि अलीकडे असावी तितकी स्थिर नाहीं. राजांचा विचार आपल्या ज्येष्ठ पुत्राला—ईश्वरसिंगाला युवराज्याभिषेक करण्याचा आहे, व ते आपला हेका सोडावयाला कांहीं केल्या तयार नाहींत. यास्तव आपण राजांवर वजन टाकून त्यांना ताळ्यावर आणलें पाहिजे. एवढी कामगिरी आपण कराल तर आम्ही आपले आहोंत. मग आम्हांला आपल्या हिंदुपदपादशाहीच्या उद्योगा-विषयीं पूर्ण आदर आहे, व निजामाशीं उत्पन्न झालेला आपला झगडा समाधान पूर्वक तोडण्यालाही आमची तयारी आहे.'' राणी बाजिरावांच्या चर्येवरील विस्मयाच्या छटा पाहून व त्यांवरून दर्शित होणारा भाव मार्मिकपणें ओळखून अंमळ रागानें म्हणाली, "श्रीमंत! मी एक बायको माणूस प्रचलित राजकारणा-विषयीं इतक्या आत्मविश्वासानें बोलतें आहें हें ऐकून आपणाला अचंबा वाटत असेल, व बायकोच्या बोलांना काय मोल द्यावयाचें असें वाटत असेल, तर आपण एवढें ध्यानीं ठेवा कीं, माझ्या—या मेवाडच्या राजकन्येच्या 'मी' या शब्दांत सामर्थ्याचें ब्रह्मांड सांठविलेलें आहे. आपणाला फार काय सांगूं; श्रीमंत! आपण जर जास्त चौकशी कराल तर आपली अशी देखील खात्री होईल कीं, प्रत्यक्ष निजामापाशीं—आजच्या मरणोन्मुख बादशहातींत नवचैतन्य ओतणाऱ्या निजामापाशींही या राणीची एवढी पत आहे कीं,—तिचा शब्द तिथें कधीं वायां जायचा नाहीं.''

" आतां श्रीमंत! आपणाला मी स्पष्टच सांगतों, अंबराधिपतींच्या कनिष्ठ राजपुत्राला अर्थात् मेवाडच्या राजकन्येच्या पुत्रालाच युवराज्याभिषेक व्हावा व अंबराधिपतींच्या पश्चात माधवसिंगच अंबराधिपति व्हावा, अशी सर्व तजवीज आम्हीं आधींच करून ठेविली आहे. निजामाचें आमच्या योजनेला पूर्ण पाठबळ असल्यानें राजांना ही गोष्ट मनापासून रुचत नसली तरी त्यांना नाइलाजास्तव ती

मान्य करावी लागेल; व इतकेंही करून राजांना ती मान्य न झाली तर त्या अमान्यतेबद्दल त्यांना राजत्यागासारखें जबरदस्त मोल द्यावें लागेल. पण एवढ्या थराला गोष्टी जाऊं नयेत म्हणून—आपण राजांचे जीवश्चकण्ठश्च स्नेही, आपला शब्द राजे खात्रीनें मानतील असा आम्हांला भरंवसा आहे, म्हणून आपणाला एवढें निवेदन करावें लागलें."

" एकूण आपणां उभयतांच्या एथवरच्या भाषणाचा तात्पर्यार्थ काय, कीं आपण आमच्या विरुद्ध जाल याला भिऊन आम्हीं आपल्या तंत्रानें वागावें; होय ना ? " त्या बहीण-भावंडांच्या चढेलपणाच्या भाषणानें बाजिरावांना चीड आली. आपलें मन शांत ठेवण्याचा त्यांनीं आपल्या मतें शिकस्तीचा प्रयत्न केला. पण तो अखेर साधूं शकला नाहीं. ते बोलतां बोलतां आणखी एका कलेनें स्वर चढवून जगत्‌सिंगाकडे वळून म्हणाले, " जगत्‌सिंगजी ! तुमचें शस्त्रग्रहण ही काय चीज आहे हें आम्हांला माहीत नाहीं अशी तुमची समजूत झालेली दिसते. पण तुम्हीं एवढें ध्यानीं ध्यावयाला पाहिजे कीं ज्या पेशव्यांनीं सर्व बादशहातीला आपल्या दराऱ्यांत दाबून ठेवणाऱ्या व कृतान्तकाळाप्रमाणें थैमान घालणाऱ्या निजामालाही आजवर अनेकदां खडे चारावयाला कमी केलें नाहीं, ते पेशवे त्या निजामाच्या दाढीच्या केसांना लटकणाऱ्या तुमच्यासारख्या आयतोबा नामधारी राजांच्या शस्त्रग्रहणाला कितीसे जुमानतील ?"

एकाएकीं बाजीराव इतके संतापलेले पाहून राणी तर फारच अस्वस्थचित्त झाली, व उभी राहून सामोपचारानें म्हणाली, " श्रीमंत ! आपण असे एकदम संतापूं नका "

" संतापूं नका ? राणीसाहेब ! कोणता स्वाभिमानी मनुष्य अशा अपमानास्पद स्थितींत संतापणार नाहीं ? " लगेच ते जगत्‌सिंहाकडे पहात म्हणाले, " जगत्‌सिंहजी ! आम्हीं हिंदुपदपादशाहीचा जगड्व्याळ उद्योग आरंभिला आहे, तो तुमच्यासारख्या पर्यंकवीरांच्या जिवावर मुळींच आरंभिलेला नाहीं; काय समजलांत ? तुम्हीं सारे हिंदूच खरे; पण आज तुम्हीं रजपुतांनीं आपलें नांव गमावलें आहे, व आज तुमचीं बुडें सध्यांच्या डळमळीत स्थितींत कां असेनात पण जाग्यावर आहेत, हा सारा महाराष्ट्रांतील मराठ्यांच्या मर्दुमकीचा प्रभाव आहे. मराठे स्वयंप्रकाशक तारे आहेत; त्यांना कोणापासून तेजाची उसनवारी करावी लागत नाहीं. पण तुम्ही आजकालचे रजपूत—खरें बोलावयाचें तर पूर्वपुण्याईचा पूर्ण ऱ्हास झाल्यामुळें

नभोमंडळांतून तुटून, जळून तेजोहीन होऊन खालीं कोसळलेल्या ताऱ्यांप्रमाणें आम्हां स्वयंप्रकाशक ताऱ्यांना तेजाचा पुरवठा तुम्हीं काय करावा ? नरेंद्रमंडळाच्या बैठकींत जर असेच एकेका नरेंद्राच्या अकलेचे तारे तुटावयाचे असतील, तर त्या बैठकींत—नव्हे, त्या नरपागेंत येण्याची आमची मुळींच इच्छा नाहीं." लगेच ते राणीकडे वळून म्हणाले, "आणि राणीसाहेब ! आम्हीं अगदीं स्पष्ट बोलतों याबद्दल आम्हांला क्षमा करा. राजे आमचे परममित्र; ते बादशहाचे अंकित असले तरी आमच्या हिंदुपदपादशाहीच्या महत्कार्यांत आजवर त्यांनीं आम्हांला पुष्कळ हातभार लावला आहे. तुमच्या घराण्याचा मराठ्यांशीं ऋणानुबंधाचा संबंध महाराष्ट्र-स्वराज्यसंस्थापक गोब्राह्मण-प्रतिपालक श्रीछत्रपति शिवाजी महाराजांच्या वेळेपासून आहे. आमच्या वडिलांचा व राजांचा अकृत्रिम स्नेह होता. इतकी आपुलकी आम्हांला राजांविषयीं वाटत असल्यामुळें राजांच्या यशाला, कीर्तीला किंवा वैभवाला डाग लावणारी एखादी गोष्ट कानीं आली कीं, आमचें हृदय शतधा विदीर्ण होतें."

"पण राजांच्या अगर त्यांच्या वंशाच्या यशाला, कीर्तीला किंवा वैभवाला डाग लावण्याजोगें कोणतेंच कृत्य मीं केलें नाहीं किंवा करणारही नाहीं. आपण माझ्यावर हा वृथारोप कां करतां ?" राणीनें विचारलें. इतका वेळ बाजिरावांनीं तोंडाचा तोफखाना जगतसिंगावर चालविला असूनही जगतसिंग स्तब्ध राहिला, त्यामुळें राणीचाही धीर कांहींसा खचल्यासारखा झाला होता; म्हणूनच ती बाजिरावांशीं इतक्या नरमाईनें बोलली. जगतसिंग बाजिरावांना भिऊनच स्तब्ध राहिला होता असें नाहीं, तो आपल्या ईश्वरदत्त खुनशी व कुढ्या स्वभावाला अनुसरून प्राप्त परिस्थितीला तोंड कसें द्यावें याविषयीं विचार करीत होता. बाजिरावांच्या तें प्रथम ध्यानीं आलें नाहीं. पण ते राणीशीं बोलूं लागले, तेवढ्यांत जगतसिंग दांतओंठ खात धनुष्यापासून सुटलेल्या वेगवान् तीरासारखा तेथून बाहेर निघून गेला, तें मात्र बाजिरावांनीं पाहिलें. परंतु त्यांना बैठक सोडून इतक्यांत उठतां येत नव्हतें—तसें त्यांनीं करणें बरें दिसलें नसतें. आणि शिवाय त्यांच्या जिवाला जीव देणारी मंडळी बाहेर डोळ्यांत तेल घालून खडी होतीच.

बाजीराव राणीच्या प्रश्नावर उत्तरले, "राणीसाहेब ! तुमची चूक तुम्हांला दिसत नाहीं हें बरोबरच आहे. मनुष्याला आपली चूक कळेल तर मनुष्य कळून सवरून चुका सहसा करणार नाहीं. आम्ही इतका वेळ बोलावयाला कचरत होतों

याचें कारण जगत्‌सिंगजी इथें होते. त्यांच्यादेखत तुमच्या चुका उघड करून दाखविण्यानें तुम्हांला व त्यांनाही विषाद वाटला असता. राणीसाहेब ! तुम्ही राजांच्याविरुद्ध एवढीं कारस्थानें चालविलीं आहेत, हें तुम्हांला शोभतें का ! युवराज्याभिषेक थोरल्या राजपुत्राला व्हावा कीं धाकट्या राजपुत्राला व्हावा, हा प्रश्न तुम्हीं व राजे अशा उभयतांनीं एकांतांत एक विचारानें सोडवावयाचा होता. तो प्रश्न तुमच्या अन्यथा करणीनें इतका चिघळला नसता तर आम्हींही राजांपाशीं दोन शब्द बोलून उभयपक्षीं संतोषकारक असा मार्ग शोधून काढण्याचा प्रयत्न केला असता."

" मग आपणाला अजूनही तें करतां येणार नाहीं काय ?" राणीनें सौम्य स्वरांत विचारलें. कांहीं क्षणांपूर्वीं तिच्या स्वरांत अनुभवाला येणारें काठिण्य आतां पुष्कळ कमी झालें असून तिची निसर्गतः कोमल व चंचल असणारी दृष्टिही जास्त स्नेहमय, जास्त चंचल, जास्त लालित्यपूर्ण झाली होती.

एवढें राणी बोलत आहे, तोंच त्या महालाबाहेर एकदम गलबला सुरू झाला. राणी व बाजीराव हीं दोघेंही दचकून दरवाजाबाहेर जातात, तोंच जगत्‌सिंग बरोबर पंधरा-वीस सशस्त्र लोक घेऊन समोरून चालून येत आहे सभासिंग व तेजकर्ण त्याच्यावर तुटून पडत आहेत असा देखावा बाजिरावांना आढळला. सभासिंग व तेजकर्ण पाठमोरे असल्यानें मशालींच्या प्रकाशांत राणी त्यांच्या चर्या पाहूं शकली नाहीं."

" जा ! राणीसाहेबापाशीं तो पेशवा उभा आहे त्याला कैद करा." जगत्‌सिंगानें आपल्याबरोबरच्या सैनिकांना हुकूम दिला. त्या हुकुमासरसे सैनिक पुढें घुसूं लागले, पण सभासिंग व तेजकर्ण यांनीं हातांतील तरवारीनें भराभर त्यांचीं मुंडकीं धडांवेगळीं करण्याचा सपाटा चालविला. एक मेला, दोन मेले, तीन मेले चार मेले, असा तो संहार पाहून राणी भीतीनें गांगरून जाऊन थरथर कापूं लागली. ती आंत जाऊन दरवाजा लावून घेईल तर बाहेर जगत्‌सिंगाच्या जिवावर बेतलेला आणीबाणीचा प्रसंग तिच्या अंतःकरणाचे लचके तोडीत होता. बरें, ती बाहेर उभी राहील किंवा पुढें जाईल तर तिला तिच्या स्वतःच्या प्राणांचें भय वाटत होतें. तशांत स्वतः बाजिरावांनीं त्या दंगलींत उडी घालतांना तर तिच्या तोंडचें पाणीच पळालें, व ती मूर्च्छित झाली. त्या वेळीं तिच्या सींपैकीं दोन दासी तेथें मागें हजर होत्या म्हणून बरें; त्यांनीं तिला मूर्च्छी

येऊन खालीं कोसळतांना पाहून तिला सांवरून धरलें व अंतर्म्हालांत नेऊन शय्येवर निजविलें. नाहींपेक्षां तिला तेथेंच अपघात व्हावयाचा.

बाजिरावांनीं अगदीं ऐनवेळीं त्या दंगलींत उडी घातली. त्यांना एकक्षण विलंब झाला असता तर तेजकर्ण व सभासिंग या दोघांचींही कलेवरें पहाण्याचा दुर्धर प्रसंग त्यांच्यावर ओढवला असता. जगतसिंगाची तरवार सभासिंगाच्या मानेला विळखा घालण्याच्या अगदीं बेतांत होती; व तेजकर्ण शत्रूंच्या हातून भयंकर जखमी होऊनही शत्रूंशीं झगडत होता. बाजीराव तेथें ऐनवेळीं गेले व त्यांनीं प्राणांचीही पर्वा न करतां, आडवे आलेल्या दोघां सैनिकांना तरवारीच्या एकेका फटकाऱ्यासरसे घायाळ करून सभासिंगाच्या मानेवर तरवारीचा घाव घालण्याला आवेशानें सरसावलेला जगतसिंगाचा हात घट्ट धरला. त्यामुळें सभासिंग मोकळा झाला, व त्यानें तेजकर्णाच्या जिवावर उठलेल्या सैनिकांवर अशी तरवार चालविली कीं, हां हां म्हणतांच सर्व सैनिक खालीं लोळविले गेले. तीन चार जे अद्यापि जिवंत होते ते स्वभावतःच भ्याड असल्यामुळें प्रथमपासूनच मागें पाय घेऊन अंगचुकारूपणानें जीव बचावीत असल्यामुळें जिवंत राहिले होते. ते मात्र जास्त कुमक आणण्याच्या मिषानें तेथून पळाले.

जगत्सिंगानें बाजिरावांच्या कचाटींत सांपडल्यावर देखील उसन्या अवसानाचा एक झटका दाखविण्याला कमी केलें नाहीं. त्यानें डाव्या हातानें आपल्या कमरपट्ट्यांतील खंजीर काढून फेकण्याची धमकी देऊन पाहिली. पण सभासिंगानें आपल्या डाव्या हातानें जगतसिंगाचा डावा हात पकडून इतक्या जोरानें दाबला कीं, ती कळ जगत्सिंगाच्या मस्तकाला झोंबून त्यानें चीं चीं करीत आपल्या हातांतील खंजीर खालीं टाकून दिला. त्या धक्काबुक्कींत सभासिंगाच्या नकली दाढीमिशा पडल्यामुळें जगत्सिंगानें त्याला तेव्हांच ओळखलें, व तशा स्थितींतही धमकी दिली, " सभासिंग ! तूं फितूर आहेस. तूं निजामाच्याविरुद्ध शत्रूच्या कारस्थानांत सामील झाला आहेस. या फितुरीचें प्रायश्चित्त तुला भोगावें लागेल."

सभासिंग इतका वेळ बेभान झाला होता. आपलें वेषांतर उघडें झालें हें त्याला या क्षणापर्यंत मुळींच कळलें नव्हतें, अशी स्वतःच्या मनाची समजूत करून सारी चिंता, भय आणि त्याबरोबरच त्या वेळीं शत्रूंशीं झगडतांना सर्वांगाला झालेल्या जखमांमुळें होणाऱ्या वेदनांचें दुःख गिळूनपण म्हणून जगतसिंगाला एक खासा

टोमणा हाणला, " जगत्सिंगजी ! अंगचें तुटपुंजें धैर्य गळाल्यामुळें शस्त्रप्रयोगाची ताकद हातांत उरली नाहीं, म्हणून तुम्हीं हा तोंडाचा पट्टा सुरू केला आहे वाटतें !"

जयसिंग तेवढ्यांत तेथें येऊन थडकला. त्यानें जगत्सिंगाला विचारलें, " जगत्सिंगजी ! हा काय प्रकार आहे ? "

'चोराच्या उलट्या बोम्बा' या न्यायानें जगत्सिंग जयसिंगाला म्हणाला, " जयसिंगजी! हे तुमचे दोस्त एथें येऊन निष्कारण बखेडा माजवूं लागले, याचा बंदोबस्त तुम्हीं प्रथम केला पाहिजे. त्याप्रमाणेंच हा सभासिंग—"

" त्यांच्या बंदोबस्ताचें आम्ही पाहून घेतों. पण मला अगोदर सांगा, अशा अपरात्रीं राणीला घेऊन या ठिकाणीं येण्याचें तुम्हांला काय कारण ? "

" राणीसाहेबांची इकडे येण्याची इच्छा दिसली म्हणून मी त्यांच्याबरोबर आलों. शिवाय, राणी ही माझी सख्खी बहीण आहे." एवढें बोलून जगत्सिंग थबकला. आपण कांहींतरी भकत आहों असें त्याचेंच मन त्याला सांगूं लागलें असावें.

" राणीसाहेबांची इच्छा ! माझ्या राजवाड्यांत माझ्या इच्छेपेक्षां माझ्या राणीची इच्छा थोर काय ? तुम्हांला काय वाटतें, मला तुमचे हे लांडे कारभार कळत नाहींत असें ? चला निघा, अगोदर माझ्या डोळ्यांपुढून निघून जा ! "

" जयसिंगजी ! तुम्ही हा मेवाडाधिशाचा अपमान करीत आहां ! तुम्ही मराठ्यांना–बादशहाच्या शत्रूंना सामील आहां याला यापेक्षां निराळ्या पुराव्याची मुळींच गरज उरलेली नाहीं. हे तुमचे उपरे मित्र आज आहेत व उद्यां नाहींत; खुंटावरचे कावळे हे ! भुर्रकन् उडून जातील ! आणि अखेर नित्याचा प्रसंग तुमचा आमचा एकमेकांशींच राहील. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून मला सांगा, तुम्ही पेशव्यांना त्यांच्या या दोन हस्तकांसह आतांच्या आतां कैद करणार कीं नाहीं ? "

इतक्यांत जयगडाच्या प्रवेशद्वारावर असलेल्या द्वाररक्षकांपैकीं एकजण रक्तबंबाळ होऊन घाबऱ्याघुबऱ्या धांवत धापा टाकीत तेथें ओरडत आला, " सरकार ! दगा ! दगा ! अजमेरीसिंग व शिवसिंग यांचा हल्ला आला ! " पुढें त्याच्याच्यानें बोलवेना. तो रक्त ओकीत खालीं कोसळला. तोंच त्यानें राम म्हटला !

अजमेरीसिंग व शिवसिंग आल्याचें ऐकून जगत्सिंग एकाएकीं आनंदानें बेहोष होऊन थैथयाट करीत म्हणाला, " शाबास ! शाबास दोस्त अजमेरीसिंग !

शिवसिंग ! तुम्हीं अगदीं योग्य वेळीं बाजू राखलीत." तो तेथून तांतडीनें निघून जातां जातां जयसिंग व बाजीराव यांना अनुलक्षून म्हणाला, "महाशय ! मेवाडाधिशाचा प्रभाव याला म्हणतात ! तुमच्या ज्या तोंडानें इतका वेळ माझी विटंबना मीं ऐकली, त्याच तोंडानें माझीं प्रार्थनागीतें गाइलेलीं मी ऐकेन. तुमचे जे हात माझ्यावर तुटून पडूं पहात होते, तेच हात जोडून तुम्हांला माझ्यासमोर उभें राहावें लागेल व माझ्यासमोर मस्तक नमवावें लागेल. पेशवे ! इतक्या वेळां निजामाला खडे चारल्याची बढाई सांगत होतां; पण आतां त्याच निजामाची पायधूळ ललाटीं लावून त्याच्या पायांवर लोटांगण घालण्याचा प्रसंग तुमच्यावर येऊं घातलेला आहे हें लक्षांत ठेवा."

या निर्लज्ज चांडाळाचा शिरच्छेद करावा इतका बाजिरावांना चेव आला व ते त्याच्यावर तुटून पडले. पण तो पळाला म्हणून सुटला. हा सारा त्याचाच डाव होय हें बाजिरावांना व जयसिंगालाही कळून चुकलें. त्यांचे इतर सर्व विचार त्या प्रतिकूल परिस्थितीच्या झंझावातांत कुठच्या कुठें पार उधळले गेले. ते आठवून कार्याला जुंपण्याइतकी सवडच त्या वेळीं तरी उरली नाहीं. अकस्मात् आकाशच्या कुऱ्हाडीप्रमाणें कोळसलेल्या त्या अरिष्टांतून कशी वाट काढावी या चिंतेचा भार तरी ते तसलेच मनाचे खंबीर म्हणून सहन करीत होते. तेजकर्णदेखील जरी भयंकर जखमी झाला होता तरी त्या अरिष्टाची वार्ता त्याच्या कानीं पडतांच तो सर्व दुःख विसरून जसा कांहीं खणखणीत ताजातवाना होऊन उठला, व बाजिरावांच्या उजव्या बाजूला जाऊन उभा राहिला. ज्याप्रमाणें तेजकर्णाला विव्हळत बसण्याला सवड नव्हती, त्याप्रमाणेंच बाजिरावांनाही त्याच्या प्रकृतीविषयीं विचारपूस करण्याला सवड नव्हती. राणीची दासी घाबऱ्याघुबऱ्या धांवत आली व जयसिंगाला म्हणाली, "राणीसाहेब आपणाला भेटण्यासाठीं उत्सुक झाल्या आहेत. आपणाला बोलावून आणण्यासाठींच त्यांनीं मला इकडे पाठविलें आहे."

जयसिंग आधींच राणीवर संतापला होता; तशांत प्राप्त संकटाला तोंड देणें हें त्याचें आतां पहिलें कर्तव्य ठरून गेलें होतें. त्यानें त्या दासीला राणीच्या प्रकृतीची नीट काळजी घेण्याला सांगून व थोड्या वेळानें तिला भेटण्याचें कबूल करून तेथून परत पाठवून दिलें.

इतक्यांत गडाच्या तटाच्या बाहेरून मोठमोठ्यानें रणगर्जना ऐकूं येऊं लागल्या. बाजीराव आपलीं श्रवणेंद्रियें शक्य तितकीं तीव्र करून 'हरहर महादेव'ची गर्जना

ऐकूं येते किंवा कसें याची अत्यंत उत्सुकतेनें वाट पहात होते. ते सभासिंगाच्या कानाशीं लागून म्हणाले देखील, " पिलाजी जाधव गेले त्यांनीं काय केलें ? कीं ते तिकडे आमच्याप्रमाणेंच एखाद्या आवर्तांत सांपडले ? "

इतक्यांत कोणा एका व्यक्तीनें रक्तानें थबथबलेलीं दोन शिरें आणून बाजिरावांच्या पायांपाशीं ठेवून उद्गार काढले, " परमेश्वराच्या कृपेनें व सरकारांच्या पुण्याईनें आम्हीं आज भवानीलाच एवढी लूट मिळविली; ती आपल्या चरणीं अर्पण केली आहे."

बाजीराव, जयसिंग, तेजकर्ण व सभासिंग या सर्वांनाच तो प्रकार पाहून अचंबा वाटला. तीं शिरें कोणत्या दोन दैत्यांचीं आहेत, हें ओळखण्यासाठीं प्रथम जयसिंगानें आपल्या मशालजीला मशाल पुढें करण्यास सांगितलें. मशालीच्या प्रकाशांत तीं शिवसिंग व अजमेरीसिंग यांचीं शिरें आहेत एवढें निश्चित झालें. त्याबरोबरच एवढा अतुल पराक्रम गाजविणाऱ्या त्या व्यक्तीची ओळख करून घेण्यासाठीं साहजिकपणेंच सर्वांना उत्कंठा वाटूं लागली. जयसिंगाच्या आज्ञेवरून मशालजीनें आपल्या हातांतील मशालीचा उजेड त्या व्यक्तीच्या तोंडावर पाडला; पण त्यापूर्वीच ती व्यक्ति तेथून अदृश्य झाली होती.

इतक्यांत बाहेरून 'हर हर महादेव'ची गर्जना बाजिरावांना ऐकूं आली. त्याबरोबर बाजिरावांनीं स्वयंस्फूर्तीनें उद्गार काढले, " शाबास पिलाजी ! भले बहाद्दर ! मराठ्यांनीं रणशिंग फुंकलें; आतां समेट संपला ! "

## प्रकरण एकतिसावें

# रंगाचा बेरंग !

" कोण आहे ! "

" दोस्त आहे."

" नांव काय ! "

" मला अत्यंत तांतडीनें प्रथम राजांची भेट घ्यावयाची आहे."

" अरे ! नांव काय असें विचारतों तरी कळत नाहीं ! अनुराधसिंगाचा राजवाडा म्हणजे तुला एखादी सराई वाटते कीं काय !"

जयगडावर—उज्जयनी नगरीच्या वेशीवर मागील प्रकरणांत वर्णिल्याप्रमाणेंच तुंबळ युद्ध सुरू असतांना सामान्य हरकारूचा वेष केलेला एक तरुण लपत छपत अनुराधसिंगाच्या राजवाड्याच्या प्रवेशद्वारांत येऊन थडकला. त्याचीं राजवाड्याच्या प्रवेशद्वारावरील द्वाररक्षकाशीं वरीलप्रमाणें प्रश्नोत्तरें झालीं. त्या द्वाररक्षकानें जरा दरडावून विचारतांच तो तरुण किंचित् कांकूं करून लगेच त्या द्वाररक्षकाच्या कानापाशीं तोंड नेऊन त्याच्या कानांत हळूच कायसें पुटपुटला. तें पुटपुटणें तिसऱ्या कोणालाच ऐकूं येणें शक्य नव्हतें. पण तें ऐकून जणुं यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें तो द्वाररक्षक नतमस्तकपूर्वक त्या तरुणाची क्षमा मागून गरिबीच्या भाषेंत उत्तरला, " सरकार ! आपण जरा थांबा, मी हुजुरांना कळवून येतों."

तो तरुण द्वाररक्षक परत येण्याची वाट न पहातां थेट आंत जाऊं लागला. इतक्यांत द्वाररक्षक येतांना त्याला मार्गांतच भेटला. त्यानें त्या तरुणाला पहातांच जमिनीपर्यंत लवून प्रणाम करून हात जोडून सांगितलें, " हुजुरांनीं आपणाला आंत यावयाला सांगितलें आहे."

" बरें; आंत आणखी कोण कोण आहेत ! "

" पुष्कळ मंडळी आंत आहेत. कोटयाचे महाराज दुर्जनसालजी आहेत, ओरछाचे महाराज कुंवर लक्ष्मणसिंगजी आहेत, पुष्कळ बडीबडी मंडळी आहेत."

" आज अनुराधसिंगजींच्या मार्फत एखाद्या मजलसीचा थाट जुळवून आणण्यांत आला आहे वाटतें ! "

" सरकार ! आम्ही खाशांच्या पायांतळच्या धुळींतील कण ! आम्हीं लहान तोंडीं मोठा घांस कसा घ्यावा ! " द्वाररक्षक नम्रपणें म्हणाला.

बोलतां बोलतां तो द्वाररक्षक त्या तरुणाला अनुराधसिंगाच्या बैठकखान्याचा मार्ग दाखविण्यासाठीं पुढें चालूं लागला, व तो तरुण त्याच्या मागोमाग जाऊं लागला. ते वेळ रुजाम्यांनीं अंथरलेल्या मार्गावरून कांहींसे पुढें जातात तोंच सुस्वर गीतालाप त्या तरुणाच्या कानीं आले. तो आणखी एक दालन ओलांडून पुढें गेला, तों अठरावर्षांच्या उमरीच्या अर्थात् तारुण्याच्या ऐन उमेदींत असलेल्या, रूपानें सुंदर व बहुमोल वस्त्रालंकार धारण केलेल्या दोन द्वाररक्षिका त्याच्या स्वागतार्थ पुढें आल्या. त्यांनीं त्याला मजलशीच्या बैठकखान्याकडे चालविलें. द्वाररक्षक तेथून मागें परतला. तो तरुण आणखी थोडा पुढें गेला तों तशाच दोन सौंदर्यवती युवतींच्या स्कंधावर हात टाकून डुलत डुलत अनुराधसिंगांची स्वारी त्याचें स्वागत करण्यासाठीं पुढें आली.

" यावें मेवाडाधीश्वर ! यावें." अनुराधसिंग अडखळत बोलतां बोलतां एक-वार त्या तरुणाला नखशिखान्त अवलोकन करीत आश्चर्यपूर्वक उद्गारला, " ऑं ! तुम्ही जगत्‌सिंगजीच का ? आणि हा असला भिकारडा पेहराव ?"

तो तरुण जगत्‌सिंग होता, हें वाचकांना आतां माहीत झालें असेलच. जयगडाकडे घडलेल्या अनर्थांतून प्राणभयानें पळतां पळतां त्याला भुई थोडी झाली होती. तेथून तो गडाच्या मागील बाजूच्या तटाला असलेल्या एका दिंडीदरवाजानें मुद्दाम वेष पालटून पळाला होता. त्यानें बेमालूम वेषांतर केल्यामुळें त्याची खरी ओळख गडावरील पहारेकऱ्यांना पटली नाहीं; राजांच्या खास बातमीदारांपैकीं हा कोणीतरी असावा अशी त्यांची कल्पना झाली. आणि शिवाय, आपण राजा जयसिंगाच्या तांतडीच्या आज्ञेवरून शत्रूचें पारिपत्य करण्यासाठीं कुमक आणण्याकरितां जात आहों अशी बेमालूम थाप जगत्‌सिंगानें दिली तीही द्वाररक्षकांना खरीच वाटली. तो गडावरून निसटला, तो प्रथम शहाजाद्याच्या निवासस्थानाकडे गेला. तों शहाजादा जाग्यावर नाहीं ! थोडी जास्त चौकशी करितां शहाजादा भागाबाई या नांवाच्या आपल्या नव्या प्रियतमेला भेटण्यासाठीं भैरवगडावर गेला आहे असें त्याला कळलें. त्याबरोबर तो निजामाच्या वास्तव्यस्थानाकडे गेला. तों निजाम व त्याचा पुत्र गाझीउद्दीन हे

दोघेही जागयावर नसल्याचें कळलें. आतां पुढें कुणापाशीं जावयाचें याविषयीं क्षणभर स्वतःच्या मनाशीं विचार करून तो अखेर अनुराधसिंगाकडे आला होता.

अनुराधसिंगाच्या अडखळत्या बोलण्यावरून व तारवटलेल्या लालस दृष्टी-वरून जगत्‌सिंगानें ओळखलें कीं, स्वारी मदिरादेवीच्या पाशांत चांगलीच गुरफटून गेली आहे. पण अनुराधसिंगानें जगत्‌सिंगाच्या पेहरावाविषयीं आश्चर्य प्रदर्शित केलें तें मात्र केवळ मदिरादेवीच्या नशेंत केलें असें नाहीं. त्या मजलसींत बसले-ल्या खाशा मंडळीपैकीं कितीएकांना देखील सकृद्दर्शनीं जगत्‌सिंगाची ओळख पटली नाहीं. ते त्याच्याकडे कंटाळवाण्या दृष्टीनेंच पहात होते. सर्वांनाच ओळख पटली नाहीं असें विधान करण्यांत या ठिकाणीं तरी कांहीं स्वारस्य नाहीं. कारण तेथें जमलेल्या मंडळींतील बऱ्याच जणांची अवस्था कमी अधिक प्रमाणांत अनुराधसिंगासारखीच होती. मदिरादेवीला धिक्कारणारा किंवा सुंदर नर्तकीच्या दर्शनाला लोलुप नाहीं असा एकही पुरुष त्या बैठकींत नव्हता.

कालिदासही त्या मैफलींत हजर होता. तेथलें स्त्रीसाम्राज्य पाहून व विशेषतः मुमूताजजॉनचा एकंदर थाटमाट अवलोकन करून त्याची काव्यप्रतिभा सागर-फेनाप्रमाणें उताला येत होती. त्या प्रतिभेचा पाठिंबा अनुराधसिंगाला देण्याला तो घाईघाईनें पुढें येऊं लागला तोंच जगत्‌सिंगानें त्याला जोरानें मागें रेटीत अनुराध-सिंगाला म्हटलें, "अनुराधसिंगजी! काय हें! कांहीं शुद्धीवर या! शत्रूनें तुमच्या आमच्या सर्वस्वावरून नांगर फिरविण्याची वेळ आणली तरी तुमचे असेच नाचरंग चालावयाचे काय? पेशव्यांनीं जयगड घेतला, जयसिंगजी त्यांना सामील झाले, निजामाच्या खास पक्षांतील सभासिंगासारखे लढवय्ये देखील पेशव्यांचीच पाठ राखूं लागले, तरीही आपण सावध व्हावयाचें नाहीं? या अरिष्टाची दाद लागावी म्हणून हा जगत्‌सिंग इतका वेळ इथें शंख करीत आहे तरी एकालाही माझ्याकडे लक्ष्य देण्याची इच्छा होऊं नये ना?"

आतां कुठें सर्वांना कळलें कीं, तो जगत्‌सिंग आहे. जगत्‌सिंगाच्या तारस्वरानें रंगसभेंतील बरेच तारवटलेले राजे तारेंतून खडबडून जागे होऊं लागले. नर्तकींचा मंजुळ कंठस्वर त्या धक्क्यासरसा थांबला. शुद्धीवर असलेल्या व आलेल्या नृपांपैकीं प्रथम दुर्जनसाल, त्याच्या मागोमाग कुंवर लक्ष्मणसिंगजी वगैरे बडींबडीं धेंडें चौकशीसाठीं पुढें येऊं लागलीं. तोंच त्या सभास्थानाच्या आगच्या दरवाजा एकदम उघडला गेला. तो एवढ्या जोरानें उघडला गेला कीं,

त्याच्या दोन दारांचा दोन्ही बाजूंच्या भिंतींवर टांगण्यांत आलेल्या भव्य दर्पणांवर जोराचा आघात होऊन दोन्ही दर्पणें फुटून खालीं कोसळलीं. त्यांचा खळ्ळ् खळ्ळ् असा आवाज झाला. त्या आवाजामुळें दचकून सर्व मंडळी तिकडे पाहूं लागते, तोंच एक स्त्री विद्युल्लतेच्या वेगानें त्या दरवाजांतून आंत आली. ती सभागृहांतील मंडळीला दोन्ही हातांनीं बाजूला लोटीत पुढें घुसून अनुराधसिंग उभा होता तेथवर आली व अनुराधसिंगाचे दोन्ही हात आपल्या हातीं धरून गदगदां हलवीत म्हणाली, " राजे ! काय हा तुमचा अधःपात ! यःकश्चित् एका वारांगनेशीं हास्यविनोद करण्यापर्यंत तुमची मजल जावी ना ? आणि हे बीभत्स नाचरंग !— पशूंनाही लाजविणाऱ्या या प्रणयचेष्टा ! राजकारणाचे अवघड पेंच सोडविण्यासाठीं सारे नरेंद्र—" ती स्त्री सभागृहांतील सर्व मंडळीकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाली, " हे सारे नरपागेंतील प्राणि इथें जमले, ते हें राजकारण करण्यासाठीं काय ? शत्रु नगरांत घुसून तुमच्या छातीवर थैथयां नाचूं लागला, तुम्ही वाड्याबाहेर पडेन म्हणाल तर मुंगीलादेखील आंतबाहेर रीघ मिळूं नये इतका कडेकोट गराडा तुमच्या वाड्यासभोंवार पडला, आतां काय रडणार ? "

ती स्त्री कल्याणी होती. तिचे ते जळजळीत उद्गार सर्वांचीं अंतःकरणें चरचरां कापीत गेले. अनुराधसिंगाचेही डोळे उघडले व तो शुद्धीवर आला. त्या सभेंतील त्या रात्रीची उत्साहमूर्ति मुमताजजान इतका वेळ अंगच्या ज्या नटवेपणामुळें सर्व सभाजनांना पागल बनवून सोडीत होती, ती सारा नटवेपणा विसरून व्याधाच्या टप्प्यांत सांपडलेल्या वन्यहरिणांनीं प्राणभयानें व्याधाकडे पहावें तशा घाबरट संशयी नजरेनें कल्याणीकडे पहात लपतछपत तेथून निघून गेली. कालिदासदेखील तिच्या मागोमाग लपतछपत निघून गेला. त्याच्या तर्काप्रमाणें मुमूताजजान ही अनुराधसिंगाला मोहिनी घालून नादीं लावण्याला समर्थ अशी नवयौवना होती. आज ना उद्यां अनुराधसिंग पूर्णपणें तिच्या पायांपाशीं कुत्र्यासारखा घोंटाळूं लागणार हें कालिदास ओळखून होता; त्यामुळें आपलें दरबारांतील वूड कायम ठेवण्यासाठीं त्याला असल्या बांगड्यांच्या वशिल्याची काळजी प्रथम करणें प्राप्त होतें. अनुराधसिंग त्या रात्रौ जें बोलत होता, तें खरोखर बोलत नसून बरळत होता. पण अष्टौप्रहर व्यसनकर्दमांत लोळत पडण्यांत धन्यता मानणाऱ्या अशा आयतोबा राजांच्या बोलण्यांत व बरळण्यांत फारसें अंतर नसतें हें पूर्वानुभवावरून गृहीत धरून भविष्यकाळाची तरतूद करून ठेवण्यासाठीं कालिदास आपली सर्व 'राजकारणधुरंधरता' कसाला लावून धोरणानें वागत होता.

'पुढें काय?' हा प्रश्न आतां सर्वांसमोरच उभा होता. शत्रूच्या सैन्यानें वाड्या-सभोंवार कडेकोट वेढा देऊन वाड्यांत घुसण्यासाठीं–अर्थात् वाड्यांत घुसून सर्व राजांना शरण आणून आपला पक्ष सबळ करण्यासाठीं चंग बांधला होता. वाड्यांत अडकून पडलेले राजेलोक सारेच शेंदाडशिपाई होते अशांतली गोष्ट नाहीं. त्यांत अनुराधसिंग, दुर्जनसाल, कुंवर लक्ष्मणसिंगजी, जगत्सिंग, वगैरे कांहीं चांगले रणझुंजारही होते. शत्रूशीं दोन हात करण्याची त्यांची पात्रता होती. परंतु ते सारे एकाच ठिकाणीं एकाच वेळीं कोंडले गेल्यावर करतात काय ? त्यांची त्या वेळची अवस्था कोणाच्याही मनांत करुणा उत्पन्न करण्यासारखी होती.

आतां काय करावें याचा निर्णय करण्यापूर्वी हा इतका बिलंदर शत्रु तरी कोण याचा तपास करण्यांत आला; तेव्हां कळून आलें कीं, बाजीराव पेशवे हे या हल्ल्याचे प्रमुख प्रवर्तक असून सज्जनसिंग, पिलाजी जाधव वगैरे कितीतरी सेनानी त्यांच्या पाठीशीं आहेत. अजमेरीसिंग व शिवसिंग हे दोघेही शत्रूच्या तरवारीला बळी पडून राजा जयसिंग शत्रूचा कैदी झाला व जयगड शत्रूच्या स्वाधीन झाला तरीही सभासिंग, ईश्वरसिंग व माधवसिंग हे एकविचारानें शत्रूशीं निकाराचा सामना देत आहेत असेंही त्याच वेळीं कळलें. एकट्या बाजिरावांचें नांवदेखील सर्व राजांची घाबरगुंडी उडविण्याला पुरेसें होतें. त्या नांवाबरोबर इतर सेनानींचीं नांवें ऐकू येतांच सर्वजण मनांतून खचून गेले यांत आश्चर्य कसलें ?

हां हां म्हणतां 'हरहर महादेव' व 'जय एकलिंगजी' अशा गगनभेदी रणगर्जनांनीं त्या वाड्यासभोंवारचें वातावरण दुमदुमून गेलें. तेवढ्यांत शत्रूनें वाड्याच्या बाहेरील तटाचा दरवाजा फोडून आंत प्रवेश केल्याची दुर्वार्ता येऊन थडकली. 'आतां पुढें कसें करावयाचें' या चिंतेची तांत प्रत्येकाच्या गळ्याला क्षणोक्षणीं जास्त तीव्रतेनें झोंबूं लागली.

## प्रकरण बत्तिसावें

# भैरवगडावर

त्याच रात्रौ भैरवगडावर देखील बरीच गडबड माजून राहिली होती. कालिदासानें भागाबाईला भैरवगडावरच आणून ठेविलें होतें, व शहाजादा आज तिला भेटण्यासाठीं–तिला आपली प्रियतमा करण्यासाठीं मुद्दाम घटकाभर रात्रीला तेथें आला होता. शहाजाद्याची प्रियतमा म्हणजे कांहीं सामान्य स्त्री नव्हे! ती उद्यांची सम्राज्ञीच! तिचा मानमरातब यथावत् ठेवण्यासाठीं त्या रात्रौ गडावरील अधिकाऱ्यांची कोण धांदल! भागाबाईला वास्तव्यासाठीं देण्यांत आलेला लालमहाल पूर्वीपासूनच नानाप्रकारच्या शृंगारविलासोपयोगी साधनांनीं उत्कृष्ट प्रकारें सजविलेला होता. कारण, शहाजाद्याचें उज्जयनीला आगमन झाल्यापासून तो एखाद् दुसऱ्या दिवशीं तरी विलासोपभोगांसाठीं लालमहालांत अवश्य येई. तरीही त्या नेहमींच्या सजावटीपेक्षां आजची तेथली सजावट कांहीं और होती. कालिदासानें शहाजाद्याच्या नव्या शादीचा वाग्निश्चय ठरविण्याचा बहुमान आपल्या वांटणीला आल्याचें जाहीर करण्यासाठीं ही बातमी मुद्दाम बाहेर फोडली होती. मात्र कालिदासाच्या पूर्वोक्त घोषणेनें गडावरील सर्व मंडळींची जशी दिशाभूल झाली तशी वाचकांची होऊं नये म्हणून येथें अंमळ घाईनें एक गोष्ट निवेदन करून ठेवणें अवश्य आहे कीं, 'शहाजाद्याशीं भागाबाईची शादी' ही केवळ कालिदासाच्या कविविशिष्ट कल्पक मेंदूतून निघालेली कल्पनाभरारी होती. शहाजाद्याला शादीच्या मजबूत दोरखंडानें रोज रोज नव्या नव्या बेगमांच्या धोंडी आपल्या गळ्यांत अडकवून घ्यावयाचा नव्हत्या; त्याला नुसते विलास करावयाचे होते.

असो. त्या रात्रौ घटकाभर रात्रीच्या सुमाराला शहाजाद्याची स्वारी उज्जयनीहून निवडक सेवकांसह पालखींतून गडावर आली, ती थेट लालमहालांत प्रविष्ट झाली. भागाबाईसाठीं बहुमोल वस्त्रालंकार पूर्वींच उज्जयनीहून रवाना करण्यांत आलेले असल्यामुळें शहाजादा येऊन पोंचेतों भागाबाई त्या वस्त्रालंकारांनीं नटून थटून शहाजाद्याच्या स्वागतासाठीं मंदिरांच्या प्रवेशद्वारांत सज्ज होतीच. तिनें शहाजाद्याचें यथोचित स्वागत केल्यावर शहाजादा मंदिरांतील आरामशीर बैठकीवर विराजमान झाला. शहाजाद्याच्या देखत भागाबाईनें जेव्हां

आपल्या सर्व दासींना ‘तुम्ही सर्वजणी एथून निघून जा. खावंदांची सेवा आज मी एकटी करणार’ असें सांगून बाहेर घालवून दिलें, तेव्हां शहाजाद्याला किती तरी धन्यता वाटली. तो आपल्या मनाशीं म्हणाला, “अहाहा ! खुदा ! तुझ्या कुदरतीनें आज मला खरी अस्मानची परी लाभली. नुसत्या खुबसूरत औरतींना दुनियेंत तोटा नाहीं, व मला देखील आजवर त्यांची कधींच वाण भासली नाहीं. परंतु अंतःकरणापासून माझ्यावर पहिल्या पहिल्या भेटींतच प्रेम करूं लागणारी—किंबहुना त्या प्रेमापायीं आई बाप जात धर्म सर्व कांहीं झूट मानून एथवर धावत येणारी रूपगुणयौवनसंपन्न औरत ही आजच प्रथम मला भेटली !”

भागाबाईनें आपल्या सौंदर्यानें व नम्रपणानें शहाजाद्याला जितकी मोहिनी घातली, तिच्यापेक्षां जास्त मोहिनी शहाजाद्याला भागाबाईच्या मधुभाषणाची पडली. भागाबाईनें सुवर्णपत्रांतून सुवासिक तांबूल दे, नेचाची नळी अदबीनें त्याच्या ओंठांना लाव, वगैरे शृंगारचेष्टांनीं तर शहाजाद्याला पूर्णपणें भारून टाकलें. तिनें उंची सुवासिक मद्यानें रत्नखचित पेला भरून तो शहाजाद्याच्या ओंठांना लावला, तेव्हां तर शहाजाद्याला किती आल्हाद व किती धन्यता वाटली, याचें वर्णन करणें अशक्य !

“प्यारी ! हें अमृताप्रमाणें मधुर मद्य मीं एकट्यानेंच प्यावें व तूं माझ्या तोंडाकडे पहात बसावें हें योग्य नाहीं. तूं मात्र माझी सेवा करावीस आणि मी—” असें म्हणून शहाजादा मद्याचे चार पेले प्राशन केल्यावर पांचवा पेला भागाबाई त्याच्या ओठाला लावूं लागली तेव्हां उठून तिच्या हातांतील पेला आपल्या हातीं घेऊं लागला. त्याचा विचार तो पेला तिच्या हातून घेऊन आपल्या हातानें तिच्या ओठांना लावण्याचा होता.

परंतु भागाबाईनें स्मितवदनपूर्वक शहाजाद्याला खालीं बसावयाला लावून तो पेला त्याच्या ओठांना लावीत म्हटलें, “परवरदिगर ! आपण ह्या अलम् दुनियेचे मालिक व मी आपली एक यःकश्चित् दासी ! आपण माझ्यासारख्या यःकश्चित् दासीकडून सेवा करून घेण्यांत कमीपणा मानीत नाहीं, यांतच माझा आपण कितीतरी गौरव करीत आहां.”

“छे ! छे ! प्यारी ! मी अलम् दुनियेचा मालिक असलों तरी तूं माझी मालिक आहेस.” शहाजादा मद्याचा पेला अर्धा रिकामा करून आणखी एक घोट घेत म्हणाला.

" या मद्याचा स्वाद कसा काय आहे?" भागाबाईनें लाडक्या स्वरांत विचारलें.

" वाः! प्यारी ! हें काय विचारतेस ? आधींच हें मद्य स्वादिष्ट आहे, व शिवाय त्यावर तुझे अमृतमय श्वास सुटल्यामुळें त्याच्या स्वादिष्टपणांत उत्कृष्ट भर पडली आहे. असलें अमृतमय पेय मीं एकट्यानेंच प्यावें हें मला निष्ठुरपणाचें वाटतें." असें म्हणून शहाजादा आपल्या ओंठाचा पेला काढून भागाबाईपुढें करूं लागला.

भागाबाईनें तो पेला आपल्या हातीं घेतला, व शहाजाद्यासमोर अदबी दाखविण्या- साठीं किंचित् बाजूला जाऊन शहाजाद्याकडे पाठ करून तो तिनें ओंठांना लावल्या- सारखें करून तो हलकेच बाजूला ठेवून दिला.

" प्यारी ! " शहाजादा मद्याच्या तारेंत येऊन बरळूं लागला, " प्यारी ! सांग मी आपल्या या पहिल्या चांदरात्रीच्या स्मरणार्थ काय करूं ? बोल, तुझ्या बापाला मी एखाद्या प्रांताची सुभेदारी देऊं का ? "

शहाजाद्यावर मद्याचा अंमल चांगला चढूं लागल्याचें पाहून मनांतल्या मनांत आनंदित होत भागाबाई त्याला म्हणाली, " आपण एवढे उदारधी आहां हें आपल्या थोर नांवाला साजेसेंच आहे. मी याचा विचार करीन व मग आपणाला काय तें सांगेन. आपण आतां विश्रांति घ्यावी."

भागाबाई न सुचविती तरी शहाजाद्याला आतां विश्रांति घेणें भागच होतें. त्याचें सर्वांग मद्याच्या निशेंत थरथर कांपूं लागलें होतें, दरेक शब्दागणिक जीभ अडखळूं लागली होती. अशा स्थितींत तो विश्रांति न घेईल तर काय करील ! भागाबाईनें त्याला हात देऊन तेथील सुसज्जित शय्येवर पहुडविलें. तशा झिंगले- ल्या स्थितींतही शहाजाद्यानें भागाबाईला आपल्या हृदयाशीं ओढण्याला कमी केलें नाहीं. पण भागाबाई प्रथमपासूनच सावध होती. तिनें तेवढ्यांत चट्कन् आपला हात सोडवून घेऊन उशालगतची एक मऊ मऊ उशी पुढें केली. ब्रह्मानंदीं लय लावण्याच्या पंथाला लागलेल्या शहाजाद्याला तरी आपली प्रियतमा हृदयाशीं बिलगली आहे कीं निसटून दूर गेली आहे हें जाण्याइतकी शुद्ध कुठें होती !

  

" ताईसाहेब ! आटोपलें का ? "

" हो ! आटोपलें." भागाबाई उत्तरली.

" तर मग लौकर चला."

" पण पहारेकरी—"

" त्याची काळजी करण्याचें तुम्हांला कांहींच कारण नाहीं. मीं सर्व व्यवस्था केली आहे. मात्र तुम्ही एक करा, कोणाला तुमची ओळख पटूं नये एवढ्यासाठीं हा पेहराव मीं मुद्दाम आणला आहे तेवढा चट्कन् धारण करा." त्या व्यक्तीनें कांहीं कपडे भागाबाईपुढें करीत म्हटलें.

" पण—"

" पुन्हा तेंच ! 'पण' काय आणि 'परंतु' काय ? तुम्ही या हरनामसिंगाला आतां काय समजतां ? मी आतां ओंकारेश्वरीं भिक्षांदेहि करणारा भिक्षेकरी राहिलों नसून मी दिल्लीच्या बादशहातींतील ज्यांचा पंचहजारी मनसबदार आहें. आजपासून भैरवगडची किल्लेदारीही माझ्या हातीं आली आहे. एथें आतां मला कोणत्याही गोष्टीला प्रतिबंध करणारें कोण आहे ?"

" खरेंच ?"

" खरेंच !"

" वाः ! हरनामसिंग ! एवढें घबाड तूं कधीं साधलेंस ?"

" कधीं साधलें ! हें पहा, असल्या गोष्टी बोलत बसण्याला आपणाला सध्यां वेळ नाहीं. आपला कार्यभाग साधून आपण एकदां गडाबाहेर गेलों कीं मग बोलावयाला पुष्कळ अवकाश आहे. चला.—"

भागाबाईनेंही काळवेळेचा विचार करून फार वेळ बोलत न बसतां झट्कन् हरनामसिंगानें पुढें केलेला पेहराव धारण केला व प्रसंगीं उपयोग व्हावा म्हणून नेहमीं जिवापलीकडे जवळ जतन केलेली तरवार बरोबर घेऊन ती त्याच्या मागोमाग महालाबाहेर पडली. जातांना तिनें शयनमंदिरांतील दीप मालविले व ते मालवितां मालवितां हरनामसिंगाला विचारलें, " पण कायरे हरनामसिंग ! शहाजाद्याला ही नुसती गुंगीच आली असेल ना ? कीं—"

हरनामसिंगानें घाईघाईनें बाहेर पडतां पडतां भागाबाईच्या तोंडचें वाक्य पूर्ण केलें, " कीं मरण आलें असेल असेंच ना तुमचें म्हणणें ? आलें तर आलें मरण ! त्याचें सुतक आपणाला थोडेंच आहे ?"

भागाबाई यावर जास्त कांहीं बोलली नाहीं. तीं दोघें लालमहालाच्या दरवाजापाशीं येतात तों त्यांना कोणाची तरी अस्पष्ट आकृति दरवाजाच्या आड लपतांना दिसली. त्याबरोबर भागाबाई एकदम दचकून दोन पावलें मागें सरून हरनामसिंगाच्या कानाशीं लागून हळूच उद्गारली, " हरनामसिंग ! हें रे काय ?" ती असें विचारते



"...मात्र तुम्ही एक करा, कोणाला तुमची ओळख पडूं नये एवढ्यासाठीं हा पेहेराव मीं मुद्दाम आणला आहे तेवढा चटकन् धारण करा." त्या व्यक्तीनें कांहीं कपडे भागाबाईपुढं करीत म्हटलें.

[ पृष्ठ २६८

आहे तोंच दरवाजाच्या दुसऱ्या बाजूला आणखी एक अस्पष्ट आकृति तिला आढळली. त्यामुळें ती जास्तच बावरली. हरनामसिंगही विस्मयचकित झाला. पण त्यानें भागाबाईला धीर देऊन स्वतः तिच्या पुढें होऊन आपली तरवार सरसावीत कठोर स्वरांत त्या दोन अज्ञात व्यक्तींना दरडावून विचारलें, "कोण तुम्ही ? मुकाटयानें स्वाधीन व्हा, नाहींतर प्राणाला मुकाल !"

इतक्यांत भागाबाईही आपली तरवार सरसावून पुढें झाली.

"कोण–कोण बोलत आहे तो ? ओळखलें मीं तुला. हरनाम–हरामखोर–" प्रथम आढळलेल्या व्यक्तीनें आपल्या तरवारीचा हरनामसिंगाच्या मानेवर जोराचा वार करीत संतापपूर्वक उद्गार काढले, "चांडाळा ! तूं माझा केंसानें गळा कापलास काय ? हें घे त्याचें प्रायश्चित्त ! भैरवगडाचा किल्लेदार हो !"

हरनामसिंग त्या एका घावासरसा खालीं पडला व त्याचा बचाव करण्यासाठीं भागाबाई आवेशानें आपली तरवार उपसून पुढें सरत होती ती दचकून एकदम मागें सरून कांपऱ्या स्वरांत उद्गारली, "कोण तुम्ही ?"

त्या निमअंधाऱ्या जागीं कांहीं क्षणांपूर्वी हरनामसिंग व भागाबाई यांना आढळलेली दुसरी व्यक्ति भागाबाईलाही हरनामसिंगाचाच साथीदार समजून त्याची हरनामसिंगासारखीच गत करण्यासाठीं पवित्र्यांत पुढें सरली होती, व त्या व्यक्तीच्या हातांतील तरवारीचा घाव भागाबाईच्या मानेवर पडण्याच्या ऐन बेतांत होता. परंतु भागाबाईच्या मुखांतून 'कोण तुम्ही' हा प्रश्न निघतांच त्या व्यक्तीचा तो असिसिद्ध हस्त झटक्यासरसा आपोआप मागें सरला व त्याच वेळीं त्या व्यक्तीच्या मुखांतून आश्चर्योद्गार निघाले, "कोण ? भागा !"

"कोण ? भागा काय ?" हरनामसिंगाला लोळविणाऱ्या व्यक्तीनें मागें वळून पहातां पहातां आपली तरवार सरसावीत जवळच्या दुसऱ्या व्यक्तीकडे वळून विचारलें, "कुठें आहे ती ? भागा कुठें आहे ? आपल्या बद्करणीनें माझ्या बेचाळीस पूर्वजांना रौरवनरकांत लोटणारी ती कुळबुडवी कारटी कुठें आहे !"

इतक्यांत हरनामसिंग विव्हळत उद्गारला, "धनी ! ताईसाहेब पूर्ण निरपराधी आहेत. आपला व बालकर्णांचा हरयुक्तीनें बचाव करण्यासाठींच ताईसाहेब व मी भगीरथ प्रयत्न करून एथवर पल्ला गांठला, व आमचा मार्ग निष्कंटक करून आतां आम्ही आपली बंधमुक्तता करण्यालाच निघालों होतों.—" हरनामसिंगाची जीभ एकाएकीं अडखळली ती कायमचीच अडखळली. त्याची हत्या करणाऱ्या पहिल्या

व्यक्तीनें करुणस्वरानें त्याला हांका मारल्या, ओ नाहीं ! पुरुषवेषधारी भागाबाईनें दुःखातिरेकानें हळहळत 'हरनाम ! हरनाम !' अशा हांका मारीत तेथें येऊन बसून त्याचें मस्तक उचलून हातीं घेतलें व पुन्हा हांका मारल्या, तरीही ओ नाहीं !

" बाबा ! तुम्हीं अविचारानें हरनामाला ठार केलें. हरनाम माझ्याबरोबर होता म्हणून मी बचावलें, व त्याच्या जिवावरच मी आपणां उभयतांची सुटका करणार होतें ! " भागाबाई शोकपूर्ण स्वरांत उद्गारली.

" भागा ! हरनामानें सांगितला हा सारा वृत्तान्त खरा काय ? "

" ईश्वरसाक्ष—तुमच्या पायांची साक्ष सर्व खरें ! " भागाबाई उत्तरली.

" अरेरे ! एकूण माझ्या हातून महत्पाप घडलें. हरनाम ! हरनाम ! मीं मूर्खानें उतावळेपणाच्या भरांत काय हें केलें ! हरनाम ! पुण्यात्म्या ! मला या अपराधा बद्दल क्षमा कर ! " असें म्हणून त्या पहिल्या व्यक्तीनें हरनामसिंगाच्या पायांवर डोकें ठेविलें.

त्या दुसऱ्या व्यक्तीनेंही हरनामसिंगासाठीं हळहळत भागाबाईपुढें येऊन तिच्या-समोर गुढगे टेंकून उद्गार काढले, " भागा ! तूं देवता आहेस ! तुझी खरी योग्यता मला मूर्खाला आजवर न कळल्यामुळें मीं तुझ्याविषयीं भलत्याच विकल्पांना माझ्या मनांत थारा दिला, याबद्दल तूं मला क्षमा करशील का ? "

भागाबाई जरी हरनामसिंगाच्या निधनामुळें खिन्न झाली होती, तरी ती अस्फुट शब्दांत उत्तरली, " काय हें !—बाबा जवळ आहेत, ते हें पाहून काय म्हणतील ! कांहीं काळवेळ—"

भागाबाईच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच गडावर सर्वत्र 'शत्रूचा वेढा पडला असा हलकल्लोळ उडाला. त्याच वेळीं भागाबाईला लालमहालाच्या पिछाडीला कोणीतरी हळूहळू बोलत असल्याचें ऐकूं आलें, " ताईसाहेब ! आपणां-ला भिण्याचें कारण नाहीं. गडाला वेढा मल्हारराव, आपले धनी व विक्रमसिंह यांचा पडला आहे. आपल्या केंसालाही धक्का लागणार नाहीं. आपण व ही अशा दोघीजणी निर्धास्तपणें या भुयारांतून जा. काळोख असला तरी भिण्याचें कारण नाहीं. निर्धास्तपणें जा. मी चंद्रशेखर,बालकर्ण व भागाबाई यांचा शोध करून त्यांना बंधमुक्त करून आपल्या मागोमाग घेऊन येतों. चला लौकर. बोलत बसूं नका. एकेक क्षण पृथ्वीच्या मोलाचा जातो आहे. तिकडे उज्जयनीला भडकलेला युद्धाचा वणवा एथवर भडकत आला नाहीं तोंवर आपणां सर्वांना गडापार झालें पाहिजे."

विक्रमसिंह व मल्हारराव बांडे यांची गांठ पडली केव्हां व त्यांनीं वेढ्याची तयारी केली केव्हां ?

## प्रकरण तेहतिसावें

# उलगडा

पुढें काय झालें ?—तें सांगण्यापूर्वी आपणाला गेल्या दोन प्रकरणांतील घटनां-चा कार्यकारणभावाच्या साह्यानें उलगडा करून पाहिला पाहिजे.

जयसिंगानें बाजिरावांना सभासिंगाच्या हातीं जो निरोप पाठविला, तो आपल्या मतें अत्यंत गुप्त असा पाठविला. परंतु राणी डोळ्यांत तेल घालून पतीच्या हालचालींवर नजर ठेवीत होती. जयसिंग हा स्वतः सज्जन, विद्वान्, गुणवान् असल्यामुळें त्याच्या पदरीं जसा गुणी व कर्तृत्ववान् पुरुषांचा संग्रह होता, त्याप्रमाणेंच त्याला नकळत त्याच्या घरांत लाडक्या धाकट्या राणीच्या पदरच्या नादान पोटाळांचाही बराच मोठा तांडा जमलेला होता. तशांत कलहाचा प्रादुर्भाव ज्या घरांत होतो, त्या घरांत तर असल्या आगलाव्या वृत्तीच्या माणसांचें राज्य! जयसिंगा-चा बाजिरावांची भेट घेण्याबद्दलचा बेत राणीला व जगत्सिंगाला अशाच एका सेवका-कडून कळला. लगेच त्यांनीं आपसांत संकेत करून जयसिंगाचा तो बेत हाणून पाडण्या-चा—इतकेंच काय पण बाजिरावांना पेंचांत पकडून आपला डाव साधण्याचा निश्चय केला. तो त्यांचा डाव पूर्वी सांगितल्याप्रमाणें फसला. त्यांनीं तो डाव निजामाच्या सल्ल्यानें रचिला होता. कालिदासानें आपल्या कविकल्पनांतून निर्माण केलेला सेनापति दाभाड्यांविषयींचा भ्रमाचा भोंपळा त्याच दिवशीं फुटला होता. निजामा-च्या पदरच्या एका चतुर गुप्त हेरानें त्याच दिवशीं सायंकाळीं गणेशतीर्थापावेतों जाऊन बाजिरावांच्या नोकरचाकरांत मिसळून खऱ्या प्रकाराचा तलास लावून तो निजामाला कळविला होता. त्याच्या पूर्व दिवशींच शिंदे-होळकरांनीं भोपाळकडील सर्व प्रांतांत चांगला जम बसवून निजामाशीं मोक्याच्या जागीं सामना देण्याची जय्यत तयारी केल्याचेंही निजामाच्या कानीं आलें होतें. वनवासीच्या हालचालींना आळा घालणें तर निजामाच्या आवांक्याबाहेरचें काम होऊन बसलें होतें. बुंदीचा बुधसिंग पुन्हा ताज्या दमानें चालून येत होता. सज्जनसिंगाचे बादशाही सत्तेला रसातळाला नेण्याविषयींचे प्रयत्नही अव्याहत सुरूच होते.

रहातां राहिला एकच जितका रामबाण तितकाच विचित्र उपाय,—मराठ्यांना शरण आणण्यासाठीं त्यांच्या राजकन्येला पकडून अटकेंत ठेवणें हा ! व राजकन्या

पकडली गेल्याची बातमी प्रथम जेव्हां निजामाच्या कानीं आली, तेव्हां त्याला अतिशय संतोष वाटलाही. पण सटवोजी जाधवानें तिला पकडून उज्जयनीला आणण्यासाठीं आपल्या ताब्यांत घेतलें आहे असें कळतांच निजामाचा संतोष पार लयाला गेला, व त्यानें मनांतल्या मनांत खूणगांठ बांधली कीं 'याचें नांव मराठ्यांचा गनिमी कावा!' राजकन्या आपल्या ताब्यांत येईल ही आशा त्यानें सटवोजीचें नांव ऐकतांच सोडली; इतकेंच काय, पण कालिदासानें दाभाड्यांच्या बाबतींत आणलेल्या बातमींतील दाभाडेही मराठ्यांच्या गनिमी काव्याच्या एखाद्या बेमालूम डावांतून केवळ काल्पनिक जगांत अवतरले असले पाहिजेत असाही त्याचा ग्रह झाला. या अनिष्ट वार्तांच्या आघातांनीं दुखावलेल्या त्याच्या मनावर मीठ चोळण्यासाठींच कीं काय, विक्रमसिंह जिवंत असून तो मराठ्यांना सामील होऊन दिल्लीची बादशाही सत्ता धुळीला मिळविण्याच्या खटपटींत आहे असेंही त्या बातमीदारानें सांगितलें. या सर्व एकीहून एक तीव्र दुःखद वार्ता त्या दिवशीं अवघ्या एका प्रहराच्या आंत निजामाच्या कानीं आल्या!

ज्या अर्थी बाजीराव पेशवे व त्यांचे हस्तक मूळपासूनच इतके पायाशुद्ध वागत आहेत, त्या अर्थीं ते नरेंद्रमंडळाच्या बैठकीला हजर राहिले तरी ते तडजोडीच्या बैठकीला म्हणून हजर न रहतां अंतस्थ रीत्या समरांगणावर पवित्रा ठोकण्याच्या जय्यत तयारीनेंच हजर राहतील, हें निजामानें चाणाक्षपणानें अजमावलें, व तशी वेळ जर आलीच तर आपलीही मराठ्यांशीं सामना देण्याची तयारी असावी असा दूरवर विचार करून तो त्या उद्योगाला लागला. त्या वेळीं उज्जयनींत इतके देशोदेशींचे राजे महाराजे एकत्र झाले होते; पण निजामाला शंका अशी कीं, ते ऐनवेळीं मराठ्यांना सामील होणार नाहींत कशावरून! यास्तव ज्या सैन्यावर आपणाला पूर्ण विसंबून राहतां येईल असें आपलें खास मुसलमान सैन्य एथें बिनीला पाहिजे असें निजामाच्या मनानें घेतलें. गाजीउद्दिनालाही तो विचार पटला. त्यांचें खास सैन्य नरसिंगगड ते भोपाळ एवढ्या दरम्यान् सोईच्या जागोजागीं छावण्या ठोकून बसलेलें असल्यानें त्यांतलें जरूर तेवढें सैन्य ताबडतोब उज्जयनीला आणण्यासाठीं त्या बापलेकांनीं गुपचूप तिकडे जाण्याचें ठरविलें. तिकडे इतक्या तांतडीनें जाण्यांत भोपाळकडील शत्रूंच्या—होळकर—शिंदे वगैरेंच्या हालचालींविषयीं बित्तंबातमी काढण्याचाही त्यांचा हेतु

होता. आज बऱ्याच दिवसांपासून शिंदे-होळकरांचा भोपाळच्या किल्ल्यावर डोळा आहे हें निजामाला माहीत होतें, व तो बळकट किल्ला मराठयांच्या हातीं गेला रे गेला कीं आपलें मरण ओढवलें, हें निजाम पक्कें ओळखून होता. म्हणून अशा आणीबाणीच्या वेळीं भोपाळच्या किल्ल्याला प्राणांपेक्षां जास्त जपणें निजामाला प्राप्त होतें. मात्र बोभाटयाच्या भयानें या राजकीय भानगडी त्यानें कोणालाच-शहाजाद्यालाही कळविल्या नव्हत्या.

अशा चौरंगी अडचणींत निजाम सांपडला असतांना अंबरची राणी त्या दिवशीं सूर्यास्त झाल्यावर व अर्थात जयसिंग आपल्या बेतानुसार जयगडीं गेल्यावर निजामाकडे गेली, व तिनें साधल्यास बाजिरावांना जयगडांत कोंडून बंदिवान करण्याविषयीं निजामाची सल्ला विचारली. निजामाचा हिंदु राजांवर जरी फारसा विश्वास नसला, तरी स्त्रीजातीच्या साहसी वृत्तीची त्याला चांगली ओळख होती. राणी आपल्या हट्टाग्रहाच्या पूर्ततेसाठीं पेशव्यांना कैद करील इतकेंच,काय पण एखादी अपूर्व साहसाची गोष्ट करण्यालाही मागें पाऊल घेणार नाहीं अशी निजामाची खात्री होती. परस्पर पेशव्यांची खोड मोडते आहे असें पाहून त्यानें राणी व जगत्सिंग यांना बाजिरावांचा खरपूस समाचार घेण्याला उत्तेजन दिलें, व तें कार्य राणी आणि जगत्सिंग यांच्या हातून तत्परतेनें तडीला जावें यासाठीं त्यानें 'माधवसिंगालाच युवराज्याभिषेक करण्याला आपण जयसिंगजींना भाग पाडूं; तुम्ही त्याची मुळींच काळजी करूं नका' असें वचनही राणीला दिलें. राणीला तरी तेंच पाहिजे होतें.

एवढें झाल्यावर निजाम पुढील तजविजीसाठीं गाजीउद्दिनासह ताबडतोब तिसऱ्या कोणालाही न कळवितां निघून गेला. मात्र जातांना त्यानें अनुराधसिंगाची भेट घेऊन त्याला परिस्थिति सहज समजावून सांगतां येण्याजोगी होती तेवढी थोडक्यांत समजावून सांगून जरूर तर सर्व राजमंडळीला संग्रामासाठीं सज्ज रहाण्याला सुचविलें होतें. या सूचनेनुसार विचारविनिमय करण्यासाठीं अनुराधसिंगाच्या राजवाड्यांत एकत्र जमलेल्या राजेरजवाड्यांनीं कशा प्रकारचा विचारविनिमय त्या रात्रौ चालविला होता हें वाचकांना मागें कळलेंच आहे.

जयसिंग पूर्वसंकेतानुसार जयगडीं सूर्यास्तापूर्वी जाऊन पोंचतो तोंच त्याच्या मागोमाग जगत्सिंग व राणी हीं दोघेंही तेथें हजर ! तें जयसिंगाला रुचलें नाहीं. पण करतो काय ! तो त्या दोघांशीं कांहींशा तुटकपणानें वागला; तिथें पुन्हां युवराज्याभिषेकाचा अप्रिय प्रश्न निघाला, व तें भांडण इतकें विकोपाला गेलें कीं जयसिंगाचा मन:-

संतापानें मस्तकशूळ चाळवला व तो विश्रांति घेण्यासाठीं आपल्या महालांत निघून गेला. आतां पेशवे इथें आल्यास या मंडळीला विनाकारण जास्त संशय घेण्याला अवसर मिळणार असें पाहून जयसिंगानें आपल्या एका 'विश्वासू' सेवकाला हांक मारून त्याच्या हातीं 'तुम्ही तूर्त येऊं नका. मींच तुम्हांला रात्रीच्या चौथ्या प्रहरीं तिकडे येऊन भेटेन' असा निरोप पेशव्यांना पाठविला. पण जयसिंगाचा हा 'विश्वासू' सेवक जयसिंगाच्या हालचालींवर गुप्त नजर ठेवणाऱ्या राणीच्या विश्वासू हस्तकांपैकीं एकजण असल्यानें त्यानें ती बातमी नेमकी जगत्सिंग व राणी यांना कळविली. त्यामुळें आगींत तेलाचा शिडकाव झाल्यासारखें झालें. राणीनें त्या नोकराला बाजिरावांकडे तर जाऊं दिलें नाहींच; उलट आपल्या बेतांविषयीं जयसिंगाला पूर्ण अज्ञान असावें यास्तव दोन घटकांच्या अवकाशानंतर त्याच नोकराला पढवून पुन्हा जयसिंगाकडे पाठविलें. नोकरानें जाऊन खोटीच वर्दी दिली, " पेशवे मला मार्गांतच भेटले. त्यांना मीं आपला निरोप सांगितला. ते 'बरें' म्हणून माघारे गेले."

असा प्रकार झाल्यामुळें जयसिंग आपल्या महालांत बाजिरावांच्या बाबतींत अगदीं निश्चित बसला होता; व राणीच्या संगनमतानें जगत्सिंगानें बाजिरावांच्या आदरातिथ्याचें कार्य आपल्या शिरावर घेतलें होतें. त्यांच्या बैठकीचा परिणाम काय झाला हें आपणाला पूर्वींच कळलें आहे. बाजिरावांनीं जगत्सिंगाला पहातांच प्रथमारंभींच तेथें कांहींतरी पाणी मुरत आहे हें ओळखून पिलाजी जाधवांना पुढील प्रसंगाला—तसा प्रसंग ओढवलाच तर तोंड देण्याची जय्यत तयारी ठेवण्यासाठीं आपल्या सैन्याच्या मुक्कामावर पाठविलें होतें. पिलाजी जाधवांकडून त्या कामगिरींत अणुमात्र ढिलाई झाली नाहीं. परंतु जगत्सिंगानें त्यापूर्वींच अजमेरीसिंग व शिवसिंग यांच्या नेतृत्वाखालीं जय्यत सैन्य गडाच्या पिछाडीला गुप्तपणें ठेविलें असल्यामुळें तें खुणेसरसें धावून आलें, व त्यांच्या जोरावर जगत्सिंगानें बाजिरावांना कैद करण्याचा आव घातला. परंतु तेवढ्यांत पिलाजी जाधवांनीं त्या सुंदोपसुंदांचा मोठ्या युक्तीनें कोंडमारा केल्यामुळें जगत्सिंगाचा डाव त्याच्यावरच उलटला. गडाच्या आंतील बाजूला कोणाला कल्पनादेखील करतां येणार नाहीं एवढा निकराचा संग्राम गडाबाहेर उभयपक्षांत झाला. अजमेरीसिंग व जयसिंग हे दोघे वीर पश्चिम माळव्यांतील विजयामुळें फार शेफारून गेले होते. व सकृद्दर्शनीं पहातां त्यांना शेफारून सोडण्याइतका तो विजय महत्त्वशील होता

यांत संशय नाहीं. त्यांनीं मांडवगड काबीज केला, त्यांनीं युक्तीनें निहालकर्ण व अनुपसिंग यांना कैद करून आपणाबरोबर उज्जयनीला आणलें, राजकन्येला पकडून नवीनच फितलेल्या सटवोजी जाधवाच्या हातीं उज्जयनीला रवाना करण्याचें श्रेयही त्यांचेंच होतें; आणि आतां बाजीराव पेशव्यांना कोंडून पकडून त्या आपल्या भव्य यशोमंदिरावर सुवर्णकळस चढविण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती.

पण तो त्यांचा डाव अखेर त्यांच्यावरच उलटला ! ज्या एका फितुरावर त्यांचा एवढा भरंवसा—कारण, तो बाजिरावांकडील जबाबदार माणूस असून तो फितुर झालेला !—त्यानेंच बाह्यात्कारीं बाजिरावांविरुद्ध शस्त्रग्रहण करून जयगडावरील हल्ल्यांत आपला प्रवेश करून घेतला, आणि त्यानेंच ऐन खडाजंगींत अजमेरीसिंग व शिवसिंग यांचीं शिरें धडावेगळीं करून तीं शिरकमलें बाजिरावांच्या चरणांवर आणून वाहिलीं. आणि हें भयंकर कृत्य त्या माणसानें इतक्या बेमालूमपणें केलें, कीं तो जेव्हां पुन्हा माघारा आपल्या लोकांत जाऊन आपल्या दोघां सेनानींना शत्रूनें ठार मारल्याबद्दल त्या शत्रूला शिव्याशाप देत त्यांचा शोध करण्यासाठीं आवेशपूर्वक पिलाजी जाधवांच्या सैन्यांत घुसला, तेव्हां त्याच्या पक्षाचे लोक त्याची उलट वाहवा करूं लागले ! इतकें झालें तरी अजमेरीसिंग व शिवसिंग यांना ठार करणारा तो धीट माणूस कोण याचा कोणालाही तपास लागेना. त्या रणधुमाळींत पिलाजी जाधवांनीं मराठ्यांची बाजू चांगलीच राखली होती; तशांत तेजकर्ण व सभासिंग यांच्यासह बाजीराव पेशवे त्यांना येऊन मिळाल्यावर मग काय शत्रूचा नुसता धुव्वा उडाला !

पण तो नैमित्तिक विजय म्हणजे प्रस्तुतच्या लढयांतील निर्णयात्मक विजय नव्हे; इतकेंच काय, पण हा विजय बहुशः मराठयांवर महासंकट ओढून आणणारा आहे; एथल्या पराभवानें चिडून गेलेली मंडळी नगरांत जाऊन निजाम व अनुराधसिंगादि जीहुकूमवाले बादशाही पक्षांतील राजे यांना ही खबर सांगेल, त्यावरून सर्व शत्रुपक्षीय लोक चिडून एक होऊन आपल्या पारिपत्यासाठीं धांवून येतील; हें भविष्य ओळखून 'आतां परवांच्या तडजोडीची मुळींच आशा नाहीं' अशी खात्री मानून शत्रूच्या बेसावधपणाचा जेवढा फायदा घेतां येईल तेवढा घ्यावा अशा इराद्यानें बाजिरावांनीं ताबडतोब उज्जयनीवर चाल करण्याचें ठरविलें, व तो बेत त्याच क्षणीं अंमलांतही आणला. कदाचित् आपल्याबरोबरचें सैन्य अपुरें पडलें म्हणून त्यांनीं उज्जयनीवर चाल करतांनाच सभासिंगाला गणेशतीर्थावर पाठवून

तेथील सारें सैन्य आणविण्याची तजवीज केली. बाजिरावांचा मानस जयसिंगाशीं शांतपणानें महत्त्वाच्या गोष्टींविषयीं विचारविनिमय करण्याचा होता. त्याप्रमाणेंच तावडतोब गणेशतीर्थावर जाऊन विक्रमसिंगाला भेटण्याचेंही त्यांच्या मनांत होतें. असे आपल्या पक्षाच्या बळकटीविषयीं किती तरी महत्त्वाचे विचार त्यांच्या मनांत होते. पण त्या विचारांना प्रत्यक्ष कार्यक्षेत्रांत मूर्त स्वरूप लाभण्याची आशा आतां उरली नाहीं; व बाजिरावांनींही त्याविषयीं विषाद मानला नाहीं. "यांतही परमेश्वराचा कांहींतरी पवित्र हेतु असेल" असें ते आत्मविश्वासपूर्वक आपल्या मनाशीं म्हणाले, व मनानेंही त्यांना तसेंच उत्तेजक उत्तर दिलें.

## प्रकरण चौतिसावें

# आणखी थोडा उलगडा

कालिदासाबरोबर भागाबाई उज्जयनीला आली, ती बाह्यात्कारीं जरी शहाजाद्याच्या विलासमंदिरांत प्रविष्ट होण्यासाठीं आली, तरी तो डाव रचण्यांतील तिचा खरा उद्देश बालकर्णाची–आपल्या प्रियकराची भैरवगडावरून कैदेंतून मुक्तता करणें व आपला पिता चंद्रशेखर जर कदाचित् शत्रूच्या आहारीं जाऊं लागला तर त्याला ताळ्यावर आणणें हा होता. शहाजाद्याचा आपणावर डोळा आहे हें भागाबाईला प्रथम कालिदासाकडूनच कळलें. चंद्रशेखराचा विश्वासू सेवक हरनामसिंग याला चंद्रशेखरानें, शत्रूच्या ओराच्या हालचालींची बातमी कानांवर असल्यामुळें शत्रूकडील गुप्त बातम्या काढून आणण्याच्या कामावर नेमिलें होतें, व हरनामसिंग भिक्षेकऱ्याचा वेष घेऊन आपलें कर्तव्य करीत होता. त्या दिवशीं ओंकारेश्वरीं राजकन्या यात्रेसाठीं येणार व तिला पकडण्याचा शत्रूचा विचार आहे अशी आगाऊ कुणकूण कळल्यामुळें हरनामसिंग ओंकारेश्वरींच भिक्षांदेहीच्या मिषानें हिंडत होता. त्यानें बेलविक्याच्या मिषानें तेथें हिंडणाऱ्या चमेलीसिंगाचा, कालिदास व भवानीराम यांच्याशीं झालेला सांकेतिक संवाद ऐकून ताबडतोब चंद्रशेखराच्या वाड्यांत जाऊन भागाबाईला ती खबर दिली. त्यावरून भागाबाईला आपणावर कोसळणाऱ्या संकटाची कल्पना आली, व भवानीरामाच्या कृष्णहृदयाची ओळख पटली. पण ती घाबरली नाहीं. तिनें हरनामसिंगाकडून मिळालेल्या माहितीवरून कालिदास हा एक आचरट प्राणी आहे हें ओळखून त्याच्याच साह्यानें त्याला नकळत अरिष्ट निवारण करतां येईल अशी आगाऊ योजना आपल्या मनाशीं ठरवून कालिदासाला ताबडतोब बोलावून घेतलें. कवीच तो! त्याचा रसिकतापूर्वक आदरसत्कार करतांच त्याच्या अंतःकरणाची कळी उमलण्याला कितीसा उशीर! तशांत भागाबाई शहाजाद्याची विलासदासी होण्याला उत्सुक असल्याचें भागाबाईच्या तोंडून कळतांच तर कालिदास केवळ काव्यानंदांत नाचूं लागला. आपणाला कोठून तरी एकदां भैरवगडावर प्रवेश मिळावा असा भागाबाईचा अंतस्थ हेतु असल्यानें तिनें आपल्या साखरघोळ भाषेंत शहाजाद्याची भैरवगडावर एकान्तांत भेट घेण्याचा विचार उक्त म्हणून कालिदासाच्या अंतःकरणावर ठसविला. कालिदासाचें आपणाशीं भावैक्य करून घेण्याला भागाबाईला मुळींच

सायास पडले नाहींत. तिनें 'शहाजाद्याची प्रणयिनी' हा शाब्दिक दोष मुद्दाम भावी यशाकडे दृष्टि देऊन आपल्या नांवाला चिकटवून घेतला, व भैरवगड एकदांचा गांठला. मात्र ओंकारेश्वराहून निघतांना विश्वासू हरनामसिंगाला बरोबर घेण्याला ती विसरली नाहीं.

भागाबाई भैरवगडीं गेल्यावर कालिदास तिच्या आगमनाची खुषखबर शहाजाद्याला देण्यासाठीं उज्जयनीला गेला. ती मंडळी भैरवगडावर जाऊन पोंचण्यापूर्वींच त्यांच्या आगमनाची वार्ता भैरवगडावर पोंचल्यामुळें तेथें महालांत सर्व प्रकारच्या विलासोपयोगी साहित्याची जय्यत तयारी ठेवण्यांत आली होती. भागाबाईला त्या कशाचीच आवश्यकता नव्हती हा प्रश्न अगदीं निराळा.

भैरवगडावर आल्यावर लगेच भागाबाई व हरनामसिंग यांनीं प्रथम तेथील सर्व परिस्थिति गड पाहाण्याच्या उत्कंठेचें मिष करून अवलोकन केली. बालकर्ण अमुक एका जागीं कैदेंत आहे हें त्यांना कळून आलें; त्याप्रमाणेंच चंद्रशेखरानें भागाबाईला शहाजाद्याच्या जनानखान्यांत पाठविण्याचें साफ नाकारल्यामुळें त्याला जयगडावर कैदेंत ठेवण्यांत आलें आहे असेंही त्यांना चौकशीअंतीं समजलें. त्या दोघांचीही मोकळीक करण्याला अनुकूल वातावरण निर्माण होण्यासाठीं शहाजादा गडावर येणें अवश्य होतें. त्यामुळें हरनामसिंगाला—तो भागाबाईचा विश्वासू हस्तक म्हणून—सर्वत्र दरारा बसविणें सोपें जाणार होतें. फार काय, हरनामसिंगानें तर आणखी एक पाऊल पुढें जाऊन कालिदासाच्या वशिल्यानें भैरवगडची किल्लेदारीही तात्काळ संपादन केली. 'भागाबाईनें शहाजाद्याच्या जनानखान्यांत जाऊन बाटणें ही गोष्ट कितीएक यवनद्वेष्ट्या हिंदूंना मान्य नाहीं; गडावरील हिंदु लोकही याच कारणामुळें नाखूष झाले असून ते वेळीं शत्रूचा आंत शिरकाव करून द्यावयालाही कमी करणार नाहींत; यास्तव मला कांहीं दिवस—शहाजाद्यांबरोबर भागाबाई गडावरून रवाना होईतों गडावर एकतंत्री सख्त अंमल राखण्याची मोकळीक असावी' अशी मागणी हरनामसिंगानें केली व कालिदासानें तिला पूर्ण दुजोरा दिला. मग ती मागणी मान्य होण्याला कितीसा उशीर! त्याच दिवशीं हरनामसिंग भैरवगडचा किल्लेदार झाला!

एथवर सर्व ठीक जुळलें. शहाजादा महालांत येऊन रात्रौ सर्वत्र सामसूम झाल्यावर हरनामसिंगानें गुपचूप बालकर्णाची मुक्तता करावयाची, व भागाबाई-

सह तिघांनीं तेथून पाय काढावयाचा, हा बेत तर मुक्रर झाला. पण तो अंमलांत कसा आणावयाचा हाच प्रश्न होता. त्यांत खरा आणीबाणीचा प्रसंग भागाबाईवर होता. शहाजादा आल्यावर भागाबाईला घेतल्या सोंगाची बतावणी करणें तर अपरिहार्य होतें. पण ती बतावणी करतां करतां तिला आपलें कौमार्य अभंग राखावयाचें होतें. या सर्व गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून कशा साधाव्या याविषयीं पूर्ण विचार करून भागाबाईनें हरनामसिंगाच्या साहाय्यानें शहाजाद्याला पाजावयाच्या उंची मद्यांत, त्याप्रमाणेंच ताम्बूलांतही अमली पदार्थांचा समावेश केला होता. त्यामुळें तिचा तो डाव बेमालूम साधला.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट एथेंच निवेदन करणें अवश्य आहे. सटवोजी जाधव गजराबाई व काशीबाई यांच्यासह उज्जयनीला येण्यासाठीं केव्हां निघाला, हें वाचकांना माहीत आहेच. सटवोजीनें कालिदासाबरोबर ओंकारेश्वरीं जावयाला निघतांच आपण दाभाड्यांचा अर्थात् पेशव्यांच्या प्रतिस्पर्ध्यांचा हस्तक असल्याचा बहाणा केला होता. तो जो ओंकारेश्वरापावेतों कालिदासासमवेत आल्यावर तेथून कसल्या तरी मिषानें कालिदासाला सोडून निसटला, तो मांडवगडाकडे निघाला. मंडलोईंना शत्रूच्या कारस्थानाची आगाऊ माहिती देऊन सावध करावें असा त्याचा मानस होता. परंतु तो अर्ध्या मार्गावर जातो न जातो तोंच राजकन्या व आपली भावी वधू काशीबाई यांच्यावर शत्रूचा घाला पडणार असल्याची बातमी त्याच्या कानीं आली. मग कुठचा मांडवगड व कुठचें काय! तें सर्व सोडून देऊन सटवोजी एकदम गजराबाई व काशीबाई यांच्या रक्षणार्थ निघाला. त्यानें योग्य वेळीं शत्रूला गांठलें. पण उपयोग काय! तो अगदीं एकटा होता. तरीपण त्यानें तेथेंही आपली कल्पकता लढविली. अनेकवार भवानीरामाचें नांव कालिदासाच्या मुखांतून सटवोजीनें ऐकलें होतें, व भवानीरामानेंही कालिदासाकडूनच सटवोजीविषयीं माहिती मिळविली होती तो भवानीराम त्याला तेथें आढळला. सटवोजी हा दाभाड्यांचा हस्तक होय अशी भवानीरामाची ठाम समजूत झाली असल्यानें त्या दोघांची ओळख होऊन त्या ओळखीचें परस्पर विश्वासांत रूपांतर व्हावयाला फारसे आयास पडले नाहींत. इतकेंच काय; पण गजराबाई व काशीबाई या दोघी कैद झाल्यावर भवानीरामाला मांडवगडची कामगिरी अजून पार पाडावयाची असल्यानें त्या दोघींना विश्वासानें उज्जयनीला पोंचविण्याची कामगिरी सटवोजीवरच पडली.—नव्हे,सटवोजीनें बादशाही पक्षाची अल्पस्वल्प सेवा केल्यानें

तरी पुण्य लाभावें असा बहाणा करून ती कामगिरी आपणावर ओढून घेतली. गजराबाई व काशीबाई यांनीं शत्रूच्या हातीं सांपडल्यावर प्रथम जेव्हां सटवोजीला तेथें आलेला पाहिला, तेव्हां गजराबाई ताबडतोब त्याला ओळखूं शकली पण सटवोजीनें नेत्रसंकेत करून तिला गप्प रहावयाला सांगितल्यामुळें ती गप्प राहिली. काशीबाईनें मात्र सटवोजीला पूर्वीं कधींच पाहिलें नसल्यानें प्रथमच तो शत्रूच्या वतीनें चालून आलेला मराठा पहातांच तिनें त्याला लाखोली मोजली. तो सटवोजी जाधव आहे असें गजराबाईकडून कळतांच तर ती जास्तच खवळली, व शिव्यांची दुसरी लाखोली सटवोजीवर वहात 'असल्या देशकंटकाशीं आपलें लग्न झालें नाहीं ही परमेश्वरानें आपणावर कृपाच केली' असेंही बोलून चुकली. परंतु मागाहून—सटवोजी त्या दोघींना कैद करून उज्जयनीच्या मार्गाला लागल्या वर जेव्हां खरा प्रकार त्या दोघींनाही कळला, तेव्हां काशीबाईला काय वाटलें तें तिचें ती जाणे ! तिचीच गोष्ट कशाला ? तिचा बाप खासेराव देशमुख जो प्रथम शत्रूकडून होणाऱ्या जाचाला भिऊन शत्रूला शरण गेला होता, जो आपली लेंक तिच्या मर्जीविरुद्ध माणकोजी निंबाळकरालाच काय, पण निजामास सांगेल त्याला अर्पण करावयाला तयार झाला होता, आणि तरीही ज्याच्या कपाळीं बंदिवास आला होता, त्याला देखील मागाहून सटवोजीचें खरें स्वरूप कळतांच किती आनंद झाला व त्या आनंदाबरोबरच स्वतःच्या नेभळेपणाबद्दल किती लाज वाटली, याचें वर्णन कोणत्या शब्दांत करावें !

गजराबाई व काशीबाई या दोघींसह सटवोजी उज्जयनीला यावयाला निघाला, तेव्हां त्याचा विचार प्रथमच थेट बाजिरावांकडे जाऊन गजराबाईला त्यांच्या लग्नीं लावण्याचा होता. परंतु प्रारंभींच असें केल्यास शत्रूला आपल्या कारस्थानाचा सुगावा लागून आपले पुढील बेत फसतील या भयानें त्यानें तो विचार बदलून भैरवगडावरच प्रथम जावयाचें ठरविलें. राजकन्येला तेथेंच कैदेंत डाम्बून ठेवण्याचा निजामाचा बेत पूर्वींच ठरलेला असल्यानें सटवोजीच्या योजनेविषयीं कोणाला संशय आला नाहीं. बालकर्ण तेथेंच कैदेंत असल्याचें सटवोजीला कालिदासाकडून कळलेलें असल्यानें त्याची सुटका करण्याचाही त्याचा बेत होताच. तशांत थोड्या अवकाशानें कालिदास भागाबाईसह भैरवगडाकडे जातांना त्या मंडळीला भेटला, तेव्हां तर सर्वांचाच विचार नक्की झाला, व गजराबाई आणि काशीबाई यांच्यासह तो भैरवगडावरच गेला.

सटवोजी जयगडावर गेला तो प्रथम जगत्सिंगाला भेटला. त्याच्याशीं अघळपघळ गप्पा मारून त्याच्यापासून चंद्रशेखराविषयींचा वृत्तांत त्यानें काढून घेतला, व जगत्सिंगाच्याच तोंडून पेशव्यांच्या अपोक्षित कैदेची बातमी ऐकून तो तसाच अजमेरीसिंग, शिवसिंग वगैरे मंडळीला भेटावयाला गेला. त्या दोघां सेनानींची भेट घेण्यांतील सटवोजीचा हेतु येनकेन प्रकारेण शत्रूच्या गोटांत प्रामुख्यानें शिरकाव करून घेण्याचा होता; आणि साधल्यास—पण शिवसिंग आणि अजमेरीसिंग यांचीं शिरकमळें बाजिरावांच्या चरणांवर अर्पण करणारा धाडसी वीर सटवोजीच होता, एवढें सांगितल्यावर त्याला शत्रूच्या गोटांत शिरून काय साध्य करावयाचें होतें हें निराळें सांगावयाला नको.

* * *

चंद्रशेखर त्या दिवशीं अचानक बंधमुक्त झाला. तो बंदिवासांत असतांनाच भागाबाई शहाजाद्याला वश झाली असून ती भैरवगडावरील लालमहालांत आहे, तिथं शहाजादा रात्रौ तिची एकान्तभेट घेणार आहे, वगैरे दुर्वार्ता चंद्रशेखराच्या कानीं आल्या होत्या. शहाजाद्याच्या हुकुमाप्रमाणें बादशाही सरकारशीं राजनिष्ठा दाखविण्याच्या हेतूनें अर्थात् जरूर तर मराठ्यांचा पक्ष सोडावयाचा अशा बेतानें ओंकारेश्वराहून निघालेला चंद्रशेखर आतां फक्त देहानें मूळचा उरला होता, पण मनानें पार बदलला होता. 'तूं आपल्या इच्छेनें भागाबाईला शहाजाद्याच्या जनानखान्यांत पाठविण्याला राजी तरी हो, नाहींपेक्षां मरेतों असाच कैदेंत कुजत पड' अशी राक्षसी अट घालून चंद्रशेखराला बंदिशाळेंत ठेवण्यांत आलें होतें. चंद्रशेखर कांहीं हाडाचा खरा स्वाभिमानी वीर नव्हता. पण प्रसंगानें मनुष्य धीट बनतो—प्राणांवर बेतली कीं मांजरदेखील व्याघ्रासारखें उग्र स्वरूप धारण करतें, त्यांतलीच चंद्रशेखराची गत झाली होती. भागाबाई शहाजाद्याला आपण होऊन वश झाली ही बातमी भवानीरामानें केवळ सूडबुद्धीनें चंद्रशेखरला कळवून खिजविण्याला कमी केलें नाहीं. पण त्याबद्दल भवानीरामाला त्याच क्षणाला खासें प्रायश्चित्त द्यावयाला चंद्रशेखरानें कमी केलें नाहीं. भवानीराम बातमी सांगण्याच्या ऐन रंगांत आला असतां त्यानें त्याच्या कमरपट्ट्यांतील जंबिया मोठ्या चतुराईनें काढून घेऊन त्यानेंच त्याचा तेथल्या तेथें प्राण घेतला. अर्थात् या अत्याचाराचा बोभाटा हां हां म्हणतां होऊन चौकशीही करण्यांत आली. पण चंद्रशेखरानें आपल्या अंगच्या प्रसंगावधानाच्या जोरावर तो प्रसंग

बेमालूमपणें निभावून नेला. 'भवानीरामाला भागाबाईचा अभिलाष होता; ती शहाजाद्याच्या जनानखान्यांत न जातां आपली व्हावी अशी शिष्टाई तो माझ्या-समोर करूं लागला, शहाजाद्याची नानापरींनीं निर्भर्त्सनाही त्यानें केली; तें मला सहज न होऊन मीं त्याचा खून केला' असें चंद्रशेखरानें आपल्या तोंडानें कबूल करतांच त्याचा गौरव करण्यापुढें भवानीरामाच्या निधनाबद्दल हळहळण्याला फुरसत कोणाला होती ! त्याच्या वधाच्या आरोपांतून चंद्रशेखर लगेच मुक्त झाला इतकेंच काय, पण त्याचा बंदिवासही त्याच क्षणाला टळला. भागाबाईच्या वशिल्यावर तो पुढें कारभारांत थोर मान्यतेला चढणार या कल्पनेवर आजवर त्याला तुच्छ लेखणारे बादशाही पक्षाचे लोक त्याला लवून सलाम करून त्याच्या मुखांतील एखाद्या तरी सहानुभूतीच्या शब्दाची अपेक्षा करूं लागले !

पण चंद्रशेखराचें अंतःकरण भागाबाईसाठीं कसें आंतल्या आंत पिचत होतें तें एका त्याला स्वतःलाच माहीत, व दुसऱ्या परमेश्वराला माहीत ! चंद्रशेखर जो बंधमुक्त होऊन बाहेर पडला, तो 'दुसरा तिसरा कांहीं विचार नाहीं. त्या हरामखोर नादान पोरीला कधीं एकदां या जगांतून नाहींशी करूं, व तिच्या बदूकरणीनें माझ्या कुळाला लागलेला डाग तिच्याच रक्तानें कधीं एकदां धुऊन काढूं !' अशा संतप्त भावनेनें तो थेट भैरवगडाकडे वळला. सटवोजीला चंद्रशेखराची भेट जयगडावर जरी झाली नाहीं, तरी चंद्रशेखराच्या मुक्ततेची वार्ता त्याला कळली. जयगडच्या दंगलींत एकवार पिलाजी जाधव व बाजीराव यांना भेटून आपली करामत त्यांना निवेदन करून त्यांच्याकडून शाबासकी मिळवावी अशी इच्छा सटवोजीला एकदां झाली. पण तेव्हांच त्याच्याविरूद्ध उठलेलें काहूर त्याच्या कानीं आल्यामुळें व त्या आणीबाणीच्या वेळीं पिलाजी जाधव वगैरे मंडळीची संशयनिवृत्ति करण्याइतका अवकाशही त्याला नसल्याकारणानें एकदम गजराबाई-साहेबांसह आपल्या मंडळींची भेट घेऊं म्हणजे गैरसमज आपोआपच दूर होईल' असा विचार करून तो भैरवगडाकडे वळला. परंतु तो भैरवगडावर जाऊन पोंचण्यापूर्वींच चंद्रशेखर तेथें जाऊन पोंचला होता. तेथें जातांना त्याला द्वार-रक्षकांकडून प्रथम आंत जाण्याला प्रतिबंध झाला. आतां जयगडाहून बंधमुक्त होण्यासाठीं योजिलेली युक्तीच योजिल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें पाहून चंद्र-शेखरानें त्या दाररक्षकाला आपली ओळख दिली व ती ओळख पटतांच चंद्रशेखराला कोण प्रतिबंध करणार ? त्याला नुसता आंत प्रवेश मिळाला इतकेंच काय पण जातां जातां मुजरेही मिळाले. शहाजादा त्यापूर्वींच तेथें येऊन दाखल झाला होता व

त्याची सरबराई करण्यांत हरनामसिंग गुंतून पडला होता म्हणून, नाहींपेक्षां तेव्हांच चंद्रशेखर व हरनामसिंग यांची भेट व्हावयाची, आणि—पण भवितव्यतेची योजना निराळी होती.

लालमहालांत भागाबाई व हरनामसिंग शहाजाद्याची सरबराई करण्यांत गुंतून पडल्यामुळें चंद्रशेखराला गडाच्या आंतील बाजूला मनसोक्त भ्रमण करावयाला सांपडलें. योगायोग असा कीं, भागाबाई शहाजाद्याला वश झाल्याची दुर्वार्ता तेथें बंदिवासांत असलेल्या बालकर्णाला अगोदरच कळली होती, व त्यामुळें त्याच्याही मनाची स्थिति–तिला तुलना अथवा उपमा नाहींच; पण उपमाच द्यावयाची झाली तर चंद्रशेखराच्या दारुण मनःस्थितीची उपमा देतां येईल–दारुण व दुःखमय झाली होती. आपणाशीं अशा प्रकारें विश्वासघात करणाऱ्या नादान कुलटेला या जगांत एक क्षणही जिवंत राहूं देतां कामा नये असा बालकर्णाचा निर्धार ठरला खरा, पण बंधमुक्तता झाली असती तर तो निर्धार तडीला जाणारा होता ! कदाचित् चंद्रशेखरही आपल्या लेंकीला शहाजाद्याच्या जनानखान्यांत लोटून बाटविण्याला राजी झाला असेल काय, अशा नाना कुशंका काढून स्वतःशीं हळहळत अंतःकरणांतल्या अंतःकरणांत जाळून घेत बालकर्ण आपल्या बंदिस्त जागेंत कर्माला हात लावून स्तब्ध बसला असतां, अकस्मात् त्याच्या बंदिशालेचा दरवाजा मोकळा झाला, व 'आतांच हरनामसिंग व भागाबाई यांची आपणाला भेट होईल असा संदिग्ध संदेश एका शिपायानें दिला. बालकर्णानें 'हरनामसिंग म्हणजे कोण' असें विचारतांच 'आमचे नवे किल्लेदार' असें उत्तर देऊन तो शिपाई निघून गेला. शहाजादा झोंपीं जातांच गुपचूपपणें भागाबाई व बालकर्ण, राजकन्या व काशीबाई या सर्व मंडळीला बरोबर घेऊन रातोरात बाजिरावांच्या छावणीचा पल्ला गांठावयाचा अशा बेतानें हरनामसिंगानें सारे आडाखे ठरविले होते. परंतु–!

बालकर्ण बंधमुक्त होतांच बाहेरच्या मोकळ्या उद्यानांत शून्य चित्तानें भ्रमण करीत असतां चंद्रशेखराची व त्याची अचानक गांठ पडली व दोघांचें संभाषण झालें, त्यामुळें चंद्रशेखरापुरता बालकर्णाचा गैरसमज दूर झाला. पण भागाबाई व हरनामसिंग हीं दोघेंही या जगांत जिवंत रहावयाला लायक नाहींत असें त्या दोघांच्याही मनानें घेतलें. लगेच ते दोघे मिळून भागाबाई व हरनामसिंग यांचा शोध करण्यासाठीं लालमहालाकडे वळले. पुढें काय झालें तें वाचकांना ठाऊक आहेच.

## प्रकरण पस्तिसावें

# डाव साधला !

पिलाजी जाधवांना बाजिरावांनीं आज्ञापिल्याप्रमाणें त्यांनीं जयगडावर जगत्-सिंगानें रचिलेलें कुटिल कारस्थान मोठ्या शिताफीनें हाणून पाडलें हें आपणाला पूर्वींच माहीत झालें आहे. बाजीराव पेशवे, तेजकर्ण व सभासिंग येऊन मिळतांच पिलाजी जाधवांना जास्त स्फुरण आलें. त्यांनीं जगत्सिंगाच्या पक्षाचा पूर्ण मोड केल्यावर जगत्सिंगाचा शोध करण्यासाठीं सारा गड पालथा घातला. परंतु जगत्सिंहानें पूर्वींच पलायन केलें होतें, तो कोठून हातीं सांपडणार ! पण पिलाजी जाधवांनीं त्याचा पिच्छा पुरविण्याचा निर्धार केला. बाजिरावांना प्रथमारंभीं तें रुचलें नाहीं. जयसिंगाला देखील तें प्रथम पसंत पडलें नाहीं. परंतु पिलाजी जाधवांनीं त्या दोघांनाही स्पष्ट सांगितलें, "जगत्सिंग हा अत्यंत नीच मनोवृत्तीचा पाताळयंत्री पुरुष आहे. तो स्वाभाविकपणेंच नीचपणाच्या गोष्टी करण्यांत आनंद मानतो; मग तो एथून मानखंडित होऊन गेल्यावर काय करील, काय नाहीं याचा काय नेम सांगावा ! व्यवहार सांगतो कीं, सर्पाला आधीं दुखवूं नये; पण एकदां दुखवल्यावर त्याला जिवें मारल्यावांचून राहूं नये. कारण एरव्हीं तो केव्हां ना केव्हां दावा साधणारच. यास्तव आपण जगत्सिंगाचा पिच्छा पुरविलाच पाहिजे."

"पण यामुळें माझें स्वरूप अगदीं उघड होत आहे, व तेंही विकृत स्वरूपांत उघड होत आहे याची मला चिंता वाटते. मी मराठ्यांचा नेहमींचा साहयकर्ता आहें खरा, व त्यांच्या देशोद्धाराच्या प्रयत्नांना माझी अंतःकरणांतून सहानुभूति आहेही." जयसिंग बाजिरावांना म्हणाला, "परंतु आजच्यासारख्या चमत्कारिक वेळीं आपण जर उज्जयनीवर चाल केली, तर त्याचा परिणाम कांहींही होवो, दोषाचें खापर माझ्या माथीं फुटेल."

बाजिरावांना जयसिंगाची ही अडचण जरी योग्य वाटली, तरी पिलाजी जाधवांची सल्ला त्यांना पटली. तसें जयसिंगाला सांगून ते पुढें म्हणाले, "राजे ! आम्हांला दुहेरी अडचणींतून बाहेर पडण्याचा एक रामबाण उपाय सुचतो. मात्र आपण तो मनाला लावून घेतां कामा नये."

"असा कोणता उपाय आपणाला सुचतो?" जयसिंगानें विचारलें.

"जगाला–निदान बादशाही पक्षाला दिसावयाला तरी जयसिंग व पेशवे हे परस्परांचे शत्रु निदान प्रतिस्पर्धी तरी आहेतच!"

"अर्थात्! उगीच माझे दोन्ही राजपुत्र निजामाच्या झेंड्याखालीं उभे राहून मराठ्यांशीं लढण्याला सज्ज आहेत ते! पेशव्यांशीं अंबराधिपतीची दावेदारी आहे असें सिद्ध करण्याला यापेक्षां आणखी कोणता पुरावा पाहिजे?" जयसिंग हंसून म्हणाला.

"म्हणूनच अशा दावेदारांना पेशवे आज कैद करूं इच्छितात. म्हणजे पेशव्यांना सामील झाल्याबद्दल आपणांला कोणींही दोष द्यावयाला नको." बाजीराव हंसून म्हणाले.

जयसिंगाला बाजिरावांची ती युक्ति पटली. जगाला सांगावयाला बाजिरावांनीं जयगडावर हल्ला करून जगतसिंगाला पळवून लावलें, जयसिंगाचा पाडाव करून जयगड आपल्या ताब्यांत घेतला, व त्याच किल्ल्यांत जयसिंग आणि त्याची राणी या दोघांनाही कैद करून ठेविलें. ही योजना पाहून सर्वांनाच आनंद झाला. हों! राणीसह सर्वांना आनंद झाला असें सांगतांना राणीची समजूत कशी झाली हें प्रथम सांगितलें पाहिजे. राणी जी इतकी बिथरली होती, ती केवळ एका बायकी कारणासाठीं—आपल्या पुत्राला युवराज्याभिषेक व्हावा! परंतु जयसिंगाची इच्छा ईश्वरसिंगाला युवराज्याभिषेक करण्याची होती! म्हणून बाजिरावांनीं त्या परिस्थितीचा पूर्ण विचार करून त्याच वेळीं घाई न म्हणतां जयसिंगाला बाजूला बोलावून घेतलें, व त्याला उपदेश केला, "राजे! तुमच्या राणीची अशी इच्छा आहे हें तुम्हांला माहीत आहेच. ती तिची इच्छा योग्य आहे असें जरी नाहीं, तरीदेखील तुम्ही राणीची मनोवृत्ति तिच्या सभोंवारची परिस्थिति—आम्ही जास्त खोलांत शिरत नाहीं; जगत्सिंगाला तुम्ही ओळखतांच, व क्षुल्लक स्वार्थासाठीं निजामाला सामील होण्यालाही त्यांनीं कमी केलेलें नाहीं हें आम्हीं स्वानुभवावरून तुम्हांला सांगतों.—या सर्व गोष्टी विचारांत घेतां राणीचा हा हट्ट न पुरविल्यानें तुम्ही आपणांवर कायमचें संकट ओढून आणल्यासारखें होईल. राणीचा स्वभाव निदान या बाबतींत तरी सौजन्याच्या दृष्टीनें नांवें ठेवण्यासारखा असला–नव्हे, आहे अशी आमचीही खात्री आहे.—तुमच्याजवळ खरें तें

बोलावयाला मुळींच हरकत नाहीं. पण ही जन्मगांठ आहे हें समजून तुम्हीं वागावयाला हवें. आम्हांला विशेषतः राणीपेक्षां जगत्सिंगाचें जास्त भय वाटतें. या निमित्तानें राणीवर आपलें वजन ठेवून अंबरच्या राज्यांत ढवळाढवळ—"

" तें सारें मी ओळखतों." समोरून राणी येत असलेली पाहून जयसिंग तें संभाषण थांबविण्याच्या उद्देशानें म्हणाला.

" मग याप्रमाणें करणार ना ? " बाजिरावांनीं विचारलें.

" होय. " जयसिंग उत्तरला. इतक्यांत राणी तेथें येऊन पोंचली. जयसिंगानें तिला सांगितलें, " राणीसाहेब ! तुमची हौस पुरविण्यासाठीं मीं पेशव्यांच्या सल्ल्यानें माधवसिंगालाच युवराज्याभिषेक करण्याचें ठरविलें आहे. कारण तो देखील माझाच पुत्र आहे, व तो ईश्वरसिंगाला कोणत्याही प्रकारें न दुखवितां यथान्याय राजा करील असा माझा त्याच्या ठायीं भरंवसा आहे. यापुढें तरी तुम्हीं माधवाप्रमाणेंच ईश्वरालाही आपला पुत्र मानून त्याच्या स्वर्गवासी मातेची उणीव भरून काढली पाहिजे."

राणीनें परमसंतुष्ट चित्तानें जयसिंगाला नमस्कार करून उद्गार काढले, " राजे ! मी आपल्या चरणांची छाया आहे; जिकडे आपले चरण तिकडे मी ! आजवर झालें तें गेलें. तें मनावर न घेतां आपण मला त्याबद्दल मनःपूर्वक क्षमा करावी. पण यापुढें माझें जीवित म्हणजे आपल्या आज्ञेचा पडसाद आहे." आनंदातिरेकामुळें कंठीं गहिंवर दाटून आल्याकारणानें तिचें बोलणें खुंटलें. पण ती जें बोलली त्यांत तिचें अंतःकरण कळून चुकलें होतें, व आतां तिच्या अनिष्ट साहसाबद्दल भय बाळगण्याचें कारण उरलें नव्हतें. तरीही बाजिरावांनीं आणखी थोड्या मोजक्या शब्दांत राजकारणी डावपेंचांचा यथेष्ट उपयोग करून जगत्सिंगाच्या स्वार्थी हेतूची जाणीव राणीच्या मनाला करून दिली, व राणीलाही ती तावडतोब पटली. तिनें उत्तर दिलें,' " मी जगत्सिंगाला ओळखतें. मी भोळी नाहीं. तो माझा सख्खा भाऊ म्हणून मला प्रिय असला तरी माझ्या माहेरापेक्षां मला माझ्या सासरची जास्त काळजी आहे. यांत काय तें समजा." बायकोचें चंचल मन पालटण्याला कितीसा उशीर !

" बस्स ! सर्व कांहीं समजलें." बाजीराव संतोषपूर्वक उद्गारले. जयसिंगही समाधानपूर्वक हंसला !

"पण मी म्हणतें," राणी लगेच जयसिंगाकडे वळून म्हणाली, "आपण यापुढें बादशहातीशीं इतकें नमून वागावयाचें तें कां म्हणून ? पेशव्यांनीं आरंभिलेल हिंदुपदपादशाहीच्या उभारणीचें कार्य त्यांचें एकटयाचें नाहीं; आमच्याही डोक्यावर त्याची जबाबदारी आहे. एकजुटीनें प्रयत्न केल्यावर काय साधत नाहीं ! मला वाटतें, आपण यापुढें निजामाला जरादेखील साहय करूं नये. ईश्वर व माधव जे त्याच्या साह्याला गेले आहेत, त्यांनाही माघारे बोलवावे."

राणीचें हे विचार स्वाभिमानपूर्वक निघाले असले तरी ते कोत्या व अदूरदृष्टीचे द्योतक होते. बाजीराव, जयसिंग यांच्यांत पूर्वीच या प्रश्नाचा खल होऊन त्याचा निर्णय ठरला होता. बाजीराव व जयसिंग यांची दोस्ती निजाम व इतर बादशाही अधिकारी यांच्या डोळ्यांवर येऊं नये, म्हणूनच जयसिंगानें आपल्या दोघां पुत्रांना निजामाबरोबर दिलें होतें, व यापुढेंही त्या दोघांनीं या लढ्याचा निकाल लागेपावेतों निजामालाच चिकटून राहिलें पाहिजे याबद्दल त्या दोघांचेंही एकमत होतें. आणि खरेंच आहे. माधवसिंग व ईश्वरसिंग यांना या विशिष्ट परिस्थितींत उघडपणें मराठ्यांविरुद्ध वागून अंतस्थ रीतीनें मराठयांना विजय मिळवून देण्याच्या कामीं निजामाच्या निशाणाखालीं राहून जी मदत करतां आली असती ती उघडपणें मराठ्यांना मिळून करतां आली नसती. त्या दोघांचीच गोष्ट कशाला, सभासिंगालाही बाजिरावांनीं त्याच वेळीं जवळ बोलावून त्यालाही तीच युक्ति समजावून सांगितली. अर्थात् जगत्‌सिंगानें सभासिंगाला ओळखलें होतें, त्या ओळखीचा परिणाम शून्यवत् करण्यासाठीं बाजिरावांनीं हा डाव टाकला होता.

पण या सर्व गोष्टी बाजीराव आणि जयसिंग यांच्या खासगी वाटाघाटींतील झाल्या; त्या दोघांनीं राणीशीं बोलतांना तिला त्यांचा मागमूस देखील ल[illegible] न देतां तिच्याच म्हणण्याला बाह्यात्कारीं पण बेमालूम मान तुकावून तिला सं[illegible]ुष्ट करून तिच्या महालांत पाठविलें. तेवढ्या वेळांत पिलाजी जाधव व तेजकर्ण यांनीं जातीनें उज्जयनी नगरांत जाऊन तेथील एकंदर हालहवाल अवलोकन केली. अनुराधसिंगाच्या वाड्यांत सर्व राजे-रजवाडे नाच–रंग–तमाशांत ग[illegible] गेलें असून शहाजादाही भागाबाईच्या आशेनें भैरवगडावर गेला आहे, निजाम व त्याचा मुलगा हेही पुढील सामन्याची तयारी करण्यासाठीं कोठें तरी अज्ञात स्थलीं निघून गेले आहेत, अतएव हीच वेळ उज्जयनीवर हल्ला करून मराठयांच्या दराऱ्यानें शत्रूचे डोळे दिपवून सोडण्याला सोईची आहे असें त्यांच्या मनानें

घेतलें. त्यांनीं माघारीं भैरवगडावर येऊन बाजिरावांना हा वृत्तान्त सांगितला, तेव्हां बाजिरावांनाही ती योजना पटली. पण ती मुख्यतः एका कारणासाठीं; मराठयांची राजकन्या गजराबाई सटवोजी जाधवाबरोबर आली–तिला सटवोजीनें पकडून आणली अशी दुर्वार्ता बाजीराव, पिलाजी जाधव वगैरे सर्वांच्या कानीं पूर्वींच आली होती. परंतु ती कोठें आहे याचा कांहींच पत्ता लागत नव्हता. पिलाजी जाधव व तेजकर्ण यांनींही उज्जयनींत जाऊन घाईघाईनें कां होईना पण गजराबाईविषयीं तपास केला; पण व्यर्थ ! अर्थात् तर्कावरच त्या गोष्टीचा निर्णय करणें प्राप्त झालें, व सर्वांचा असा तर्क वाहूं लागला कीं, ज्या अर्थी राजकन्येला इरेला घालून मराठयांना शरण आणण्याची कल्पना मूळ अनुराधसिंगाच्या नासवया अंतःकरणांत उत्पन्न झाली होती, त्या अर्थी राजकन्या त्याच्याच वाडयांत असली पाहिजे; किंवा तेथें नसल्यास तिला भैरवगडावर डाम्बून ठेवण्यांत आलें असलें पाहिजे.

आतां आधीं हल्ला भैरवगडावर करावयाचा कीं उज्जयनीवर करावयाचा, हा प्रश्न उभा राहिला. तेजकर्णाचें मत त्याचा पुत्र व त्याची भावी वधू भागाबाई हीं दोघेंही भैरवगडावर कैदेंत असल्यामुळें भैरवगडावर प्रथम हल्ला करावा असें पडलें. परंतु जयसिंगांना तेथली एकंदर परिस्थिति सर्वांहून जास्त माहीत असल्यानें 'आधीं भैरवगडावर हल्ला केल्यास शहाजादा गडावरच असल्यामुळें सारे राजे एकजुटीनें भैरवगडावर धावून जातील, त्यांच्या संयुक्त सैन्यापुढें आपला टिकाव लागणार नाहीं, व पराजय मात्र आपल्या पदरीं येईल. त्यापेक्षां प्रथम उज्जयनीवर अचानक हल्ला करून सर्व राजांना कोंडून ठेवावयाचें व मग भैरवगडावर हल्ला करावयाचा' असें बाजिरावांनीं जयसिंगाच्या सल्ल्यानें ठरविलें व तो बेत ताबडतोब अंमलांत येऊन कल्पनेबाहेर यशस्वीही झाला. अनुराधसिंगाच्या वाड्यांत विलास-विहारांत डुंबत असलेल्या राजांनीं चतुर कल्याणीच्या साह्यानें आपला बचाव करण्याची एक अजब युक्ति शोधून काढली. वाड्यासभोंवार वेढा पडल्यावर कल्याणीनें अनुराधसिंगाच्या–अर्थात् सर्व राजांच्या वतीनें कालिदासाला पुढें पाठवून बाजिरावांशीं बोलणें लावलें, "अनुराधसिंगजींसह सर्व राजे मराठे व निजाम यांच्यांत तडजोड घडवून आणून बाजीराव पेशव्यांनीं आरंभिलेल्या हिंदुपदपादशाहीच्या महत्तमकार्याला अंतःकरणपूर्वक साह्य करण्यासाठीं झटत असतां पेशव्यांनीं एकाएकीं असा आततायीपणा पत्करणें बरें नाहीं. अजूनही

संधि व्हावा अशीच सर्व राजेलोकांची उत्कट इच्छा आहे, व त्याला पेशव्यांची मान्यता असावी."

या निमित्तानें प्रथमारंभींच कालिदास पुढें आलेला पहातांच बाजिरावांना मोठी मौज वाटली, व त्यांनीं त्याच्या मूर्खपणाचा आपल्या कारस्थानांत पुरेपूर उपयोग करून घ्यावयाचें ठरविलें.

" आम्हीं आमच्या सेनापति दाभाड्यांच्या तोंडून तुमची कीर्ति ऐकली आहे. अनुराधसिंगजी वगैरे सर्व राजांच्या वर्तीनें तुम्ही वकील म्हणून पुढें आलां आहां हें पाहून आम्हांला फार आनंद होत आहे." बाजीराव उद्गारले.

झालें ! ओझरतें स्तुतिस्तोत्र कानीं पडतांच कवि हुरळला व चण्यांच्या झाडावर चढूं लागला. कोणीकडूनही वेळ मारून नेण्यांत त्याचा हातखंडा ! मग त्यांत कांहीं कां निष्पन्न होईना ! खरें सांगावयाचें तर—पण वाचकांना कविराजांचा पूर्ण परिचय असल्यानें त्यांच्याविषयीं जास्त कांहीं खरेंखोटें सांगण्याची कांहीं आवश्यकता नाहींच. बाजिरावांनीं दाभाड्यांचा हवाला देऊन त्याची स्तुति करतांच बाजिरावांची स्तुति करून आपल्या शीघ्रकवित्वशक्तीनें बाजिरावांवर मोहिनीमंत्र घालून स्वतः दुबाचार्य म्हणून मिरविण्याची संधि कालिदास कशी वायां घालवील ! शिवाय कालिदासाला स्वतः मोठा राजकारणधुरंधर पुरुष असल्याची जबरदस्त घमेंड होती. त्या अलौकिक गुणाच्या जोरावरच आपण सेनापति दाभाड्यांना भुरळ पाडली असें त्याचें मन त्याला सांगत होतें. बाजीराव पेशव्यांसारखा महाचतुर राजकारणी पुरुषही हस्तें परहस्तें आपली कीर्ति ऐकून आपल्या अलौकिक गुणसौरभाच्या नुसत्या भपकाऱ्यानें इतका मोहित झाला;—याला पुरावा स्वतः पेशव्यांचा आतांचा कबुलीजबाब !—यापेक्षां कालिदासाला स्वतः 'पुरुषोत्तम असल्याबद्दलच्या निराळ्या पुराव्याची आवश्यकता मुळींच नव्हती.

त्या दोघांचें परस्परं प्रशंसन्ति या न्यायाचें संभाषण ती वेळ घाईची असल्यानें जरी थोडेंसेंच झालें तरी त्या थोडक्या वेळांतच बाजिरावांनीं कालिदासाला अगदीं 'गरुड' करून सोडलें; इतकेंच काय पण त्याच्या तोंडून अनेक महत्त्वाच्या गोष्टी काढून घेतल्या. गजराबाई त्या वाड्यांत नसून ती आज सटवोजीबरोबर भैरवगडावर यावयाची होती ही बातमीही बाजिरावांना कालिदासाच्याच तोंडून कळली. पूर्वी दाभाड्यांची भूमिका घेऊन बाजीराव कालिदासाला भेटले होते

तेव्हांच्या व आतांच्या त्यांच्या वेषांत व विचारांतही महदंतर असल्यानें तें बाजिरावांचें खरें अंतर्बाह्य स्वरूप पाहून कालिदासही स्वतःला नकळत त्यांच्यापुढें दिपून गेला. बाजिरावांनीं तडजोडीचें थोतांड बुद्धिपुरस्सर कायम ठेविल्यामुळें व दाभाडयांचीं आणि त्या निमित्तानें कालिदासाचीं स्तुतिस्तोत्रें गाण्याचा क्रम अखंड चालू ठेविल्यामुळें कालिदास प्रथम भुलून गेला होता हें जरी खरें, तरी आतां त्याला खरोखरच वाटूं लागलें, “ पेशवे हे सूर्य आहेत, व त्यांचे सारे प्रतिपक्षी काजवे आहेत. सूर्यासमोर काजव्यांचें तेज कितीसें पडणार ! पेशवे साऱ्या रजपूत राजांना नजरेच्या एका फुंकरीसरसे दूर भिरकावून देतील ! आणि निजाम एवढा मिस्किल छट आहे ना, बादशहाला देखील त्याच्या दाढीला हात लावून त्याची करुणा भाकावी लागली ना, पण त्या निजामाला देखील दाढी धरून धरणीवर लोळवण्याचें सामर्थ्य पेशव्यांच्या अंगीं आहे.”

शिवाय बाजीराव पेशवे व जयसिंग यांची अकृत्रिम दोस्ती असल्याचें कालिदासाला माहीत होतेंच ! जयसिंगाच्या पदरीं असलेल्या रत्नाकर कवीला कालिदास आपला प्रतिस्पर्धी मानीत होता; व ‘जयपूरच्या दरबारांत आपली ज्या रत्नाकरामुळें अप्रतिष्ठा झाली, त्या रत्नाकराला दूर लोटून मी जयपूरचा राजकवि होईन तरच नांवाचा कालिदास' असा कालिदासाचा निर्धार होता. हें ध्येय साध्य करण्याच्या कामीं बाजीराव पेशव्यांच्या वशिल्याचा आपणाला यथास्थित उपयोग होईल अशी खात्री बाळगून कालिदास बाजिरावांचें प्रीतिपात्र होण्याच्या उत्कट इराद्यानें त्यांच्याशीं बोलत होता. बाजिरावांनीं जयसिंगाला कैद केल्याचें वर्तमान बाजिरावांच्याच तोंडून ऐकून कालिदासाला अंमळ विषाद वाटला. पण बाजिरावांनीं त्याची चिंता चातुर्यपूर्वक दूर केली, “ कविराज ! जयसिंगजी आमचे स्नेही खरे; पण देशकल्याणाच्या कार्यांत असल्या खासगी स्नेहाची आम्ही कधीं पर्वा करीत नसतों.”

“ बरोबर आहे ! म्हणूनच आज उभें भारतवर्ष श्रीमंतांच्या शब्दाच्या तालावर पाऊल उचलीत आहे, व निजामदेखील श्रीमंतांना भितो तो यासाठींच.” कालिदास लांगूलचालन करण्याच्या आंगच्या गुणानें उद्गारला.

“ असें जरी आहे, तरी जयसिंगांना कायम कैदेंत ठेवून त्यांचा निष्कारण मानभंग करण्याचा आमचा इरादा नाहीं. प्रस्तुतची भानगड एकवार मिटली, कीं

आम्ही त्यांना सन्मानपूर्वक बंधमुक्त करणार आहों. त्या वेळीं रत्नाकराच्या ऐवजीं तुम्हांला राजकवि नेमण्याची पहिली अट घालून ती आम्ही जयसिंगजींकडून मान्य करून घेऊं. तुमचा मानापमान तोच पेशव्यांचा मानापमान ! मग तर झालें ना ? ”

बाहेर जोराजोरानें लढाई चालली असतां बाजिरावांना कालिदासाशीं गोष्टी बोलण्याला त्याच वेळीं त्या रणांगणावर एवढा तरी अवकाश मिळाला याचें कारण बाहेर बाजिरावांशीं सामना देण्याला उभी राहिलेली सभासिंग वगैरे मंडळी निजामाच्या पक्षाचें केवळ नांव सांगणारी असल्यानें ती लढाई लुटुपुटूचीच होती. जगत्‌सिंग व जयसिंग यांनीं जयगडावर बाजिरावांची फौज येतांना जगत्‌सिंगानें अवलोकन केली होती व निजामापासून शहाजाद्यापर्यंत त्या गोष्टीचा बोभाटा होण्याचा संभव होता. तें टाळण्यासाठींच जगत्‌सिंगाच्या वाड्याबाहेर ती लुटुपुटूची लढाई रंगविण्यांत आली होती.

बाजिरावांच्या रसाळ बोलण्यानें कालिदास इतका खूष होऊन गेला कीं, ज्या कामासाठीं तो आला होता त्या कामाचेंही भान त्याला उरलें नाहीं. तो बाजिरावांचीं स्तुतिस्तोत्रेंच गात सुटला ! अखेर बाजिरावांनीं त्याला भानावर आणलें. ते म्हणाले, “ बरें; कविराज ! आंत अनुराधसिंग वगैरे सर्व मंडळी तुमची वाट पाहात असतील.”

“ होय. मग त्यांना मी काय निर्णय सांगूं ? ” कालिदासानें प्रश्न केला.

“ आमची अट एकच; राजकन्या तेवढी आमच्या स्वाधीन प्रथम झाली पाहिजे. आतां तुम्हीं राजकन्येचा पत्ता सांगितलाच आहे, तेव्हां आमची मंडळी भैरवगडावर जाऊन तपास करील. राजकन्या आमच्या हातीं लागली कीं हा वेढा उठला.”

“ तोंवर—”

“ माफ करा. तोंवर हें असेंच चालावयाचें.”

कालिदास जास्त बोलत बसला नाहीं. तो तसाच आंत गेला. सर्व राजांना बाजिरावांची ती अट त्या प्रसंगीं मान्य करणें प्राप्तच होतें. बाजिरावांनीं लगेच तेथील वेढा पक्का करून त्याचें नेतृत्व स्वतः पत्करिलें, व पिलाजी जाधव आणि तेजकर्ण यांना गजराबाईच्या शोधार्थ भैरवगडाकडे रवाना केलें. ते दोघे अर्ध्या

मार्गावर माघारे जयगडाजवळ जाऊन पोंचतात तोंच चंद्रशेखर, बालकर्ण व भागाबाई ही मंडळी त्यांना भेटली. त्या मंडळीनें जरी वेषांतर केलें होतें, तरीही तेजकर्ण बालकर्णाला, त्याप्रमाणेंच भागाबाई व चंद्रशेखर यांनाही ओळखूं शकला. भागाबाई व चंद्रशेखर यांच्याविषयीं तेजकर्णाचें मन पूर्वग्रहदूषित असल्यानें प्रथमच तेजकर्णाला त्या दोघांच्या भेटीमुळें जेवढा आनंद व्हावा तेवढा झाला नाहीं. पण बालकर्णाच्या भेटीनें मात्र त्याला कल्पनातीत आनंद झाला हें सांगितलेंच पाहिजे असें नाहीं. कारण ते केवळ पितापुत्रच होते. तेजकर्णाला पाहून भागाबाई लाजूं लागली. ती लाजत असलेली पाहून बालकर्णाच्या चर्येवर प्रणयसंपन्न हास्य चमकूं लागलें. बरोबरच्या मशालजीच्या हातांतील मशालीच्या प्रकाशांत सर्वांना या गोष्टी पाहातां येत होत्या. ती देखावा पाहून तेजकर्ण स्वतःच्या मनाशींच आश्चर्यपूर्वक विचारूं लागला, " असें कसें ? "

इतक्यांत चंद्रशेखराच्या आज्ञेवरून भागाबाईनें तेजकर्णाला नमस्कार केला. त्याच वेळीं राजकन्या व काशीबाई या दोघींही सुरक्षितपणें मल्हारराव बांडे व सटवोजी जाधव यांच्याबरोबर नरसिंगगडाकडे रवाना झाल्याचें पिलाजी जाधवांना कळून आलें.

पिलाजी जाधव आनंदाश्चर्यपूर्वक म्हणाले, " म्हणजे ! मी जें ऐकत होतों तें सारें खोटेंच तर ! "

" तें सर्व एका दृष्टीनें खरें होतें. कारण, सटवोजी वगैरे मंडळीनें शत्रूच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाटीं उपयोगांत आणलेल्या युक्त्यांचे एकतर्फी अहवाल तुम्ही ऐकत होतां. मीही भागाबाईविषयीं अशाच विकृत गोष्टी ऐकल्या होत्या, व त्यांवर जास्त विश्वास ठेवल्यामुळें माझ्या हातून माझ्या एका परमविश्वासू सेवकाचा वध झाला ! " तेजकर्ण उद्गारला.

सटवोजी जाधवानें अजमेरसिंग, शिवसिंग वगैरे शत्रूंच्या डोळ्यांत धूळ फेंकून राजकन्येला व काशीबाईलाही आपल्या ताब्यांत घेतल्याचा वगैरे वृत्तान्त वाचकांना पूर्वींच माहीत झाला आहे. सटवोजी त्या दोघींसह उज्जयनीकडे यावयाला म्हणून निघाला होता, तोंच बाजीराव पेशव्यांचा मुक्काम गणेशतीर्थावर असल्याचें त्याला कळलें. पिलाजी जाधव आणि तेजकर्ण हे दोघेही त्या बाबतींत संशयग्रस्त होऊन पेशव्यांकडे शोधार्थ गेल्याची बातमीही त्याला कळली. हा

सार्वत्रिक गैरसमज व ही सार्वत्रिक चिंता शक्य तितकी लौकर दूर करण्याच्या उत्कट इच्छेनें सटवोजी प्रथम थेट गणेशतीर्थावर गेला. पण बाजीराव पेशवे त्याच रात्रौ उज्जयनीकडे निघून आलेले असल्यानें व सटवोजी-ला तेथें जावयाला एक प्रहर उशीर झाल्यामुळें त्याला बाजिरावांची भेट होऊं शकली नाहीं. पण विक्रमसिंह, इंद्रकुमारी, मल्हारराव बांडे ही मंडळी अचानक तेथें भेटली. विक्रमसिंहानें आपला शब्द पाळला; व सटवोजी जाधव तेथें जाऊन पोंचावयाच्या पूर्वींच विक्रमसिंह, इंद्रकुमारी, सज्जनसिंग व मल्हारराव बांडे वगैरे मंडळींचें बराच वेळ जिव्हाळ्याचें संभाषण झालें. त्यांत त्यांनीं वनवासीच्या विविध कारस्थानांविषयींचा उलगडा करून घेतला. तो उलगडा कांहीं काळपर्यंत—शक्य तों प्रस्तुतच्या झगड्याचा शेवट होईपावेतों व एकलिंगजीचा शोध लागेतो गुप्त ठेवण्याची आवश्यकता विक्रमसिंहाला वाटल्या-मुळें त्यानें इंद्रकुमारी, सज्जनसिंग व बांडे या तिघांनाही तसें बजावून ठेविलें होतें. त्या कारणामुळें सटवोजी, गजराबाई वगैरे मंडळीला त्याविषयीं कांहींच खबर मिळाली नाहीं. बाजीराव पेशव्यांचा गनिमी कावा निजामाच्या कानांवर गेला असून त्यांच्याकडून अचानक गणेशतीर्थावर छापा पडण्याचा संभव असल्याची वार्ता त्या दिवशीं विक्रमसिंहाच्या कानीं आली होती. तेव्हां अशा धोक्याच्या जागीं गजराबाईला ठेवण्यापेक्षां नरसिंगगड पूर्णपणें वनवासीच्या ताब्यांत आहे, तेथें शत्रूची नजर पोंचण्याचा संभवही फारच कमी, यास्तव त्या ठिकाणीं इंद्रकुमारी, गजराबाई, काशीबाई वगैरे बायकामंडळीला सुरक्षितपणें राहातां येईल असें विक्रमसिंहाचें मत पडलें, व तें सर्वांना मान्यही झालें. दरम्यान् यदाकदाचित् शत्रूचे लोक भेटले तरी त्यांच्या डोळ्यांत धूळ फेंकणें सटवोजीला सोपें जाईल असा विचार करून सर्वांनीं त्या बायकामंडळीला नरसिंगगडावर घेऊन जाण्याची जबाबदारी सटवोजीवर सोंपविली. स्वतः विक्रमसिंह, मल्हारराव बांडे व सज्जनसिंग हे तिघेही बरोबरच्या सैन्यासह बाजिरावांच्या साह्यार्थ तावड-तोब उज्जयनीकडे निघाले. तों जयगडाहून गणेशतीर्थाकडे रवाना झालेला बाजि-रावांचा बातमीदार त्यांना मार्गांत भेटला. 'जयगड पाडाव झाला असून आतां श्रीमंत प्रथम उज्जयनीवर हल्ला करणार व तेथील बंदोबस्त केल्यावर राजकन्या, बालकर्ण, भागाबाई वगैरे मंडळीची मुक्तता करण्यासाठीं भैरवगडाकडे मोर्चा वळ-विणार' वगैरे वृत्तान्त त्या बातमीदारानें सज्जनसिंगाला निवेदन केला, व भैरव-

गडावरील हल्ल्यांत मदत करण्यासाठीं बाजिरावांनीं तेथल्या मंडळीला शक्य तितक्या साहित्यानुसार बोलावित्याचें सांगितलें. त्याप्रमाणें विक्रमसिंह व सज्जनसिंग यांनीं भैरवगडावर प्रथम चाल केली. पण राजकन्येचा प्रश्न पूर्वीच सुटला होता, व गडाला वेढा देतांक्षणींच चंद्रशेखर, बालकर्ण, भागाबाई वगैरे मंडळी विक्रमसिंहाचें नांव ऐकून स्वसंतोषानें बाहेर आली, त्यामुळें सर्वच चिंता मिटली.

मात्र एवढा प्रकार होईतों भैरवगडावर ह्या मंडळीनें रचिलेल्या कारस्थानाचा सुगावा शत्रूला कसा लागला कोण जाणे! निजामाच्या पदरचे दोन मुसलमान सरदार तावडतोब धूमकेतूंप्रमाणें आपल्या सैन्यासह गडाच्या रक्षणार्थ–नव्हे, विशेषतः शहाजाद्याच्या जीवितसंरक्षणार्थ गडावर चालून आले. त्या दोघां सरदारांचें सैन्य प्रचंड असल्यानें त्यांच्याशीं त्या वेळीं सामना देणें विक्रमसिंह, सज्जनसिंग वगैरे मंडळीला फारच जिकिरीचें गेलें असतें. पण आतां गड कोणाच्याही ताब्यांत गेला तरी त्याचीही मोठीशी मातब्बरी नव्हती. शिवाय खरा लढा बाजीराव पेशवे उज्जयनींत मांडून बसले होते. त्या लढ्यांत त्यांना साह्य होणें अवश्य होतें. यास्तव उगाच अनेक ठिकाणीं लढाईला तोंडें पडूं नयेत म्हणून विक्रमसिंह वगैरे मंडळीनें भैरवगड त्या मुसलमान सरदारांना मोकळा सोडून तेथून हलकेच पाय काढला.

त्या मंडळीचा विचार लगेच उज्जयनीला जावयाचा होता. परंतु त्या मुसलमान सरदारांच्या सैन्यांत चाललेल्या वाटाघाटींची बित्तंबातमी विक्रमसिंहाच्या एका चतुर गुप्त हेरानें आणली, त्या बातमीवरून त्या लोकांना राजकन्या वगैरे सर्व मंडळी नरसिंगगडावर पळून गेली असल्याचा संशय असल्याचें व त्यांचा विचार नरसिंगगडावर तांतडीनें हल्ला करण्याचा असल्याचें कळून आलें. त्याबरोबर नरसिंगगडाच्या रक्षणाचें काम विक्रमसिंह व सज्जनसिंग यांनीं आत्मविश्वासपूर्वक पत्करलें, व प्रसंगीं खबरदारी असावी म्हणून बाजिरावांना ही बातमी कळविण्यासाठीं इतर मंडळीला वाटसरूंच्या वेषांत उज्जयनीकडे रवाना केलें. दरम्यान् जयगडापाशीं येतांच तेथें नुक्तीच खडाजंगी उडाल्याची वार्ता ऐकून बालकर्ण वगैरे मंडळी तेथें थोडा वेळ थांबली असतां पिलाजी जाधव व तेजकर्ण यांची अचानक भेट झाली.

याप्रमाणें भैरवगडावर जाण्याची आवश्यकता संपल्यामुळें पिलाजी जाधवांनीं

त्या मंडळीसह पुन्हा उज्जयनीचा मार्ग धरिला. मार्गानें त्या मंडळीच्या वरच्या-प्रमाणेंच गोष्टी चालल्या होत्या. सटवोजी जरी भेटला नाहीं, तरी त्याच्या चातुर्याचा व स्वामिनिष्ठेचा वृत्तान्त ऐकून पिलाजी जाधवांना अत्यंत समाधान झालें, ती शुभवार्ता बाजिरावांना आपण केव्हां एकदां कळवूं व सटवोजी-विषयीं त्यांच्या तोंडून निघालेले धन्यवाद कधीं ऐकूं असें त्यांना झालें होतें.

परंतु वनवासी व त्याचे एकलिंगजी वगैरे देवदूत यांच्याविषयीं मात्र कांहींच बातमी न मिळाल्यामुळें सर्वांचें एकसारखें तिकडे लक्ष लागून राहिलें होतें. आणि तसें होणें साहजिकच होतें.

## प्रकरण छत्तिसावें

# शेवट गोड !

खरेंच; वनवासी तोंवर कोठें होता ? एकलिंगजी कोठें होता ? मल्हारराव बांड्यांना गोत्यांत आणण्याचा दुष्टाव्याचा प्रयत्न कोणाचा ?—पण तें सांगण्यापूर्वी आपणाला बाजीराव पेशवे व निजाम यांच्यांतील प्रस्तुतच्या झगड्याचा शेवट काय झाला तें पाहिलें पाहिजे.

निजाम वगैरे मंडळीनें खलबुद्धीनें आरंभिलेला तडजोडीचा मानभावी डाव पूर्णपणें त्यांच्याच गळ्यांत आला. निजामाला जरी वेळींच मराठ्यांच्या गनिमी काव्याचा सुगावा लागला व त्यानें मराठ्यांच्या प्रतिकारार्थ त्याच रात्रौ उज्जयनीबाहेर पाय काढला, तरी तो माघारा येईतोंदेखील उज्जयनीतील त्याच्या हस्तकांना टिकाव धरवला नाहीं. राजकन्येच्या मुक्ततेची निश्चित वार्ता कानीं येईतों बाजिरावांचा अनुराधसिंगाच्या वाड्याला पडलेला वेढा कायम होता. ती वार्ता कानीं आल्यावर व इतर सर्व मंडळी सुखरूपपणें जागच्याजागीं आली गेली असें कळल्यावर बाजिरावांनीं प्रथम नरसिंगगडाच्या बंदोबस्ताची जरूर ती तजवीज केली; व कांहीं दिवस स्वतः उज्जयनींतच ठाणें देऊन तेथें जमलेल्या सर्व राजेरजवाड्यांना हिंदुपदपादशाहीच्या महत्कार्याला अनुकूल करून घेण्याचे भगीरथ प्रयत्न केले. परंतु दुर्दैवाची गोष्ट ही कीं, त्या अजागलस्तनवत् राजांचा त्या महत्कार्यांत व्हावा तसा उपयोग होण्याचें लक्षण दिसेना. जो तो निजामाला भीत होता ! नुसती तोंडदेखली सहानुभूति व तीही बाजिरावांच्या दराऱ्याला भिऊन दाखविण्यांत कांहींनीं पुढाकार घेतला, व कांहीं तर तसेच तडकाफडकीं पेशव्यांचें पारपित्य करण्याचा मनांतल्या मनांत चंग बांधून निजामाच्या मागोमाग लाळ घोंटावयाला गेले. त्यांचीच गोष्ट कशाला ! दिल्लीचाच शहाजादा देखील त्या दोन मुसलमान सरदारांच्या कृपेनें भैरवगडावर जो बचावला, तो कुठचें काय व कुठचें काय, अगोदर जीव मुठींत घेऊन आग्र्याला पळून गेला ! जयसिंगाची कैद केवळ जगाला दाखविण्यापुरतीच होती; ती चार दोन दिवसांतच संपली, व जयसिंग पुन्हा एकवार आपलें दिल्लीदरबारांतील धोरण यशस्वी व्हावें असा प्रयत्न करण्यासाठीं निजामाकडे गेला.

परंतु निजाम बाजिरावांचे हे विलक्षण डावपेंच व त्यांचे परिणाम ऐकून मनस्वी चिडला होता. त्यानें सामोपचाराची तर भाषाच काढली नाहीं; पण जयसिंगाची शिष्टाई बाजिरावांच्या सांगण्यावरून चालली आहे असें जमेला धरून बाजिरावांना उलट निरोप पाठविला, " यापुढें निजाम व पेशवे या दोन शक्ति जगांत तुल्यबल म्हणून नांदणें शक्य नाहीं. दोघांपैकीं कोणातरी एकाचें मस्तक दुसऱ्यासमोर पूर्णपणें नमल्याशिवाय या लढ्याचा निकाल लागावयाचा नाहीं."

हें अर्थात् युद्धाचें आव्हान होतें, व तें बाजिरावांनीं आनंदानें स्वीकारलें. दोन्ही पक्ष आपापल्या परीनें युद्धाचा पवित्रा मांडूं लागले. तडजोडीची आशा संपतांच बाजिरावांनीं एकदम उज्जयनीपासून चोहोंबाजूंनीं निजामाला रेंटण्याला सुरुवात केली. बुधसिंग व विक्रमसिंग हे दोन पराक्रमी वीर परस्पर बुंदी-कोट्याकडील डोंगराळ भागांत सैन्यसामग्री जमवून वारंवार ठायीं ठायीं निजामाचे लचके तोडीत होतेच. विक्रम-सिंहाच्या सांगण्यावरून व बाजिरावांच्या निकडीच्या पत्रावरून मल्हारराव वांडे, तेजकर्ण व बालकर्ण हे गजराबाई, काशीबाई व भागाबाई या तिघींना घेऊन परस्पर इंदुराकडे गेले. त्यांनीं मांडवगड वगैरे त्या बाजूचे किल्ले शत्रूच्या घशांतून ओढून काढून तेथें आपला अंमल पूर्ववत् सुरू केला, व निहालकर्ण आणि अनुपसिंग यांची मांडवगडावरील तुरुंगांतून मुक्तता केली. पश्चिम माळव्यांत अजमेरीसिंग व शिवसिंग यांनीं बसविलेला दरारा त्या दोघांच्या निधनानें अर्धा कमी झाला होता, तो आतां अगदीं नामशेष झाला. मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे यांनीं प्रारंभापासूनच भोपाळ-सिरोंज्याच्या आसपास निजामाची गळेचेंपी करण्याची जय्यत तयारी करून ठेविल्यामुळें दिल्ली आग्ऱ्याकडून निजामाला बादशाही मदत येण्याची आशा उरली नाहीं. बुंदेलखंडांत गोविंदपंत बुंदेल्यांसारखा पेशव्यांचा कैवारी सिंह जबडा पसरून बसल्यानें साहधार्थ तिकडे वळून पहाण्याची निजामाची छाती नव्हती. दक्षिणेंतून मदत येईल अशी आशा निजामाला होती. ती चिमाजीअप्पांनीं नासीरजंगाला शहांत धरून अगदीं फोल ठरविली होती. मराठ्यांची सुमारें ऐशीं हजार फौज या लढाईंत रणांगणांत उतरण्यासाठीं रणांगणाच्या तीरावर खडी होती.

निजामाचा पक्षही मराठ्यांपेक्षां दुबळा होता असें नाहीं. स्वतः निजाम त्याचा पुत्र गाजीउद्दीन, वाडेसें व दतिया एथील राजे, अहीर, रोहिले, अयोध्येचा सुभा सादतखान याचा भाचा, कोट्याचा राजा दुर्जनसाल, वगैरेंची मिळून

सुमारें लाखभर फौज निजामाच्या पाठीशीं होती. तिकडे दक्षिणेंत औरंगाबादे कडेही सुलतानजी व जानोजी निंबाळकर रावरंभा वगैरे मोंगली फौज दहा हजार खडी होती. परंतु मराठे व त्यांचे साहाय्यक यांनीं चोहोंकडे कोंडमारा केल्यामुळें निजामाचा बराच नाइलाज झाला. त्याला मराठ्यांशीं समोरासमोर सामना देण्याची सोयच उरली नाहीं. अगदीं आरंभींच राणोजी शिंदे, पिलाजी जाधव वगैरे मंडळीनें निजामावर जोराचा हल्ला केला; त्या पहिल्या हल्ल्यांतच निजामाकडील पांचशें रजपूत व सातशें घोडे पडले. मराठ्यांचेंही निजामाच्या तोफखान्यामुळें बरेंच नुकसान झालें. पण मराठे डरले नाहींत. बाजीराव स्वतः जातीनें निजामावर झडप घालण्यासाठीं टपून बसले होते. पण तो आपल्या बंदोबस्ताच्या जाग्यावरून हलेना. अखेर बाजिरावांनीं सर्व बाजूंनीं एकदम जोराचा हल्ला केल्यामुळें निजामाची हैराणगत होऊन त्याला आपल्या सर्व लोकांसह जवळच्या भोपाळच्या मजबूत किल्ल्याचा आश्रय करावा लागला. त्यामुळें त्याचा आंतल्या आंत कोंडमारा करण्याला बाजिरावांना चांगलेंच फावलें. दुर्जनसाल व सफदरजंग यांनीं बाहेरून मदत आणली; पण मल्हारराव होळकरांनीं दुर्जनसालाचा धुव्वा उडविला, व सफदरजंगानें मराठ्यांच्या यशाचें पारडें उलटविण्याचा रंग आणला असतांना विक्रमसिंहानें परस्पर त्याच्यावर छापा घालून त्याच्या सैन्याची नुसती लांडगेतोड केली.

असा एक दिवस गेला, दोन दिवस गेले, तीन दिवस गेले, एकामागून एक चांगले बावीस तेवीस दिवस लोटले.* मराठ्यांनीं केलेल्या नाकेबंदीमुळें दाणा महाग झाला, गवत मिळेनासें झालें, आतां या कोंडींत आपला फार दिवस टिकाव लागणें शक्य नाहीं अशी निजामाची खात्री होऊन तो आपल्या फौजेचा कंपू करून तेथून पाय काढण्याच्या उद्योगाला लागला. मराठेही त्याचा पिच्छा पुरविण्याच्या निर्धारानें त्याची नाकेबंदी मजबूत राखून तसेंच चालूं लागले. हा प्रवास केवळ मुंगीच्या पायांनीं चालला होता. रोज एखाददुसऱ्या कोसापेक्षां जास्त अंतर तुटत नव्हतें.

असें करतां करतां निजाम सिरोंच्यानजीक दुराईसराई एथवर कसाबसा आला.

---

* मराठ्यांच्या इतिहासांतील संस्मरणीय युद्धांपैकीं हें भोपाळचें युद्ध एक रमजानपासून सत्तावीस रमजानपावेतों म्हणजे ता. १३ डिसेंबर १७३७ पासून ता. ८ जानेवारी १७३८ पावेतों चालू होतें.

तेथें येईतों त्याची किती शोचनीय हैराणगत झाली होती याचा पडताळा त्या संग्रामांतील विजयी नायक श्रीमंत बाजीराव पेशवे यांच्याच ओजस्वी शब्दांत घावयाचा तर—

  

'कालपासून आजपावेतों नबाब उभेच केले आहेत. नबाब व फौज सत्त्वहीन झाली आहे. दाणा, गल्ला, घांस, लकडी बंद केली, एक रुपयास एक शेर अन्न झालें. तेंही कोणास प्राप्त, कोणास अप्राप्त. घोडीं पळसाचा पाला खाऊं लागलीं. परवां मोगल पठाणांनीं भाड्याचे बैल खाल्ले. रजपुतांस तों केवळ उपास पडूं लागले. नबाबांनीं सर्वांचें दुःख पाहून बहुतच काहील होऊन सलूखाविशीं त्वरा केली. आनंदराव पंडित सुमंत नबाबांपाशीं होते, त्यांस त्यांनीं बोलीचालीचा संदर्भ सांगून आम्हाकडे पाठविलें. त्यांजला मतलब सांगून आम्ही पिलाजी जाधव, बाजी भीवराव व बाबूराव मल्हार यांस त्यांच्या वकिलाकडे लष्करापुढें टेकडी होती तेथें पाठविलें.* बोलीचालीचा ठराव केला. माळवा दरोबस्त जहागीर सुभेदारीचे यादीवरी दस्कत करून दिलें. द्रव्यही साधेल तें बादशहापासून पाहिले बोलीप्रमाणें करून देऊं ऐसें दस्तकानिशीं लिहोन दिलें. पिलाजी जाधव व बाबूराव मल्हार यांजपाशीं दस्तक स्वतांनिशीं याद करून दिली.†......जो नबाब चौथाई सरदेशमुखीचीं नांवें घेत नव्हता, त्यांनीं माळवे दरोबस्त ऐसें खास दस्तकानें लिहितां उच्चार केला कीं, यामागें कधींच गोष्ट न जाहली ते या प्रसंगीं झाली. पुत्राचे

---

*सुमंत हे जरी शाहूमहाराजांच्या दरबारांतील एक बडे कारभारी होते, तरी त्यांच्यावर बाजीराव पेशव्यांचा विश्वास नव्हता. म्हणूनच बाजिरावांना निजामाकडे आपले अलाहिदा वकील पाठवावे लागले.

† हा तह भोपाळजवळील सिरोंज्यानजीक दुराईसराई एथें झाला. (१) माळवा प्रांत बाजिरावांना देणें; (२) नर्मदा व चंबळ यांमधील मुलूख देणें; (३) या दोन्हींबद्दल बादशहाच्या सनदा आणून देणें; (४) मराठयांच्या खर्चाचे पन्नास लाख रुपये बादशहापासून देवविणें. अशीं या तहाचीं चार कलमें होतीं.—अर्विन.

नांवें सुभेदारी करून समागमें आणिलें, त्या माळव्याची दरोबस्त सनद करून देतां नबाबाच्या चित्तांत कल्पांत आला. परंतु काय करील! संकटाचा प्रसंग देखोन द्यावें लागलें. आप्पा! रा० स्वामींचें तपोबळ, वडिलांचें पुण्य समर्थ, म्हणोनच ही गोष्ट घडोन आली. आज पादशहातींत नबाबासारखा दुसरा अमीर कोण आहे! अतःपर नबाब दिल्लीस जातील, व बंदोबस्त कर्तव्य तैसा केल्यावर होईल तें वर्तमान लिहून पाठवूं. करार झाला यांत अंतर न करावें अशी मनरोटी नबाबानें दिली'.

  

विक्रमसिंह जरी भोपाळच्या संग्रामांत बाजिरावांच्या वतीनें लढण्याची शिकस्त करीत होता, व सफदरजंगाचा पाडाव करून त्यानें मराठ्यांवरचें एक जबरदस्त अरिष्ट निवारण केलें होतें, तरी संग्रामाचा शेवट होऊन निजामाचा वकील बाजिरावांकडे शरणचिठी घेऊन येईपावेतों विक्रमसिंहाला बाजिरावांची भेट घेण्याला सवडच झाली नाहीं. किंवा त्यानें मुद्दाम त्यांची भेट घेतली नसेल. बाजीराव त्याचा पुष्कळ शोध करीत होते तरी शोध लागेना! मात्र सज्जनसिंगानें त्यांना लौकरच विक्रमसिंहाची भेट करून देण्याचें कबूल केलें होतें.

निजाम व पेशवे यांचा उभयपक्षीं तह झाल्यावर दुसऱ्या दिवशीं बाजिरावांचा मुक्काम भोपाळच्या किल्ल्यांत होता. निजामासारख्या चतुर सेनानीनें निर्वाणीच्या वेळीं ज्या अर्थी भोपाळच्या किल्ल्याचा आश्रय केला होता, व जो किल्ला पाडाव करण्याला अवघड असा बाजिरावांचा ताजा अनुभव सांगत होता, तो इतका दुर्जय किल्ला ताब्यांत आल्यावर एकवार त्याचें दर्शन घेण्याचा मोह कोणाला पडणार नाहीं! बाजिरावांनीं प्रस्तुतच्या विजयी संग्रामाचा समारोप भोपाळगडावर दरबार भरवून करावयाचा असा विचार ठरविला होता.

त्या दरबारांत कोणा विजयी वीराची संभावना कशी करावी याविषयीं पिलाजी जाधव, मल्हारराव होळकर, राणोजी शिंदे, सज्जनसिंग, बुधसिंग, वगैरे मंडळीसमवेत बाजी॰॰व किल्ल्यांतील उद्यानवाटिकेंत प्रहरभर दिवसाच्या सुमाराला विचारविनिमय करीत बसले असतां हुजऱ्यानें येऊन वर्दी दिली, "राजे विक्रमसिंहजी सरकारांच्या भेटीला आले आहेत."

विक्रमसिंहाचें नांव ऐकतांच सर्व मंडळीचीं मनें एकदम तिकडे वेधलीं गेलीं. त्यांतल्या त्यांत सज्जनसिंगाची चर्या तर त्याच क्षणीं जणूं अमृतरसानें न्हाऊन

निघाल्याप्रमाणें तेजस्वी दिसूं लागली. तो बाजिरावांना म्हणाला, " श्रीमंत ! मीं कबूल केलें होतें, त्याप्रमाणें विक्रमसिंह आपल्या भेटीला आले किंवा नाहीं पहा ! "

बाजिरावांनीं विक्रमसिंहाला ताबडतोब गौरवपूर्वक आंत आणण्याची कामगिरी पिलाजी जाधवांना सांगितली. पिलाजी जाधवांनीं विक्रमसिंहाला त्याच्या बरोबरच्या एका तरुणासह उद्यानांत आणलें. त्याबरोबर बाजीराव व सटवोजी जाधव त्या दोघांच्या चेहऱ्यांकडे टकमक पहात स्वतःशीं पुटपुटूं लागले, " हा वनवासी कीं विक्रमसिंह ? याचा चेहरा तर वनवासीसारखा दिसतो ! आणि बरोबरचा तरुण तर एकलिंगजी आहे. यावरून इथें कांहींतरी घोंटाळा असावा असें वाटतें."

पण त्या घोंटाळ्याचा उलगडा आपोआपच आतां होईल; तोंवर धीर धरणें उचित होय, अशी बाजिरावांनीं आपल्या मनाची समजूत करून विक्रमसिंहाला आपल्या उजव्या बाजूच्या आसनावर बसण्याची विनंति केली.

वाचक ! तो कोण होता ? विक्रमसिंह कीं वनवासी !

# उपसंहार

विक्रमसिंह त्या आसनाचा स्वीकार न करतां उभ्या उभ्याच उद्गारला, " श्रीमंत ! आपण देऊं केलेल्या आसनाचा मला इतक्यांत स्वीकार करतां येत नाहीं."

" कां बरें ! " बाजिरावांनीं विचारलें.

" वनवासीवर आपणां सर्वांचा असा आरोप आहे कीं, वनवासी हा विश्वासघातकी, देशद्रोही व शत्रूचा फितूर आहे ! " विक्रमसिंह चर्या गंभीर करून पुढें उद्गारला, " आपणाला आतां समक्ष वनवासीची ओळख पटलीच असेल; व वनवासी आणि विक्रमसिंह ह्या दोन्ही व्यक्ति एकच आहेत हें आपणाला आतां नव्यानें सांगावयाला नको. मीं इतके दिवस आपली भेट घेतली नाहीं, तोंड लपवून बसलों होतों, तो या एका मूर्ख मुलाच्या नादानपणामुळें ! "–विक्रमसिंह एकलिंगजीकडे अंगुलीनिर्देश करून म्हणाला, " मल्हारराव बांड्यांना गोत्यांत आणण्याला याचा पागलपणा कारण झाला व त्यावरून आपणां सर्वांच्या मनांत–फार काय, प्रत्यक्ष माझ्या सहचारिणीच्या मनांतही वनवासीविषयीं भयंकर विकल्प आला." इंद्रकुमारीला एकवार वनवासीच्या वेषांत भेटण्याचा प्रयत्न त्यानें केला होता, तो त्याला या क्षणीं आठवला. त्यानें शालीनतापूर्वक त्याचा मोघम उल्लेख केला व म्हटलें, " मलादेखील ती गोष्ट अत्यंत लाजिरवाणी होती व अजूनही आहेच. पण देवदयेनें आपणां सर्वांचा माझ्याविषयींचा गैरसमज दूर करण्याजोगा जिवंत पुरावाच मीं बरोबर आणला आहे." तो एकलिंगजीकडे बोट करून म्हणाला, " आतां याच्या तोंडून तो वृत्तान्त आपण ऐका. एकलिंगजी ! सांग, तुझ्या शब्दांत तुझ्या पापांची परवड तूं रचून दाखव."

" गुरुमहाराजांनीं मला क्षमा करावी ! " एकलिंगजी विक्रमसिंहाच्या पायांवर मस्तक नमवून विनवूं लागला. आपणाला आपल्या पापांचा उच्चार करावा लागूं नये असा त्याच्या त्या विनवणींतील आशय होता.

पण विक्रमसिंहानें निस्पृहपणानें तितक्याच कठोर स्वरांत त्याला सांगितलें, " क्षमा कीं शासन तें आपल्या देवदूतसंघाच्या शिस्तीनुरूप आपण मग पाहूं. प्रथम तूं तुझ्या पापांचा पाढा तर वाचून दाखव ! "

एकलिंगजी देवदूतसंघाच्या शिस्तींत मुरलेला होता. त्यानें स्वतः विक्रमसिंहाचा

अर्थात् वनवासीचा दुय्यम या नात्यानें अनेकवार शिस्त गाजविली होती. त्यानें विक्रमसिंहाची आज्ञा प्रमाण मानून आपला वृत्तान्त निवेदन केला त्याचा आशय असा कीं,—दुर्गादासाची कन्या चंचला हिच्यावर एकलिंगजीचें प्रेम बसलें. दुर्गादास शत्रूचा हेर आहे व चंचलेनेंही त्याच कार्याला वाहून घेतलेलें आहे हें एकलिंगजीला माहीत नव्हतें. चंचला काय किंवा दुर्गादास काय, दोघेंही आपणाप्रमाणेंच मायदेशाच्या मंगलासाठीं झटणारीं आहेत अशी एकलिंगजीची ठाम समजूत असल्यामुळें सुंदर व तरुण चंचलेच्या प्रेमपाशांत सांपडून एकलिंगजी वस्तुतः डोळस असतांही आंधळा प्रेमवेडा बनल्याकारणानें तो कधीं कधीं रंगांत आल्यावर महत्त्वाच्या गुप्त गोष्टीदेखील चंचलेला निवेदन करूं लागला. चंचलेमार्फत त्या दुर्गादासाला व त्याच्या मार्फत अनुराधसिंग वगैरे शत्रूंना कळत असत. बाजीराव पेशवे वेषांतरानें देवदूतसंघाची गुहा सोडून निघाले व मल्हारराव बांडे एकटेच तेथें आहेत ही बातमी एकलिंगजीमार्फत चंचलेला व तिच्यामार्फत दुर्गादासाला कळली. राजकन्या गजराबाईला पकडून ठेवण्याचा शत्रूचा मुख्य डाव असल्याचें दुर्गादासाला माहीत होतें, व तोही त्या दृष्टीनें प्रयत्न करीत होता. त्याला वाटलें कीं, मल्हारराव बांडे जर हातीं सांपडले, तर ते छत्रपतींचे जांवई असल्यानें राजकन्येला पकडल्याचेंच श्रेय जवळजवळ आपल्या पदरीं पडेल. हें कारस्थान बेमालूमपणें तडीला नेण्यासाठीं दुर्गादासानें चंचलेचे कान भरून आपण मुद्दाम घरांतून पाय बाहेर काढला. चंचलेनें त्या दिवशीं एकलिंगजी तिच्या भेटीसाठीं तिच्या घरीं गेला असतां त्याला बाजिरावांचा निकडीचा निरोप म्हणून सज्जनसिंग पाताळकुंडाजवळच्या वास्तव्यस्थानीं संकटांत असल्याचें सांगितलें, व सज्जनसिंगाविषयीं कमालीची कळकळ दाखविली. फार काय, 'एवढें कार्य तुम्हीं पार पाडलें तर मी आजपासून सर्वस्वी तुमची आहें; नाहींपेक्षां मी तुमची कोणी नव्हे व तुम्ही माझे कोणी नव्हे' इतकी भीड एकलिंगजीला घालण्यालाही चंचलेनें कमी केलें नाहीं. एकलिंगजीनें भोळ्या भावानें त्या कुलटेच्या शब्दावर विश्वासून आणि प्रेमाच्या नांवावर विकणाऱ्या विषयवासनेच्या अंमलांत पागल बनलेला प्रत्येक मनुष्य अशा वेळीं आपलें सारें शहाणपण बहुशः झटकून कोळून पितोच !—ती कामगिरी ताबडतोब पार पाडली, व दुर्गादास त्या दिवशीं घरीं नाहीं; अशी संधि पाहून 'मी आजपासून सर्वस्वीं तुमची आहें' या चंचलेच्या प्रेमोद्गारांवर

विश्वासून तो पागल तसाच चंचलेच्या घरीं गेला. परंतु परमेश्वर दुर्गादासाच्या मुखीं उभा राहिला व त्यानें एकलिंगजीचा नैतिक अधःपात टाळून त्याच्या ब्रह्मचर्यव्रताचें रक्षण केलें. एकलिंगजी पूर्णपणें आपल्या कन्येच्या मोहपाशांत सांपडला आहे व आतां तो तिच्या प्राप्तीसाठीं काय पाहिजे तें करण्याला तयार होईल अशी मनाशीं पूर्ण खात्री बाळगून दुर्गादास त्या दिवशीं जो मल्हाररावांना गोत्यांत घालवून माघारा घरीं आला, तो आपलें खरें स्वरूप प्रगट करून एकलिंगजीला म्हणाला कीं, 'मल्हाररावांना पकडण्याच्या कामीं तूं मदत केलीस तशीच राजकन्या, बाजीराव व वनवासी यांनाही पकडण्याच्या कामीं मला मदत कर; तरच चंचला तुझी अर्धांगी होईल. नाहींपेक्षां तूं एक प्रमुख शत्रुपक्षांतील गुप्त क्रांतिकारक म्हणून तुला सुळावर चढावें लागेल'. या दुर्गादासाच्या बोलांनीं एकलिंगजीच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. दुर्गादास हा शत्रुपक्षाचा मनुष्य असून आपणाला आजवर त्यानें आपल्या हातांतील बाहुलें बनविलें याबद्दल त्याला मनांतून मनस्वी चीड आली; पण ही चूक शक्य तों सुधारण्यासाठीं व तिचे भावी दुष्परिणाम टाळण्यासाठीं त्याला प्रथम आपली मुक्तता करून घेणें अवश्य होतें. तेवढ्यापुरती त्यानें दुर्गादासाच्या तोंडावर साखर पेरून आपली मुक्तता करून घेतली, व थोड्याच अवकाशांत प्रथम दुर्गादास आणि चंचला या दोघांनाही मोठ्या शिताफीनें जगांतून नाहींसें करून टाकलें. नंतर लगेच वनवासीचा शोध करून, त्यांच्यापुढें उपस्थित होऊन त्यानें त्यांजपाशीं आपल्या सर्व अन्यायांचा पाढा वाचला.

  

" श्रीमंत ! आतां आपली सर्वांची संशयनिवृत्ति झाली का ? " विक्रमसिंहानें विचारलें.

" होय." बाजीराव उत्तरले.

" आतां एकलिंगजीचा न्याय. श्रीमंतांना देवदूतसंघाची कठोर शिस्त माहीत आहेच ! " विक्रमसिंहानें उद्गार काढले.

" होय " बाजीराव पुन्हा उत्तरले.

" आणि एकलिंगजी ! तूं तर देवदूतसंघाचा एक प्रमुख चालक असल्यानें कनक-कान्तेच्या मोहाला बळी पडणाऱ्या देवदूताला देहान्त शासन देण्याचें कटु कर्तव्य संघाच्या शिस्तीला अनुसरून तूं आजवर अनेकदां पार पाडलें आहेस ! "

" होय ! " एकलिंगजी गद्गद् स्वरांत उद्गारला.

"तर मग जा ! मी तुलाच तुझा न्यायधीश नेमतों. अजूनही तुझ्या प्रामाणिकपणावर माझा विश्वास आहे; पाहूं तूं कसा निःपक्षपातानें न्याय करतोस तो !"

एकलिंगजी यावर कांहीं न बोलतां प्रथम विक्रमसिंहाला व नंतर इतर मंडळीला साष्टांग नमस्कार करून 'मी येतों' असा त्यांचा निरोप घेऊन जड पावलांनीं तेथून निघून गेला. नंतर विक्रमसिंहानें आसनाचा स्वीकार केला.

" विक्रमसिंहजी ! आतां एकलिंगजी काय करील ?" बाजिरावांनीं विचारलें.

" तो आपलें कर्तव्य करील." विक्रमसिंह उत्तरला.

" म्हणजे ?—"

बाजिरावांना पुढें बोलूं न देण्याच्या इराद्यानें, पण त्यांना त्यांत अपमान वाटूं नये इतक्या सौजन्यानें विक्रमसिंह उद्गारला, " श्रीमंत ! देवदूतांचें असिधारा-व्रत देवदूत जाणोत. इतरांनीं त्यांत लक्ष्य घालण्याचें कारण नाहीं." अर्थात् एकलिंगजीनें आत्मशासनार्थ आत्महत्या करावी असा त्याचा उघड अर्थ होता, व त्याची अंमलबजावणी करण्यांत माघार घेणारा एकलिंगजी नव्हता ! तें ओळखून विक्रमसिंह लगेच विषय बदलून इतर गोष्टींविषयीं बोलूं लागला. त्या गोष्टी अर्थात् त्याच्या स्वतःच्या इतक्या दिवसांच्या अज्ञातवासाविषयींच्या होत्या. त्याला ठार करण्याचा डाव शत्रूनें कसा रचिला होता, तो डाव चुकवून त्यानें आपली कशी मुक्तता करून घेतली, इंद्रकुमारीची गणेशतीर्थावर प्रथम भेट झाली तेव्हां दोघांच्याही अंतःकरणाला काय वाटलें, वगैरे वृत्तांत ऐकतांना सारी मंडळी अगदीं देहभान विसरून गेली होती. सज्जनसिंगानेंही त्या भाषणांत बराच भाग घेतला. विक्रमसिंह व वनवासी या दोन्ही व्यक्ति एकच आहेत हें रहस्य सज्जनसिंगाला गणेशतीर्थावर विक्रमसिंहाची प्रथम भेट झाली तेव्हांच कळलें होतें. परंतु विक्रमसिंहाच्या विनंतीवरून त्यानें या वेळेपावेतों तो प्रकार गुप्त ठेवला होता.

गोष्टी बोलतां बोलतां बाजिरावांनीं विक्रमसिंहाला विचारलें, " बरें; विक्रमसिंहजी ! आपला पुढचा विचार काय आहे ? आमचें तर असें मत आहे कीं, आपण मारवाडच्या सिंहासनावर अधिष्ठित होऊन तेथें रामराज्य करावें. आपले मेहुणे अभयसिंगजी या युद्धांत पराजय पावून पळाल्याचें आपणाला माहीत असेलच."

"होय, पण तो प्रश्न यापूर्वीच मिटला आहे. अभयसिंगानें नरसिंगगडावर येऊन आपल्या बहिणीची व माझी मनःपूर्वक क्षमा मागितली व यापुढें रीतीनें वागण्याचें कबूल केलें, आणि आम्ही उभयतांनींही त्याला त्याच्या आजवरच्या सर्व अपराधांबद्दल क्षमा केली आहे. आम्हीं उभयतांनींही देशोद्धारासाठीं एकवार सर्वस्वावर पाणी सोडून हा मार्ग पत्करला; आतां यांतच आमच्या आयुष्याची अखेर व्हावयाची."

"एकूण अजूनही क्रांतिकारकांच्या गुप्त चळवळीवर आपला विश्वास आहे का ?"

विक्रमसिंहानें यापूर्वी बाजिरावांपाशीं या बाबतींत झालेलीं सारीं संभाषणें आठवून उत्तर दिलें, "श्रीमंत ! उत्तरध्रुव व दक्षिणध्रुव एका बिंदूत एकत्र स्थिर झालेले कोणाला कसे पहावयाला सांपडतील ? तेव्हां त्या विषयावर जास्त वादविवाद नको. एवढें खरें कीं, आपले व आमचे देशोद्धाराचे मार्ग भिन्न असले, तरी जोंपर्यंत आपलें व आमचें ध्येय एक आहे तोंवर आपणाला आमचें साह्य पूर्ववत् होईल. त्याविषयीं चिंता करण्याचें कारण नाहीं. या प्रसंगीं यापेक्षां जास्त कांहीं आपणाला सांगण्याची आवश्यकता नसल्यानें मी आपला अमोल वेळ घेऊं इच्छीत नाहीं. मात्र अखेर एवढेंच सांगावयाचें कीं, ज्या अर्थी विक्रमसिंह व वनवासी हे दोघेही एक असल्याचें आतां महशूर झालें आहे, त्या अर्थी विक्रमसिंहाची अवतारसमाप्ति पूर्वीच झाली आहे व वनवासीचा अवतारही आज संपला. यापुढें विक्रमसिंह, वनवासी किंवा इंद्रकुमारी यांपैकीं कोणालाही भेटण्याचा प्रयत्न कोणींही करूं नये, त्यात यश यावयाचें नाहीं."

एवढें सांगून विक्रमसिंह तेथून तडक बाहेर निघून गेला. सर्वजण तो देखावा विस्मयपूर्ण दृष्टीनें पहात होते.

  

पूर्वी सज्जनसिंगाला अनुराधसिंगानें मानभावीपणानें आपल्या भेटीला बोलाविलें होतें; त्याप्रमाणें सज्जनसिंग भदावरच्या राज्यांत गेला. पण केव्हां ? निजाम व पेशवे यांच्यांतील लढ्याचा निकाल लागून अनुराधसिंग त्यांत पराजय पावून तो माघारा आपल्या राज्यात जातांक्षणीं त्याच्या रयतेनें त्याचा सार्वत्रिक निषेध आरंभून त्याला भंडावून तो बाजीराव व सज्जनसिंग यांना शरण आला तेव्हां ! तरी पण सज्जनसिंगानें अनुराधसिंगाच्या अपकारांची फेड उपकारांनीं केली. त्यालाच राज्यावर कायम ठेवून व रयतेंत त्याचा जम पुन्हा नीट बसवून देऊन आपलें

'सज्जन' नांव सार्थ केलें. इतके दिवस संकटांत खितपत पडलेलीं सज्जनसिंगाचीं बायकोमुलें पुन्हा त्याच्या सुखाच्या संसारांत समाविष्ट झालीं हें सांगावयाला नकोच. मात्र कल्याणीला हें रुचलें नाहीं; पण तिच्या-एका यःकश्चित् रक्षेच्या इच्छेला अशा वेळीं काय मोल येणार ?

  

बुंदीचा बुधसिंग पूर्वीपेक्षां जास्त सामर्थ्यवान व लोकप्रिय बनून आपला राज्य कारभार करूं लागला. त्यानें बाजिरावांना हिंदुपदपादशाहीच्या पवित्रतम कार्यांत मनापासून हातभार लावल्यामुळें बाजिरावांनीं संपादन केलेल्या विजयांत त्याचा वांटा होताच. 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानें बुधसिंगाची प्रजाही त्याच्या-सारखीच सुज्ञ होती. ती आपल्या विजयी, न्यायी व तेजस्वी राजाचें निःसीम राजनिष्ठापूर्वक अभीष्ट कां चिंतिणार नाहीं ! आणि बाजीराव पेशवे तरी असल्या जिव्हाळ्याच्या साह्यकर्त्याला कसे विसरतील ?

मात्र जयसिंग, त्याचे ईश्वरसिंग व माधवसिंग हे दोन पुत्र व सभासिंग यांनीं अखेरपावेतों आपलें लपंडावाचें धोरण धूर्तपणानें पूर्ण यशस्वी केलें. निजाम व मराठे यांच्या खडाजंगीच्या वेळीं हे सारे वीर मराठ्यांच्या विरुद्ध रणांगणावर उभे होते. पण ते उभेच होते; ते मराठ्यांवर खरी चढाई करतील तर शपथ ! त्यामुळें मराठ्यांचेंही कार्य झालें व बादशहा आणि निजाम यांनाही त्यांच्या विरुद्ध बोलण्याला जागा उरली नाहीं.

परंतु मराठ्यांच्या या गनिमी काव्याची खरी तारीफ त्या प्रसंगीं कोणीं केली असेल तर ती कालिदासानें ! कारण तो एवढा मोठा कवि ! एवढा मोठा राज-कारणधुरंधर पुरुष ! तरीही त्याच्या डोळ्यांत ज्या मराठ्यांनीं बेमालूमपणें धूळ फेंकण्याला कमी केलें नाहीं, ते-कालिदासाच्या प्रामाणिक व अनुभवसिद्ध मता-प्रमाणें-बादशाही दरबारांतील कार्यकर्त्यांच्या व निजामासारख्याच्या डोळ्यांत सहज जातां जातां धूळ फेंकूं शकतात यांत नवल तें काय ? मात्र हें कालिदासाचें राजकारण आपल्या अंगाशीं आलें असा अनुराधसिंगाचा ग्रह झाल्यामुळें त्यानें त्याला हाकलून लाविलें. पण अनुराधसिंगासारख्या पागल राजेरजवाड्यांना तेव्हां देखील भारतवर्षांत दुष्काळ मुळींच नव्हता. मग कालिदासावर निराश्रित रहाण्या-चा प्रसंग कां येईल !

भवानीराम मात्र खरा मानी-जहरी सर्प खरा. पण तो जातिवंत सर्प होता.

निजामाचा पराजय झाला म्हणून त्याला जितकें वाईट वाटलें नाहीं, तितकें पेशव्यांचा जय झाल्याचें पाहून वाईट वाटलें; व त्याचे हाडवैरी मंडलोई यांचा पुन्हा पूर्ववत् जम बसून अखेर भागाबाई व बालकर्ण यांचा विवाह होण्याला कोणतीच अडचण उरली नाहीं, हें पाहून तर त्याला इतका खेद वाटला कीं, त्या भरांत 'मी या मानवकोटींतून माझ्या शत्रूवर सूड घेण्याला असमर्थ ठरलों, त्या अर्थी आतां मी पिशाच्च बनून त्यांना छळणार, पण छळणार' अशा आसुरी निर्धारानें त्यानें लौकरच एके दिवशीं आत्महत्या करून घेतली !

  

बालकर्ण व भागाबाई, त्याप्रमाणेंच सटवोजी व काशीबाई यांचे पूर्वनियोजित विवाह होण्याला आतां कोणतीच अडचण उरली नव्हती. त्यांचे विवाह लौकरच मोठ्या थाटामाटानें मांडवगडावर पार पडले. बाजिरावांनीं मुद्दाम जाणीव ठेवून त्या विवाहप्रसंगीं बहुमोल आहेर पाठविले होते.

  

हा 'उत्तरदिग्विजय' संपादन केल्यावर पेशव्यांनीं वसईचा धर्मसंग्राम यशस्वितेनें कसा जिंकला, तें वाचकांनीं 'पेशवाईंतील धर्मसंग्राम' या पूर्वीच्या कादंबरींत वाचलेंच आहे. आतां बाजीराव पेशव्यांच्या प्रागतिक व सुधारणाप्रिय आचार-विचारांबद्दल त्यांच्या कुटुंबांतील व इतर मंडळीच्या आकुंचित विचारदृष्टीमुळें त्यांना कसा जाच व मानभंग सोसावा लागला व तशा स्थितींतही त्यांनीं नासीर-जंगावर मोहीम करून त्यांत यश कसें संपादन केलें, त्या सर्व शारीरिक व मानसिक दगदगीचा त्यांच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होऊन मृत्यूला त्यांच्यावर अकालीं झडप घालण्याला कसें फावलें, वगैरे गूढ: रहस्यें अत्यंत मनोवेधकपणें उलगडून दाखविणारी **'पेशवाईवरील गण्डान्तर'** ही प्रस्तुत मालेंतील बारावी कादंबरी यथाकालीं वाचकांच्या हातीं देण्याचें वचन देऊन तूर्त लेखणीला विश्रांति देतों.

इत्यलम्

# अगोदर हें वाचा !

महाराष्ट्राच्या इतिहासांतील पेशवाईच्या उगम-उत्कर्ष-अपकर्षाचा सांगोपांग इतिहास सुलभतेनें आबालवृद्ध महाराष्ट्रवाचकांना अभ्यासितां यावा व बोध आणि मनोरंजन या दोन्ही गोष्टी एकाच वेळीं साध्य व्हाव्या या उद्देशानें महाराष्ट्राचे सुपरिचित व आवडते कादंबरीकार श्री० **विठ्ठल वामन हडप** यांनीं हें 'कादंबरीमय पेशवाई'चें लेखनकार्य अंगिकारलें असून तें एकंदर पंचवीस कादंबऱ्यांत पूर्ण व्हावयाचें आहे. मालेच्या सर्व कादंबऱ्या हीं महाराष्ट्र-वाङ्मयाचीं चिरकालीन भूषणें ( Standard works ) आहेत असें निःसंदिग्ध लोकमत आहे.

**थोरांचें मत**—श्री० नरसिंह चिंतामण केळकर, श्री० श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, श्री० माधव श्रीहरि अणे, श्री० नाम० दादासाहेब खापर्डे, डॉ० मुंजे, 'आनंद'कर्ते कै० आपटे, प्रो० बेहेरे, प्रो० लेलेशास्त्री, प्रो० चापेकर वगैरे सर्वमान्य विद्वानांनीं आणि केसरी, मॉडर्न रिव्ह्यू, मराठा, नवाकाळ, महाराष्ट्र, रत्नाकर वगैरे नियतकालिकांनीं 'कादंबरीमय पेशवाई'मालेंतील कादंबऱ्यांची वेळोवेळीं प्रशंसा केली आहे.

**बोध व मनोरंजन**—'कादंबरीमय पेशवाई'मधील प्रत्येक कादंबरी जितकी मनोरंजक तितकीच उद्‌बोधक व पवित्र अथवा अभिजात असते असें निर्विवाद लोकमत असल्यामुळेंच अबालवृद्ध स्त्री-पुरुष वाचकांनीं या सर्व कादंबऱ्या केवळ वाचणेंच नव्हे तर संग्रहीं ठेवणें अवश्य आहे.

**स्त्रियांसाठीं**—'कादंबरीमय पेशवाई'मधील प्रत्येक कादंबरींत ऐतिहासिक अथवा काल्पनिक स्त्रीभूमिका नैसर्गिक स्त्रीस्वभावाच्या द्योतक, सच्चारित्र्यप्रवर्तक व स्त्रीमानसशास्त्राला अनुलक्षून रंगविलेल्या अतएव आदर्शवत् असतात हा या कादंबऱ्यांचा एक विशेष होय.

**मुलांसाठीं**—'कादंबरीमय पेशवाई'मधील कादंबऱ्या सर्वथैव निर्दोष, सुबोध व मुलांच्या मनांत स्वाभिमान, स्वदेशाभिमान, स्वधर्माभिमान या दिव्य ज्योति उजळविणाऱ्या अशा असतात. महाराष्ट्राच्या इतिहासाचें स्फूर्तिदायक व सत्यज्ञान मुलांनाही या कादंबऱ्यांच्या वाचनानें प्राप्त होतें.

**इतिहासाच्या अभ्यासूंसाठीं**—महाराष्ट्रेतिहासाचें संशोधनकार्य अजून पूर्ण झालेलें नाहीं, सुरू आहे. अशा वेळीं उपलब्ध ऐतिहासिक स्फुट सत्यांची शास्त्रशुद्ध जुळणी करून चिकित्सक पद्धतीनें इतिहास कसा अभ्यासावा हें 'कादंबरीमय पेशवाई'मधील कादंबऱ्यांच्या वाचनानें कळेल; व मराठ्यांच्या इतिहासांतील अनेक महत्त्वाच्या गूढ गोष्टींवर यथावत् नवा संशोधनप्रकाश पाडण्यांत आल्याचें आढळून येईल.

**सर्वसामान्य वाचकांसाठीं**—'कादंबरीमय पेशवाई'मधील कादंबऱ्या गरिबांनादेखील घेतां याव्या यास्तव त्यांच्या किंमती अगदीं माफक व ठराविक अशा ठेवण्यांत येत असतात. साधारणतः दर तीन महिन्यांनीं एक कादंबरी प्रसिद्ध होत असते. प्रत्येक कादंबरी सचित्र, सुबक छापलेली, मजबूत व सुंदर बांधणीची सुमारें ३०० पृष्ठांची अशी असूनही तिची फुटकळ किंमत प्रत्येकीं दीड रुपया असते. कापडी बाइंडिंगच्या व भारी कागदावर छापलेल्या प्रतीला प्रत्येकीं ४८ जास्त पडतात. कोणतीही एक कादंबरी पूर्ण किंमतीला विकत घेऊन 'कादंबरीमय पेशवाई'चे कायम ग्राहक होणारांना पेशवाईवरील पुढील कादंबऱ्या पाऊणपट किंमतीला म्हणजे प्रत्येकीं रु. १८२ मिळतात. ट.खर्च मात्र केव्हांही ग्राहकांनाच सोसावा लागतो.

मात्र ग्राहक झाल्यावर मध्येंच कादंबऱ्या घेण्याचें बंद करण्यांत आल्यास ग्राहकांचें नांव ग्राहकांच्या यादींतून कमी होतें, व त्यांना पुन्हा कायमचे ग्राहक व्हावयाचें झाल्यास नवीन ग्राहकांच्या नियमांप्रमाणें होतां येतें.

# आजवर प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्या

**१. पेशवाईचें पुण्याहवाचन**—जंजिऱ्याच्या सिद्दीच्या अमानुष छळाला विटून बाळाजी विश्वनाथ भट—पुढें पहिले प्रतापशाली पेशवे झाले—यांना कोंकणांतील आपली मायभूमि सोडून व घरादारावर पाणी सोडून देशावर यावें लागलें, तो हृदयंगम कथाभाग प्रस्तुत कादंबरींत आला आहे.

**२. पेशवाईची प्राणप्रतिष्ठा**—शाहूमहाराज बादशहाच्या कैदेंतून सुटून दक्षिणेंत आल्यावर राणी ताराबाई मराठशाहीचीं राज्यसूत्रें हातचीं सोडावयाला

तयार नसतांही बाळाजी विश्वनाथांनीं चतुराईनें शाहूमहाराजांची बाजू राखून त्यांना साताऱ्याची गादी मिळवून दिली व महाराजांचे ते प्यार होऊन बसले. हा हृदयंगम वृत्तान्त प्रस्तुत कादंबरींत आला आहे.

**३. पेशवाईचें ध्रुवदर्शन**—बाळाजी विश्वनाथांचा उत्कर्ष सेनापति चंद्रसेन जाधवाला सहन न झाल्यानें त्यानें हरणाच्या शिकारीबाबतच्या क्षुल्लक कारणावरून त्यांच्याशीं युद्ध मांडलें. त्या युद्धांत बाळाजी विश्वनाथांनीं चंद्रसेनाचा पाडाव करून मराठशाहीची बाजू चांगलीच राखली, व महाराजांनीं त्यांच्या कर्तबगारीवर प्रसन्न होऊन त्यांस पेशवाईचीं वस्त्रें अर्पण केलीं, हा हृदयंगम कथाभाग प्रस्तुत कादंबरींत वर्णन करण्यांत आला आहे.

**४. पेशवाईचा ध्रुव ढळला?**—बाळाजी विश्वनाथ पेशव्यांनीं दिल्लीवर स्वारी करून शाहूमहाराजांच्या राण्या बादशाही कैदेंतून सोडवून आणल्या व बादशहाला नमवून महाराजांच्या नांवानें बादशहाकडून स्वराज्य-चौथाई-सरदेशमुखीच्या 'सनदाही मिळवून आणल्या. त्या तेजस्वी प्रसंगाचें सुंदर वर्णन या कादंबरींत करण्यांत आलें आहे.

**५. पेशवाईचा पुनर्जन्म**—बाळाजी विश्वनाथांच्या निधनानंतर थोरल्या बाजिरावांना पेशवाईचीं वस्त्रें प्राप्त होण्याच्या कामीं त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांकडून कसकसे अडथळे आले, व त्या सर्व अडथळ्यांना बाजूला सारून महाराजांची आपल्या प्रामाणिकपणाविषयीं व कर्तबगारीविषयीं खात्री पटवून बाजिरावांनीं पेशवाईचीं वस्त्रें कशीं मिळविलीं, हा मनोरम कथाभाग प्रस्तुत कादंबरींत आला आहे.

**६. पेशवाईचें पुनर्वैभव**— महंमदखान बंगषानें बुंदेलखंडच्या छत्रसाल राजावर स्वारी केली तेव्हां त्याच्या विनंतीवरून बाजीराव पेशव्यांनीं त्याच्या साह्यार्थ धांवून जाऊन बंगषाचा पाडाव केला; व त्याच प्रसंगीं बाजिरावांना त्रिभुवनसुंदर मस्तानीची धर्मविवाहविधिपूर्वक प्राप्ति झाली, या प्रसंगावर प्रस्तुत कादंबरी विरचिली गेली आहे.

**७. पेशवाईचा दरारा**—कोल्हापूरचा नवता सुभा ताराबाईनें स्थापन केल्यापासून सातारा व कोल्हापूर एथील गाद्यांबाबत एकसारखे तंटे सुरूच होते. अखेर कोल्हापूरकर संभाजीराजानीं साताऱ्याची गादी नामशेष करण्याचा डाव कसा रचिला होता व तो बाजिरावांनीं कुशलतापूर्वक समूळ हाणून पाडून मराठ-

शाहीवरील संकट कसें टाळलें, याचें परिणामकारक व मनोवेधक शब्दचित्र ह्या कादंबरींत रेखाटण्यांत आलें आहे.

८. **पेशवाईतील दुर्जन**—शाहूमहाराजांचे सेनापति त्रिंबकराव दाभाडे यांना बाजिरावांचा वाढता उत्कर्ष व दरारा सहन न होऊन त्यांनीं बाजिरावांशीं उघड उघड वैर मांडलें; त्यांचें पारिपत्य बाजिरावांनीं डभईच्या लढाईंत केलें व त्यांतच दाभाड्यांचा अंत झाला. या हृदयस्पर्शी कथानकावर या कादंबरीची उभारणी करण्यांत आली आहे.

९. **पेशवाईतील पश्चिमदिग्विजय**—जंजिऱ्याचा सिद्दीसात फार मदांधपणें वागत होता; त्याचें बाजिरावांनीं पारिपत्य करून हिंदुधर्माचें व त्या प्रांतीं हिंदवी स्वराज्याचें कसें रक्षण केलें, हा रमणीय कथाभाग प्रस्तुत कादंबरींत आला आहे.

१०. **पेशवाईतील धर्मसंग्राम**—जगप्रसिद्ध वसईच्या वेढ्यांतील पोर्तुगीज व मराठे यांच्या भीषण झगड्यांत मराठ्यांनीं—विशेषतः चिमाजीअप्पांनीं अद्वितीय मर्दुमकी गाजवून बलाढ्य पोर्तुगीजांना कसें शरण आणलें व त्यांच्याकडून हिंदूंचा होणारा अमानुष धर्मछल कसा थांबविला, याचें चित्तवृत्ति थरारून सोडणारें वर्णन ह्या कादंबरींत वाचावयास मिळेल.

११. **पेशवाईतील उत्तर दिग्विजय**—हिंदुस्थानावर राज्य मराठे किंवा मुसलमान यांपैकीं कोणीं करावें हें निश्चित ठरविणाऱ्या बाजीराव पेशवे व निजाम यांमधील भोपाळच्या दारुण संग्रामाच्या मध्यवर्ति कल्पनेवर ह्या कथानकाची उभारणी करण्यांत आली आहे.

**अशा एकंदर सुमारें पंचवीस कादंबऱ्या ‘ कादंबरीमय पेशवाई’मधून प्रसिद्ध व्हावयाच्या आहेत. तरी सर्वांनीं ह्या मालेचे ग्राहक होऊन हीं वाङ्मयाचीं बहुमोल भूषणें अवश्य आपल्या पदरीं ठेवावीं ही विनंति.**

प्रकाशक—**परचुरे, पुराणिक** आणि **मंडळी,**

**बुकसेलर्स व पब्लिशर्स, मुंबई नं. ४.**